# महात्माजींचे सत्याचे प्रयोग

अथवा

# आ त्म क था

अनुवादक

सीताराम पुरुषोत्तम पटवर्धन

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : पुष्प १–२

# महात्माजींचे सत्याचे प्रयोग

अथवा

# आ त्म क था

अनुवादक

सीताराम पुरुषोत्तम पटवर्धन




जानेवारी, १९५१ ] [ मूल्य ९ रुपये

# या आवृत्तीविषयीं

महात्माजींच्या 'आत्मकथे'ची ही नवी आवृत्ति बऱ्याच कालावधीनंतर प्रकाशित होत आहे. मध्यंतरींच्या तीन वर्षांत या पुस्तकास मोठ्या प्रमाणावर मागणी असूनहि अनेक अडचणींमुळें आम्ही ती पूर्ण करूं शकलों नाहीं, याचें वाईट वाटतें.

आतां नव्या स्वरूपांत ही आवृत्ति महाराष्ट्रीय वाचकांना आम्ही सादर करीत आहोंत. आतांपर्यंत दोन स्वतंत्र खंडांतून प्रस्तुत पुस्तकाचें प्रकाशन झालेलें असून प्रथम खंडाची तृतीयावृत्ति आणि द्वितीय खंडाची द्वितीयावृत्ति संपलेली आहे. आतां या नव्या आवृत्तींत पूर्वींचे ते दोन्ही खंड एकत्रित केलेले असून पुस्तकाचा आकारहि (डेमी) बदलला आहे. या सर्व गोष्टींमुळें वाचकांची चांगली सोय होईल, अशी आशा वाटते.

महाराष्ट्रीय वाचकवर्ग पूर्वींप्रमाणेंच याहि आवृत्तीचा यथायोग्य परामर्श घेईल, असा भरंवसा आहे.

—प्रकाशक

# प्रस्तावना

चार किंवा पांच वर्षांपूर्वी निकटच्या सहकाऱ्यांच्या आग्रहावरून मीं आत्मकथा लिहिण्याचें मान्य केलें होतें; आणि आरंभहि केला. परंतु फूलस्केपचें एक पान लिहितों न लिहितों इतक्यांत मुंबईची आग[1] भडकली आणि मीं हातीं घेतलेलें काम अर्धवट राहून गेलें. त्यानंतर तर मी एकामागून एक अशा व्यवसायांत पडलों, कीं शेवटीं मला माझें येरवड्याचें स्थान मिळालें. तेथें भाई जयरामदासहि[2] होते. त्यांनीं माझ्यापाशीं अशी मागणी केली, कीं बाकीचीं सर्व कामें बाजूला सारून मीं पहिल्यानें आत्मकथा लिहून टाकावी. त्यांना जबाब पाठविला, कीं माझा अभ्यासक्रम ठरून चुकला आहे आणि तो पुरा होईपर्यंत मी आत्मकथेला प्रारंभ करूं शकत नाहीं. मला जर माझी शिक्षेची पूर्ण मुदत येरवड्यामध्येंच घालविण्याचें सद्भाग्य लाभलें असतें, तर मी खात्रीनें तेथेंच आत्मकथा लिहूं शकलों असतों. परंतु आत्मकथेला सुरुवात करण्यासच मला अजून एक वर्ष पाहिजे होतें. त्यापूर्वीं मला कोणत्याहि तऱ्हेनें आत्मकथेचा आरंभहि करणें शक्य नव्हतें. अर्थात् आत्मकथा राहून गेली. आतां स्वामी आनंदांनीं[3] फिरून पुन्हां तीच मागणी केली आहे, व मींहि 'दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहा'चा इतिहास पुरा केला असल्यामुळें आत्मकथा लिहावीसें वाटूं लागलें आहे. स्वामींची मागणी तर अशी होती, कीं मीं सबंध कथा लिहून काढावी आणि नंतर ती पुस्तकरूपानें छापावी. परंतु माझ्यापाशीं लागोलाग एवढा वेळ नाहीं. लिहावयाचेंच तर 'नवजीवन'-साठींच लिहितां येणार. मला 'नवजीवन'साठीं कांहीं तरी लिहावयाचें असतेंच. मग आत्मकथाच कां लिहूं नये? स्वामींनीं हा बेत मान्य केला. अशा तऱ्हेनें आत्मकथा लिहिण्याचा आतां योग आला आहे.

परंतु हा बेत करतों, इतक्यांत एका निर्मळ अंतःकरणाच्या मित्रानें सोमवारीं माझें मौन[4] चालूं असतांना सौम्य शब्दांमध्यें मला म्हटलें:—

" तुम्ही आत्मकथा काय योजून लिहिणार आहां ? ही तर पश्चिमची पद्धत

१ नोव्हेंबर १९२१ मध्यें प्रिन्स ऑफ वेल्सच्या आगमनप्रसंगीं मुंबई शहरीं झालेले दंगे. हे थांबेपर्यंत गांधीजींनीं अन्न वर्ज्य केलें होतें.

२ सिंधचे पुढारी श्री. जयरामदास दौलतराम.

३ गांधीजींच्या वर्तमानपत्रांचे मुद्रक, प्रकाशक व व्यवस्थापक. गांधीजींचे एक निकटचे अनुयायी.

४ दर सोमवारीं गांधीजी चोवीस तास मौन पाळतात.

आहे. पूर्वेमध्यें लिहिलेली ऐकिवांत नाहीं. आणि लिहिणार तरी काय? आज ज्या गोष्टी सिद्धान्त म्हणून तुम्ही मानीत आहां, त्या उद्यां मानीतनासे झालां तर? अथवा सिद्धान्तांना अनुसरून जीं जीं कामें तुम्ही करीत आहां, त्यांत मागून फेरफार केलेत तर? पुष्कळ लोक तुमच्या लिखाणाला प्रमाणभूत मानून स्वतःचें वर्तन ठरवीत असतात, त्यांची दिशाभूल झाली तर? म्हणून सावध राहून तूर्त आत्मकथेसारखें कांहीं एक लिहिलें नाहींत, तर बरें नाहीं का?"

या युक्तिवादाचा माझ्या मनावर थोडाबहुत परिणाम झाला. परंतु मला आत्मकथा थोडीच लिहावयाची आहे! मला तर आत्मकथेच्या नांवाखालीं सत्याचे जे अनेक प्रयोग मीं केले आहेत, त्यांची हकिकत लिहावयाची आहे. त्या प्रयोगांमध्यें माझें जीवन गुरफटलेलें असल्यामुळें ती हकिकत एकाद्या जीवन-वृत्तान्ताप्रमाणें होऊन जाईल ही गोष्ट खरी; परंतु जर तिच्या प्रत्येक पानांतून माझे प्रयोगच प्रकट होत राहिले, तर त्या कथेला मी स्वतः निर्दोष समजेन. माझ्या सर्व प्रयोगांची मालिका लोकांसमोर राहिली तर ती लाभदायी होऊन राहील, असें मला वाटतें—किंवा असा मला मोह वाटतो म्हणाना! राजकीय क्षेत्रांतील माझे प्रयोग आतां हिंदुस्थानच्या माहितीचे झाले आहेत; एवढेंच नव्हे, तर थोड्याबहुत अंशानें ज्याला "सुधारलेलें" जग म्हणण्याची वहिवाट आहे, त्याच्याहि माहितीचे आहेत. माझ्या मतें त्या प्रयोगांची किंमत अल्पांत अल्प आहे, व म्हणूनच त्या प्रयोगांमुळें मला जी 'महात्मा' पदवी मिळाली आहे, तिचीहि किंमत अल्प आहे. कित्येक वेळां त्या विशेषणानें मला अतिशय दुःखहि दिलें आहे. त्या विशेषणानें मी फुशारलों असेन, असा एकहि क्षण मला आठवत नाहीं. पण माझे आध्यात्मिक प्रयोग, कीं जे माझा मीच जाणूं शकणार, आणि ज्यांतूनच माझी राजकीय क्षेत्रांतील शक्तीहि उद्भवलेली आहे, त्या प्रयोगांचें वर्णन करून सांगणें मला आवडेल खरें. जर हे प्रयोग खरोखर आध्यात्मिकच असतील, तर त्यांमध्यें फुशारकीला जागाच नाहीं. त्यांपासून केवळ नम्रतेचीच वृद्धि होईल. जसजसा मी विचार करूं लागतों, माझ्या भूतकालीन जीवनावर दृष्टि टाकीत जातों, तसतसें माझें अल्पत्व मला स्पष्टपणें दिसून येतें. मला जें करावयाचें आहे, ज्याच्यासाठीं आज तीस वर्षें माझी धडपड चालली आहे, तें तर आत्मदर्शन, ईश्वराचा साक्षात्कार, - मोक्ष हेंच होय. माझी सर्व हालचाल याच दृष्टीनें होत असते. माझें लिखाण सर्व याच दृष्टीनें चालतें, आणि राजकीय चळवळींतहि मी मनोभावानें पडतों, तेंहि याचसाठीं.

परंतु पहिल्यापासूनच माझें असें मत आहे, कीं जें एकाला शक्य आहे तें सर्वांना शक्य आहे. त्यामुळें माझे प्रयोग खाजगी म्हणून झालेले नाहींत, खाजगी राहिलेलेहि नाहींत. ते सर्वांनीं पाहिले म्हणून त्यांची आध्यात्मिकता कमी होत

असेल असें मला वाटत नाहीं. अलबत, अशा कित्येक गोष्टी असतात कीं ज्या आत्म्यालाच समजणार, आत्म्यांतच अंतर्धान पावणार. अशा गोष्टींचें वर्णन माझ्या शक्तीपलीकडचें आहे. माझ्या प्रयोगांमध्यें तरी आध्यात्मिक म्हणजे नैतिक, धर्म म्हणजे नीति, आत्म्याच्या दृष्टीनें पाळावयाची नीति तो धर्म. अर्थात् ज्या गोष्टींचा निर्णय बालक, तरुण व वृद्ध करतात व करूं शकतात, अशा गोष्टींचाच समावेश या कथेमध्यें होईल. असली कथा जर मला तटस्थपणें, निरभिमानवृत्तीनें लिहितां आली, तर त्यापासून तसलेच प्रयोग करणाऱ्या इतर लोकांना थोडीबहुत सामग्री मिळूं शकेल.

माझे प्रयोग कोणत्याहि प्रकारें संपूर्ण आहेत, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. एकादा शास्त्रज्ञ ज्याप्रमाणें आपले प्रयोग अतिशय पद्धतशीर रीतीनें विचारपूर्वक व सूक्ष्मपणें करीत असूनहि, त्यांपासून काढलेलीं अनुमानें अखेरचीं आहेत असें लोकांना सांगत नाहीं, किंवा त्या प्रयोगांचे हेच निर्विवाद परिणाम आहेत किंवा नाहींत याबद्दल तो साशंक नसला तरी तटस्थ राहतो, तशाच तऱ्हेचें माझेंहि माझ्या प्रयोगांसंबंधीं म्हणणें आहे. मीं खूप आत्मनिरीक्षण केलें आहे; एकन् एक भावना तपासली आहे, तिचें पृथक्करण केलें आहे; परंतु त्यावरून निघालेलीं अनुमानें सर्वांच्याच बाबतींत अखेरचीं आहेत, किंवा खरीं आहेत, किंवा तीं तेवढींच खरीं, असा माझा मुळींच आग्रह नाहीं. हो, एवढें मात्र मी अवश्य म्हणतों, कीं माझ्या दृष्टीनें तीं खरीं आहेत आणि तूर्त तरी अखेरचींशीं वाटतात. तशीं तीं वाटत नसतील, तर त्यांच्या आधारावर मीं कोणत्याहि कामाची उभारणी करतां कामा नये. परंतु मी तर पावलोपावलीं ज्या ज्या गोष्टी समोर येतील त्यांचें त्याज्य आणि ग्राह्य असे दोन वर्ग पाडतों आणि ग्राह्य मानलेल्या गोष्टींस अनुरूप असें स्वतःचें वर्तन निश्चित करतों. आणि अशा तऱ्हेनें ठरविलेल्या आचरणापासून जोंपर्यंत माझें, म्हणजे माझ्या बुद्धीचें आणि आत्म्याचें समाधान होत असेल, तोंपर्यंत मला त्याच्या शुभ परिणामाबद्दल अचलित विश्वास राखलाच पाहिजे.

जर मला केवळ सिद्धान्तांचें म्हणजे तत्त्वांचेंच वर्णन करावयाचें असेल, तर मी ही आत्मकथा लिहिणारच नाहीं. परंतु मला तर त्या सिद्धान्तावर रचलेल्या कार्यांचा इतिहास द्यावयाचा आहे; व म्हणूनच या प्रयत्नाला पहिलें नांव मीं 'सत्याचे प्रयोग' असें दिलें आहे. यांमध्यें अहिंसा, ब्रह्मचर्य इत्यादि नियमांचेहि प्रयोग येऊन जातील. हे नियम सत्याहून भिन्न समजले जातात; परंतु माझ्या मतें सत्यच सर्वश्रेष्ठ आहे, आणि त्यामध्येंच अगणित वस्तूंचा समावेश होऊन जातो. हें सत्य म्हणजे स्थूल—वाचिक—सत्य नव्हे; तर जसें वाचेचें, तसें विचाराचेंहि. हें सत्य म्हणजे आपण कल्पिलेलें सत्य तेवढेंच नव्हे; तर स्वतंत्र, शाश्वत सत्य; म्हणजे परमेश्वरच.

परमेश्वराच्या व्याख्या अगणित आहेत. कारण त्याच्या विभूतीहि अगणित आहेत. या विभूती मला आश्चर्यचकित करून टाकतात, क्षणभर मुग्धहि करतात. परंतु मी सत्यस्वरूपी परमेश्वराचाच पुजारी आहें. तो एकच सत्य आहे, आणि बाकी सारें मिथ्या आहे. तें सत्य मला सांपडलेलें नाहीं. मी त्याच्या शोधांत आहें. त्याच्या शोधार्थ मला सर्वांत प्रिय असलेल्या वस्तूचाहि त्याग करण्यास मी तयार आहें. या शोधरूपी यज्ञामध्यें या शरीराचाहि होम करण्याची माझी तयारी आहे, आणि शक्तीहि आहे असा मला विश्वास वाटतो. परंतु जोंपर्यंत मला त्या सत्याचा साक्षात्कार झाला नाहीं, तोंपर्यंत माझ्या अंतरात्म्याला जें सत्यसें वाटतें त्या काल्पनिक सत्यालाच माझा आधार समजून, त्याच्याच खुणेचा दिवा करून, त्याच्या आश्रयानें मी माझें जीवन व्यतीत करीत आहें.

हा मार्ग जरी वस्तऱ्याच्या धारेवर चालण्यासारखा आहे, तरी तो मला सोप्यांत सोपा वाटला आहे. या मार्गानें जातांना झालेल्या भयंकर चुकाहि मला क्षुल्लकशा वाटल्या आहेत. कारण त्या चुका करीत असतांहि मी बचावून गेलों आहे आणि माझ्या समजुतीनें प्रगतीहि केली आहे. दुरून दुरून विशुद्ध सत्याचें–ईश्वराचें–अंधुक दर्शनहि करूं लागलों आहें. सत्यच काय तें आहे; त्याशिवाय या जगांत दुसरें कांहींहि नाहीं, असा माझा विश्वास दिवसेंदिवस बळावत जात आहे. हा विश्वास कशानें वाढत गेला, तें माझें जग–म्हणजे 'नवजीवन' इत्यादींचे वाचक–समजून घेऊन त्या प्रयोगांमध्यें सामील होतील व माझ्याप्रमाणें ईश्वराचें दर्शन करतील, तर तें इष्टच आहे. शिवाय, माझ्या बाबतींत जें शक्य आहे तें एकाद्या बालकाच्या बाबतींतहि शक्य आहे, हा माझा विश्वास उत्तरोत्तर वाढतच आला आहे, आणि तसें वाटण्यास माझ्यापाशीं सबळ कारणेंहि आहेत. सत्याच्या शोधाचीं साधनें जितकीं कठिण तितकींच सोपींहि आहेत. तीं एकाद्या अभिमानी इसमाला अशक्यशीं वाटतील आणि एकाद्या निष्पाप बालकाला अगदीं संभवनीय वाटतील. सत्याच्या शोधकाला रजःकणापेक्षांहि तुच्छ बनावें लागतें. सर्व जग रजःकणाला चिरडीत असतें; परंतु सत्याचा पुजारी तर रजःकणसुद्धां त्याला चिरडूं शकेल इतका अल्प बनणार नाहीं, तोंपर्यंत त्याला निरपेक्ष सत्याचें किंचिन्मात्र दर्शनहि दुर्लभ आहे. ही गोष्ट वसिष्ठ-विश्वामित्रांच्या आख्यानांत स्पष्ट करून दाखविलेली आहे. ख्रिस्ती व इस्लामी धर्महि हीच गोष्ट शाबीत करतात.

मी जीं प्रकरणें लिहिणार आहें, त्यांत जर वाचकाला अभिमानाचा भास झाला, तर त्यानें खुशाल समजावें, कीं माझ्या शोधांत कांहीं तरी न्यून आहे, आणि माझा साक्षात्कार मृगजलवत् आहे. माझ्यासारख्या अनेकांचा क्षय झाला तरी फिकीर नाहीं, परंतु सत्याचा जय होवो! अल्पात्म्याचें माप काढण्यासाठीं सत्याचा गज कधींहि आंखूड न होवो!

माझे लेख कोणी प्रमाणभूत मानूं नयेत, अशी माझी इच्छा आहे— अशी माझी विनंति आहे. त्यांत दर्शविलेल्या प्रयोगांना दृष्टान्तरूप समजून सर्वांनीं आपापले प्रयोग यथाशक्ति आणि यथामति करावे, एवढीच माझी इच्छा आहे. या मर्यादित क्षेत्रामध्येंहि लोकांना माझ्या आत्मकथेच्या लेखांचा पुष्कळ उपयोग होऊं शकेल असा मला विश्वास वाटतो. कारण कीं सांगण्यालायक एकहि गोष्ट मी छंपविणार नाहीं. माझ्या दोषांची जाणीव वाचकांस परिपूर्ण करून देण्याची मला उमेद आहे. मला फक्त सत्याचे शास्त्रीय प्रयोग वर्णावयाचे आहेत; मी कसा देखणा आहें, तें सांगत बसण्याची तिळमात्र इच्छा नाहीं. ज्या मापानें स्वतःला मोजण्याची माझी इच्छा आहे, आणि जें माप आपण सर्वांनीं आपापल्याला लावलें पाहिजे, त्याप्रमाणें तर मी निःशंकपणें म्हणेन कीं,

मो सम कौन कुटिल खल कामी ?
जिन तनु दियो ताहि बिसरायो
ऐसो निमकहरामी ॥

कारण कीं ज्याला मी संपूर्ण श्रद्धापूर्वक माझ्या श्वासोच्छ्वासाचा स्वामी समजतों, ज्याला मी माझ्या निमकाचा दाता मानतों, त्याच्यापासून अजूनहि मी दूर आहें, ही गोष्ट मला क्षणोक्षणीं सलते. त्याला कारणीभूत असलेले माझे विकार मी पाहूं शकतों. परंतु त्यांना अजूनहि बाहेर मात्र काढून लावूं शकत नाहीं.

परंतु तूर्त एवढें पुरें. प्रस्तावनेंतून प्रयोगांच्या वर्णनांत शिरणें बरें नाहीं. तें कथेच्या प्रकरणांमध्येंच सांपडेल.

आश्रम, साबरमती
मार्गशीर्ष शु. ११, संवत् १९८२

— मोहनदास करमचंद गांधी

*

# अनुक्रमणिका

## खंड १ ला



## खंड २ रा

## खंड ३ रा

## खंड ४ था

## खंड ५ वा

परिशिष्टें

१

# जन्म

गांधी-कुटुंब प्रथम तरी किराण्या मालाचा व्यापार करणारें असावें असें समजतें. परंतु माझ्या आजोबांपासून गेल्या तीन पिढ्या तें राज्यकारभार करीत आलें आहे. उत्तमचंद गांधी उर्फ ओता गांधी दृढनिश्चयी असावेत असें दिसतें. राज्यप्रकरणीं लटपटीमुळें त्यांना पोरबंदर सोडावें लागलें व त्यांनीं जुनागडच्या राज्याचा आश्रय घेतला. त्यांनीं नबाबसाहेबांना डाव्या हातानें सलाम केला, या उघड दिसणाऱ्या अविनयाचें कोणीं कारण विचारलें तेव्हां जबाब मिळाला, "उजवा हात तर पोरबंदरला देऊन चुकलों आहें."

ओता गांधींचीं एकामागून एक दोन कुटुंबें झालीं. पहिल्याचे त्यांना चार मुलगे होते आणि दुसऱ्याचे दोन. बालपणची आठवण करतां ते बंधू सावत्र असावेत अशा तऱ्हेची कल्पनाहि मला होत नाहीं. त्यांपैकीं पांचवे करमचंद उर्फ कबा गांधी व शेवटचे तुलसीदास गांधी. उभयतां बंधूंनीं आळीपाळीनें पोरबंदरमध्यें कारभाऱ्याचें काम केलें. कबा गांधी हे माझे वडील. पोरबंदरची दिवाणगिरी सोडल्यानंतर ते राजस्थानी कोर्टांत सभासद होते. नंतर राजकोटला व कांहीं काळ वांकानेरला दिवाण होते व मृत्युसमयीं राजकोट-दरबारचे पेन्शनर होते.

कबा गांधींचींहि एकामागून एक चार कुटुंबें झालीं. पहिल्या दोहोंपासून दोन मुली झाल्या. शेवटच्या पुतळीबाईपासून एक मुलगी व तीन मुलगे. त्यांतला सर्वांत धाकटा मी.

वडील कुटुंबप्रेमी, सत्यप्रिय, धीट, उदार पण रागीट असे होते. कांहीं अंशीं विषयासक्तहि असावेत. त्यांचा शेवटचा विवाह चाळिसाव्या वर्षानंतर झाला होता. ते लांचेपासून दूर पळत, त्यामुळें शुद्ध न्याय देत अशी आमच्या कुटुंबांत व

बाहेरहि बोलवा होती. सरकारशीं ते अत्यंत राजनिष्ठ असत. एकदां प्रांताच्या एका साहेबानें राजकोटच्या ठाकूरसाहेबांचा अपमान केला. त्याबद्दल ते त्याच्याशीं भांडले. साहेब संतापले. कबा गांधींना माफी मागण्यास फर्माविलें. त्यांनीं माफी मागण्याचें नाकारलें व त्यापायीं कांहीं तास अटकेंतहि राहिले; परंतु ते डगमगले नाहींत. त्यामुळें अखेरीस त्यांना साहेबानें सोडून देण्याचा हुकूम केला.

वडिलांनीं द्रव्यसंचय करण्याचा लोभ कधींच धरला नव्हता; त्यामुळें आम्हां भावांसाठीं ते थोडकीच मिळकत ठेवून गेले.

वडिलांचें शिक्षण केवळ अनुभवजन्य होतें. ज्याला आपण आज गुजराथी पांचव्या इयत्तेचें शिक्षण म्हणूं, तेवढें शिक्षण त्यांचें झालें असेल. इतिहास-भूगोलाचें ज्ञान तर विचारावयालाच नको. असें असूनहि व्यवहारज्ञान इतक्या उच्च दर्जाचें होतें, कीं सूक्ष्मांत सूक्ष्म प्रश्नाचा उलगडा करण्यांत किंवा हजार माणसांपासून काम घेण्यास त्यांना अडचण पडत नसे. धार्मिक शिक्षण नाहींसारखेंच. परंतु देवळांत जाण्यानें कथा वगैरे ऐकून जें धर्मज्ञान असंख्य हिंदूंना सहजीं मिळत असतें, तें त्यांना होतें. एक विद्वान् ब्राह्मण आमच्या कुटुंबाचे मित्र होते. त्याच्या सल्ल्यावरून शेवटच्या वर्षांत त्यांनीं गीतापाठ सुरू केला होता, आणि रोज पूजेच्या वेळीं थोडे-बहुत श्लोक ते मोठ्यानें पठण करीत असत.

आई साध्वी स्त्री होती, अशी माझ्या मनावर छाप राहिलेली आहे. ती फार भाविक होती. पूजापाठ केल्याशिवाय कधीं जेवण नाहीं. हवेलींत* नित्यनेमानें जायची. मला समजूं लागलें तेव्हांपासून तिनें कधीं चातुर्मास्य व्रतवैकल्याखेरीज रितें दवडलेलें मला स्मरत नाहीं. ती कठिणांत कठिण व्रत घेई आणि निर्विघ्नपणें पार पाडी. घेतलेलीं व्रतें आजारी पडली तरी सोडायची नाहीं. मला असा एक प्रसंग स्मरतो, कीं तिनें चांद्रायण-व्रत केलें. त्यामध्यें आजारी पडली. परंतु व्रत भंगूं दिलें नाहीं. चातुर्मास्यांत एकभुक्त राहणें यांत तर तिला विशेषसें कांहीं वाटेच ना. एवढ्यानें संतोष न मानतां एका चातुर्मास्यांत तिनें एक दिवसाआड जेवण्याचा नियम केला होता. लागोपाठ दोन-तीन उपास म्हणजे तर तिला कांहींच नाहींसें वाटे. एका चातुर्मास्यांत तिचें असें व्रत होतें कीं सूर्यनारायणाचें दर्शन करून नंतरच जेवावयाचें. त्या पावसाळ्यांत आम्ही मुलें ढगांकडे डोळे लावून पहात रहात असूं, कीं केव्हां सूर्य दिसतो आणि आई जेवते. पावसाळ्यांत पुष्कळ वेळां दर्शन दुर्मीळ होत असतें, हें सर्वांना माहीतच आहे. असेहि दिवस स्मरतात, कीं ज्या दिवशीं आम्ही सूर्य पहावा, "आई, आई, सूर्य दिसला" असें ओरडावें, आणि आई घाईघाईनें येते तों सूर्यानें दडी मारावी! "त्याचें काय मोठें? आज नशिबांत जेवायचें नसेल!" असें म्हणून ती परत वळे आणि स्वतःच्या कामांत दंग होऊन जाई.

* गुजराथेंतील वैष्णवांच्या देवालयास 'हवेली' म्हणतात.

आई व्यवहारकुशल होती. दरबारच्या सर्व गोष्टी तिला समजत. राजस्त्रियांमध्यें तिच्या बुद्धीबद्दल बहुमान असे. मी लहान म्हणून कधीं कधीं आई मला राजवाड्यांत आपल्याबरोबर घेऊन जाई. त्यावेळीं "आजीसाहेबां"बरोबर चालणारे कित्येक संवाद मला अजून आठवतात.

या आईबापांच्या घरीं मी संवत् १९२५ च्या भाद्रपद वद्य द्वादशीच्या दिवशीं म्हणजे सन १८६९ च्या ऑक्टोबरच्या २ तारखेला पोरबंदर अथवा सुदामपुरी येथें जन्म पावलों.

बालपण पोरबंदरांतच गेलें. कोठल्याशा शाळेंत मला घातलें होतें असें आठवतें. कसेबसे कांहीं पाढे शिकलों. त्या वेळीं मुलांबरोबर मी पंतोजींना मात्र शिव्या देण्यास शिकलों होतों, एवढी आठवण आहे; दुसरें कांहींएक आठवत नाहीं. त्यावरून मी अनुमान करतों, कीं माझी बुद्धि मंद असावी, आणि स्मरणशक्ति आम्ही पोरें एक कडवें गात असूं त्यांतल्या कच्च्या पापडासारखी असावी. ते चरण तर मला दिलेच पाहिजेत:

एकड एक, पापडशेक
पापड कच्चो.—* मारो—

पहिल्या रिकाम्या जागीं मास्तराचें नांव असायचें. त्याला मी अमर करूं इच्छीत नाहीं. दुसऱ्या रिकाम्या जागीं दिलेली शिवी भरण्याचें प्रयोजन नाहीं.

● ● ●

## २

# बालपण

पोरबंदरहून वडील राजस्थानी कोर्टाचे सभासद होऊन राजकोटला गेले, तेव्हां माझें वय सात एक वर्षांचें असावें. मला राजकोटच्या गांवठी शाळेंत घातलें. या शाळेंतील दिवस मला चांगले आठवतात. पंतोजींचीं नांवें वगैरेहि आठवतात. पोरबंदरप्रमाणेंच येथीलहि अभ्यासासंबंधीं सांगण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. माझी गणना सामान्य दर्जाच्या विद्यार्थ्यांत तरी होत असेल की नाहीं याबद्दल शंकाच. गांवठी शाळेंतून मुख्य शाळेंत व तेथून हायस्कुलांत, येथपर्यंत पोंचेतों माझ्या वयाला बारा वर्षें होऊन गेलीं. तोंपर्यंत मी कधींहि शिक्षकांशीं लबाडी केल्याचें किंवा कोणाशीं मैत्री जोडल्याचें स्मरत नाहीं. मी अतिशय भिडस्त मुलगा होतों. शाळेंत माझें काम बरें कीं मी बरा. घंटा वाजण्याच्या सुमारास पोंचायचें आणि शाळा बंद होतां क्षणीं घरीं पळायचें. 'पळायचें' हा शब्द इरादापूर्वक लिहिला आहे. कारण

* माझा.

कोणाबरोबर बोलत राहणें मला आवडत नसे. ‘ कोणी माझी थट्टा केली तर ’ अशी भीतीहि वाटे.

हायस्कुलांतील पहिल्याच वर्षी परीक्षेच्या प्रसंगीं घडलेली एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. शाळाखात्याचे इन्स्पेक्टर जाइल्स शाळा तपासण्यास आले होते. त्यांनीं पहिल्या इयत्तेच्या मुलांना पांच शब्द लिहायला घातले. त्यांत एक शब्द केटल् ( Kettle ) होता. त्याची वर्णरचना मीं चुकीची लिहिली. मास्तरांनीं मला आपल्या बुटाचें टोंक मारून इशारा दिला. परंतु माझ्या तें कोठून लक्षांत येणार ? मास्तर मला समोरच्या विद्यार्थ्यांच्या पाटीकडे पाहून माझें शुद्धलेखन सुधारण्यास सांगत असतील, अशी माझी कल्पनाहि होऊं शकली नाहीं. माझी समजूत कीं आम्ही एकमेकांचें चोरून पाहूं नये, एवढ्यासाठींच मास्तर नजर ठेवीत आहेत. सर्व विद्यार्थ्यांचे पांची शब्द बरोबर आले आणि मीच काय तो ढ ठरलों ! माझा ‘ मूर्खपणा ’ मास्तरांनीं मागाहून मला दाखवून दिला. परंतु माझ्या मनावर त्या सांगण्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. मला दुसऱ्या विद्यार्थ्यांची कॉपी कधींच करतां आली नाहीं.

असें असूनहि मास्तरांविषयींची माझी विनयवृत्ति कधींच ढळली नाहीं. वडील मंडळींचे दोष न पाहण्याचा गुण माझ्यामध्यें स्वभावतःच होता. त्याच मास्तरांचे इतर दोषहि मागाहून माझ्या ध्यानांत आले. तरीहि त्यांचेबद्दल मला वाटणारा आदर कायम राहिला. वडिलांच्या आज्ञेचें पालन करायचें, एवढें मला माहीत होतें. ते सांगतील तें करावें; त्यांच्या कृत्यांच्या गुणदोषांच्या निवाड्यात आपण पडूं नये.

याच सुमारास दुसरे दोन प्रसंग घडले, ते कधीहि माझ्या स्मरणांतून गेलेले नाहींत. मला सामान्यपणें शाळेच्या पुस्तकापलीकडे कांहींहि वाचण्याचा नाद नसे. धडे केले पाहिजेत; बोललेलें सहन व्हावयाचें नाहीं, मास्तरांना फसवावयाचें नाहीं, म्हणून धडे वाचीत असे. परंतु मनांतून कंटाळा. त्यामुळें धडे पुष्कळदां कच्चे रहात. मग इतर वाचन सुचणार कोठून ? परंतु वडिलांनीं विकत आणलेलें एक पुस्तक माझ्या नजरेस भरलें. तें ‘ श्रवण-पितृभक्ति ’ नाटक. तें वाचण्याची मला इच्छा झाली. तें मीं अतिशय आवडीनें वाचलें. त्याच सुमारास कांचेंतून चित्रें दाखविणारेहि दारोदार हिंडत. त्यांच्यापासून श्रवण आपल्या आईबापांना कावडींत बसवून यात्रा करण्यास घेऊन जात आहे, असें चित्र मीं पाहिलें. दोन्ही गोष्टींचा माझ्या मनावर खूप परिणाम झाला. “ मला पण श्रवणासारखें व्हावयाचें ” असें मनांत येई. श्रवणाच्या मृत्यूसमयींचा त्याच्या मातापित्यांचा विलाप अजून आठवतो. ती गोड चाल मी वाजावरहि बसविली. वाजा शिकण्याची हौस होती, व वडिलांनीं एक वाजाहि घेऊन दिला होता.

याच सुमारास कोणी नाटकमंडळी आली होती. तिचें नाटक पाहण्याची परवानगी मिळाली. हरिश्चंद्राचें आख्यान होतें. तें नाटक पाहण्याचा मला कंटाळा कसा तो वाटेच ना. तें पुन्हां पुन्हां पाहण्याची इच्छा होई. वारंवार पाहायला कोण जाऊं देणार ? परंतु मनांतल्या मनांत मीं तें नाटक शेंकडों वेळां रंगविलें असेल ! हरिश्चंद्राचीं स्वप्नें पडत. "सर्वांनींच हरिश्चंद्रासारखें सत्यवादी कां होऊं नये," हाच विचार घोळे. हरिश्चंद्रावर आल्या तसल्या विपत्ती भोगून सत्याचें पालन करावें हेंच खरें सत्य. नाटकांत लिहिलेल्या होत्या तशाच विपत्ती हरिश्चंद्रावर येऊन पडल्या असल्या पाहिजेत, असेंच मी तरी समजत होतों. हरिश्चंद्राचें दुःख पाहून, त्याचें स्मरण करून, मी खूप रडलों आहें. आज माझ्या बुद्धीला समजत आहे, कीं हरिश्चंद्र ही कोणी ऐतिहासिक व्यक्ति नसावी. परंतु माझ्या मनःसृष्टींत हरिश्चंद्र आणि श्रवण आजहि जिवंत आहेत. आजसुद्धां मीं तीं नाटकें वाचलीं, तर आजहि मला अश्रू येतील असें वाटतें.

● ●

## ३
# बालविवाह

हें प्रकरण मला लिहावें लागूं नये अशी माझी इच्छा आहे. परंतु या कथेमध्यें मला अशा तऱ्हेचे कितीतरी कडू घोट प्यावे लागणार आहेत. स्वतःला 'सत्याचा पुजारी' म्हणवून घेणाऱ्या मला दुसरा मार्गच नाहीं.

तेरा वर्षांचा असतांना माझा विवाह झाला, ही गोष्ट लिहितांना मला दुःख होतें. आज माझ्यासमोर बारा-तेरा वर्षांचीं मुलें आहेत. त्यांचेकडे पाहतों आणि माझ्या विवाहाचें स्मरण करतों, तेव्हां मला स्वतःबद्दल कींव वाटूं लागते; आणि माझ्यावर ओढवलेल्या प्रसंगांतून बचावल्याबद्दल या मुलांना धन्यवाद देण्याची इच्छा होते. तेरा वर्षांच्या वयांत झालेल्या माझ्या विवाहाच्या समर्थनपर असा एकहि नैतिक युक्तिवाद मला सुचूं शकत नाहीं.

मी * 'सगाई' विषयीं लिहितों अशी वाचकानें समजूत करून घेऊं नये. काठेवाडांत विवाह म्हणजे लग्न, 'सगाई' नव्हे. 'सगाई' म्हणजे मुलामुलींचें लग्न लावण्यासंबंधीं वर-वधूंच्या आई-बापांमध्यें झालेला करार. 'सगाई' मोडूं शकते. सगाई झाली आणि वर मयत झाला, तर कन्या विधवा होत नाहीं. सगाईमध्यें वर व कन्या यांचा कांहीं संबंध येत नाहीं. दोघांना त्याची गंधवार्ताहि नसते. माझी एकामागून एक तीनदां सगाई झाली. ती केव्हां कशी झाली, याची मला

* गांधीजी काठेवाडचे. गुजराथींत 'विवाह' म्हणजे वाङ्‌निश्चय किंवा वर उल्लेखिलेली 'सगाई.'

गंधवार्ताहि नाहीं. दोन कन्या एकामागून एक मृत्यु पावल्या, असें मला कोणी सांगितलें. त्यावरून मला तरी माहीत, कीं माझ्या तीन सगाया झाल्या होत्या. तिसरी सगाई सात एक वर्षांच्या वयाला झालेली असावी असें कांहींसें स्मरतें. परंतु सगाई झाली त्यावेळीं मला कांहीं सांगितलें असल्याचें मला माहीत नाहीं. विवाहामध्यें वर व कन्या दोहोंची जरूर पडते. विवाहामध्यें विधि करायचा असतो. मी लिहीत आहें तें या विवाहासंबंधीं. विवाहाचें मला पूर्ण स्मरण आहे.

आम्ही तीन भाऊ होतों, हें वाचकांना माहीतच आहे. त्यांपैकीं वडील भावाचें लग्न होऊन चुकलें होतें. मधील बंधु माझ्यापेक्षां दोन तीन वर्षांनीं मोठे होते. त्यांचा, माझा चुलत भाऊ कदाचित् माझ्याहून वर्षाभऱ्यानें मोठा असेल त्याचा, व माझा, असे तीन विवाह एकत्र करण्याचा वडील मंडळींनीं बेत केला. यांत आमच्या कल्याणाचा प्रश्न नव्हता. इच्छेबद्दल तर त्याहून नव्हता. यांत फक्त वडिलांच्या सोयीचा आणि खर्चाचा प्रश्न होता.

हिंदुसमाजामध्यें विवाह अशी तशी गोष्ट नाहीं. वर-वधूंचे आईबाप लग्नापायीं सर्वस्व घालवून बसतात, पैसे उधळतात, आणि काळाचा अपव्यय करतात. आगाऊ कित्येक महिन्यांपासून तयारी सुरू होते. कपडे तयार होतात, दागिने घडवावयाचे असतात, गांवभोजनांचे अंदाज चालतात, भोजनासाठीं निरनिराळीं पक्वान्नें करण्याच्या शर्यती सुरू होतात. गळा असो किंवा नसो, बायका घसे बसेतों गाणीं गातात, आजारी पण पडतात! शेजाऱ्यांच्या शांततेच्या भंग करतात. प्रसंग येईल तेव्हां त्यांना स्वतःलाहि असेंच सर्व करायचें असतें, म्हणून बिचारे शेजारीहि गोंगाट, खरकटें आणि इतर घाण मुकाट्यानें सहन करतात!

"एवढा गोंधळ तीन वेळां करण्यापेक्षां एकाच वेळीं उरकून घेतला तर किती चांगलें? लग्न थोडक्या खर्चांत आणि पुन्हां थाटानें होईल." कारण कीं तीन लग्नें एकत्र करायचीं, तर द्रव्य मुबलकपणें खर्चिण्यास हरकत नाहीं. वडील व चुलते वृद्ध होते. आम्ही त्यांचे सर्वांत धाकटे मुलगे. तेव्हां आमच्या लग्नाचा सोहळा डोळ्यांदेखत व्हावा अशीहि इच्छा असायचीच. या व अशा तऱ्हेच्या विचारांनीं हे तिन्ही विवाह एकत्र करण्याचा निश्चय झाला आणि मीं वर सांगितल्याप्रमाणें त्यांची तयारी आणि सामग्री कित्येक महिन्यांपासून चालू होती.

आम्हां भावांना तयारी चाललेली पाहूनच समजलें, कीं लग्नें व्हायचीं आहेत. त्या वेळीं माझ्या मनांत चांगले चांगले कपडे वापरायला मिळतील, वाजंत्रें वाजतील, वरात निघेल, सुग्रास भोजनें मिळतील, एका नव्या मुलीबरोबर खेळ करायला मिळतील वगैरे हौसेपलीकडे दुसरें कांहीं असल्याचें स्मरत नाहीं. विषयवासना मागाहून उद्भवली. ती कशी उद्भवली त्याचें वर्णन मी करूं शकेन. परंतु वाचकांनीं तशी जिज्ञासा ठेवूं नये. मी माझ्या लज्जेवर झांकण घालूं इच्छितों.

कांहीं गोष्टी ज्या सांगण्यासारख्या आहेत त्या पुढें येतील. परंतु हें लिहिण्यांत मीं जो मध्यबिंदु नजरेसमोर ठेविला आहे, त्याचा आणि ह्या बाबतींतील बारीकसारीक गोष्टींचा फार थोडा संबंध आहे.

आम्हां दोघां भावांना राजकोटहून पोरबंदरला नेलें. तेथें हळद लावण्याचे वगैरे विधी झाले. ते सर्व मनोरंजक असले तरी सोडून देणेंच योग्य.

वडील दिवाण झाले तरी नोकरच. शिवाय राजाच्या मर्जीतले, त्यामुळें विशेषच पराधीन. ठाकूरसाहेब शेवटल्या घटकेपर्यंत जाऊं देत ना. शेवटीं जाऊं दिलें, तेव्हां मुद्दाम टप्प्यांची व्यवस्था केली, आणि दोनच दिवस अगोदर पाठविलें. पण ! पण विधिघटित निराळेंच होतें. राजकोटहून पोरबंदर ६० कोस आहे. गाडी-रस्त्यानें पांच दिवसांची वाट होती. वडील तीन दिवसांत आले. शेवटच्या मजलींत टांगा उलटला. वडिलांना जबर दुखापत झाली. हातावर पट्टी, पाठीवर पट्टी. विवाहांतून त्यांचा आणि आमचा अर्धा आनंद मावळला. पण विवाह तर झालेच. लिहिलेले मुहूर्त कांहीं टळणार आहेत ? मी तर विवाहाच्या बालउत्साहांत वडिलांचें दुःख विसरून गेलों.

पितृभक्त खराच, पण विषयभक्तहि तितकाच ना ? येथें विषयाचा अर्थ एकाच इंद्रियाचा विषय नव्हे, तर भोगमात्र. मातापितरांच्या भक्तीसाठीं सर्व सुखांचा त्याग केला पाहिजे, हें ज्ञान पुढें यावयाचें होतें. असें असूनहि जणु काय मला या भोगेच्छेचें प्रायश्चित्त भोगणेंच जरूर होतें. म्हणून माझ्या आयुष्यांत असा एक वेडावांकडा प्रसंग घडला, कीं जो मला अद्यापपर्यंत सलत आहे. जेव्हां जेव्हां निष्कुलानंदाचें

"त्याग न टके रे वैराग विना, करीए कोटि उपाय जी"

हें गीत मीं गातों किंवा ऐकतों, त्या त्या वेळीं हा दारुण आणि कटु प्रसंग मला आठवतो आणि शरम आणतो.

वडिलांनीं उसनें अवसान आणून चेहरा प्रफुल्ल ठेवला आणि शारीरिक वेदना होत असतांहि लग्नांत परिपूर्ण भाग घेतला. वडील कोणत्या प्रसंगीं कोठें बसले होते वगैरे सर्व जसेंच्या तसें मला अजून आठवतें. बालविवाहाचा विचार करतांना वडिलांच्या कृत्यांची जी टीका मीं आज केली आहे, ती कांहीं माझ्या मनानें त्या वेळीं थोडीच केली होती ! त्या वेळीं सर्व कांहीं यथायोग्य आणि मनाजोगतें वाटत होतें. लग्नाची आवड होती. आणि वडील करतात तें सर्व बरोबरच आहे असें वाटत होतें. त्यामुळें त्या वेळचीं स्मरणें ताजीं आहेत.

बोहल्यावर बसलों, सप्तपदी केली, शिरा खाल्ला, घांस दिले आणि पतिपत्नी तेव्हांपासूनच एकत्र राहूं लागलों. ती पहिली रात्र ! दोन निर्दोष बालकांनीं अजाणतां संसारांत प्रवेश केला ! मी पहिल्या रात्रीं कसें वागावें त्याची वैनीनें शिकवण

दिली होती. धर्मपत्नीला कोणीं शिकवण दिली होती, तें विचारून घेतल्याचें मला स्मरत नाहीं. अजूनहि विचारतां येईल, परंतु विचारण्याची लवलेश इच्छा होत नाहीं. वाचकांना एवढें सांगूं शकतों, कीं आम्ही दोघेंहि एकमेकांना भीत होतों अशी अंधुक आठवण आहे. एकमेकांची लाज तर वाटत होती. काय बोलावें, कसें बोलावें, हें मला काय कळे ? मिळालेल्या शिकवणीचा तरी काय उपयोग ? पण या गोष्टी काय शिकवाव्या लागतात ? जेथें संस्कारच बलवान् असतात, तेथें शिकवण ही रिकामकी जोड होय. हळूहळू एकमेकांना ओळखूं लागलों. बोलूं-चालूं लागलों. आम्ही दोघें सारख्या वयाचीं आहोंत. पण मीं मात्र स्वामित्व गाजवायला सुरुवात केली !

• • •

४

# स्वामित्व

लग्न झालें त्या दिवसांमध्यें निबंधांचीं लहान लहान चोपडीं, पैशापैशाचीं कीं पैपैचीं आठवत नाहीं, निघत असत. त्यांमध्यें पतिपत्नीप्रेम, काटकसर, बालविवाह वगैरे विषयांची चर्चा केलेली असे. यांपैकीं एकादा निबंध माझ्या हातीं पडे, व मी तो वाचीत असें. ही तर संवय होतीच, की वाचलेलें पसंत पडलें नाहीं तर विसरून जावें, आणि पसंत पडलें तर त्याचा अंमल करावा. एकपत्नीव्रत पाळणें हा पतीचा धर्म आहे असें वाचलें, तें हृदयांत घोळत राहिलें. सत्याची आवड होतीच. अर्थात् पत्नीची प्रतारणा करायची नाहींच. त्यावरूच अन्य स्त्रीशीं संबंध ठेवायचा नाहीं, हेंहि लक्षांत आलेंच होतें. लहान वयांत एकपत्नीव्रताचा भंग होण्याचा संभव कमीच.

परंतु या सुविचारांचा एक विपरीत परिणाम घडला. "मीं जर एकपत्नीव्रत पाळायचें, तर पत्नीनें एकपतिव्रत पाळलें पाहिजे" या विचारानें मी संशयी पति बनलों. "पाळावें" वरून "पाळवावें" या विचारावर मी आलों. आणि जर पाळवावयाचें, तर मला नजर ठेवली पाहिजे. मला कांहीं पत्नीच्या पावित्र्यतेबद्दल शंका घेण्याचें कारण नव्हतें. परंतु असूया ही कारण थोडीच शोधीत बसणार ? माझी पत्नी कोठें जाते, हें मला नेहमीं माहीत झालेंच पाहिजे; म्हणून तिनें माझ्या परवानगीवांचून कोठेंहि जातां कामा नये. या गोष्टीमुळें आमच्यामध्यें दुःखदायक बेबनाव होऊं लागले. परवानगीशिवाय कोठेंहि जायचें नाहीं, ही एक प्रकारची कैदच झाली. परंतु कस्तूरबाई ही अशा प्रकारची कैद सहन करणारी स्त्री नव्हती. मनाला येईल तेव्हां खुशाल मला विचारल्याशिवाय ती जाई. मी जसजसा दाब घाली

तसतशी ती अधिकच मोकळीक घेई, आणि तसतसा मी अधिकच चिडत असें. अशा तऱ्हेनें आम्हां बालकांमध्यें अबोला वरचेवर उद्भवूं लागला. कस्तूरबाईनें जी मोकळीक घेतली, ती मी निर्दोष समजतों. जिच्या मनाला पापाचा स्पर्शहि नाहीं, अशी बालिका देवदर्शनाला जायचें किंवा कोणाला भेटायला जायचें असल्या गोष्टींवर नियंत्रण कां म्हणून सहन करील ? मी जर तिच्यावर दडपण घालणार, तर तिनें माझ्यावर कां घालूं नये ?—पण हें आतां सुचतें. त्या काळीं तर मला माझें स्वामित्व शाबीत करावयाचें होतें !

परंतु आमच्या या गृहसंसारांत माधुर्य मुळींच नव्हतें, असें वाचकानें समजूं नये. माझ्या वक्रतेच्या मुळाशीं प्रेम होतें. माझ्या मनांतून माझ्या पत्नीला आदर्श स्त्री बनवावयाचें होतें. तिनें निष्पाप व्हावें, निष्पाप रहावें, मी शिकतों तें शिकावें, आणि आमची उभयतांची एकतानता व्हावी, अशीच माझी भावना होती.

कस्तूरबाईच्या मनांत ही भावना असल्याचें मला माहीत नाहीं. ती निरक्षर होती. स्वभावानें सरळ, स्वतंत्र, मेहनती आणि माझ्याशीं तरी मितभाषण करणारी होती. तिला स्वतःच्या अज्ञानाबद्दल असंतोष नव्हता. मी शिकतों, त्याअर्थी आपणहि शिकलेलें चांगलें, अशी तिची इच्छा मीं माझ्या बालपणांत कधींहि अनुभवलेली नाहीं. त्यावरून मला वाटतें, कीं माझी भावना एकपक्षीय होती. माझें विषयसुख एका स्त्रीवरच सांठविलेलें होतें. आणि त्या सुखाच्या प्रतिध्वनीची मी अपेक्षा करीत होतों. एकतर्फी कां होईना, पण जेथें प्रेमाचें अस्तित्व आहे तेथें सर्वस्वींच दुःख असणें अशक्य आहे.

मला सांगितलें पाहिजे, कीं माझ्या पत्नीच्या बाबतींत मी विषयासक्त होतों. शाळेंतहि तिचे विचार येत. रात्र केव्हां पडते आणि आमची भेट केव्हां होते, हाच विचार सारखा चाले. वियोग असह्य वाटे. माझ्या रिकाम्या बडबडीनें मी तिला झोपूं देत नसे. या आसक्तीबरोबर जर माझ्यात कर्तव्यपरायणता नसती, तर मी व्याधिग्रस्त होऊन मृत्युवश झालों असतों, अथवा या जगांत भूभार बनून राहिलों असतों, असें मला वाटतें. सकाळ झाली कीं नित्यकर्में केलींच पाहिजेत, कोणाला फसवितां कामा नये—अशा तऱ्हेच्या माझ्या विचारामुळें मी पुष्कळ संकटांतून बचावलों आहे.

वर लिहिलेंच आहे कीं कस्तूरबाई निरक्षर होती. तिला शिकविण्याची मला फार हौस होती. परंतु माझी विषयवासना मला शिकवूं देणार कोठून ? एक तर मला सक्तीनें शिकवावे लागणार. तेंहि रात्रीं एकांतांतच जुळणार. वडिलांदेखत पत्नीकडे नुसतें पाहतांहि कामा नये. बोलायचें तर नांवच नको. काठेवाडांत त्या वेळीं बुरख्याचा निरुपयोगी व अडाणी रिवाज अमलांत होता. आजहि बऱ्याच अंशीं तो चालू आहे. त्यामुळें शिकविण्याची संधीहि मला प्रतिकूल. त्यामुळें शिकविण्याचे

जेवढे प्रयत्न मी तारुण्यांत केले तेवढे सर्व व्यर्थ गेले, हें मला कबूल केलें पाहिजे. जेव्हां मी विषयाच्या निद्रेंतून जागा झालों, तेव्हां तर मी सार्वजनिक जीवनामध्यें गुरफटलेला होतों. त्यामुळें विशेष वेळ देतां येण्यासारखी माझी स्थिति राहिली नव्हती. शिक्षकांमार्फत शिकविण्याचे माझे प्रयत्नहि निष्फळ झाले. त्यामुळें आज कस्तूरबाईची स्थिति ती जेमतेम पत्र लिहूं शकेल आणि सामान्य गुजराथी समजूं शकेल इतपत आहे. माझें प्रेम विषयदूषित नसतें, तर आज ती विदुषी स्त्री असती अशी माझी समजूत आहे. तिचा शिकण्याचा कंटाळा मी जिंकूं शकलों असतों. शुद्ध प्रेमाला कांहीं अशक्य नाहीं, हें मला माहीत आहे.

अशा तऱ्हेनें स्वस्त्रीविषयीं आसक्त असूनहि त्या मानानें मी बचावलों कसा त्याचें एक कारण वर दाखविलेंच आहे. दुसरें एक कारण नमूद करण्यासारखें आहे. शेंकडों अनुभवांवरून मीं हें सार काढलें आहे, कीं ज्याची निष्ठा खरी आहे त्याला प्रभूच तारतो. हिंदुसमाजांत बालविवाहाचा घातकी रिवाज आहे. त्याबरोबरच त्यांतून थोडी मोकळीक मिळावी अशीहि पद्धति ठेवलेली आहे. बाल-पतिपत्नींना त्यांचे आईबाप फार काळ एकत्र राहूं देत नाहींत. बालपत्नीचा अर्ध्याहून अधिक काळ तिच्या माहेरीं जातो. आमच्याहि बाबतींत तसेंच झालें. म्हणजे १३ ते १९ वर्षांच्या दरम्यान आमचें मधून मधून मिळून तीन वर्षांहून जास्त वेळ एकत्र राहणें झालें नसावें. सात-आठ महिने होतात तों आईबापाकडून माघारी येईच. त्यावेळीं तें फार दुःसह वाटत असे. परंतु त्यामुळेच आम्ही दोघेंहि बचावलों. पुढें १९ वर्षांच्या वयाला मी विलायतेला गेलों. त्यामुळें अनुकूल आणि दीर्घ मुदतीचा वियोग आला. विलायतेहून आल्यावर एकत्र असों सहा एक महिनेच राहिलों असूं. कारण मला राजकोट—मुंबई दरम्यान यायचें-जायचें असे तितक्यांतच पुन्हां दक्षिण आफ्रिकेचें बोलावणें आलें. एवढ्या अवधींत मी नीट जागृतहि झालों होतों.

• • •

५

# हायस्कुलांत

विवाह झाला तेव्हां मी हायस्कुलांत शिकत होतों, हें मी पूर्वी लिहिलेंच आहे. त्या वेळीं आम्ही तिन्ही भाऊ एकाच शाळेंत शिकत असूं. वडील बंधु वरील इयत्तेंत होते आणि ज्या बंधूबरोबर माझें लग्न झालें, ते एक वर्ग पुढें होते. विवाहाचा परिणाम असा झाला, कीं आम्हां दोघां भावांचें एक एक वर्ष फुकट गेलें. माझ्या बंधूंच्या बाबतींत तर याहूनहि वाईट परिणाम घडला. विवाहानंतर ते

शाळेंत राहूंच शकले नाहींत. असला अनिष्ट परिणाम किती तरुणांवर घडत असेल देव जाणे ! विद्याभ्यास आणि विवाह हीं दोन्ही एकत्र हिंदुसमाजामध्येंच आढळतील.

माझा अभ्यास चालू राहिला. हायस्कुलांत माझी गणना ढ विद्यार्थ्यांत होत नसे. शिक्षकांची मर्जी तर मी नेहमींच संपादीत असें. प्रत्येक वर्षीं आईबापांना विद्यार्थ्यांचा अभ्यास व वर्तन यासंबंधीं प्रमाणपत्रें पाठविलीं जात. त्यामध्यें कधींहि माझा अभ्यास किंवा वर्तन खराब असल्याबद्दल टीका नव्हती. दुसऱ्या इयत्तेनंतर बक्षिसेंहि मिळविलीं, व पांचव्या-सहाव्या इयत्तेंत अनुक्रमें चार व दहा रुपयांची शिष्यवृत्तीहि मिळविली. ती मिळविण्यांत माझ्या हुषारीपेक्षां दैवाचाच भाग विशेष होता. ही शिष्यवृत्ति सर्व विद्यार्थ्यांसाठीं नव्हती; तर जे सोरठ-प्रांतांतले विद्यार्थी असतील, त्यांत पहिला येणाराला होती. चाळीस-पन्नास विद्यार्थ्यांच्या वर्गांत त्या दिवसांत सोरठ-प्रांताचे विद्यार्थी कितीसे असणार ?

मला स्वतःला असें स्मरतें, कीं मला माझ्या हुशारीबद्दल अभिमान मुळींच नव्हता. बक्षिस किंवा शिष्यवृत्ति मिळाली तर मला आश्चर्य वाटत असे. परंतु माझ्या वर्तनाला मी फार जपत असें. वर्तनांत उणीव निघाली तर मला रडें येई. शिक्षकास मला बोलावें लागेल अशा तऱ्हेचें माझ्या हातून कांहींहि घडणें किंवा शिक्षकाना तसें वाटणें, ही गोष्ट मला असह्य होत असे. एक वेळ मार खावा लागला असें मला स्मरतें. माराचें दुःख नव्हतें. परंतु मी शिक्षेला पात्र झालों, याचें महादुःख वाटलें. मी खूप रडलों. हा प्रसंग पहिल्या किंवा दुसऱ्या इयत्तेंतील आहे. दुसरा प्रसंग सातव्या इयत्तेंतील आहे. त्या वेळीं दोराबजी एदलजी गिमी हेडमास्तर होते. ते विद्यार्थि-प्रिय होते. कारण, ते नियम पाळीत, पद्धतशीर काम करीत, करवीत व शिकवीतहि चागलें. त्यांनीं वरच्या इयत्तांच्या विद्यार्थ्यांस कसरत, क्रिकेट आवश्यक केलें होतें. मला त्यांचा कंटाळा. भाग पडण्यापूर्वीं मी कधीं कसरत, क्रिकेट किंवा फुटबॉलमध्यें गेलोंच नव्हतों. माझा भिडस्त स्वभाव हेंहि न जाण्याचें एक कारण होतें. आतां मला दिसतें, कीं हा कंटाळा चुकीचा होता. कसरतीचा शिक्षणाशीं संबंध नाहीं, अशी चुकीची समजूत माझी त्या वेळीं होती. मागून मी समजलों, कीं व्यायामाला म्हणजे शारीरिक शिक्षणाला मानसिक शिक्षणाच्या बरोबरीचें स्थान विद्यार्जनांत असलें पाहिजे.

तरीहि कसरतींत न गेल्यामुळें माझें नुकसान झालेलें नाहीं, हेंहि मला नमूद केलें पाहिजे. त्याचें कारण असें, कीं पुस्तकांत मोकळी हवा खायला जाण्याची शिफारस वाचली, ती मला आवडली होती, आणि त्यामुळें हायस्कूलच्या वरच्या इयत्तांपासूनच फिरायला जाण्याची मला संवय जडली होती. ती शेवटपर्यंत राहिली. फिरणें हाहि व्यायाम आहेच. त्यामुळें माझें शरीर कांहीं अंशीं कसलेलें बनलें.

कंटाळ्याचें दुसरें कारण वडिलांची सेवा करण्याची तीव्र इच्छा हें होतें. शाळा बंद झाली कीं लगेच घरीं जाऊन सेवा-चाकरीला लागत असें. जेव्हां कसरत आवश्यक झाली, तेव्हां या सेवेमध्यें विघ्न आलें. वडिलांची सेवा करण्यासाठीं कसरतीची माफी मिळाली पाहिजे अशी विनंति केली. परंतु गिमीसाहेब कसली माफी देतात ! एका शनिवारीं सकाळची शाळा होती. संध्याकाळीं चार वाजतां कसरतीला जायचें होतें. माझ्यापाशीं घड्याळ नव्हतें. आकाशांत ढग असल्यामुळें वेळाची समज पडेना. ढगांमुळें मी फसलों. कसरतीला जातों तों सर्व निघूनहि गेले होते. दुसऱ्या दिवशीं गिमीसाहेबांनीं हजेरी तपासली. तींत मी गैरहजर निघालों. मला कारण विचारलें. मीं जें होतें तें सांगितलें. त्यांनीं तें खरें मानलें नाहीं आणि मला एक कीं दोन आणे ( किती तें बरोबर आठवत नाहीं ) दंड झाला. मी खोटा ठरलों. मला अतिशय दुःख झालें. " मी खोटा नाहीं " हें कसें सिद्ध करूं ? कांहीं उपाय सुचेना. मनांतल्या मनांत फुणफुणत राहिलों, रडलों. ठरवलें कीं सत्य बोलणारानें व सत्य आचरणारानें गाफिलहि राहतां कामा नये. अशा तऱ्हेची गफलत माझ्या शिक्षणाच्या मुदतींत ही पहिली व शेवटलीच होय. मला पुसट आठवण आहे, कीं अखेरीला मी तो दंड माफ करवूं शकलों.

कसरतींतून मोकळीक तर मिळविलीच. शाळेच्या वेळेनंतर स्वतःच्या सेवेसाठीं आपल्याला माझी जरूर असते, असें वडिलांचें पत्र हेडमास्तरांना असल्यामुळें मोकळीक मिळाली.

व्यायामाऐवजीं फिरायचें ठेवलें, त्यामुळें शरीराला व्यायाम न देण्याच्या चुकीबद्दल मला कदाचित् शिक्षा भोगावी लागली नाहीं; परंतु दुसऱ्या एका चुकीची शिक्षा मी आजपर्यंत भोगीत आहें. शिक्षणामध्यें हस्ताक्षर चांगलें लिहिण्याची जरूरी नाहीं, असा चुकीचा समज माझ्यामध्यें कोठून आला तें माहीत नाहीं; परंतु तो थेट विलायतेला जाईपर्यंत राहिला. मागाहून आणि मुख्यतः दक्षिण आफ्रिकेमध्यें तेथील वकिलांची व आफ्रिकेंत जन्मलेल्या नवयुवकांचीं मोत्यासारखीं हस्ताक्षरें पाहिलीं, तेव्हां मी शरमलों व पस्तावलों. माझ्या ध्यानांत आलें, कीं खराब अक्षर ही अर्धवट शिक्षणाची निशाणी समजली पाहिजे. मीं मागून माझें अक्षर सुधारण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु पक्क्या मडक्याचें कांठ वळणार थोडेच ? बालवयामध्यें ज्याची मीं हेळसांड केली, तें मी आजपर्यंत करूं शकलेलों नाहीं. दर एक नवयुवक व युवती यांनीं माझ्या उदाहरणावरून सावध व्हावें आणि ध्यानांत धरावें, कीं चांगलें अक्षर हें विद्येचें आवश्यक अंग आहे. चांगलें अक्षर शिकण्यासाठीं रेखाकला आवश्यक आहे. माझें तर असें मत बनलें आहे, कीं मुलांना रेखाकला अगोदर शिकवावी. ज्याप्रमाणें पक्षी, वस्तू वगैरे पाहून बालक त्यांचें स्मरण ठेवून सहजीं ओळखूं शकतें, त्याप्रमाणेंच अक्षरें प्रथम ओळखण्यास शिकावें व रेखाकला शिकून

चित्रें वगैरे काढण्यास शिकल्यानंतर अक्षरें काढण्यास शिकलें, तर त्याचें अक्षर छापी अक्षराप्रमाणें येईल.

या काळच्या विद्याभ्याससंबंधीं आणखी दोन आठवणी नमूद करण्यासारख्या आहेत. विवाहामुळें एक वर्ष फुकट गेलें तें भरून काढण्याचा दुसऱ्या इयत्तेंत मास्तरांनीं माझ्याकडून बेत करविला. मेहनती विद्यार्थ्याला तसें करण्याची परवानगी त्या वेळीं तरी मिळत असे. म्हणून मी तिसऱ्या इयत्तेंत सहा महिने बसलों, व उन्हाळ्याच्या सुटीपूर्वीच्या परीक्षेनंतर मला चौथींत घातलें. येथपासून कांहीं शिक्षण इंग्रजींतून होऊं लागतें. मला कांहीं समजेचना. भूमिति सुद्धां चौथ्या इयत्तेंत सुरू होते. मी तींत मागें पडलेला होतोंच. शिवाय ती मुळींच समजेना. भूमितीचे शिक्षक समजावून देण्यांत हुषार होते. परंतु माझें कांहीं बस्तानच बसेना. मी अनेक वेळां निराश होत असें. कित्येक वेळां असेंहि वाटे, कीं दोन इयत्ता सोडून देऊन परत तिसऱ्या इयत्तेचा मार्ग धरावा. परंतु तसें केल्यास माझी अब्रू जाईल व मी झटून अभ्यास करीन या विश्वासावर ज्या शिक्षकांनीं मला वर चढविण्याबद्दल शिफारस केली, त्या शिक्षकाचीहि अब्रू जाणार, या भयानें खालीं उतरण्याचा विचार मीं रद्द केला. प्रयत्न करतां करतां जेव्हां युक्लिडच्या तेराव्या प्रमेयाशीं आलों तेव्हां एकाएकीं मला वाटूं लागलें, कीं भूमिति तर सोप्यांत सोपा विषय आहे. ज्यांत बुद्धीचा फक्त साधा व सरळ उपयोग करायचा आहे, त्यात अडचण ती कसली ? त्यानंतर नेहमीं मला भूमिति हा सोपा व रसिक विषय होऊन राहिला.

संस्कृतानें मला भूमितीपेक्षांहि अधिक त्रास दिला. भूमितीमध्यें घोकायचें कांहींच नसतें, तर संस्कृतांत पाहतों तों सर्व कांहीं घोकायचेंच ! हा विषयहि चौथ्या इयत्तेपासून सुरू झाला. सहाव्या इयत्तेंत मी हरलों. संस्कृत-शिक्षक फार कडक होते. त्यांना विद्यार्थ्यांना खूप शिकविण्याचा लोभ असे. संस्कृत-वर्ग आणि फारसी-वर्ग यांमध्यें एक प्रकारची स्पर्धा असे. फारसी शिकविणारे मौलवी गरीब होते. विद्यार्थी आपापसांत बोलत असत, कीं फारसी फार सोपें आहे, आणि फारसी-शिक्षक फार सज्जन मनुष्य आहेत. विद्यार्थी करतील तेवढ्यावर ते चालवून घेतात. मी पण सोपें आहे, असें ऐकून लोभांत पडलों आणि एक दिवस फारसीच्या वर्गांत जाऊन बसलों ! संस्कृत-शिक्षकाला दुःख झालें. त्यांनीं मला बोलावलें. "तूं कोणाचा मुलगा हें तरीं ध्यानीं आण. तुझ्या धर्माची भाषा तूं शिकणार नाहींस ? तुला ज्या अडचणी येतील त्या मला दाखव. माझी तर सर्व मुलांना उत्तम संस्कृत शिकविण्याची इच्छा आहे. पुढें त्याच्यामध्यें मधुर रसाचे घुटके चाखायला मिळणार आहेत. तूं असा कंटाळून जाऊं नकोस. तूं पुन्हां माझ्या वर्गांत येऊन बैस." मी शरमलों. शिक्षकाच्या प्रेमाची अवगणना माझ्यानें करवली नाहीं. आज माझा आत्मा कृष्णाशंकर मास्तराचे उपकार मानीत आहे.

कारण कीं जितकें संस्कृत मी त्या वेळीं शिकलों, तेवढेंहि जर शिकलों नसतों तर आज संस्कृत शास्त्रांमध्यें मला जी गोडी वाटते, ती वाटली नसती. मला तर याचाच पश्चात्ताप होत आहे, कीं मी संस्कृत जास्त शिकलों नाहीं. कारण कीं कोणाहि हिंदु बालकानें संस्कृतचा सरस अभ्यास केल्याशिवाय राहतां कामा नये.

अलीकडे तर मला असें वाटतें, कीं भारतवर्षाच्या उच्च शिक्षणक्रमामध्यें मातृभाषेखेरीज राष्ट्रभाषा हिंदी, संस्कृत, फारसी, अरबी व इंग्रजी एवढयांना स्थान मिळालें पाहिजे. इतक्या भाषांच्या संख्येकडे पाहून कोणाला भिऊन जाण्याचें कारण नाहीं. भाषा पद्धतशीर रीतीनें शिकविण्यांत येईल आणि सर्व विषय इंग्रजींतूनच शिकविण्याचा व त्यांवर विचारहि इंग्रजींतूनच करण्याचा बोजा आपल्यावर नसेल, तर वरील भाषा शिकण्यांत जड असें कांहींच नाहीं; एवढेंच नव्हे, तर त्यामध्यें फार गोडी वाटेल. शिवाय, जो एक भाषा शास्त्रीय पद्धतीनें शिकला, त्याला मागून दुसरी भाषा शिकणेंहि सोपें जातें. खरें म्हटलें असतां हिंदी, गुजराथी, संस्कृत ही एकच भाषा म्हणतां येईल. त्याचप्रमाणें फारसी व अरबी. फारसी संस्कृताशीं मिळती असली तरी आणि अरबी हिब्रूशीं मिळती असली तरी दोहींचा विकास इस्लामच्या उदयानंतरच झाला असल्यामुळें दोहींमध्यें निकट संबंध आहे. उर्दूचा मीं स्वतंत्र भाषा म्हणून निर्देश केलेला नाहीं. कारण कीं तिच्या व्याकरणाचा समावेश हिंदीमध्यें होतोच. तिचे शब्द फारसी आणि अरबीच आहेत. उच्च दर्जाचें उर्दू जाणणाराला अरबी व फारसी शिकावें लागेल; ज्याप्रमाणें उच्च दर्जाचें गुजराथी, हिंदी, बंगाली, मराठी जाणणाराला संस्कृत जाणणें आवश्यक आहे.

६

# दुःखद प्रसंग : १

मीं मागें सांगितलेंच आहे, कीं हायस्कुलांत माझे खास मित्र असे थोडेच होते. अशा मैत्रीचें नांव देतां येईल असे दोन मित्र मला निरनिराळ्या वेळीं होते असें म्हणतां येईल. एक संबंध मी आपण होऊन त्या मित्राचा त्याग केला नसतांहि फार काळ चालला नाहीं. मीं दुसऱ्या मित्राची संगति धरली म्हणून पहिल्यानें मला सोडलें.

दुसरी मैत्री हें माझ्या आयुष्यांतील एक दुःखद प्रकरण आहे. ही मैत्री पुष्कळ वर्षेपर्यंत चालली. ती मैत्री करण्यामध्यें माझी दृष्टि त्या मित्राला सुधारण्याची होती. त्या इसमाची प्रथम माझ्या मधल्या बंधूशीं मैत्री होती. तो माझ्या बंधूंच्या वर्गांत होता. त्याच्यांत कित्येक दोष होते, ते मला दिसत होते. परंतु

ज्याला आपला म्हटलें, त्याला कधीं अंतर द्यायचें नाहीं हा गुण मीं त्याचे ठिकाणीं काल्पिला होता. माझी मातुःश्री, माझे वडील बंधु व माझी धर्मपत्नी तिघांनाहि हीं संगत रुचत नव्हती. माझ्यासारखा गर्विष्ठ नवरा बायकोची सूचना थोडीच मनावर घेणार ! आईच्या शब्दाबाहेर नाहीं जाणार, वडील बंधूंचें ऐकेनच; परंतु त्यांना मीं याप्रमाणें सांगून शांत केलें:—" तुम्हीं जे त्याचे दोष सांगितले, ते मला माहीत आहेत. त्याचे गुण मात्र तुम्हांला माहीत नाहींत. मला तो आडमार्गांत नेणार नाहीं. कारण माझा त्याचेबरोबरचा संबंध फक्त त्याला सुधारण्यासाठीं आहे. तो सुधारला तर फार उत्तम मनुष्य निघेल, अशी माझी खात्री आहे. तुम्हीं माझ्या-बद्दल निर्धास्त राहवें अशी माझी मागणी आहे." या बोलण्यानें त्यांचें समाधान झालें असें मला वाटत नाहीं; परंतु त्यांनीं माझ्यावर विश्वास ठेवून मला माझ्या मार्गानें जाऊं दिलें.

माझा अंदाज बरोबर नव्हता असें मला मागून दिसून आलें. सुधारणा करण्यासाठीं माणसानें आपल्या शक्तीपलीकडे खोल पाण्यांत उतरणें बरें नाहीं. ज्याला सुधारायचें आहे त्याचेबरोबर मैत्री शक्य नाहीं. मैत्रीमध्यें अद्वैत-भावना असते. अशी मैत्री जगांत क्वचितच आढळते. मैत्री समानगुणवाल्यांमध्यें शोभते व टिकते. मित्र एकमेकांवर परिणाम केल्याशिवाय रहायचेच नाहींत. त्यामुळें मैत्रीमध्यें सुधारणेला फारच थोडा वाव असतो. माझें असें मत आहे कीं खाजगी दोस्ती अनिष्ट आहे. कारण मनुष्य दोषच लवकर उचलतो. गुण ग्रहण करण्यास प्रयास पडत असतात. ज्याला आत्म्याची—ईश्वराची—मैत्री संपादावयाची आहे, त्यानें एकटें रहावें हें चांगलें, किंवा अखिल जगताची मैत्री करावी. वरील विचार योग्य असोत किंवा अयोग्य असोत, माझा तरी निकट मैत्री जमविण्याचा प्रयत्न निष्फळ ठरला.

मी या मित्राच्या संबंधांत आलों त्या वेळीं राजकोटमध्यें " सुधारणा-पंथ " पसरत होता. पुष्कळ हिंदू शिक्षक गुप्तपणें मांसाहार व मद्यपान करीत असतात, अशी बातमी या मित्राकडून मिळाली. राजकोटच्या इतर सुप्रसिद्ध गृहस्थांचींहि नांवें घेतलीं. हायस्कुलांतील कांहीं विद्यार्थ्यांचींहि नांवें माझ्या कानीं आलीं. मला आश्चर्य वाटलें व दुःखहि झालें. मीं कारण विचारलें तेव्हां असा युक्तिवाद सांगण्यांत आला : " आपण मांसाहार करीत नाहीं त्यामुळें आपला समाज नेभळट बनला आहे. इंग्रज आपल्यावर राज्य करतात त्याचें कारण त्यांचें मांसाशन होय. मी किती शक्तिवान् आहें आणि किती धांवूं शकतों तें तर तुम्हांला माहीतच आहे; त्याचें कारणहि माझें मांसाशन. मांसाहाऱ्याला गळवें होत नाहींत. झालीं तर चटकन् भरून निघतात. आमचे शिक्षक मांस खातात. इतके नामांकित लोक खातात, ते कांहीं खुळे म्हणून खातात ? तुम्हींहि खाल्लें पाहिजे. खाऊन पहा म्हणजे समजेल तुमच्यांत किती बळ येतें तें ! "

हा कांहीं एकच दिवस झालेला युक्तिवाद नव्हे. अशा तऱ्हेचे युक्तिवाद, अनेक उदाहरणांनीं सजविलेले असे अनेकवार झाले. माझे मधील बंधू तर अगोदरच बाटलेले होते. त्यांनीं त्या युक्तिवादाला स्वतःची अनुमति दिली. माझ्या बंधूंच्या व त्या मित्राच्या मानानें मी फारच नेभळट होतों. त्यांचीं शरीरें जास्त पीळदार होतीं. त्यांचें शरीरबळ माझ्यापेक्षां पुष्कळ जास्त होतें. ते हिंमतवान् होते. त्या मित्राचे पराक्रम पाहून मी मुग्ध होऊन जात असें. तो वाटेल तितकें धांवूं शकत असे. त्याचा वेगहि उत्तम होता. लांब आणि उंच उडीहि खूपपर्यंत मारीत असे. मार सहन करण्याची शक्तीहि त्याचप्रमाणें. या शक्तीचें प्रदर्शन तो माझ्यापुढें वेळोवेळीं करीत असे. आपल्यांत नसलेली शक्ति इतरांमध्यें पाहून माणसाला आश्चर्य वाटणारच. माझेंहि तसेंच झालें. आश्चर्यांतून मोह उद्‌भवला. माझ्यांत धांवण्यासवरण्याची शक्ति नाहींसारखीच होती. "मी पण या मित्राप्रमाणेंच बलवान् झालों तर किती चांगलें!"

शिवाय, मी फार भित्रा होतों. चोर, भुतें, साप इत्यादींच्या भीतीनें पछाडलेला होतों. या भीतीची पीडाहि मला खूप होत असे. रात्रीं एकट्यानें कोठेंहि जाण्याची हिंमत चालेना. अंधारांतून पाऊलहि टाकायचा नाहीं. दिव्याशिवाय झोंपणेंहि जवळ जवळ अशक्य. इकडून भूत आलें तर? आणि तिकडून चोर? तिसरीकडून सर्प? म्हणून दिवा हा पाहिजेच. जवळ झोंपलेल्या व आतां कांहीं अंशीं तारुण्यांत आलेल्या पत्नीजवळदेखील या माझ्या भीतीचा उल्लेख मीं कसा करावा? माझ्यापेक्षां ती जास्त हिंमतवान् होती, हें माझ्या लक्षात आलें होतें व त्याची मला लाजहि वाटे. तिला सापाबिपाचें भय कसें तें माहीतच नव्हतें. अंधारांतून एकटी जाई. ही माझी दुर्बलता त्या मित्राला माहीत होती. तो तर मला सांगे, कीं आपण जिवंत साप हातानें पकडतों. चोराची भीति त्याला ठाऊकच नव्हती. भुतांवर तर विश्वासच नव्हता. हा सर्व मांसाहाराचा प्रताप, असें त्यानें माझ्या मनावर ठसविलें.

त्या दिवसांत कवि नर्मदाशंकरांचें पुढील काव्य शाळेंत गाइलें जात असेः

इंग्रीश राज्य करिती, देशी दबून जाती,
देशी दबून जाती, उभयांची देख शक्ती,
तो पांच हात पूर्ण, पुरणार पांचशेंना.

या सर्वांचा माझ्या मनावर व्हायचा तो परिणाम झाला. मी नरमलों. "मांसाहार ही चांगली गोष्ट आहे. त्यामुळें मी बलवान् व हिंमतवान् बनेन. सर्व देश मांसाहार करील, तर इंग्रजांचा पाडाव करतां येईल," असें मला वाटूं लागलें.

मांसाहाराचा आरंभ करण्याचा दिवस मुक्रर झाला.

ह्या निश्चयाचा—या उपक्रमाचा—अर्थ सर्वच वाचकांच्या पूर्णपणें लक्षांत येणार

नाहीं. गांधी-कुटुंब वैष्णव संप्रदायांतलें. माझ्या मातापित्यांची तर विशेष धर्मनिष्ठ म्हणून ख्याति. रोज हवेलींत जायचीं. कित्येक देवळें तर आमच्या कुटुंबांचींच म्हटलीं तरी चालतील. शिवाय गुजराथेंत जैन संप्रदायाचें विशेष प्राबल्य. त्याची छाप हरएक स्थळीं, हरएक कार्यामध्यें दिसून येते. अर्थात् मांसाहाराबद्दल जो विरोध, जो तिरस्कार गुजराथेंत आणि श्रावकांमध्यें व वैष्णवांमध्यें दिसून येतो, तसा हिंदुस्थानांत किंवा साऱ्या जगांत इतरत्र कोठेंहि दिसून येणार नाहीं. हे माझे संस्कार.

मातापित्यांचा मी परम भक्त. माझ्या मांसाहाराची गोष्ट त्यांच्या कानीं गेली तर त्यांचें असत्या आयुष्यीं तत्काल प्राणोत्क्रमण होईल, असें मला वाटत होतें. समजून किंवा बिनसमजतां पण मी सत्याचा सेवक होतोंच. मांसाहार करतांना मातापित्यांना फसवावें लागेल हें ज्ञान त्या वेळीं मला नव्हतें, असें मी सांगूं शकत नाहीं.

अशा स्थितीमध्यें माझा मांसाहार करण्याचा निश्चय ही माझ्या बाबतींत फार गंभीर व भयंकर गोष्ट होती.

परंतु मला तर सुधारणा घडवून आणावयाची होती. मांसाहाराचा शोक नव्हता. त्यांत स्वाद आहे असें समजून मला मांसाहार सुरू करायचा नव्हता. मला तर बलवान्, हिंमतवान् व्हायचें होतें. इतरांना तसें होण्याचें निमंत्रण द्यायचें होतें, आणि मग इंग्रजांचा पाडाव करून हिंदुस्थानला स्वतंत्र करायचें होतें. ‘ स्वराज्य ’ शब्द त्या वेळीं ऐकला नव्हता. या सुधारणेच्या उत्कटतेंत माझें भान हरपलें.

● ● ●

७

# दुःखद प्रसंग : २

नेमला दिवस आला. माझ्या स्थितीचें संपूर्ण वर्णन करणें कठिण आहे. एका बाजूनें सुधारणेचा उत्साह, राहणींत महत्वाचा फेरफार करण्याचें कौतुक, आणि दुसऱ्या बाजूनें चोराप्रमाणें लपून काम करण्याची शरम. यांपैकीं कोणती वस्तु प्रधान होती याचें मला आज स्मरण नाहीं. आम्ही नदीकडे एकान्त शोधायला चाललों. दूर जाऊन कोणी पाहणार नाहीं असा कोपरा शोधून काढला आणि तेथें मीं कधीं न पाहिलेली वस्तु—मांस पाहिलें. बरोबर भट्टीवाल्याकडची डबलरोटी होती. दोहोंतून एकहि वस्तु आवडेना ! मांस चामड्यासारखें लागे ! खाणें अशक्य होऊन गेलें ! मला ओकारी यायला लागली. खाणें अर्ध्यावर सोडावें लागलें

ती रात्र मला फार बिकट गेली. झोंप येईना. जणुं काय शरीरांत बकरें जिवंत आहे आणि ओरडतें आहे अशीं स्वप्नें पडत. मी उसळून उठें, पस्तावें आणि पुन्हां विचार करीं, कीं मांसाहार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं; हिंमत सोडतां कामा

नये ! मित्रहि नाउमेद होणारा नव्हता. त्यानें आतां मांस निरानिराळ्या तऱ्हेनें रांधण्याला आणि मीठ-मसाला घालून त्याचा दर्प झांकून टाकण्याला सुरुवात केली. नदीकांठीं घेऊन जाण्याऐवजीं एका बबर्जीशीं संधान बांधून गुपचुपपणें एका सरकारी डाक बंगल्याकडे घेऊन जाण्याची योजना केली आणि तेथे मला खुर्ची-टेबल इत्यादि सामग्रीच्या मोहांत घातलें. त्याचा परिणाम झाला. रोटीचा तिरस्कार मंदावला, बकऱ्याची कींव बुजाली आणि मांसाची म्हणतां येत नाहीं, पण मांस-मिश्रित पदार्थांची चटक लागली. अशा तऱ्हेनें एक वर्ष लोटलें असावें, व त्या मुदतींत पांचसहा वेळा मांस खायला मिळालें असेल. कारण कीं डाक बंगला वाटेल तेव्हां मिळेना, मांसाचीं स्वादिष्ट समजलीं जाणारीं सुरस पक्वानें नेहमींच तयार करणें जुळत नसे. शिवाय असल्या जेवणांना पैसेहि पडणार. माझ्याजवळ फुटकी कवडीहि नव्हती, त्यामुळें मी कांहीं देणें शक्य नव्हतें. पैसे त्या मित्रालाच शोधून काढावे लागत. त्यानें कोठून आणले असतील त्याची मला आजमितीपर्यंत माहिती नाहीं. त्याचा इरादा तर मला मांसखाऊ करून सोडण्याचा—मला बाटविण्याचा—होता. त्यासाठीं पैशाचा खर्च स्वतः करी. परंतु त्याच्याजवळ म्हणून अखंड खजिना नव्हता. अर्थात् असलीं जेवणें क्वचितच होऊं शकत.

जेव्हां जेव्हां मी असलीं जेवणें जेवीत असे, तेव्हां तेव्हां घरीं जेवण शक्यच होईना. आई जेव्हां जेवायला बोलवी, तेव्हां "आज भूक नाहीं, पचन झालेलें नाहीं" अशा सबबी काढाव्या लागत. असें सांगतांना त्या वेळीं मला मोठा धक्का बसत असे. असलें असत्य; आणि तेंहि आईजवळ ! शिवाय मातापित्यांना जर समजलें कीं मुलगे मांसाहारी झाले आहेत, तर त्यांच्यावर वीजच कोसळल्याप्रमाणें होईल. हे विचार माझ्या हृदयाला घरें पाडीत. म्हणून मीं निश्चय केला, "मांस खाणें आवश्यक आहे. त्याचा प्रचार करून आपण हिंदुस्थानला सुधारूं. परंतु मातापित्यांना फसविणें आणि खोटें बोलणें हें मांस न खाण्यापेक्षांहि खराब आहे. यासाठीं आईबाप जिवंत असेपर्यंत मांस खातां कामा नये. त्यांच्या मृत्यूनंतर स्वतंत्र झालों म्हणजे उघडपणें खावें, व ती वेळ येईपर्यंत मांसाहाराचा त्याग करावा." हा निश्चय मीं मित्राला कळविला, आणि तेव्हांपासून मांसाहार सुटला तो सुटलाच. आपले दोन मुलगे मांसाहार करून चुकले आहेत, हें आईबापांना कधींच समजलें नाहीं.

मातापित्यांना न फसविण्याच्या शुभ विचारानें मीं मांसाहार सोडला; परंतु ती मैत्री मात्र सोडली नाहीं. सुधारायला निघालेला मीच बाटलों आणि बाटल्याचें माझ्या ध्यानांतहि आलें नाहीं !

त्याच मैत्रीमुळें मी व्यभिचारांतहि पडलों असतों. एक वेळ हा भाई मला वेश्यांच्या वस्तींत घेऊन गेला. तेथें मला योग्य सूचना देऊन एका बाईच्या घरांत

सोडलें. मीं कांहीं तिला पैसे वगैरे द्यायचे नव्हते. हिशेब चुकवलेला होता. मीं फक्त गुजगोष्टी करावयाच्या होत्या.

मी घरांत अडकलों तर खरा; परंतु ईश्वराचीच ज्याला तारण्याची इच्छा, तो पडूं पहात असला तरी पवित्र राहूं शकतो. त्या खोलींत मी तर आंधळाच बनून गेलों. मला बोलण्याचें भान राहिलें नाहीं. शरमेनें स्तब्ध होऊन त्या बाई-पाशीं खाटेवर बसलों. परंतु तोंडांतून शब्दच निघेना. बाई संतापली, आणि चार-दोन शेलक्या विशेषणांचा अहेर करून तिनें मला दरवाजा दाखविला.

त्या वेळीं तर माझ्या मर्दगिरीला लांछन आलें असेंच मला वाटलें, आणि धरणीमाता मला आपल्या पोटांत घेईल तर बरें, असें मला वाटूं लागलें. परंतु अशा तऱ्हेनें बचावल्याबद्दल मीं सदैव ईश्वराचे आभार मानले आहेत. अशाच तऱ्हेचे आणखी चार प्रसंग माझ्या आयुष्यांत आलेले आहेत. त्यांपैकीं बहुतेक प्रसंगीं स्वतःच्या प्रयत्नाशिवाय, बाह्य संयोगामुळेंच मी बचावलों, असें म्हणतां येईल. विशुद्ध दृष्टीनें तर या सर्व प्रसंगीं माझें पतन झालेंच असें म्हणतां येईल. मीं विषयाची इच्छा केली, तेव्हांच मी ते विषय करून चुकलों. तरी पण लौकिक दृष्टीनें, इच्छा केली असूनहि प्रत्यक्ष कर्मापासून जो बचावतो, त्याला आपण बचावलाच म्हणतों. आणि मी या प्रसंगीं याच अर्थानें, एवढ्याच अंशानें बचावलों, असें म्हणतां येईल. शिवाय कित्येक कार्येंच अशीं असतात, कीं जीं प्रत्यक्ष करण्यापासून बचावल्यानें व्यक्तीचा व त्याच्या सहवासांत येणाऱ्यांचा फार फायदा होतो; आणि जेव्हां विचार शुद्ध होतात, तेव्हां त्या कर्मापासून झालेला बचावहि तो ईश्वरी कृपा समजतो. ज्याप्रमाणें पतन न पावण्याचा प्रयत्न करीत असतांहि मनुष्याचा अधःपात होतो असा कैक वेळां अनुभव येतो, त्याचप्रमाणें कुमार्गानें जाण्याची इच्छा असूनहि अनेक बाह्य संयोगामुळें मनुष्य बचावून जातो, ही पण अनुभवसिद्ध गोष्ट आहे. यांत पुरुषार्थाला जागा किती आहे, दैवाला किती आहे, अथवा कोणत्या नियमांच्या नियंत्रणानुरूप मनुष्याचा अधःपात किंवा बचाव होतो, हे गहन प्रश्न आहेत. त्यांचा उलगडा आजपर्यंत झालेला नाहीं आणि कायमचा उलगडा कधीं तरी होईल कीं नाहीं, तें सांगणेंहि कठिण आहे.

परंतु आपण पुढें चालूं या.

त्या मित्राची मित्रता अनिष्ट आहे ही गोष्ट अजूनहि माझ्या ध्यानांत आली नाहीं. तसें होण्यापूर्वीं आणखीहि कांहीं कडवे अनुभव मला मिळायचे होते. त्याच्या ठिकाणीं मला कल्पनाहि नाहीं अशा दोषांचें जेव्हां प्रत्यक्ष दर्शन झालें, तेव्हांच माझ्या डोक्यांत उजेड पडला. परंतु मी होतां होईल तों माझे अनुभव कालानुक्रमानें लिहीत आहें; म्हणून इतर अनुभव पुढें येतील.

या वेळची एक गोष्ट आहे, तेवढी सांगितली पाहिजे. आम्हीं नवराबायको-

मध्यें वितुष्ट येई आणि कज्जेकफावती होत, त्याच्या मुळाशीं ही मैत्री पण होती. मीं मागें सांगितलेंच आहे, कीं मी जसा प्रेमळ तसाच संशयी पति होतों. या या मैत्रीमुळें माझ्या संशयी वृत्तींत भर पडली. कारण कीं मित्राच्या सत्यवादित्वाबद्दल मला बिलकुल शंका नव्हती. या मित्राच्या बोलण्यावर विश्वास ठेवून मीं माझ्या धर्मपत्नीला कितीतरी दुःख दिलेलें आहे. या हिंसेबद्दल मीं स्वतःला कधींच क्षमा केलेली नाहीं. असलीं दुःखें हिंदु स्त्रीच सहन करीत असेल; आणि म्हणूनच मी नेहमीं स्त्रीला सहनशीलतेची केवळ मूर्तीच असें मानीत आलों आहे. नोकरावर खोटा आळ घेतला तर नोकर नोकरी सोडील, मुलावर असा प्रसंग आला तर मुलगा बापाचें घर सोडून जाईल, मित्रांमित्रांमध्यें संशय आला तर मैत्री तुटेल, पत्नीला पतीचा संशय आला तर ती मनांतल्या मनांत फणफणून गप्प बसेल; परंतु जर पतीनें पत्नीवर आळ घेतला तर पत्नीचा बिचारीचा भोगच उभा राहिला ! ती जाणार कोठें ? उच्च मानलेल्या वर्णाची हिंदु स्त्री कोर्टांत जाऊन बांधलेली गांठ कापवूनहि टाकूं शकत नाहीं. असा एकतर्फी न्याय तिच्या बाबतींत चालू आहे. असलाच न्याय मींहि दिला, त्याचें दुःख कधींहि विसरणें शक्य नाहीं. या संशयी वृत्तीचा सर्वथैव नाश मला अहिंसेचें सूक्ष्म ज्ञान झालें तेव्हांच झाला; म्हणजेच जेव्हां मी ब्रह्मचर्याचा महिमा समजलों, आणि हेंहि समजलों, कीं पत्नी पतीची दासी नाहीं, तर त्याची सहचारिणी आहे, सहधर्मिणी आहे, दोघंहि एकमेकांच्या दुःखांचीं समान वांटेकरी आहेत आणि जितकी स्वतंत्रता बरेंवाईट करण्याची पतीला आहे तितकीच स्त्रीला आहे. या संशयग्रस्ततेच्या कालाचें स्मरण झालें म्हणजे मला माझा मूर्खपणा व विषयांध निर्दयता यांजबद्दल संताप येतो, आणि मैत्रीच्या बाबतींतील मूढपणाची कींव वाटते.

• • •

८

# चोरी आणि प्रायश्चित्त

मांसाहाराच्याच सुमाराच्या, तसेंच त्यापूर्वीं घडलेल्या कित्येक दोषांचें वर्णन अजून करायचें राहिलें आहे. हे दोष विवाहापूर्वींचे किंवा त्यानंतर लवकरच घडलेले आहेत.

माझ्या एका नातलगाबरोबर मला विडी पिण्याची चटक लागली. आमच्यापाशीं पैसे नसत. विडी पिण्यापासून कांहीं फायदा आहे किंवा तिच्या वासांत कांहीं मजा आहे, असें आम्हां दोघांपैकीं एकालाहि वाटत नव्हतें; परंतु फक्त धूर काढण्यांतच कांहीं मजा असावी अशी समजूत होती. माझ्या चुलत्यांना विडी

ओढण्याची संवय होती. त्यांना व इतरांना धूर काढतांना पाहून आम्हांलाहि विडी फुंकण्याची इच्छा झाली. गांठीला पैसा तर नाहीं. तेव्हां काकांनीं फेंकून दिलेलीं विड्यांचीं थोटकें चोरण्यास आम्हीं सुरुवात केली.

परंतु विड्यांचे तुकडे नेहमींच कोठून मिळणार? शिवाय, त्यांतून विशेष धूरहि निघेना. म्हणून नोकराच्या गांठीला चारदोन दिडक्या असत, त्यांतील मधून मधून एकादी लांबविण्याला सुरुवात केली, आणि तिच्या विड्या विकत आणूं लागलों. परंतु त्या ठेवायच्या कुठें, हा प्रश्न पडला. वडिलांच्या देखत विडी प्यायची नाहीं हें माहीत होतें. कसेंबसें करून चारदोन दिडक्या चोरून कांहीं आठवडे-पर्यंत चालविलें. मध्यंतरीं अशी बातमी मिळाली कीं एक झाड असतें, (त्याचें नांव आतां लक्षांत नाहीं) त्याच्या डहाळ्या विडीप्रमाणेंच पेटतात, आणि त्याहि विडीप्रमाणेंच ओढतां येतात. आम्ही त्या आणून ओढूं लागलों!

परंतु समाधान होईना; आमची पराधीनता आम्हांला बोंचूं लागली. वाडिलांच्या परवानगीशिवाय कांहींच करतां येऊं नये, याचें फार वाईट वाटलें. आम्ही कंटाळलों आणि आत्महत्या करण्याचा निश्चय केला!

पण आत्महत्या कशी करायची? विष कोण देणार? ऐकलें कीं धोतऱ्याच्या फळांतील बिया खाल्ल्या तर मनुष्य मरतो. रानांत जाऊन आम्हीं त्या मिळवून आणल्या. संध्याकाळची वेळ शोधली. केदारजीच्या देवळांत नंदादीपांत तूप घातलें, देवदर्शन घेतलें आणि एकांताची जागा शोधून काढली. परंतु विष खाण्याची छाती होईना. तत्काळ मृत्यु आला नाहीं तर? मरून तरी काय मिळणार? पराधीनता भोगून टाकलेली काय वाईट? तरीहि चारदोन बिया खाल्ल्याच! आणखी खाण्याचें मात्र धैर्य होईना. दोघांनाहि मृत्यूची भीति वाटली, आणि रामजीच्या देवळांत जाऊन दर्शन घेऊन शांत होण्याचा व आत्महत्येची गोष्ट विसरून जाण्याचा आम्हीं ठराव केला.

आत्महत्येचा बेत करणें सोपें, पण प्रत्यक्ष आत्महत्या करणें सोपें नाहीं, ही गोष्ट माझ्या लक्ष्यांत आली. त्यावरून जेव्हां कोणी आत्महत्या करण्याची धमकी देऊं लागतो, तेव्हां त्याचा माझ्यावर फारच थोडा परिणाम होतो—मुळींच होत नाहीं म्हटलें तरी चालेल.

या आत्महत्येच्या विचारापासून एक परिणाम घडून आला. तो हा कीं आम्ही दोघेहि उष्टया विड्या चोरून पिण्याची व नोकराच्या दिडक्या चोरून त्यांच्या विड्या पिण्याची संवय पार विसरून गेलों. मोठेपणीं विडी पिण्याची इच्छाच मला कधीं झालेली नाहीं; आणि ही संवय जंगली, गलिच्छ व हानि-कारक आहे असेंच मी नेहमीं मानीत आलों आहे. विडीचा इतका जबरदस्त शोक दुनियेला कां असावा, त्याचें कारण समजण्याची शक्ति मी कधींच मिळवूं

शकलेला नाहीं. आगगाडीच्या डब्यांत जेथें खूप विड्या फुंकल्या जात असतात, तेथें बसणें मला असह्य होतें व त्यांच्या धुरानें मी गुदमरून जातों.

विड्यांचीं थोटकें चोरणें, तसेंच त्यासाठीं चाकराचे पैसे चोरणें, या गुन्ह्यांपेक्षांहि दुसरा एक चोरीचा गुन्हा जो माझ्या हातून घडला, तो मी जास्त भयंकर समजतों. विडीचा गुन्हा घडला तेव्हांचें वय बारा-तेरा वर्षांचे असेल; कदाचित् त्याहूनहि कमी. दुसऱ्या चोरीच्या वेळीं वय पंधरा वर्षांचें असावें. ही चोरी माझ्या मांसाहारी बंधूंच्या सोन्याच्या कड्याच्या तुकड्याची होय. त्यांना थोडेसें, म्हणजे पंचवीस एक रुपयांचें कर्ज झालें होतें. तें फेडावें कसें त्याचा आम्ही उभयतां बंधू विचार करीत होतों. माझ्या बंधूंच्या हातांत सोन्याचें भरीव कडें होतें. त्यांतून एक तोळा सोनें कापून काढणें कठिण नव्हतें.

कडें कापलें, कर्ज फिटलें. परंतु मला ही गोष्ट असह्य झाली. इतःपर चोरी म्हणून करावयाची नाहीं, असा मीं निश्चय केला. वडिलांपाशीं कबुलीहि देऊन टाकली पाहिजे असें वाटूं लागलें. पण जीभ तर चालेच ना. वडील स्वतः मला मारतील अशी भीति वाटत नव्हती. त्यांनीं उभ्या जन्मांत आम्हां भावांना कधीं तरी मारलें असेल असें आठवत नाहीं. परंतु त्यांना स्वतःला दुःख होईल. डोकेंहि आपटून घेतलें तर? हा धोका सहन करूनहि गुन्हा कबूल केलाच पाहिजे, त्याखेरीज दोषाचें क्षालन होणार नाहीं, असें मनानें घेतलें.

अखेरीला मीं ठराव केला कीं चिठी लिहून गुन्हा कबूल करावा आणि माफी मागावी. मीं चिठी लिहिली आणि स्वतः त्यांचे हातीं नेऊन दिली. चिठीमध्यें सर्व गुन्हा कबूल करून शिक्षा मागितली होती, त्यांनीं स्वतःवर कांहीं दुःख ओढवून घेऊं नये अशी विनवणी केली होती; व इतःपर अशा तऱ्हेचा गुन्हा न करण्याची प्रतिज्ञा केली होती.

मीं कांपऱ्या हातानें ती चिठी वडिलांच्या हातांत दिली. मी त्यांच्या उच्चासनाच्या समोर बसून राहिलों. त्यावेळीं त्यांना भगंदराची व्यथा होती. त्यामुळें ते अंथरुणाला खिळलेले होते. खाटेऐवजी लाकडी उच्चासन वापरीत.

त्यांनीं चिठी वाचली. डोळ्यांतून मोत्याचे बिंदू गिळले. चिठी भिजली. त्यांनीं क्षणमात्र डोळे मिटून धरले, ती चिठी फाडून टाकली आणि वाचण्यासाठीं बसले राहिले होते ते परत आडवे झाले.

मी पण रडलों. वडिलांचें दुःख समजूं शकलों. मी चित्रकार असतों तर आजहि तें चित्र पूर्णपणें रेखाटूं शकलों असतों, इतक्या स्पष्ट रीतीनें तें माझ्या डोळ्यांसमोर उभें आहे.

त्या मौक्तिकबिंदूंच्या प्रेमबाणानें माझें हृदय भेदून टाकलें. मी शुद्ध झालों.

ज्याला अनुभव असेल तोच हें प्रेम समजूं शकणार. " रामबाण वाग्या रे होय ते जाणे."*

माझ्या दृष्टीनें हा अहिंसेचा पदार्थपाठ होता. त्यावेळीं त्यांत मला पितृप्रेमापलीकडे कांहीं दिसलें नव्हतें. परंतु आज मी त्याला शुद्ध अहिंसा या रूपानें ओळखूं शकतों. अशा तऱ्हेच्या अहिंसेनें व्यापक स्वरूप धारण केलें, म्हणजे तिच्या स्पर्शापासून कोण अलिप्त राहणार ? अशा व्यापक अहिंसेच्या शक्तीचें मोजमाप करणें अशक्य आहे.

अशा तऱ्हेची शांत क्षमा वडिलांच्या स्वभावाविरुद्ध होती. ते संतापतील, लावून बोलतील, कदाचित् डोकेंहि आपटून घेतील असें मला वाटलें होतें. परंतु त्यांनीं इतकी अपार शांति राखली त्याचें कारण गुन्ह्याची निखालस कबुली हेंच होय, असें मला वाटतें. जो मनुष्य अधिकारी मनुष्यापाशीं स्वतःचा गुन्हा खुल्या दिलानें कबूल करतो व पुन्हा न करण्याची प्रतिज्ञा करतो, तो सर्वोत्कृष्ट प्रायश्चित्त करतो. मला माहीत आहे, कीं माझ्या कबुलीमुळें वडील माझ्याविषयीं निश्चित झाले आणि त्यांच्या मजवरील अगाध प्रेमांत भरच पडली.

• • •

## ९

# वडिलांचा मृत्यू व माझी नालायकी

माझें सोळावें वर्ष चालू होतें. वडील भगंदराच्या विकारानें अंथरुणांतच पडून असत, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यांच्या शुश्रुषेला मातुःश्री, घरचा एक जुना नोकर व मी अशीं तिघेजणें बहुतेक वेळ रहात असूं. माझें काम 'नर्स' चें होतें. त्यांचा व्रण धुणें, त्याला औषध लावणें, मलम लावायचें असेल तेव्हां तें लावणें, औषध देणें आणि औषध घरीं तयार करावयाचें असल्यास तयार करणें, हें माझें मुख्य काम होतें. रोज रात्रीं त्यांचे पाय चेपावे, व त्यांनीं जा म्हटलें किंवा त्याना झोंप लागली म्हणजे मी झोंपावयाला जावें असा परिपाठ होता. मला ही सेवा अतिशय प्रिय होती. तींत कधींहि चुकारपणा केल्याचें मला स्मरत नाहीं. हे माझे हायस्कूलचे दिवस होते. त्यामुळें खाण्यापिण्याखेरीजचा माझा सर्व वेळ शाळेंत किंवा वडिलांच्या शुश्रुषेंतच जात असे. वडिलांची परवानगी असेल आणि त्यांच्या प्रकृतीकडून अडचण नसेल, तेव्हां संध्याकाळचा फिरायला जात असें.

* रामबाण ज्याला लागला असेल तोच समजणार.

याच वर्षी पत्नीला दिवस गेले. ही गोष्ट दोन प्रकारें लाजिरवाणी होती, हें मी आज समजूं शकतों. एक तर हा काळ विद्याभ्यासाचा असतां मीं संयम राखला नाहीं; आणि दुसरी गोष्ट अशी कीं शाळेचा अभ्यास करावयाचा धर्म मला समजत होता, त्याहूनहि मातापितरांच्या भक्तीचा धर्म समजत होता—तो येथपर्यंत कीं त्या बाबतींत बालपणापासूनच 'श्रवण' हा माझा आदर्श होता—असें असूनहि विषय माझ्या मनावर सत्ता चालवूं शकत होता. कारण कीं रात्रीं मी वडिलांचे पाय चेपीत बसत असें खरा, परंतु मन शयनगृहाकडे धांव घेत असे; आणि तेंहि अशा वेळीं कीं जेव्हां धर्मशास्त्र, वैद्यकशास्त्र आणि व्यवहारशास्त्र यांच्या दृष्टीनें स्त्रीसंग वर्ज्य होता. सेवेमधून सुटी मिळाली कीं मला आनंद होत असे, आणि वडिलांना नमस्कार करून तडक शयनगृहाकडे मी जात असें.

वडिलांचें दुखणें वाढत्या प्रमाणांत होतें. वैद्यांनीं स्वतःचे लेप लावून पाहिलें. हकिमांनीं मलमपट्टी करून पाहिली. न्हाव्यांचे वगैरे सामान्य घरगुती उपाय करून झाले. इंग्रज डॉक्टरानेंहि आपली बुद्धि चालवून पाहिली. इंग्रज डॉक्टरानें शस्त्रक्रिया एवढाच इलाज आहे असें सुचविलें. कुटुंबाचे घरोब्याचे वैद्य होते ते मध्यें पडले आणि वडिलांच्या उतार वयांत तसली शस्त्रक्रिया त्यांनीं नापसंत केली. अनेक प्रकारच्या बाटल्या विकत घेतलेल्या फुकट गेल्या, व शस्त्रक्रिया झाली नाहीं. वैद्यराज हुषार, नामांकित होते. मला वाटतें, कीं जर त्यांनीं शस्त्रक्रिया होऊं दिली असती, तर जखम भरून येण्यास अडचण पडली नसती. शस्त्रक्रिया मुंबईच्या त्या वेळच्या प्रसिद्ध सर्जनच्या हातून व्हावयाची होती. पण अंत जवळ येऊन ठेपला होता, मग योग्य उपायांचा अंमल कोठून होणार ? वडील मुंबईहून शस्त्रक्रिया करविल्याखेरीज, व त्यासाठीं खरेदी केलेलें सर्व सामान बरोबर घेऊन परत आले. त्यांनीं जास्त जगण्याची आशा सोडून दिली. अशक्तपणा वाढत चालला, आणि दर एक क्रिया बिछान्यांतच करावी लागणार अशी स्थिति येऊन पोंचली. परंतु शेवटपर्यंत त्यांनीं तसें करण्याचें नाकारलें, आणि त्यासाठीं पडतील ते कष्ट सोसण्याचा आग्रह कायम राखला. वैष्णवधर्माची तशी करडी आज्ञाच आहे. बाह्यशुद्धि अति आवश्यक आहे; परंतु पाश्चात्य वैद्यकशास्त्रानें आपणांस हें दाखवून दिलें आहे, कीं मलत्याग व स्नान वगैरे बिछान्यांत निजूनहि पूर्ण स्वच्छपणें होऊं शकतात व रोग्याला कष्ट सहन करावे लागत नाहींत; पहावें तेव्हां त्याचें अंथरूण स्वच्छच असतें. अशा तऱ्हेनें राखलेली स्वच्छता मी तरी वैष्णवधर्मसंमतच मानतों. परंतु त्या वेळीं वडिलांचा स्नान वगैरेसाठीं अंथरुणांतून बाहेर येण्याचा आग्रह पाहून मी तरी आश्चर्यचकित होत असें, आणि मनांतल्या मनांत त्यांची स्तुति करीत असें.

मृत्यूची घोर रात्र येऊन ठेपली. त्या वेळीं माझे चुलते राजकोटलाच होते.

मला असें कांहींसें स्मरतें, कीं वडिलांचें दुखणें वाढत चाललें आहे असें कळल्यावरूनच ते आले होते. उभयतां बंधूंमध्यें गाढ प्रेम वसत होतें. काका सबंध दिवस वडिलांच्या बिछान्याजवळ बसून रहात आणि आम्हां सर्वांना झोंपायला सांगून स्वतः वडिलांच्या बिछान्यापाशीं झोंपत असत. कोणाच्या हें स्वप्नींहि नव्हतें, कीं ही रात्र अखेरची ठरेल. धाकधूक तर नेहमींच चालू होती. रात्रीचे साडेदहा किंवा अकरा वाजले असावेत. मी पाय चेपीत बसलों होतों. काकांनीं मला सांगितलें, "तूं जा, आतां मी बसतों." मी खूष झालों, आणि सरळ शयनगृहामध्यें गेलों. पत्नीला बिचारीला गाढ झोंप लागली होती. परंतु मी कसचा झोंपूं देणार? मीं तिला जागी केली. पांचसात मिनिटें झालीं असतील नसतील इतक्यांत ज्याचा मीं पूर्वीं उल्लेख केला आहे, त्या नोकरानें दार ठोठावलें. माझ्या पोटांत धस्स झालें. मी चपापलों. "ऊठ, बापू फार आजारी आहेत" नोकर म्हणाला. फार आजारी आहेत हें मला माहीतच होतें. त्यामुळें त्या वेळच्या "फार आजारी"चा विशेष अर्थ माझ्या लक्षांत आला. बिछान्यांतून ताडकन् उडी मारून मी उठलों.

"काय झालें, सांग तर खरा!"

"बापू आटोपले!" जबाब मिळाला.

आतां मला पश्चात्ताप झाला तरी उपयोग काय? मी अति शरमलों. मला अतिशय दुःख झालें. वडिलांच्या खोलीकडे धांवून गेलों. माझ्या ध्यानांत आलें, कीं मी विषयांध नसतों, तर शेवटच्या त्या घडीला माझ्या नशिबीं वियोग आला नसता. मला अंतकाळीं वडिलांची पादसेवा करीत राहतां आलें असतें. आतां केवळ काकांच्या तोंडून मला ऐकायचें राहिलें कीं, "बापू तर आपल्याला सोडून निघून गेले!" आपल्या वडील बंधूंचे परमभक्त असे काका त्यांच्या शेवटच्या सेवेचा मान मिळवून बसले. वडिलांना आपल्या मृत्यूचें पूर्वज्ञान झालें होतें. त्यांनीं खुणेनें लिहिण्याचें सामान मागितलें. कागदावर त्यांनीं लिहिलें कीं "तयारी करा." एवढें लिहून हातांतील कडें त्यांनीं स्वतःच्या हातानेंच काढून टाकलें. सोन्याची कंठी होती तीहि काढून फेंकून दिली. क्षणमात्रामध्यें आत्मा उडून गेला.

माझ्या ज्या शरमेचें दिग्दर्शन मीं मागील एका प्रकरणांत केलें होतें, ती शरम हीच—सेवेच्या वेळीं विषयेच्छा! हा काळा डाग मी आजपर्यंत घासून टाकूं शकलेला नाहीं, विसरून जाऊं शकलेला नाहीं; आणि मी नेहमीं असेंच मानीत आलों आहे, कीं जरी माझी मातापित्यांबद्दलची भक्ति अपरंपार होती, जरी तिच्यासाठीं मी सर्व कांहीं सोडूं शकत होतों, तरीहि त्या सेवेच्या प्रसंगींहि माझें मन विषयाला सोडूं शकत नव्हतें, हें त्या सेवेमधील एक अक्षम्य न्यून होतें. आणि म्हणूनच स्वतःला मी एकपत्नीव्रत पाळणारा मानीत असूनहि विषयांध

मानीत आलों आहे. त्यांतून सुटून जाण्यास मला फार अवधि लागला, व सुटून जाण्यापूर्वीं अनेक धर्मसंकटें सहन करावीं लागलीं.

माझ्या दुहेरी शरमेचें हें प्रकरण पुरें करण्यापूर्वीं हेंहि सांगून मोकळा होतों, कीं माझ्या पत्नीला जें मूल झालें तें चार-दोन दिवसच श्वास घेऊन निघून गेलें! याहून दुसरें काय होणार? ज्या आईबापांची किंवा बाल पतिपत्नींची मर्जी असेल, त्यांनीं या माझ्या दाखल्यावरून सावध व्हावें.

• • •

## १०
# धर्मजागृति

सहाव्या-सातव्या वर्षापासून तों सोळा वर्षांचा होईपर्यंत मीं अभ्यास केला; परंतु शाळेंत कोठेंहि धर्माचें शिक्षण मिळालें नाहीं. शिक्षकांपासून सहजीं मिळावयाचें तेंहि मिळालें नाहीं, असें म्हणतां येईल. तरी पण वातावरणांतून कांहीं ना कांहीं मिळतच गेलें. येथें धर्माचा व्यापक अर्थ घेतला पाहिजे. धर्म म्हणजे आत्मभान—आत्मज्ञान.

माझा जन्म वैष्णव संप्रदायांत झालेला. अर्थात् हवेलींत वेळोवेळीं जाणें होई. परंतु हवेलीबद्दल माझ्या मनांत श्रद्धा उत्पन्न झाली नाहीं. हवेलीचें वैभव मला आवडलें नाहीं. हवेलीमध्यें चालणाऱ्या अनीतीच्या गोष्टी ऐकत असें व त्यामुळें त्यांचेबद्दल मन उदास होऊन गेलें. तेथून मला कांहींच लाभ झाला नाहीं.

परंतु जें हवेलीपासून कांहीं मिळूं शकलें नाहीं, तें माझ्या दाईपासून मिळालें. ती कुटुंबाची जुनी नोकर होती. तिच्या प्रेमाचें मला आजहि स्मरण होतें. मी पूर्वीं सांगितलेंच आहे, कीं मला भूतप्रेतादींचें भय वाटे. 'रामनाम' हें त्यावर औषध आहे हें रंभेनें मला समजावून सांगितलें. माझी तरी रामनामापेक्षां रंभेवरच विशेष श्रद्धा होती. म्हणून मीं बालवयामध्यें भूतप्रेतादिकांच्या भीतीपासून मुक्त होण्यासाठीं रामनामाचा जप सुरू केला. तो फार दिवस चालला नाहीं; परंतु बालपणामध्यें पेरलेलें बीं जळून गेलें नाहीं. आज रामनाम ही माझ्या बाबतींत अमोघ शक्ति आहे. त्याचें कारण रंभाबाईनें पेरलेलें बीं असें मला वाटतें.

याच सुमारास माझ्या एका चुलत्याचा मुलगा—कीं जो रामायणाचा भक्त होता, त्यानें आम्हां दोघां भावांना रामरक्षेची संथा देण्याची व्यवस्था केली. आम्हीं ती पाठ करून नित्य प्रातःकाळीं स्नानानंतर म्हणण्याचा नियम केला. पोरबंदरमध्यें रहात होतों, तोंपर्यंत हें ठीक चाललें. पुढें राजकोटच्या वातावरणांत तें पुसटून गेलें. या क्रियेबद्दलहि विशेष श्रद्धा नव्हती. त्या वडील बंधूंबद्दल आदर

होता, आणि कांहीं अंशीं रामरक्षा शुद्ध उच्चारानिशीं पाठ म्हणतां येते त्यासाठीं अभिमानहि वाटे, म्हणून तिचा पाठ होई.

पण माझ्या मनावर सर्वांत जास्त कसला परिणाम झाला असेल, तर तो रामायणाचा. वडिलांच्या आजाराचा कांहीं काळ पोरबंदरला गेला. येथें ते रामजीच्या देवालयांत रोज रात्रीं रामायण ऐकत असत. रामायण सांगणारे रामचंद्रजीचे एक परमभक्त बिलेश्वरचे लाधामहाराज म्हणून होते. त्यांच्याविषयीं असें सांगत कीं त्यांना कोड उठलें होतें. त्यावर औषध करण्याऐवजीं बिलेश्वर महादेवाच्या निर्माल्याचीं बिल्वपत्रें कोड उमटलेल्या भागावर त्यांनीं बांधलीं आणि रामनामाचा जप सुरू केला, त्यामुळें त्यांचें कोड समूळ नाहींसें झालें. ही गोष्ट खरी असो वा नसो, आम्हां ऐकणारांना ती खरी वाटली. एवढेंहि खरें, कीं लाधामहाराजांनीं कथा करण्यास आरंभ केला, तेव्हां त्यांचें शरीर पूर्ण निरोगी होतें. लाधामहाराजांचा कंठ मधुर होता. ते दोहे, चोपाई गात व त्यांचा अर्थ सांगत. ते स्वतः त्याच्या रसामध्यें लीन होऊन जात, आणि श्रोतृजनांना लीन करून सोडीत. माझें वय त्या वेळीं तेरा वर्षांचें असेल, पण मला त्याच्या वाचनामध्यें खूप गोडी वाटे, असें स्मरण आहे. रामायणाबद्दल मला वाटणारा आत्यंतिक प्रेमाचा पाया हें रामायणश्रवण होय. तुळसीदासाचें रामायण हा मी आज भक्तिमार्गावरील सर्वोत्तम ग्रंथ मानतों.

कांहीं महिन्यांनीं आम्ही राजकोटला आलों. तेथें अशा प्रकारचें वाचन नव्हतें. एकादशीच्या दिवशीं भागवत मात्र वाचलें जात असे खरें. त्याला मी कधीं कधीं बसत असें. परंतु भटजी रस उत्पन्न करूं शकत ना. आज मी समजूं शकतों, कीं भागवत हा एक असा ग्रंथ आहे कीं ज्याच्या वाचनानें भक्तिरस उत्पन्न करतां येईल. मीं तर तो गुजराथींतून अति आवडीनें वाचला आहे. परंतु माझ्या एकवीस दिवसांच्या उपवासामध्यें भारतभूषण पंडित मदनमोहन मालवीयजींच्या पवित्र मुखांतून मूळ संस्कृताचे कांहीं भाग ऐकले तेव्हां असें वाटलें, कीं बालपणींहि त्यांच्यासारख्या भगवद्भक्ताच्या तोंडून भागवत ऐकायला मिळतें, तर त्यावर माझें गाढ प्रेम बालवयामध्येंहि जडलें असतें. त्या वयांत मनावर झालेल्या शुभाशुभ संस्कारांचीं मुळें खोलवर जातात, याबद्दल मला खूप अनुभव आलेला आहे. आणि म्हणून कित्येक उत्कृष्ट ग्रंथ त्या वयामध्यें ऐकण्याची संधि मला मिळाली नाहीं, याबद्दल वाईट वाटतें.

राजकोटमध्यें मला अनायासेंच सर्व संप्रदायाविषयीं समभाव राखण्याचें शिक्षण मिळालें. हिंदुधर्माच्या प्रत्येक संप्रदायाबद्दल समभाव शिकलों. कारण कीं, आईबाप हवेलीला जात, शिवालयांत जात आणि राममंदिरांत जात. आणि आम्हां भावांना घेऊन जात, किंवा पाठवीत असत.

शिवाय, वडिलांपाशीं जैनधर्माचार्यांमधून कोणी ना कोणी नेहमीं येत. वडील त्यांना भिक्षाहि घालीत. ते वडिलांबरोबर धर्मासंबंधीं व व्यवहारासंबंधीं गोष्टी करीत. याशिवाय वडिलांचे मुसलमान आणि पारशी मित्रहि होते. ते आपापल्या धर्माबद्दल गोष्टी बोलत, आणि वडील त्यांचें म्हणणें आदरपूर्वक व पुष्कळ वेळां रसपूर्वक ऐकत असत. अशा प्रकारच्या वार्तालापांच्या वेळीं मी ‘ नर्स ’ असल्यामुळें बरेचदां हजर असें. या सर्व वातावरणाचा माझ्यावर असा परिणाम झाला, कीं सर्व धर्मांबद्दल माझ्या मनामध्यें समानभाव उत्पन्न झाला.

ख्रिस्ती-धर्म मात्र अपवाद होता. त्याच्याबद्दल कांहींसा अनादर उत्पन्न झाला. त्या वेळीं हायस्कूलच्या कोपऱ्यावर कोणी ख्रिस्ती व्याख्यान देत असत. ते हिंदू देवतांची व हिंदुधर्मीयांची नालस्ती करीत. तें मला असह्य होई. मी एखाद वेळच तें व्याख्यान ऐकण्यास उभा राहिलों असेन; परंतु पुन्हा तेथें उभें रहाण्याची इच्छाच झाली नाहीं. याच सुमाराला एक सुप्रसिद्ध हिंदु ख्रिस्ती झाल्याचें ऐकलें. गांवांत बोलत, कीं त्याचा ख्रिस्ती धर्मांत प्रवेश करवितांना त्याला गोमांस खाऊं घालण्यांत आलें, आणि दारू प्यायला दिली. त्याचा पोषाखहि बदलण्यांत आला, आणि तो गृहस्थ ख्रिस्ती झाल्यानंतर कोट, पाटलोण आणि इंग्रजी टोपी वापरूं लागला. या गोष्टींचा मला तिटकारा वाटला. ज्या धर्मापायीं गोमांस खावें लागतें आणि दारू प्यावी लागते आणि स्वतःचा पोषाख बदलावा लागतो, त्याला धर्म म्हणावें तरी कसें, असा युक्तिवाद मीं मनाशीं केला. शिवाय, जो गृहस्थ ख्रिस्ती झाला, त्यानें आपल्या पूर्वजांच्या धर्माची, रीतिरिवाजांची आणि देशाची टवाळी सुरू केल्याचें कानीं आलें. या सर्व गोष्टींमुळें माझ्या मनांत ख्रिस्ती-धर्माबद्दल अनादर उत्पन्न झाला.

जरी अशा तऱ्हेनें इतर धर्मांबद्दल माझ्या मनांत समभाव उत्पन्न झाला, तरीहि माझ्या मनांत ईश्वराविषयीं आस्था होती असें म्हणतां येणार नाहीं. या वेळीं वडिलांच्या पुस्तक-संग्रहांतून मनुस्मृतीचें भाषांतर माझ्या हातीं आलें. त्यांत जगाच्या उत्पत्तीसंबंधीं वर्णन वाचलें. त्यावर श्रद्धा बसली नाहीं. उलट, कांहींशी नास्तिकताच उत्पन्न झाली. माझ्या दुसऱ्या चुलत्यांचे चिरंजीव—जे अजून हयात आहेत, त्यांच्या बुद्धीविषयीं मला विश्वास होता. त्यांच्यापाशीं मीं माझ्या शंका प्रदर्शित केल्या. परंतु ते माझें समाधान करूं शकले नाहींत. त्यांनीं मला जबाब दिला : “ मोटा झालास कीं हे प्रश्न तूं आपल्या आपण सोडवायला शिकशील. असले प्रश्न मुलांनीं उभे करणें ठीक नाहीं.” मी गप्प बसलों पण मनाचें समाधान झालें नाहीं. मनुस्मृतीच्या खाद्याखाद्य प्रकरणांत व इतर प्रकरणांतहि मला चालू रीतिरिवाजांचा विरोधच दिसला. या शंकेचा जबाबहि मला जवळ जवळ वरच्याप्रमाणेंच

मिळाला. " कधीं काळीं बुद्धि विस्तार पावेल, वाचन वाढेल, मग समजेल " असें म्हणून मनाला परतविलें.

मनुस्मृति वाचून त्या वेळीं अहिंसेचें शिक्षण तर मिळालें नाहींच. मांसाहाराचा विषय येऊन गेलाच आहे. त्याला तर मनुस्मृतीचा आधारच मिळाला. सर्प, ढेकूण इत्यादींना मारणें. ही नीतीच आहे असेंहि वाटलें. त्या वेळीं धर्म समजून ढेकणांना वगैरे मारल्याचें मला स्मरतें.

पण एक वस्तु मनांत रुजून राहिली—या जगताचा आधार नीति आहे, व सत्यामध्यें सर्व नीतीचा समावेश होतो. मग तर सत्याचा शोध केलाच पाहिजे. दिवसेंदिवस सत्याचा महिमा माझ्या दृष्टीनें वाढत गेला. सत्याची व्याख्या अधिकाधिक विस्तृत होत गेली, व अजूनहि विस्तृत होत जात आहे.

शिवाय, एक नीतिविषयक सहा चरणी श्लोक हृदयांत ठसून राहिला. अपकाराचा मोबदला अपकार नसून उपकारच होय, ही गोष्ट जीवनसूत्र होऊन बसली. तिनें माझ्यावर साम्राज्य गाजविण्यास सुरुवात केली. अपकार करणाऱ्यांचें कल्याण इच्छिणें व करणें ही माझी आवडती गोष्ट होऊन बसली. मीं असंख्य प्रयोग केले. एवढा चमत्कार घडवून आणणारा तो श्लोक असा :

> पाणी आपने पाय, भलू भोजन तो दीजे;
> आवी नमावे शीश, दंडवत कोडे कीजे.
> आपण घासे दाम, काम मोहोरोनु करीअे;
> आप उगारे प्राण, ते तणा दुःखमां मरीअे.
> गुण केडे तो गुण दशगणो, मन वाचा कर्मे करी,
> अवगुण केडे जे गुण करे, ते जगमां जीत्यो सही.

" जो पाणी देईल त्याला चांगलें जेवण घालावें. जो आपल्यापाशीं येऊन डोकें नमवील त्याला साष्टांग दंडवत घालावा. एका पैशाची झीज सोशील त्याचें मोहरांनीं ऋण फेडावें; प्राण वांचवील त्याच्या दुःखनिवारणाच्या कामीं प्राण वेंचावे; एका उपकाराबद्दल दहा उपकार करावे; परंतु या जगांत सर्वश्रेष्ठ तोच, कीं जो कायावाचामनेंकरून अपकाराच्या बाबतींतहि उपकारच करतो."



## ११

# विलायतेची तयारी

सन १८८७ सालीं मॅट्रिक्युलेशनची परीक्षा झाली. देशाची काय किंवा आमच्या गांधी-कुटुंबाची काय, गरिबीच अशा प्रकारची, कीं परीक्षा द्यायला अहमदाबाद व मुंबई अशीं दोन ठिकाणें असल्यास त्या स्थितींतील काठेवाडी लोक जवळचें व स्वस्त असें अहमदाबादच पसंत करणार. माझेंहि तसेंच झालें. राजकोट ते अहमदाबाद हाच माझा पहिला एकट्यानें केलेला प्रवास.

पास झाल्यानंतर कॉलेजांत जाऊन शिक्षण पुढें चालवावें अशी वडील मंडळींची इच्छा होती. मुंबईतहि कॉलेज आणि भावनगरलाहि कॉलेज. भावनगरला खर्च कमी म्हणून भावनगरच्या शामळदास-कॉलेजांत जाण्याचें ठरलें. तेथें मला कांहीं समजेना. सर्वच कठिण वाटूं लागलें. अध्यापकांच्या व्याख्यानांमध्यें गोडीहि वाटेना, आणि समजहि पडेना. त्यांत अध्यापकांचा दोष नव्हता. दोष माझ्या कच्चेपणाचाच होता. त्या वेळचे शामळदास-कॉलेजचे अध्यापक तर पहिल्या दर्जाचे समजले जात. पहिली सहामाही पुरी करून घरीं आलों.

कुटुंबाचे जुने मित्र व सल्लागार एक विद्वान् व्यवहारकुशल ब्राह्मण मावजी दवे म्हणून होते. त्यांनीं वडिलांच्या मृत्यूनंतरहि कुटुंबाशीं असलेला संबंध कायम ठेविला होता. ते या सुटीच्या दिवसांत आमच्या घरीं आले होते. मातुःश्री व वडील बंधु यांचेबरोबर गोष्टी बोलत असतां माझ्या शिक्षणासंबंधीं त्यांनीं चौकशी केली. मी शामळदास-कॉलेजांत आहे हें ऐकून ते म्हणाले, " काळ बदलला आहे. कबा गांधींची गादी संभाळण्याची तुम्हां भावांपैकीं कोणाची इच्छा असेल, तर ती शिक्षणाखेरीज मिळणार नाहीं. हा मुलगा अजून शिकतो आहे, त्याअर्थीं गादी संभाळण्याचें काम त्यालाच उचलायला लावलें पाहिजे. त्याचीं अजून चारपांच वर्षे बी. ए. होईपर्यंत जातील. आणखी इतका वेळ घालवून त्याला पन्नास-साठ रुपयांची नोकरी मिळेल, दिवाणपद नाहीं मिळणार. बरें, त्याला त्यापुढें माझ्या मुलाप्रमाणें वकील करावा तर आणखीहि थोडीं वर्षे जाणार, आणि तोंपर्यंत तर दिवाणगिरीसाठीं वकीलहि कितीतरी तयार झालेले असतील! तुम्हीं त्याला विलायतेला पाठवला पाहिजे. केवळराम ( मावजी दवेच्या मुलाचें नांव ) म्हणतो कीं तिकडे शिक्षण सोपें असतें. तीन वर्षांत शिकून परत येईल. खर्च पण चारपांच हजारांहून जास्त होणार नाहीं. तो नवा बॅरिस्टर आला आहे, तो पहा ना, केवढ्या थाटांत राहतो! कारभाऱ्याची जागा त्याला पाहिजे तर आतां मिळेल. माझी तर सल्ला अशी आहे, कीं तुम्हीं मोहनदासाला यंदाच विलायतेला पाठवून

द्यावा. आमच्या केवळरामाचे इंग्लंडांत पुष्कळ मित्र आहेत, त्यांच्यावर तो शिफारसपत्रें देईल, म्हणजे त्याला तेथें कसली अडचण पडणार नाहीं."

स्वतःची सल्ला मान्य होणार याबद्दल जणुं काय शंकाच नाहीं अशा तऱ्हेनें जोशीजींनीं ( आम्ही मावजी दवे यांना या नांवानें संबोधीत असूं ) माझ्याकडे पाहून मला विचारलें :

" कसें काय, तुला विलायतला जाणें आवडेल कीं इथेंच शिकत बसणें ? " मला तर आवडत होतें तेंच वैद्यानें सांगितलें. कॉलेजांतील अडचणींनीं मी भिऊन गेलेलाच होतों. मीं म्हटलें, " मला विलायतेला पाठवाल तर फारच चांगलें. कॉलेजांत झपझप पास होतां येईलसें वाटत नाहींच. परंतु मला डॉक्टरचा धंदा शिकण्यासाठीं नाहीं पाठवतां यायचें ? "

माझे बंधु मध्येंच म्हणाले :

" तें तर बापूंना आवडत नसे. तुझ्याकडून गोष्ट निघतांच ते म्हणत, कीं आपण वैष्णवांनीं हाडें-मांस कापण्याचें काम करूं नये. बापूंचा विचार तुला वकील करण्याचाच होता."

जोशीजींनीं दुजोरा दिला : " गांधीजींप्रमाणें डॉक्टरकीचा मला तिरस्कार वाटत नाहीं. आपलीं शास्त्रें या धंद्याला कमी लेखीत नाहींत. पण डॉक्टर होऊन तूं दिवाण बनणार नाहींस. तुला दिवाणगिरी किंवा त्याहून उच्च जागा मिळावी हें तर मला पाहिजे आहे. तरच तुमचें हें एवढें मोठें कुटुंब झांकलें जाणार. काळ दिवसेंदिवस पालटत चालला आहे, आणि कठिण होतो आहे. म्हणून बॅरिस्टर होण्यांत शहाणपणा आहे."

मातुःश्रीकडे वळून म्हणतात, " आज आतां मी जातों. माझ्या बोलण्याचा विचार करून पहा. मी पुन्हां येईन तेव्हां तयारी असल्याची बातमी ऐकण्याची आशा ठेवून येईन. कांहीं अडचण आल्यास सांगा."

जोशीजी गेले. मी तर हवेंत किल्ले बांधूं लागलों. वडील बंधू फिकिरींत पडले; पैशाचें काय करावयाचें ! शिवाय, माझ्यासारख्या नवयुवकाला इतका दूर पाठवावा तरी कसा !

मातुःश्रीला तर कांहींच सुचेना. तिला वियोगाची गोष्टच सहन झाली नाहीं. पण प्रथम तरी तिनें असेंच सांगितलें : " आपल्या कुटुंबांत आतां वडील असे काकाच राहिले आहेत. अर्थात् पहिल्या प्रथम त्यांचा सल्ला घेतला पाहिजे. त्यांनीं आज्ञा केली तर मग आपण विचार करायचा."

वडील बंधूंना दुसरा एक विचार सुचला : " पोरबंदर राज्यावर आपला हक्क आहे. लेलीसाहेब येथील ॲडमिनिस्ट्रेटर आहेत. आमच्या कुटुंबाविषयीं त्यांचें

चांगलें मत आहे. काकांवर त्यांची विशेष मर्जी आहे. ते कदाचित् संस्थानतर्फे तुला थोडीबहुत मदतहि करतील."

मला हें सर्व पटलें. मी पोरबंदरला जाण्यास तयार झालों. त्या काळीं रेल्वे नव्हती, गाडीरस्ता होता. पांच दिवसांचा रस्ता होता. मी स्वभावानें भित्रा होतों हें मागें सांगितलेंच आहे. परंतु या प्रसंगीं माझी भीति पार पळाली. विलायतेला जाण्याच्या इच्छेनें माझ्यावर ताबा बसवला. मीं धोराजीपर्यंत बैलगाडी केली. धोराजीहून पुढें एक दिवस लौकर पोंचण्याच्या इराद्यानें उंट केला. उंटाच्या स्वारीचाहि हा पहिलाच अनुभव.

पोरबंदरला पोंचलों. काकांना साष्टांग प्रणाम केला. सर्व गोष्टी सांगितल्या. त्यांनीं विचार करून जबाब दिला :

"विलायतला जाऊन आपल्याला धर्म राखतां येईल कीं नाहीं हें मला सांगतां येत नाहीं. सर्व गोष्टी ऐकतों, त्यावरून तरी मला शंका वाटते. असें पहाना ! बड्याबड्या बॅरिस्टरांच्या मला गांठी घ्याव्या लागतात, तेव्हां त्यांच्या आणि साहेबांच्या राहणींत मला तरी कांहीं भेद दिसत नाहीं. त्यांना खाण्यापिण्याचा कांहीं विधिनिषेध नसतो. सिगारेट तर तोंडांतून निघायचीच नाहीं. पोशाख पहावा तर तोहि तसाच नंगा. हें सर्व आपल्या कुटुंबाला शोभणारें नाहीं. पण मी तुझ्या साहसामध्यें विघ्न घालूं इच्छीत नाहीं. मी तर थोड्याच दिवसांनीं यात्रेला जाणार. मला आतां थोडींच वर्षें काढावयाचीं आहेत. मरणाच्या दारीं आलेल्या म्यां तुला विलायतेला जाण्याची— समुद्र ओलांडण्याची–कशी परवानगी द्यावी ? पण मी तुझ्या आड येणार नाहीं. खरी परवानगी तुझ्या आईची. तिनें जर तुला परवानगी दिली तर तूं सुखानें जा. मी तुला अडवीत नाहीं, एवढें सांग. माझा आशीर्वाद तुला आहेच."

"याहून जास्तीची आशा तुमच्यापासून मी ठेवणें योग्य होणार नाहीं. मला आतां माझ्या आईचें समाधान केलें पाहिजे. परंतु मला लेलीसाहेबांवर शिफारस तर द्याल ना ?"

काका म्हणाले, "तें माझ्याकडून कसें व्हावें ? परंतु साहेब भले आहेत. तूं चिठी लिही. कुटुंबाची ओळख दे. म्हणजे मग ते तुला भेटण्याचा वेळ खात्रीनें देतील, आणि वाटल्यास मदत पण करतील."

काकांनीं साहेबांवर शिफारस कां दिली नाहीं याची मला कल्पना नाहीं. मला अस्पष्ट स्मरण आहे, कीं विलायतेला जाण्यासारख्या धर्माविरुद्ध कार्यामध्यें इतकी सरळ मदत देण्याचा त्यांना संकोच वाटला.

मीं लेलीसाहेबांना चिठी लिहिली. त्यांनीं आपल्या राहण्याच्या बंगल्यावर मला भेटायला बोलावलें. त्या बंगल्याचा जिना चढत असतां साहेब मला भेटले, आणि "तूं बी. ए. हो, मग मला भेट. सध्यां कांहीं मदत देतां येणार नाहीं"

असें म्हणून वर चढून गेले. मी खूप तयारी करून, पुष्कळशीं वाक्यें घोकून काढून गेलों होतों. खालीं वांकून दोन्ही हातांनीं सलाम केला. परंतु माझी सारी मेहनत व्यर्थ गेली !

पत्नीच्या दागिन्यांवर माझी दृष्टि गेली. वडील बंधूंवर अपार श्रद्धा होती. त्यांच्या उदारतेला सीमा नव्हती. त्यांचें प्रेम पित्यासारखें होतें.

मी पोरबंदरहून निघालों. राजकोटला येऊन सर्व गोष्टी सांगितल्या. जोशीजींची सल्लामसलत घेतली. त्यांनीं कर्ज काढूनहि मला पाठविण्याची शिफारस केली. मीं माझ्या पत्नीच्या हिस्स्याचे दागिने काढून टाकण्याची सूचना केली. त्यांतून दोनतीन हजार रुपयांपेक्षां जास्त येण्यासारखें नव्हतें. बंधूंनीं कसेंहि करून पैसे पुरे पाडण्याची प्रतिज्ञा केली.

आईची समजूत कशी पाडावी ? तिनें बारीक तपास सुरू केला होता. कोणी म्हणे, तरुण लोक विलायतेला जाऊन बहकतात; कोणी म्हणे, ते मांसाहार करतात; तर कोणी सांगत, दारूशिवाय चालायचेंच नाहीं. आईनें हें सर्व मला सांगितलें. मीं म्हटलें, "पण तुला माझा विश्वास नाहीं ? मी तुला फसविणार नाहीं; शपथ घेऊन सांगतों, कीं या तिन्ही वस्तूंपासून मी दूर राहीन. तसा धोका असला, तर जोशीजी मला कसे जाऊं देतील ?"

आई म्हणाली, "मला तुझा विश्वास आहे. पण दूर देशांत कसें होणार ? माझी अक्कलच गुंग होते. मी बेचरजी स्वामींना विचारतें." बेचरजी स्वामी मोढ-वाण्यांतून जैन साधु झाले होते. जोशीजींप्रमाणें ते आमचे सल्लागारहि होते. त्यांची मदत झाली. त्यांनीं सांगितलें, "मी या मुलापासून या तिन्ही बाबतींत व्रत घेववितों, मग त्याला जाऊं देण्यास हरकत नाहीं येणार." त्यांनीं प्रतिज्ञा घेवविली व मीं मांस, मदिरा आणि स्त्रीसंग यांपासून दूर राहण्याची प्रतिज्ञा केली. आईनें परवानगी दिली.

हायस्कुलांत समारंभ झाला. राजकोटचा एक तरुण विलायतला जातो, याचें लोकांना नवल वाटलें. उत्तरादाखल मीं थोडें लिहून नेलें होतें. पण तेंहि मोठ्या शिकस्तीनेंच वाचूं शकलों. माझें डोकें फिरत होतें, शरीर कांपत होतें, एवढें मला आठवतें.

वडील मंडळींचा आशीर्वाद घेऊन मुंबईस जाण्यास निघालों. मुंबईचा हा पहिलाच प्रवास; वडील बंधु बरोबर आले.

पण शुभकार्यांत शंभर विघ्नें ! मुंबईचें फाटक चटकन् सुटण्यासारखें नव्हतें.

• • •

# १२
# जातीबाहेर

आतां आज्ञा व आशीर्वाद घेऊन व थोड्या महिन्यांच्या अपत्याला पत्नीसह सोडून मी मोठ्या हौसेनें मुंबईस पोंचलों. पोंचलों खरा, पण तेथें मित्रमंडळींनीं बंधूंना सांगितलें कीं, " जून-जुलै महिन्यामध्यें हिंदी महासागरांत तुफान असतें आणि याची तर ही पहिलीच समुद्रावरची सफर. तरी याला दिवाळीनंतर म्हणजे नोव्हेंबर महिन्यांत पाठविला पाहिजे." त्यांतच कोणीसें तुफानांत सांपडून कोटलीशी एक बोट बुडाल्याचें सांगितलें. त्यामुळें वडील बंधु घाबरले. त्यांनीं अशा तऱ्हेनें जीव धोक्यांत घालून मला लगेच पाठविण्याचें नाकारलें, आणि मला मुंबईत एका मित्राकडे ठेवून स्वतः परत आपल्या नोकरीवर हजर होण्यासाठीं राजकोटला गेले. एका मेव्हण्यापाशीं पैसे ठेवून गेले, व कित्येक मित्रांपाशीं मला मदत करण्याची शिफारस करून गेले.

मुंबईत माझा वेळ जाईना. मला विलायतचीं स्वप्नें पडत.

मध्यंतरीं ज्ञातीमध्यें खळबळाट झाला. जातीची सभा बोलाविण्यांत आली. कोणीहि मोढ वाणिया अद्यापपर्यंत विलायतेला गेला नव्हता, आणि मी चाललों, त्याअर्थीं मला फैलावर घेतलाच पाहिजे ! मला ज्ञातीच्या वाडीमध्यें हजर राहण्याबद्दल फर्मान आलें. मी गेलों. मला एकाएकीं धैर्य कोठून आलें देव जाणे ! हजर होण्यांत मला यत्किंचितहि संकोच किंवा भय वाटलें नाहीं. ज्ञातीच्या प्रमुख शेठजींशीं दूरचें नातेंहि होतें. वडिलांचा व त्यांचा चांगला स्नेहसंबंध होता. त्यांनीं मला सांगितलें :

" ज्ञातीचें मत आहे, कीं तूं विलायतला जायचा विचार केला आहेस, तो बरोबर नाहीं. आपल्या धर्मामध्यें समुद्र ओलांडून जाण्याची मनाई आहे. शिवाय, विलायतेंत धर्म संभाळतां येणार नाहीं असें आम्ही ऐकतों. तेथें साहेब लोकांबरोबर खावें-प्यावें लागणार ! "

मीं जबाब दिला, " मला तर वाटतें, कीं विलायतेला जाण्यांत बिलकुल अधर्म नाहीं. मला तिकडे जाऊन विद्याभ्यासच करावयाचा आहे. शिवाय, ज्या गोष्टींबद्दल आपल्याला भीति वाटते, त्या गोष्टींपासून दूर राहण्याची मीं माझ्या मातुःश्रीपाशीं शपथ घेतली आहे. त्यामुळें मी त्यांपासून दूर राहूं शकेन."

" पण आम्ही तुला सांगतों, कीं तिकडे धर्मपालन शक्यच नाहीं. तुझ्या वडिलांचा व माझा कसा तऱ्हेचा संबंध होता, तें तुला माहीतच आहे. माझें सांगणें तूं मान्य केलें पाहिजेस" शेठ बोलले.

" आपल्याशीं असलेला संबंध मला माहीत आहे. आपण मला वडिलांसमान आहांत. परंतु या बाबतींत माझा निरुपाय आहे. विलायतेला जाण्याचा माझा निश्चय मी फिरवूं शकत नाहीं. माझ्या वडिलांचे मित्र व सल्लागार, जे विद्वान् ब्राह्मण आहेत, त्यांचें मत आहे कीं मी विलायतेला जाण्यामध्यें कांहीं वावगें नाहीं. माझ्या मातुःश्रींची व बंधूंची परवानगीहि मला मिळाली आहे " मीं जबाब दिला.

" परंतु ज्ञातीचा हुकूम तूं मानणार नाहींस ? "

" माझा निरुपाय आहे. मला वाटतें, कीं या बाबतींत ज्ञातीनें मध्यें न पडणें बरें."

या उत्तरानें शेठजींना क्रोध चढला. मला चारदोन सुनावल्या. मी गप्प राहिलों. शेठजींनीं हुकूम सोडला :

" या मुलाला आजपासून ज्ञातिबहिष्कृत समजण्यांत येईल. जो कोणी त्याला मदत करील किंवा पोंचवायला जाईल, त्याला ज्ञात जाब विचारील व त्याला सव्वा रुपया दंड होईल."

माझ्यावर या ठरावाचा कांहींएक परिणाम झाला नाहीं. मीं शेटजींची रजा घेतली. माझ्या बंधूंवर या ठरावाचा काय परिणाम होतो, ही एक विचारांत घेण्यासारखी गोष्ट होती. ते भिऊन गेले तर ! सुदैवानें ते भक्कम राहिले, आणि मला उत्तरीं लिहिलें, कीं ज्ञातीचा ठराव झाला तरी आपण स्वतः मला विलायतेला जाण्याचें बाबतींत अटकाव करणार नाहीं.

ही गोष्ट घडल्यानंतर मी अधिकच अधीर झालों. बंधूंवर दडपण आलें तर ! दुसरेंच कांहीं विघ्न उपस्थित झालें तर ! या काळजींत मी दिवस कंठीत होतों. इतक्यांत बातमी मिळाली कीं ४ सप्टेंबर रोजीं निघणाऱ्या बोटीनें जुनागडचे एक वकील बॅरिस्टर होण्यासाठीं जाणार आहेत. ज्या मित्रांपाशीं बंधूंनीं माझ्याबद्दल शिफारस केली होती त्यांना मी भेटलों. त्यांनींहि ही सोबत चुकवूं नये अशी सल्ला दिली. वेळ फार थोडा होता. बंधूंना तार केली आणि जाण्याची परवानगी मागितली. त्यांनीं परवानगी दिली. मी मेव्हण्यापाशीं पैसे मागितले. त्यांनीं ज्ञातीच्या हुकुमाची अडचण सांगितली. ज्ञातीबाहेर पडून त्यांचें चालण्यासारखें नव्हतें. मीं आमच्या कुटुंबाच्या एका मित्राकडे जाऊन त्याजपाशीं " भाडयाला वगैरे लागणारे पैसे मला द्या व बंधूंपासून मागून घ्या " अशी विनंति केली. या मित्रांनीं तसें करण्याचें कबूल केलें; एवढेंच नव्हे, तर मला प्रोत्साहनहि दिलें. मीं त्यांचे आभार मानले, पैसे घेतले आणि तिकीट काढलें.

विलायतच्या प्रवासाचें सर्व सामान तयार करायचें होतें. एक दुसरे अनुभवी मित्र होते, त्यांनीं सामान तयार करविलें. मला सगळेंच विचित्र वाटलें.

कांहीं आवडलें, कांहीं बिलकुल रुचेना. नेकटॉय, की जो मी मागाहून हौसेनें वापरूं लागलों तो तर मुळींच आवडेना. आंखुड जाकीट म्हणजे तर पोशाख करूनहि नागवें राहण्यासारखें वाटलें. परंतु विलायतला जाण्याच्या उत्सुकतेपुढें या नापसंतीची कथा काय? बरोबर फराळाची सामग्रीहि यथास्थित घेतली होती.

माझी जागा पण मित्रमंडळींनीं त्र्यंबकराव मजमुदारांच्याच (हें त्या जुनागडच्या वकिलांचें नांव) खोलीमध्येंच राखून घेतली. त्याचेपाशीं माझी शिफारसहि केली. ते तर प्रौढ वयाचे अनुभवी गृहस्थ होते. मी अठरा वर्षांचा, दुनियेचा अनुभव नसलेला अल्पवयी तरुण होतों. मजमुदारांनीं माझ्याबद्दल काळजी करूं नका म्हणून मित्रांना सांगितलें.

अशा तऱ्हेनें सन १८८८ च्या सप्टेंबरच्या चवथ्या तारखेला मीं मुंबई बंदर सोडलें.

• • •

## १३
## एकदांची विलायत तर गांठली !

बोट मला मुळींच लागली नाहीं. परंतु दिवस चालले, तसतसा मी गोंधळून जाऊं लागलों. स्टयुअर्टजवळ बोलण्याचाहि संकोच वाटे. इंग्रजींत बोलण्याची मला संवयच नव्हती. मजमुदारांखेरीजचे सर्व उतारू इंग्रज होते. त्यांच्याबरोबर बोलतां येईना. ते माझ्याशीं बोलण्याचा प्रयत्न करीत, तर माझी समजूत पडेना; आणि समजलें तरी जबाब कसा द्यावा कळेना. प्रत्येक वाक्य बोलण्यापूर्वी मनांत जुळवावें लागे. कांट्या-चमच्यानें जेवतां येईना, आणि कोणती वस्तु मांसाखेरीज आहे हें विचारण्याचें धैर्य होईना. त्यामुळें मी जेवणाच्या टेबलाकडे कधीं गेलोंच नाहीं. खोलींतच जेवीत असें. बरोबर मेवामिठाई वगैरे घेतली होती, त्यावरच बहुतांशीं चालवून नेलें. मजमुदारांना कसलीच अडचण नव्हती. ते सर्वांबरोबर मिसळून गेले. डेकवरहि मोकळेपणीं जात. मी मात्र सबंध दिवस खोलींत कोंडलेला राहीं. क्वचित् डेकवर थोडीं माणसें असतील अशा वेळीं तेथें थोडा वेळ बसून परत येई. मजमुदार मला सर्वांबरोबर मिसळायला, मोकळेपणीं गप्पागोष्टी बोलायला समजावून सांगत. वकिलाची जीभ बोलली पाहिजे असेंहि सांगत. स्वतःचे वकिलीचे अनुभव सांगत. इंग्रजी ही कांहीं आपली भाषा नव्हे, तींत चुका या व्हायच्याच, तरी पण दडपून बोलत गेलें पाहिजे, वगैरे उपदेश करीत. परंतु मला माझा भिडस्तपणा सोडतां येईना.

एका भल्या इंग्रजाला माझी दया आली, आणि त्यानें माझ्याबरोबर

बोलण्याचालण्यास सुरुवात केली. ते स्वतः वयानें मोठे होते. मी खातों काय, मी कोण, जाणार कोठें, कोणाशीं बोलत चालत कां नाहीं वगैरे प्रश्न तो विचारी. मला जेवणाच्या जागीं चलण्याबद्दल सुचवी. मांस न खाण्याच्या माझ्या आग्रहासंबंधीं ऐकून त्याला हंसूं आलें. माझ्याबद्दल दया येऊन तो म्हणाला, "येथपर्यंत (पोर्ट-सय्यद येण्यापूर्वीं) ठीक आहे. बिस्केच्या उपसागरांत पोंचलास कीं तूं आपले विचार बदलशील. इंग्लंडांत तर इतकी थंडी पडते, कीं मांसाशिवाय चालायचेंच नाहीं."

मीं म्हटलें, "मीं ऐकलें आहे, कीं तिकडे लोक मांसाहाराशिवाय राहूं शकतात."

ते म्हणाले, "ही खोटी गोष्ट असें समज. माझ्या ओळखीचा असा एकहि गृहस्थ मला माहीत नाहीं, कीं जो मांसाहार करीत नाहीं. हें पहा, मी दारू पितों, ती प्यायला मी तुला नाहीं सांगत; पण मांसाहार तर केलाच पाहिजे असें मला वाटतें."

मीं म्हटलें, "तुमच्या सल्ल्याबद्दल मी आभार मानतों. परंतु मांस न खाण्याबद्दल मी माझ्या आईशीं बांधलेला आहें. त्यामुळें मला मांस घेतां येत नाहीं. जर त्याखेरीज चालतच नसेल तर मी परत हिंदुस्थानांत जाईन, पण मांस नाहीं खाणार."

बिस्केचा उपसागर आला. तेथेंहि मांसाची जरुरी भासली नाहीं, किंवा दारूचीहि भासली नाहीं. मांस न खाल्ल्याबद्दलचीं प्रमाणपत्रें जमविण्याची मला सूचना मिळाली होती. म्हणून ह्या इंग्रज मित्रापाशीं मीं प्रमाणपत्र मागितलें. त्यानें तें आनंदानें दिलें. मीं तें कांहीं काळपर्यंत धनाप्रमाणें जपून ठेवलें. मागाहून मला कळलें, कीं प्रमाणपत्रें तर मांस खाऊन-सवरूनहि मिळवितां येतात ! त्यामुळें माझा त्यांच्याबद्दलचा मोह नाहींसा झाला. जर माझ्या शब्दावर विश्वास नसेल, तर असल्या बाबतींत प्रमाणपत्रें दाखवून तरी मला कसला फायदा मिळवायचा असणार ?

कसाबसा प्रवास पुरा करून आम्ही साउदॅंटन बंदरांत येऊन पोंचलों. त्या दिवशीं शनिवार होता एवढें मला स्मरण आहे. बोटीवर मी काळे कपडे वापरीत असें. मित्रांनीं माझ्यासाठीं पांढऱ्या फ्लॅनेलची एक कोट-पाटलोण शिवविली होती. ती मीं विलायतेंत उतरतांना वापरण्याचें ठरविलें होतें. सफेत कपडे जास्त शोभिवंत दिसतील अशी समजूत ! मी हे फ्लॅनेलचे कपडे घालून उतरलों. सप्टेंबर अखेरचे दिवस होते. असले कपडे वापरणारा मी एकटाच दिसत होतों. माझ्या पेट्या आणि त्यांच्या किल्ल्या तर ग्रिंडले कंपनीचे गुमास्ते अगोदरच घेऊन गेले होते. बाकीचे सर्व करतील तसें आपण करायचें असा विचार करून मीं माझ्या किल्ल्याहि देऊन टाकल्या !

माझ्यापाशीं शिफारशींचीं चार पत्रें होतीं : डॉक्टर प्राणजीवन मेहता, दलपतराम शुक्ल, राजपुत्र रणजितसिंहजी आणि दादाभाई नौरोजी यांचेवर. मीं साउदॅंटनहून डॉक्टर मेहतांना तार केली. बोटीमध्यें आम्हांला कोणी व्हिक्टोरिया हॉटेलमध्यें उतरण्याची सल्ला दिली. त्यामुळें मजमुदार आणि मी तेथें गेलों. सफेत कपड्यांच्या शरमेमुळें माझी चुळबूळ अगोदरच चालली होती. त्यांतच आणखी हॉटेलांत जातांच समजलें, कीं दुसऱ्या दिवशीं रविवार असल्यामुळें सोमवारपर्यंत ग्रिंडलेकडून सामान येणार नाहीं. त्यामुळें माझा गोंधळच उडाला.

सातआठ वाजतां डॉ. मेहता आले. त्यांनीं प्रेमानें माझी थट्टा केली. मला माहिती नसल्यामुळें मीं त्यांची रेशमानें मढविलेली केंसाळ टोपी पहायला हातांत घेतली, आणि तिच्यावर उलटा हात फिरवला. त्यामुळें टोपीची लव उभी झाली. डॉ. मेहतांनीं पाहतांच मला लगेच थांबवलें. पण गुन्हा तर होऊन चुकला होता. पुन्हां कधीं होणार नाहीं, एवढाच त्यांच्या थांबविण्याचा परिणाम झाला.

येथून माझा युरोपीय रीतिरिवाजांचा पहिला धडा सुरू झाला असें म्हणतां येईल. डॉ. मेहता हंसत हंसत अनेक गोष्टींबद्दल समजूत देत होते : कोणाच्याहि वस्तूला हात लावूं नये; हिंदुस्थानांत कोणाचीहि ओळख होतांच जे प्रश्न सहजीं विचारतां येतात, तसले प्रश्न येथें विचारावयाचे नाहींत; बोलतांना आवाज उंच चढवायचा नाहीं; हिंदुस्थानांत साहेबांशीं बोलतांना 'सर' म्हणण्याचा प्रघात आहे, तो अनवश्यक आहे. 'सर' हें फक्त नोकर आपल्या धन्याला किंवा वरिष्ठ अंमलदाराला उद्देशून बोलतो. शिवाय, त्यांनीं हॉटेलांत राहण्याच्या खर्चाचीहि गोष्ट काढली; आणि कोणाच्या खासगी कुटुंबांत रहाण्याची जरूर पडेल असें सुचविलें. याबद्दलचा जास्त विचार सोमवारपर्यंत तहकूब राहिला. कित्येक शिफारस पत्रें देऊन डॉ. मेहतांनीं निरोप घेतला.

आम्हां दोघांना तर हॉटेलांत येऊन फशीं पडल्यासारखें झालें. हॉटेल पण महागडें. माल्टाला एक सिंधी उतारू चढले होते. त्यांची व मजमुदारांची चांगली मैत्री जमली होती. हे सिंधी उतारू लंडनचे चांगले माहितगार होते. त्यांनीं आमचेसाठीं दोन खोल्या ठरवून देण्याचें काम अंगावर घेतलें. आम्हीं मान्य केलें आणि सोमवारीं सामान हातीं येतांच बिल चुकवून त्या सिंधी गृहस्थानें ठरविलेल्या खोल्यांत प्रवेश केला. मला आठवतें, कीं माझ्या वांट्याचें हॉटेलचें बिल जवळजवळ तीन पौंड होतें. मी तर थक्कच होऊन गेलों. तीन पौंड भरूनहि पोटाचे हालच ! हॉटेलांतील पदार्थांपैकीं कोणताच आवडेना. एक वस्तु घ्यावी, ती आवडली नाहीं म्हणून दुसरी घ्यावी, पण पैसे मात्र दोहोंचेहि दिले पाहिजेत. माझा आधार अजून मुंबईहून आणलेल्या फराळावर होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या खोल्यांतमुद्धां मला तरी करमेच ना. एकसारखी आपल्या मुलुखाची आठवण होई. मातेचें प्रेम मूर्तिमंत पुढें उभें राही. रात्र पडली म्हणजे रडें कोसळे. वरच्या अनेक प्रकारच्या स्मरणांच्या चढाईपुढें निद्रा येणार तरी कोठून ? हें दुःख कोणाजवळ बोलून दाखविण्याचीहि सोय नव्हती. बोलून उपयोग तरी काय ? कोणत्या उपायानें मनाचें समाधान होईल तें माझें मलाहि समजेना. लोक विचित्र, राहणी विचित्र, घरें पण विचित्र ! राहण्याची रीतभात सदरहूप्रमाणेंच. काय बोलल्यानें किंवा काय केल्यानें या रीतिभातींच्या नियमांचा भंग होत असेल त्याचाहि पत्ता नाहीं. त्यांतच भरीला खाण्यापिण्याचें बंधन; आणि खातां येण्यासारखे जिन्नस, ते शुष्क आणि नीरस लागत. त्यामुळें माझी स्थिति आडकित्त्यांत सांपडलेल्या सुपारीसारखी झाली. विलायत तर आवडत नाहीं, आणि परत स्वदेशीं जाण्याची सोय नाहीं. विलायतेंत आलों, त्या अर्थी तीन वर्षे पुरीं करण्याचा निर्धार होता.

● ● ●

## १४

# माझी पसंती

डॉ. मेहता सोमवारीं मला व्हिक्टोरिया-हॉटेलांत भेटण्यास गेले. तेथें त्यांना आमचा नवा पत्ता मिळाल्यावरून नवीन ठिकाणीं आले. माझ्या मूर्खपणामुळेंच मला आगबोटींत गजकर्ण झालें होतें. बोटींत खाऱ्या पाण्याचें स्नान असे. खाऱ्या पाण्यांत साबण विरघळत नाहीं. पण माझी तर समजूत कीं अशी साबण वापरण्यांतच सभ्यपणा आहे. त्यामुळें शरीर साफ होण्याऐवजीं चिकट होई. त्यामुळें गजकर्ण झालें. डॉक्टरांना दाखविलें. त्यांनीं मला दाहक औषध—ॲसेटिक ॲसिड—दिलें. या औषधानें मला चांगलेंच रडवलें. डॉ. मेहतांनीं आमची खोली वगैरे पाहिली आणि डोकें हालविलें. " ही जागा नाहीं चालणार. या देशांत येऊन नुसतें पुस्तकी शिक्षण घेण्यापेक्षां येथील अनुभव घेण्याचेंच जास्त महत्त्व आहे. त्यासाठीं कोणत्या तरी कुटुंबांत राहणें जरुरीचें आहे. परंतु तत्पूर्वीं थोडेसें शिक्षण घेण्यासाठीं तुम्हीं...कडे रहावें असा मीं विचार केला आहे. तिकडे तुम्हांला घेऊन जातों."

मीं ती सूचना आभारपूर्वक मान्य केली. त्या मित्रांकडे गेलों. त्यांनीं माझ्या बरदास्तींत कांहीं न्यून ठेविलें नाहीं. माझी आपल्या सख्ख्या भावाप्रमाणें काळजी घेतली. इंग्रजी रीतिरिवाज शिकवले. इंग्रजींत थोडेंफार बोलण्याची संवय त्यांनींच पाडली असें म्हणतां येईल.

माझ्या खाण्यापिण्याचा प्रश्न फार बिकट होऊन राहिला. मीठ-मसाल्या-

खेरीजच्या भाज्या आवडत ना. माझ्यासाठीं काय शिजवावें हेंच घरधनीणबाईला सुचेना. सकाळीं ओटच्या पिठाची लापशी होत असे, त्यामुळें पोट कांहीं तरी भरे; पण दुपारीं व रात्रीं उपासमार होई. मित्र मांसाहार करण्याबद्दल रोज समजूत घाली. मी आपला प्रतिज्ञेची आडकाठी सांगून स्वस्थ बसें. त्यांच्याशीं वाद घालण्याची माझी ताकद नव्हती. दुपारीं फक्त रोटी आणि तांदुळजाची भाजी व मुरंबा यावर रहात असें. रात्रींहि तेंच खाणें. मला असें दिसलें, कीं रोटीचे दोनतीन तुकडेच घेणें प्रशस्त; जास्त मागण्याची लाज वाटे. मला भरपूर खाण्याची संवय होती. जठराग्नि प्रदीप्त होता आणि त्याची मागणी खूप असे. दुपारीं काय किंवा संध्याकाळीं काय, दुधाचें नांव नाहीं. माझी अशी स्थिति पाहून मित्र एक दिवस चिडले, आणि म्हणतात, " हें बघ, तूं माझा सख्खा भाऊ असतास तर मीं तुला खात्रीनें परत लावून दिला असता. निरक्षर आईला येथील स्थिति जाणून न घेतां दिलेल्या वचनाची किंमत ती काय? त्याला प्रतिज्ञा म्हणतांच येत नाहीं. मी तुला सांगतों, कीं कायद्याच्या दृष्टीनेंहि ती प्रतिज्ञा होत नाहीं. असल्या प्रतिज्ञेला चिकटून राहणें म्हणजे निव्वळ भ्रम आहे. आणि असा भ्रम उराशीं बाळगून राहिलास तर तुला या देशांतून कांहींच मिळवून स्वदेशीं जातां येणार नाहीं. तूं तर म्हणतोस कीं तूं मांस खाल्लें आहेस, तुला हें आवडलेंहि. जेथें खाण्याची मुळींच जरूर नव्हती तेथें खाल्लेंस, आणि खाण्याची खास जरूर आहे तेथें वर्ज्य; काय आश्चर्य आहे!"

माझ्याकडून एक नाहीं कीं दोन नाहीं!

असले युक्तिवाद रोज चालत. बहात्तर रोग बरे करणारा एक नन्नाचा पाढाच माझ्यापाशीं होता. मित्र जसजशी माझी समजूत घालण्याचा प्रयत्न करीत, तसतशी माझी दृढता वाढत जाई. रोज ईश्वरापाशीं रक्षणाची याचना करीत असें आणि तें रक्षण मला मिळेहि. ईश्वर म्हणजे काय तें मला कळत नव्हतें. परंतु त्या रंभेनें शिकवलेली श्रद्धा आपलें काम करून राहिली होती.

एके दिवशीं मित्रांनीं माझेपाशीं बेंथॅमचा ग्रंथ वाचण्यास सुरुवात केली. उपयुक्ततावादासंबंधीं वाचलें. मी घाबरलों. उंची भाषा, मला कळतांना मारामार! मित्र अर्थ समजावून सांगूं लागले. मीं उत्तर दिलें:

" मला तुम्ही क्षमा करावी अशी माझी इच्छा आहे. असले सूक्ष्म प्रश्न मला समजत नाहींत. मांस खाल्लें पाहिजे हें मी कबूल करतों. परंतु माझ्या प्रतिज्ञेचें बंधन मी तोडूं शकत नाहीं. याबद्दल मला युक्तिवाद करतां येणार नाहीं. युक्तिवादांत मी तुम्हांला जिंकूं शकणार नाहीं, याबद्दल माझी खात्रीच आहे. परंतु मला मूर्ख समजून किंवा हट्टी समजून या बाबतींत तुम्ही मला सोडून द्यावा. तुमचें प्रेम मला समजतें. तुमचा हेतु समजतो. मी तुम्हांला आपले परम-

हितेच्छु मानतों. तुम्हांला वाईट वाटतें त्यामुळेंच तुम्ही मला आग्रह करतां, हेंहि मला दिसतेंच आहे. पण माझा निरुपाय आहे. प्रतिज्ञेचा भंग होणार नाहीं."

मित्र पहात राहिले. त्यांनीं पुस्तक बंद केलें. "बस्स; आतां मी वाद करणार नाहीं," असें म्हणून गप्प बसले. मला बरें वाटलें. तेव्हांपासून त्यांनीं युक्तिवाद करण्याचें सोडून दिलें.

पण माझ्याबद्दल त्यांना वाटणारी चिंता दूर झाली नाहीं. ते विडी पीत असत, दारू पीत असत. मला त्यांपैकीं एकहि गोष्ट करण्याबद्दल त्यांनीं सांगितलें नाहीं; उलट, त्या न करण्याबद्दल सांगत. मांसाहाराच्या अभावीं मी अशक्त होईन आणि इंग्लंडांत मला मोकळेपणानें राहतां येणार नाहीं याची त्यांना चिंता वाटे.

याप्रमाणें एक महिनापर्यंत मी नवाशिक्या म्हणून उमेदवारी केली. मित्रांचें घर रिचमंडमध्यें होतें. त्यामुळें लंडनला आठवड्यांतून एकदोन वेळांच जाणें. आतां मला एकाद्या कुटुंबांत ठेवला पाहिजे असा विचार डॉ. मेहता व दलपतराम शुक्ल यांनीं केला. भाई शुक्ल यांनीं वेस्ट केन्सिंग्टनमध्यें एका अँग्लो-इंडियनाचें घर शोधलें आणि मला तेथें ठेवला. घरधनीणबाई विधवा होती. तिला माझ्या मांसत्यागाची गोष्ट सांगितली. म्हातारीनें माझी व्यवस्था करण्याचें कबूल केलें. मी तेथें राहिलों. येथें पण माझे दिवस उपासमारींत जाऊं लागले. मी घरून मिठाई वगैरे खाण्याचे जिन्नस मागवले होते, ते अजून आले नव्हते. सर्वच आळणी लागे. म्हातारी रोज विचारपूस करी; पण ती तरी काय करणार ? शिवाय, मी अजून भिडस्त होतों तसाच होतों. त्यामुळें जास्त मागण्याचा संकोच वाटे. बाईला दोन मुली होत्या. त्या आग्रहपूर्वक थोडी आणखी रोटी घालीत; परंतु त्या बिचाऱ्यांना काय माहीत, कीं त्यांची रोटी खाऊन टाकावी, तेव्हां कुठें माझें पोट भरण्यासारखें होतें !

परंतु आतां मला पंख फुटूं लागले होते. अजून अभ्यास सुरू झाला नव्हता. जेमतेम वर्तमानपत्रें वाचूं लागलों होतों. हा भाई शुक्लांचा प्रताप होय. हिंदुस्थानांत मीं कधीं वर्तमानपत्रें वाचलीं नव्हतीं. पण अभ्यासानें तीं वाचण्याची आवड उत्पन्न करूं शकलों. 'डेली न्यूज', 'डेली टेलिग्राफ' आणि 'पॅलमॅल गॅझेट' एवढया पत्रांवरून नजर फिरवीत असें. पण त्यांत सुरुवातीला फार तर एक तास जात असेल.

मीं आतां हिंडणें सुरू केलें. मला निरामिष, म्हणजे अन्नाहार देणारें भोजनगृह शोधायचें होतें. अशा तऱ्हेच्या कांहीं खानावळी आहेत असें घरधनिणीनेंहि सांगितलें होतें. मी रोज दहाबारा मैल चालत असें. स्वस्तशा भोजनगृहांत जाऊन पोट भरून रोटी खाऊन येई, परंतु समाधान होईना. अशा तऱ्हेनें भटकतां भटकतां मी एक दिवस फेरिंग्डन स्ट्रीटमध्यें जाऊन पोंचलों, व 'व्हेजिटेरियन रेस्टोरॉं (अन्नाहारी भोजनगृह) हें नांव वाचलें. लहान मुलाला आवडीची वस्तु

मिळाल्यानें जसा आनंद व्हावा तसा मला झाला. मी हर्षानें वेडा होऊन आंत शिरणार त्यापूर्वींच दरवाजाजवळील कांचेच्या खिडकींत विकायचीं पुस्तकें दिसलीं; त्यामध्यें मीं सॉल्टचें 'अन्नाहाराचें समर्थन' या नांवाचें पुस्तक पाहिलें. एक शिलिंग देऊन विकत घेतलें, आणि जेवायला बसलों. इंग्लंडांत आल्यानंतर पोट भरून खायला प्रथम येथें मिळालें. ईश्वरानें माझी भूक शांत केली!

सॉल्टचें पुस्तक वाचलें. माझ्या मनावर त्याचा उत्कृष्ट परिणाम झाला. हें पुस्तक वाचल्या दिवसापासून मी स्वेच्छेनें म्हणजे मनःपूर्वक अन्नाहाराच्या मताचा झालों. मातेपाशीं केलेली प्रतिज्ञा आतां मला विशेष आनंददायी होऊन राहिली. अजूनपर्यंत मी "सर्व लोक मांसाहारी बनतील तर चांगलें" असें मानीत होतों. आणि प्रथम केवळ सत्यपालनार्थ व मागून प्रतिज्ञापालनार्थच मांसत्याग करीत होतों. तसेंच पुढें कधीं काळीं स्वतः उघडपणें मनमुराद मांस खाऊं लागून इतरांनाहि मांसाहाऱ्यांच्या कंपूंत ओढण्याची उमेद बाळगीत होतों. परंतु आतां याच्या उलट, स्वतः अन्नाहारी राहून इतरांना तसें बनविण्याची इच्छा उत्पन्न झाली.

• • •

## १५
## 'सभ्य' वेषांत

अन्नाहारावरील माझी श्रद्धा दिवसानुदिवस वाढत चालली. सॉल्टच्या पुस्तकानें आहाराच्या विषयावर जास्त वाचण्याची माझी जिज्ञासा तीव्र केली. मीं तर मिळालीं तेवढीं पुस्तकें विकत घेतलीं आणि वाचून काढलीं. त्यांपैकीं हॉवर्ड विल्यम्स्च्या 'आहारनीति' नांवाच्या पुस्तकामध्यें निरनिराळ्या काळचे ज्ञानी पुरुष, अवतार, पैगंबर इत्यादींच्या आहारांचें व आहारविषयक विचारांचें वर्णन आहे. पायथागोरस,* येशू इत्यादि लोक केवळ अन्नाहारी होते असें सिद्ध करण्याचा त्यांत प्रयत्न केलेला आहे. डॉ. मिसेस ॲना किंग्स्फर्डचें 'उत्तम आहारपद्धति' हें पुस्तकहि चित्ताकर्षक होतें. शिवाय डॉ. ॲलिन्सन्च्या आरोग्यविषयक लेखांचीहि पुष्कळ मदत झाली. औषधांऐवजीं फक्त आहारांतील फेरफारांनींच रोग्याला बरें करण्याच्या पद्धतीचें त्यांनीं समर्थन केलें आहे. डॉ. ॲलिन्सन् स्वतः अन्नाहारी होते, व रोग्यांना फक्त अन्नाहाराचीच ते शिफारस करीत असत. या सर्व पुस्तकांच्या वाचनाचा परिणाम असा झाला, कीं माझ्या जीवनामध्यें आहारविषयक प्रयोगांनीं

---

* २५०० वर्षांपूर्वी होऊन गेलेला आद्य ग्रीक तत्त्ववेत्ता.

महत्त्वाचें स्थान पटकावलें. त्या प्रयोगामध्यें प्रथम आरोग्याच्या दृष्टीला प्रधान स्थान होतें. मागून धार्मिक दृष्टीला श्रेष्ठ स्थान मिळालें.

इकडे त्या माझ्या मित्रांची माझ्याबद्दलची काळजी दूर झाली नव्हती. त्यांना माझ्यावरील प्रेमामुळें वाटे, कीं मीं मांस खाल्लें नाहीं तर अशक्त बनेन; एवढेंच नव्हे, तर 'ठोंब्या'च राहीन. कारण कीं मला इंग्रज समाजामध्यें मिसळतांच येणार नाहीं. मी अन्नाहारावरील पुस्तकें वाचीत असतों, हें त्यांना कळलें होतें. त्यांना अशी धास्ती पडली, कीं असल्या वाचनानें मी भ्रमिष्ट बनून जाईन, प्रयोगाखालींच माझा जन्म वायां जाईल, मला साधावयाचें तें मी विसरून जाईन आणि पढतमूर्खासारखी माझी स्थिति होऊन राहील ! म्हणून मला सुधारण्याचा त्यांनीं एक अखेरचा प्रयत्न केला. मला नाटकाला येण्याबद्दल आमंत्रण दिलें. तिकडे जाण्यापूर्वी मी त्यांच्याबरोबर हॉबर्न-भोजनगृहांत जेवावयाचें होतें. हें भोजनगृह म्हणजे माझ्या दृष्टीनें राजमहाल होता. व्हिक्टोरिया-हॉटेल सोडल्यानंतर असल्या भोजनगृहांत जाण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. व्हिक्टोरिया-हॉटेलांतील अनुभवाचा कांहीं उपयोग नव्हता. कारण, तेथें तर मी शुद्धीवरच नव्हतों म्हटलें तरी चालेल. आम्हीं दोघाजणांनीं एक टेबल धरलें. सभोंवार शेंकडों लोक होते. मित्रानें पहिलें वाढप मागविलें. तें 'सूप' होतें. मी बुचकळ्यांत पडलों. मित्राला कसें विचारावें ! म्हणून मी वाढणाराला जवळ बोलावला.

मित्र समजला. चिडून मला विचारलें,

"काय झालें ?"

मीं हळूच संकोचपूर्वक म्हटलें :

"यांत मांस आहे कीं काय तें मला विचारावयाचें आहे."

"असला जंगलीपणा या गृहांत खपणार नाहीं. तुला असली कटकट लावायची असेल, तर तूं बाहेर जाऊन एखाद्या बारक्या भोजनगृहांत खाऊन ये आणि बाहेर माझी वाट पहात बैस."

या ठरावानें मला आनंद झाला. मी उठून गेलों, आणि दुसरी खाणावळ शोधूं लागलों. शेजारींच एक अन्नाहार देणारें भोजनगृह होतें, परंतु तें बंद होऊन गेलें होतें. आतां काय करावें तें मला सुचेना. मी उपाशी राहिलों. आम्ही नाटकाला गेलों. मित्रानें झाल्या प्रकाराबद्दल चकार शब्दहि काढला नाहीं. मला तर बोलण्याची जरूरच नव्हती.

पण हें आम्हां उभयतांमधील शेवटचें प्रेमयुद्ध होय. आमचा संबंध तुटला नाहीं, किंवा आमच्यांत वितुष्टहि आलें नाहीं. त्यांच्या या सर्व प्रयत्नांच्या मुळाशीं असलेलें त्यांचें मजवरील प्रेम मला दिसत होतें. त्यामुळें विचार व आचार भिन्न असतांहि माझा त्यांच्याविषयींचा आदर वृद्धिंगतच झाला.

परंतु मला वाटलें, कीं त्यांना माझ्यासंबंधीं वाटत असलेली भीति नाहींशी केली पाहिजे. मीं निश्चय केला, कीं आतां जंगली रहायचें नाहीं. सभ्यपणाचीं लक्षणें संपादन करायचीं आणि अन्य तऱ्हेनें समाजामध्यें मिसळण्यास लायक बनून अन्नाहाराच्या बाबतींतील माझा विक्षिप्तपणा झांकून टाकायचा.

मीं 'सभ्यपणा' संपादण्याचा छिचोरपणाचा मार्ग पत्करला, तो माझ्या आंवाक्याच्याहि बाहेरचा होता.

विलायती फॅशनचे खरे, तरी पण मुंबईत कापून शिवलेले कपडे उच्च इंग्रज समाजामध्यें शोभणार नाहींत, म्हणून 'आर्मी अँड नेव्ही' स्टोअरमध्यें कपडे करविले. एकोणिस शिलिंग (ही किंमत त्या काळच्या मानानें फारच मोठी म्हटली पाहिजे) किंमतीची 'चिमणी' टोपी माथ्यावर चढविली. एवढ्यानें समाधान न होतां बॉंड स्ट्रीटमध्यें म्हणजे जेथें विशेष शोकीन लोकांचे कपडे शिवले जात, तेथें जाऊन दहा पौंड पाण्यांत टाकून संध्याकाळीं घालायचा पोषाख बनविला. भोळ्या व बादशाही दिलाच्या वडील बंधूंमार्फत खास सोन्याचा शेडा, दोन्ही खिशांत अडकवून लटकविण्याचा मागविला; आणि तो मिळालाहि. तयार बांधलेला टॉय वापरणें हा शिष्टाचार समजत नाहींत, म्हणून टॉय बांधण्याची कला हस्तगत करून घेतली. घरीं म्हणजे आरसा हजामतीच्या दिवशीं पहायला मिळायचा; परंतु येथें तर मोठ्या आरशासमोर उभें राहून टॉय बरोबर बांधण्यांत आणि केस चापून चोपून भांग पाडण्यांत रोज दहाएक मिनिटांचा तरी क्षय व्हावयाचाच. केस नरम नव्हते, त्यामुळें त्यांना चांगले वळवलेले राखण्यासाठीं रोज ब्रशाबरोबर (ब्रश म्हणजे केरसुणीच कीं नाहीं?) लढाई होई. आणि टोपी घालतां काढतांना भांग सांभाळण्यासाठीं हात डोक्याकडे गेलाच म्हणून समजावा. शिवाय, मधून मधून चारचौघांत बसलेले असतांना भांगावरून हात फिरवून केस जेथल्या तेथें राखण्याची निराळीच आणि सभ्यपणाची क्रिया चालायचीच!

परंतु एवढी टापटीपहि पुरेशी नाहीं. नुसत्या सभ्य पोशाखानें थोडेंच सभ्य होतां येणार? सभ्यपणाचे इतर कांहीं बाह्य प्रकारहि मीं समजून घेतले होते, आणि त्यांचाहि अभ्यास करायचा होता. सभ्य गृहस्थाला नाचतां आलें पाहिजे. त्याला फ्रेंचहि नीट आलें पाहिजे. कारण कीं फ्रेंच ही इंग्लंडचा शेजारी जो फ्रान्स त्याची भाषा होती. आणि सबंध युरोपची राष्ट्रभाषाहि होती; आणि माझी युरोपभर हिंडण्याची इच्छा होती. शिवाय, सभ्य गृहस्थाला छटादार भाषणहि करतां आलें पाहिजे. मीं नृत्य शिकून घेण्याचा निश्चय केला. एका वर्गात दाखल झालों. एका सत्राचें तीनएक पौंड भरले. तीन आठवड्यांत मिळून सुमारें सहा धडे घेतले असतील. बरोबर तालबद्ध पाऊल पडेना. पियानो वाजे, परंतु त्याच्या सुरांचा अर्थ काय याचा पत्ता लागेना! 'एक, दोन, तीन' असा क्रम चाले; परंतु त्यांच्या मधलीं अंतरें

पियानोच दर्शवी, तीं कांहीं लक्षांत येत ना. तर मग आतां ? आतां तर बावाजींच्या मांजरीपैकीं स्थिति झाली. उंदरांचें निवारण करण्यासाठीं मांजर, मांजरासाठीं गाय अशा तऱ्हेनें बावाजींचा परिवार वाढला. व्हायोलिन् वाजवायला शिकलों म्हणजे तालसुराची माहिती होईल. व्हायोलिन् विकत घेण्यांत तीन पौंड कृष्णार्पण केले, आणि आणखी कांहीं तें शिकण्यासाठीं ! भाषण करण्यास शिकण्यासाठीं तिसऱ्या शिक्षकाचें घर धुंडाळलें, त्याच्याहि हातावर एक गिनी ठेवली. बेलचें ' स्टँडर्ड इलोक्युशनिस्ट ' घेतलें. पिटचें भाषण सुरू करविलें !

या बेलसाहेबांनीं * माझ्या कानांत घंटा वाजविली. मी सावध झालों.

मला इंग्लंडांत जन्म थोडाच काढायचा आहे ? छटादार भाषण करायला शिकून मी करणार काय ? नाच नाचून मी सभ्य कसा बनणार ? व्हायोलिन् शिकायचें तर स्वदेशींहि शिकतां येईल. मी विद्यार्थी आहें. मला विद्याधन जोडलें पाहिजे. मला माझ्या धंद्याला जरूर ती तयारी केली पाहिजे. माझ्या सद्वर्तनावरून मला सभ्य म्हटलें तर ठीकच झालें. नाहीं तर तो नाद सोडून दिला पाहिजे.

या विचारांच्या तंद्रींत असतानांच मीं वरील आशयाच्या उद्गारांनीं भरलेलें पत्र वक्तृत्व-शिक्षकाला पाठविलें. त्यांच्यापाशीं मीं दोन कीं तीनच धडे घेतले होते. नृत्य शिकविणाऱ्या बाईलाहि तसलेंच पत्र लिहिलें. व्हायोलिन-शिक्षकिणीकडे व्हायोलिन् घेऊन गेलों. येईल त्या किंमतीला तें विकून टाकण्याची तिला परवानगी दिली. तिच्याशीं कांहींसा मित्रत्वाचा संबंध जुळला होता, म्हणून तिच्याशीं माझ्या मोहाची गोष्ट बोललों. नृत्य इत्यादींच्या उठाठेवींतून मोकळें होण्याचा माझा विचार तिला पसंत पडला.

' सभ्य बनण्या 'चा हा माझा नाद तीन एक महिने चालला असेल. पोशाखाची टापटीप कित्येक वर्षेंपर्यंत टिकली. पण मी विद्यार्थी बनलों

• • •

## १६
# फेरफार

नृत्य इत्यादींच्या माझ्या प्रयोगांवरून तो काळ स्वच्छन्दाचा होता, असें कोणी समजूं नये. त्यांत समजुतीचाहि कांहीं भाग होता हें वाचकांच्या ध्यानांत आलें असेल. या मोहाच्या काळींहि मी अमुक अंशानें सावधान होतों. पैन् पैचा हिशेब ठेवीत असें. खर्चाचेंहि मोजमाप होतें. दर महिन्याला पंधरा पौंडांहून जास्त खर्च करायचा नाहीं असा निश्चय केला होता. बस(मोटार)मधून जाण्याचा किंवा

---

* बेल हें पुस्तककर्त्याचें नांव, परंतु त्याच शब्दाचा अर्थ घंटा असाहि आहे.

टपालाचाहि खर्च टिपून ठेवीत असें आणि झोंपण्यापूर्वी नेहमीं मेळ घेत असें. ही संवय शेवटपर्यंत कायम राहिली. आणि मला माहीत आहे, कीं त्यामुळें सार्वजनिक आयुष्यांत माझ्या हस्तें लाखों रुपयांच्या उलाढाली झाल्या, त्यांत मी योग्य काटकसर करूं शकलों, आणि जेवढ्या चळवळी माझ्या देखरेखीखालीं चालल्या त्यांत मीं कधींहि कर्ज केलेलें नाहीं. उलट, प्रत्येकींत कांहीं ना कांहीं जमेच्या बाजूला राहिलेलें आहे. प्रत्येक तरुण मनुष्यानें स्वतःला मिळणाऱ्या थोड्याशा रुपयांचाच हिशेब काळजीपूर्वक ठेविला, तर त्याचा फायदा जसा पुढें मला व समाजाला मिळाला, तसा तो त्यालाहि मिळेल.

माझ्या राहणीवर माझी कडक नजर होती. त्यामुळें किती खर्च करणें योग्य हें माझ्या लक्षांत आलें. आतां मीं खर्च अर्धा करून टाकण्याचा विचार केला. हिशेब तपासतांना मला दिसलें, कीं माझा गाडीभाड्याचा खर्च पुष्कळच—बाजवीपेक्षां बराच जास्त—होत होता. शिवाय कुटुंबांत राहिल्यामुळें, कांहीं ठराविक रक्कम आठवड्याला खर्च केल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. कुटुंबांतल्या माणसांना एकादे दिवशीं बाहेर जेवायला नेण्याचा शिष्टाचार पाळणें जरूर होतें; शिवाय, एकादे वेळेस त्यांच्याबरोबर कोठें तरी मेजवानीला जावें लागल्यास तेथें तेथें गाडीभाड्याचा खर्च व्हावयाचाच. बरोबर मुलगीबिलगी असली तर तिचा खर्च तिच्यावर टाकणें योग्य नव्हे. शिवाय, बाहेर गेलें कीं घरीं जेवायला जातां येत नसे. तेथें पैसे दिलेले असायचेच आणि पुनः बाहेर खाण्याचे पैसे दुसरे दिलेच पाहिजेत. अशा रीतीनें होणारा फाजील खर्च वांचवितां येईल असें दिसून आलें. भिडेखातरच खर्च होत होता तोहि वांचेल, ही गोष्ट लक्षांत आली.

आतांपर्यंत इतर कुटुंबांत रहात होतों, त्याऐवजीं स्वतःची खोली घेऊन रहावें असा विचार केला. कामाच्या सोयीप्रमाणें तसेंच अनुभव मिळावा म्हणून निरानिराळ्या मोहल्ल्यांत बिऱ्हाड बदलावें असाहि विचार केला. घरें अशा ठिकाणीं पसंत केलीं, कीं तेथून कामाच्या जागीं अर्ध्या तासांत चालत जातां यावें, आणि गाडीभाडें वांचावें. ह्यापूर्वी नेहमीं इच्छित ठिकाणीं जाण्यासाठीं गाडीभाडें खर्चावें लागे, आणि पुन्हां फिरायला जाण्यासाठीं निराळा वेळ काढावा लागत असे. आतां कामावर जातांनाच फिरणें होऊन जाईल, अशी व्यवस्था झाली. आणि ह्या व्यवस्थेमुळें मी रोज ८-१० मैल सहज फिरत असें. मुख्यतः ह्या एकाच संवयीमुळें इंग्लंडांत मी क्वचितच आजारी पडलों असेन. शरीर चांगलें कसलें. कुटुंबांत राहण्याचें सोडून दोन खोल्या भाड्यानें घेतल्या; एक निजण्यासाठीं आणि दुसरी बसण्या-उठण्यासाठीं. येथून माझ्या विलायतेमधील जीवनक्रमांतील दुसरा भाग सुरू झाला असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. अजून तिसरा फेरफार ह्यानंतर व्हावयाचा होता.

अशा रीतीनें अर्धा खर्च वांचला. पण वेळेचें काय? मला माहीत होतें कीं बॅरिस्टरीच्या परीक्षेसाठीं फारशा अभ्यासाची जरूर नव्हती. त्यामुळें धीर वाटत होता. इंग्रजीचें माझें अर्धकच्चें ज्ञान मला नेहमीं टोंचत होतें. लिलीसाहेबांचे 'तूं बी.ए. हो, नंतर ये' हे शब्द मला सलत होते. बॅरिस्टरीच्या अभ्यासाशिवाय दुसरा अभ्यासहि केला पाहिजे. यासाठीं मीं ऑक्स्फर्ड-केम्ब्रिजची माहिती मिळविली. कित्येक मित्रांना भेटलों. त्यावरून दिसलें, कीं तेथें गेलें असतां खर्च फार वाढणार, आणि तेथील अभ्यासक्रमहि लांबलचक. मला तीन वर्षांवर राहणें शक्य नव्हतें. एका मित्रानें सांगितलें, "जर तुला एखादी कठिण परीक्षाच द्यायची असली, तर तूं लंडनची मॅट्रिक्युलेशन पास हो. त्यासाठीं मेहनत भरपूर करावी लागेल, आणि सामान्य ज्ञान वाढेल. खर्च तर मुळींच वाढणार नाहीं." ही सूचना मला आवडली. परीक्षेचे विषय पाहतों तों मनानें उलट खाल्ली. लॅटिन आणि दुसरी एक भाषा आवश्यक. लॅटिनचा अभ्यास कसा व्हावा? पण मित्रानें सुचविलें कीं, "वकिलाला लॅटिन भाषेचा फार उपयोग होतो. लॅटिन जाणणाऱ्याला कायद्याचीं पुस्तकें समजणें सोपें जातें. शिवाय, रोमन लॉच्या परीक्षेंत तर एक प्रश्न फक्त लॅटिन भाषेंतच असतो. आणि लॅटिन शिकल्यास इंग्रजी भाषेवरचा ताबाहि वाढेल." ह्या सर्व मुद्द्यांचा माझ्यावर परिणाम झाला. कठिण असो वा नसो, पण लॅटिन तर शिकायचेंच; घेतलेलें फ्रेंचहि पुरें करायचें. अर्थात् दुसरी भाषा फ्रेंच हेंहि ठरलेंच. एक खासगी मॅट्रिक्युलेशन वर्ग चालत असे, त्यांत नांव घातलें. परीक्षा दर सहा महिन्यांनीं होत असे. मला जेमतेम पांच महिन्यांचा अवधि होता. हें काम माझ्या आवांक्याबाहेरचें होतें. परिणाम असा झाला, कीं मी शिष्ट बनणार होतों, तो उद्योगी विद्यार्थी बनलों. वेळापत्रक तयार केलें. मिनिटामिनिटाचा उपयोग करूं लागलों. पण मी इतर विषयांचा अभ्यास करून वर लॅटिन किंवा फ्रेंच पुरें करूं शकेन इतकी माझी बुद्धि किंवा स्मरणशक्ति तीव्र नव्हती. परीक्षेस बसलों; पण लॅटिनमध्यें नापास झालों. वाईट वाटलें, पण धीर सोडला नाहीं. लॅटिनमध्यें गोडी वाटूं लागली होती. फ्रेंच जास्त चांगलें करण्याचा व विज्ञानशास्त्रांत नवीन विषय घेण्याचा विचार केला. रसायनशास्त्रांत—ज्यांत आतां मला वाटतें कीं खूप गोडी वाटायला पाहिजे—प्रयोगाच्या अभावीं मन रमेना. हिंदुस्थानांत या विषयाचा अभ्यास करावा लागलाच होता, म्हणून लंडन मॅट्रिकसाठींदेखील हाच विषय पसंत केला. ह्या वेळीं प्रकाश आणि उष्णता हा विषय मीं घेतला. हा विषय सोपा मानला जात असे, आणि मलाहि तो सोपा वाटला.

पुन्हां परीक्षा देण्याच्या तयारीबरोबरच मीं राहणींत जास्त साधेपणा आणण्याचा प्रयत्न सुरू केला. मला वाटलें, कीं अजून माझ्या कुटुंबाच्या गरिबीला

साजेसें माझें जीवन साधें नाहीं. बंधूंच्या औदार्याचा व अडचणींचा विचार मनांत येऊन मला संकोच वाटूं लागला. जे लोक पंधरा पौंड किंवा आठ पौंड दर महिन्याला खर्च करीत होते, त्यांना शिष्यवृत्त्या मिळत होत्या. माझ्यापेक्षां अधिक साधेपणानें राहाणारे विद्यार्थीहि मला दिसत होते. अशा किती तरी विद्यार्थ्यांचा माझ्याशीं संबंध आलेला होता. एक विद्यार्थी लंडनच्या कंगाल भागांत आठवड्याचे दोन शिलिंग देऊन एका खोलींत रहात होता, व लोकार्टच्या स्वस्त कोकोच्या दुकानांत दोन पेनींचा कोको आणि रोटी खाऊन निर्वाह करीत होता. त्याच्याशीं स्पर्धा करण्याची तर माझी शक्ति नव्हती. पण मी दोहोंच्याऐवजीं एका खोलींत खुशाल राहूं शकेन, आणि अर्धा स्वयंपाक मी हातानेंदेखील करून घेऊं शकेन असें मला वाटलें. असें केल्यानें मी दर महिन्याला पांच-चार पौंडांत राहूं शकेन. साध्या राहणीविषयींचीं पुस्तकेंदेखील माझ्या वाचण्यांत आलीं होतीं. दोन खोल्या सोडून देऊन आठवड्याला आठ शिलिंगांच्या भाड्याची एक खोली घेतली, एक शेगडी विकत घेतली, आणि सकाळचा स्वयंपाक हातानें करायला सुरुवात केली. स्वयंपाकांत जास्तींत जास्त वीस मिनिटें जात असत. ओटमीलची लापशी आणि कोकोसाठीं पाणी एवढें उकळण्यांत कितीसा वेळ जाणार ? दुपारीं बाहेर जेवून घ्यावें व संध्याकाळीं पुन्हां कोको करून रोटीबरोबर घ्यावा. अशा रीतीनें दररोज एक ते सव्वा शिलिंगामध्यें खाणें कसें भागवावें, हें मी शिकलों. हा माझा जास्तींत जास्त अभ्यासाचा काळ होता. जीवनक्रम साधा झाल्यामुळें वेळ जास्त वांचला. दुसऱ्या वेळीं परीक्षेस बसलों आणि पास झालों.

वाचकांनीं असें समजूं नये, कीं साधेपणामुळें माझा जीवनक्रम नीरस झाला. उलट, फेरफारामुळें माझी मनःस्थिति बाह्यस्थितीशीं समरस झाली. कौटुंबिक स्थितीशीं माझ्या स्वतःच्या राहणीचा मेळ बसला. जीवनक्रम अधिक सत्यमय झाला, व त्यामुळें आत्मानंदाला सीमा राहिली नाहीं.

● ● ●

## १७
## अन्नाचे प्रयोग

जीवनाविषयीं मी जों जों बारकाईनें विचार करूं लागलों तों तों मला माझ्या आंतरबाह्य आचारांत फरक करण्याची जरुरी भासूं लागली. ज्या वेगानें राहणी व खर्च यामध्यें फेरफार केला, त्याच किंबहुना त्याहून अधिक वेगानें मी आपल्या आहारामध्यें फेरफार करूं लागलों. अन्नाहारावरील इंग्रजी पुस्तकांमध्यें लेखकांनीं फार सूक्ष्म विचार केला असल्याचें मला दिसून आलें. अन्नाहाराचा त्यांनीं

धर्म, विज्ञान, व्यवहार व आरोग्य यांच्या दृष्टीनें विचार केला होता. नैतिक दृष्ट्या त्यांचें म्हणणें असें होतें, कीं मनुष्याला पशुपक्ष्यांदिकांवर जें प्रभुत्व मिळालेलें आहे तें त्यांना मारून खाण्यासाठीं नव्हे, तर त्यांच्या रक्षणासाठीं; किंवा ज्याप्रमाणें मनुष्यें एकमेकांचा उपयोग करून घेतात परंतु एकमेकांना खाऊन टाकीत नाहींत, त्याप्रमाणें पशुपक्षीहि तशा तऱ्हेच्या उपयोगासाठीं आहेत, खाण्यासाठीं नव्हेत. यापलीकडे ही गोष्टसुद्धां त्यांच्या ध्यानांत आली होती, कीं खाणेंपिणें हें चैनीसाठीं नव्हे, तर देह-धारणासाठीं होय. ही गोष्ट लक्षांत घेतां आहारामध्यें मांसच नव्हे, पण अंडीं आणि दूधहि वर्ज्य केलीं पाहिजेत असें कित्येकांचें म्हणणें होतें; व तें त्यांनीं कृतींतहि आणलें होतें. विज्ञानशास्त्राच्या दृष्टीनें आणि मनुष्याची शरीररचना लक्षांत घेऊन कित्येकांनीं असें अनुमान काढलें होतें, कीं मनुष्याला अन्न शिजविण्याचीच आवश्यकता असूं नये. त्यानें वनांतील वरपीक फळेंच खाऊन रहावें असा ईश्वरी संकेत दिसतो. दूध फक्त आईचें घ्यावें, दांत आल्यानंतर त्यानें चावून खाण्याजोगा आहारच घ्यावा. आरोग्याच्या दृष्टीनें त्यांनीं मिरची-मसाल्याचा त्याग सांगितला होता. व्यावहारिक किंवा आर्थिक दृष्ट्या त्यांनीं दाखवून दिलें होतें, कीं कमींत कमी खर्चाचा आहार म्हणजे अन्नाहारच होय. या चारी दृष्टींची माझ्यावर छाप पडली; आणि अन्नाहार देणाऱ्या भोजनगृहामध्यें चारी दृष्टींच्या माणसांच्या मीं गांठी घेतल्या. विलायतेंत अन्नाहाराची एक संस्था होती आणि एक साप्ताहिकहि निघत असे. मी साप्ताहिकाचा वर्गणीदार झालों आणि संस्थेचा सभासद झालों. थोडक्याच अवधींत माझी तिच्या कार्यकारी मंडळावर निवड झाली. त्या ठिकाणीं माझी अग्रगण्य अन्नाहाराची ओळख झाली. मी प्रयोगामध्यें मग्न होऊन गेलों.

घरून मिठाई, मसाला वगैरे मागविले होते ते रद्द केले; आणि मनानें निराळेंच वळण घेतलें. त्यामुळें मसाले वगैरेंचा शोक मावळूं लागला, आणि जी भाजी रिचमंडमध्यें मसाल्याच्या अभावीं बेचव लागत होती, तीच नुसती उकड-लेली स्वादिष्ट लागूं लागली. असल्या अनेक अनुभवांवरून मला कळून आलें, कीं स्वादाचें खरें स्थान जीभ नव्हे, तर मन आहे.

आर्थिक दृष्टि तर माझ्यापुढें होतीच. त्या वेळीं चहा-कॉफीला अपायकारक मानणारा व कोकोचा पुरस्कार करणारा असाहि एक पंथ होता. शरीरव्यापारासाठीं जरूर तेवढ्याच मात्र वस्तू घेणें योग्य आहे, एवढें मला समजलेंच होतें. म्हणून चहा कॉफीचा बहुतांशीं त्याग केला, व त्याऐवजीं कोको घेऊं लागलों.

भोजनगृहामध्यें दोन वर्ग असत. पहिल्या वर्गांत जेवढे पदार्थ खाल्ले तेवढ्यांचे पैसे द्यावे लागत. या ठिकाणीं वेळेला एकदोन शिलिंगांचाहि खर्च येई. यांत सुस्थितींतील लोक येत. दुसऱ्या भागांत सहा पेन्सांत तीन पदार्थ आणि रोटीचा एक

दुधचा एवढें मिळे. मीं जेव्हां खूप काटकसर सुरू केली, तेव्हां फार करून सहा पेन्सच्या विभागांमध्येंच जाऊं लागलों.

वरील प्रयोगांबरोबर इतर किरकोळ प्रयोग चालूच होते. कधीं पिठूळ पदार्थ वर्ज्य करण्याचा, कधीं फक्त रोटी आणि फळें खाऊन राहण्याचा, तर कधीं लापशी, दूध आणि अंडीं एवढेंच घेण्याचा.

हा शेवटला प्रयोग विशेष लक्ष्यांत घेण्यासारखा आहे. तो पंधरा दिवसहि चालला नाहीं. पिठाशिवायच्या आहाराचें समर्थन करणारानें अंड्यांची खूप स्तुति केली होती, आणि अंडीं म्हणजे मांस नव्हे असें सिद्ध केलें होतें. तीं घेण्यांत जिवंत प्राण्यांना दुःख होत नाहीं हें तर खरेंच. या युक्तिवादानें भुरळून मीं आईला वचन दिलेलें असूनहि अंडीं खाल्लीं. परंतु माझी भुरळ क्षणिक होती. प्रतिज्ञेचा नवा अर्थ लावण्याचा मला अधिकार नव्हता. प्रतिज्ञा देणाराचाच अर्थ प्रमाण माणला पाहिजे. मांस न खाण्याची प्रतिज्ञा देणाऱ्या मातेला अंड्यांची कल्पनाहि नसणार हें मला माहीत होतें. त्यामुळें मला प्रतिज्ञेच्या रहस्याची जाणीव होतांच मीं अंडीं सोडलीं आणि तो प्रयोगहि सोडून दिला.

हें रहस्य सूक्ष्म आहे आणि ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. विलायतेंत मांसाच्या तीन व्याख्या माझ्या वाचनांत आल्या. एकींत मांस म्हणजे पशुपक्ष्यांचें मांस. तशी व्याख्या करणारे मांस वर्ज्य मानीत, परंतु मासे खात; अंडीं तर खातच. दुसऱ्या व्याख्येप्रमाणें ज्याला सामान्य मनुष्य जिवंत प्राणी समजतो, त्यांचें मांस निषिद्ध मानलें होतें. म्हणजे मासे वर्ज्य, परंतु अंडीं ग्राह्य. तिसऱ्या व्याख्येनुरूप ज्यांना आपण सामान्यपणें जिवंत प्राणी म्हणतों, ते सर्व व त्यांपासून पैदा होणाऱ्या वस्तू या सर्व वर्ज्य. या व्याख्येप्रमाणें अंड्यांचा व दुधाचाहि त्याग आवश्यक होता. यांपैकीं पहिली व्याख्या मीं ग्राह्य मानली असती तर मासेहि खायला हरकत नव्हती. पण मला मातुःश्रीची व्याख्याच प्रमाण मानली पाहिजे, हें माझ्या लक्षांत आलें. अर्थात् जर तिच्यासमोर केलेली प्रतिज्ञा पाळायची, तर अंडीं घ्यायला मोकळीक नाहीं. त्यामुळें अंड्यांचा त्याग केला. हें मला फार अडचणीचें झालें. कारण कीं, बारीक तपास करूं लागलों, तेव्हां मला कळून आलें कीं अन्नाहाराच्या भोजनगृहांमध्येंहि पुष्कळ पदार्थांत अंडीं असतात. म्हणजे मला पुरी माहिती होईपर्यंत तेथेंहि वाढप्यापाशीं प्रत्येक पदार्थाबद्दल पूसतपास करीत बसावें लागे. कारण, पुष्कळ प्रकारच्या पुडिंगमध्यें व केकमध्यें अंडीं असायचींच. यामुळें एक तऱ्हेनें मी भानगडींतून सुटलों. कारण कीं, थोडक्याच व अगदीं साध्या अशाच वस्तू मला घेतां येत असत. उलटपक्षीं थोडा जाचहि वाटला. कारण जिभेला चटक लागलेल्या अनेक वस्तू सोडाव्या लागल्या. परंतु हा जाच क्षणिक

होता. प्रतिज्ञापालनापासून होणारा निर्मल, सूक्ष्म व शाश्वत स्वाद मला त्या क्षणिक स्वादापेक्षां अधिक प्रिय वाटला.

परंतु खरी परीक्षा ती यापुढेंच व्हावयाची होती, व ती दुसऱ्या व्रताच्या बाबतींत. देव तारी त्याला कोण मारी !

हें प्रकरण पुरें करण्यापूर्वी प्रतिज्ञेच्या अर्थासंबंधीं थोडें लिहिणें जरूर आहे. माझी प्रतिज्ञा म्हणजे मातेसमोर केलेला एक करार होता. दुनियेंतील पुष्कळ झगडे कराराच्या अर्थावरून उद्भवत असतात. पाहिजे तेवढ्या स्पष्ट शब्दांत करारनामा लिहितात; तरीहि अर्थ करणारे पंडित काऊचा बाऊ करून सोडतील ! यांत सभ्यासभ्यतेचा भेदच रहात नाहीं. स्वार्थ सर्वांस आंधळें करून सोडतो. राजापासून रंकापर्यंत सर्वजण करारांचे आपल्याला सोयीस्कर पडतील तसे अर्थ करून दुनियेला, स्वतःला आणि ईश्वराला फसवीत असतात. अशा तऱ्हेनें ज्या शब्दाचा किंवा वाक्याचा उभय पक्षकार आपापल्या परीनें अर्थ करतात, त्याला न्यायशास्त्रामध्यें द्वि-अर्थी मध्यमपद असें म्हणतात. उत्तम पक्ष म्हणजे प्रतिपक्षी आपल्या शब्दाचा जो अर्थ करील तोच खरा मानून चालावें; आपल्याला वाटणारा अर्थ तो चुकीचा किंवा अपुरा समजावा. असाच एक दुसरा सुवर्णन्याय असा आहे कीं, जेथें दोन अर्थ संभवत असतील तेथें निर्बल पक्ष जो अर्थ करील, तो अर्थ खरा मानला जावा. या दोन सुवर्णमार्गांचा त्याग झाल्यामुळेंच बहुधा झगडे होत असतात व अधर्म चालत असतो. आणि या अन्यायाच्या मुळाशीं असत्य असतें. ज्याला सत्याच्या मार्गानेंच चालायचें आहे त्याला सुवर्णमार्ग सहजीं सांपडतो. त्याला शास्त्रग्रंथ चाळावे लागत नाहींत. मातेनें 'मांस' शब्दाचा जो अर्थ मानला, आणि जो मी त्यावेळीं समजलों तोच माझ्या बाबतींत खरा होता; अधिक अनुभवावरून किंवा विद्वत्तेच्या घमेंडींत जो मी नवीन शिकलों असें मानलें, तो खरा नव्हे.

अजूनपर्यंतचे माझे प्रयोग आर्थिक तसेंच आरोग्याच्या दृष्टीनें झालेले होते. विलायतेंत त्यांना धार्मिक स्वरूप आलें नव्हतें. धार्मिक दृष्टीचे माझे कडक प्रयोग दक्षिण आफ्रिकेंत झाले; त्यांची छाननी पुढें करावी लागेल. परंतु त्यांचें बीजारोपण विलायतेंत झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

नवीन धर्म स्वीकारणाऱ्या लोकांच्या त्या धर्माच्या प्रसाराबद्दलचा उत्साह त्या धर्मांतच जन्मास येणाऱ्या लोकांपेक्षां अधिक असलेला दिसून येतो. अन्नाहार विलायतेमध्यें तरी नवीन पंथच होता, आणि माझ्या बाबतींत तीच स्थिति होती असें म्हणतां येईल. कारण कीं, मी विलायतला गेलों, तो बुद्धीनें तरी मांसाहाराचा पुरस्कर्ता झाल्यानंतर; अन्नहाराच्या धोरणाचा ज्ञानपूर्वक स्वीकार मीं विलायतेंतच केला. म्हणजे माझ्या बाबतींत नवीन धर्मांत प्रवेश केल्याप्रमाणें झालें होतें. नवधर्मीयांचा उत्साह माझ्यामध्यें आला होता. त्यामुळें मी ज्या पेठेंत रहात असें

त्या पेठेंत अन्नाहारी मंडळीची स्थापना करण्याचा मीं निश्चय केला. ही पेठ म्हणजे बेजवॉटरची होय. त्या पेठेंत सर एडविन् आर्नल्ड रहात असत. त्यांना उपाध्यक्ष होण्याबद्दल विनंति केली. ते झाले. डॉ. ओल्डफील्ड अध्यक्ष झाले. मी मंत्री ( चिटणीस ) झालों. कांहीं दिवसपर्यंत ही संस्था जेमतेम चालली; परंतु कांहीं महिन्यांनंतर तिचा शेवट झाला. कारण कीं, मी माझ्या वहिवाटीप्रमाणें ठरविक मुदतीनंतर ती पेठ सोडली. परंतु या लहानशा व अल्पावधींतील अनुभवानें मला संस्था काढण्याचा व चालविण्याचा किंचित् अनुभव मिळाला.

• • •

## १८

# लाजाळूपणा हीच माझी ढाल

अन्नाहारी मंडळाच्या कार्यवाहक समितीवर माझी निवड तर झाली. तिच्या प्रत्येक सभेला मी हजरहि रहात असें. परंतु बोलायला जीभ चालेना. मला डॉ. ओल्डफील्ड म्हणत, "तूं माझ्याबरोबर तर ठीक बोलतोस-चालतोस, पण समितीच्या बैठकींत कधीं जीभ उचलीत नाहींस. तुला मधमाशांतील नराची उपमा शोभेल." या बोलण्यांतील खुबी मला समजली. मधमाशा निरंतर कामांत असतात, परंतु नर खातो, पितो, पण काम मात्र करीत नाहीं. समितीमध्यें इतर लोक आपापले अभिप्राय व्यक्त करीत असतां मीं तेवढें मुखस्तंभ रहावें याचा अर्थ काय ? मला बोलण्याची इच्छा होत नसे असें नाहीं. पण बोलायचें काय ? सर्व सभासद माझ्याहून अधिक माहितगार असावे असे वाटे. शिवाय, एकाद्या बाबतींत बोलावेंसें वाटे, आणि मी बोलण्याची हिंमत करायला पाहीं, इतक्यांत दुसरा विषय निघे.

असें पुष्कळ दिवस चाललें. इतक्यांत समितीमध्यें एक महत्त्वाचा विषय निघाला. त्यांत भाग न घेणें म्हणजे अन्याय होऊं देणें होय असें मला वाटलें. कांहीं न बोलतां फक्त मत देऊन शांत राहणें हें नामर्दपणाचें वाटलें. मंडळाचे अध्यक्ष 'टेल्स आयर्न वर्क्स'चे मालक मि. हिल्स हे होते. ते आचरणाचे कडक होते. त्यांच्या पैशावरच मंडळ चालत होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. मंडळांतील पुष्कळसे लोक तर त्यांच्या छत्राखालचेच होते. या मंडळांत डॉ. ॲलिन्सन्‌हि होते. या वेळीं प्रजोत्पत्तीवर कृत्रिम उपायांनीं मर्यादा घालण्याची चळवळ चालू होती. डॉ. ॲलिन्सन् त्या उपायांचे पुरस्कर्ते होते; व मजुरांमध्यें त्यांचा प्रचार करीत असत. मि. हिल्स यांना हे उपाय नीतिनाश करणारे वाटले. त्यांच्या मतें अन्नाहारी मंडळ हें फक्त आहाराच्या सुधारणेसाठींच नव्हतें; तर तें

एक नीतिवर्धक मंडळहि होतें; आणि म्हणून डॉ. ॲलिन्सन्सारखे समाजघातक मतें असणारे लोक त्या मंडळांत असूं नयेत असा त्यांचा अभिप्राय होता. डॉ. ॲलिन्सन्ना मंडळांतून काढून टाकण्याचा ठराव मांडण्यांत आला. या चर्चेमध्यें मी लक्ष घालीत होतों. डॉ. ॲलिन्सन्चीं कृत्रिम उपायासंबंधींचीं मतें मला भयंकर वाटलीं. हिल्ससाहेबांनींहि त्या मतांना केलेला विरोध मला सर्वथैव योग्य वाटला. त्यांच्याबद्दल मला खूप आदर वाटत असे. त्यांच्या औदार्याबद्दलहि आदर होता. परंतु कोणी एकादा शुद्ध नीतीचे नियम मानीत नाहीं, म्हणून त्याच्या या अश्रद्धे-बद्दल त्याला अन्नाहारसंवर्धक मंडळांतून काढून लावावा हा मला धडधडीत अन्याय वाटला. माझ्या मतें मि. हिल्स यांची स्त्री-पुरुषसंबंधाविषयींचीं मतें त्यांचीं खासगी होतीं; मंडळाच्या सिद्धान्ताशीं त्यांचा कांहीं संबंध नव्हता. मंडळाचा हेतु फक्त अन्नाहाराचा प्रचार करण्याचा होता, इतर नीतीचा नाहीं. अर्थात् इतर अनेक नीतितत्त्वांची अवगणना करणाऱ्या इसमालाहि मंडळामध्यें स्थान असूं शकेल असें माझें मत होतें.

माझ्या विचाराचे मंडळांत इतरहि कांहीं लोक होते. परंतु मला माझे विचार बोलून दाखविण्याचें अवसान चढलें होतें. ते कसे मांडावे हाच मोठा प्रश्न होता! भाषण करण्याची माझी छाती नव्हती. म्हणून मीं माझे विचार अध्यक्षां-पाशीं लिहून देण्याचा बेत केला. मी आपलें लिखाण घेऊन गेलों. मला असें स्मरतें, कीं तें लिखाण वाचण्याचाहि मला धीर झाला नाहीं. अध्यक्षानीं तें दुसऱ्या एका सभासदाकडून वाचविलें. डॉ. ॲलिन्सन्चा पक्ष हरला. माझ्या बाबतींतील अशा प्रकारच्या या पहिल्याच युद्धांत मी पराजित पक्षाच्या बाजूचा झालों. परंतु तो पक्ष न्यायाचा होता, याबद्दल माझी खात्री होती. त्यामुळें माझ्या मनाला पूर्ण समाधान वाटत होतें. मला अंधुक स्मरण आहे, कीं यानंतर मीं समितीमधून राजीनामा दिला.

माझा लाजाळू स्वभाव विलायतेंत शेवटपर्यंत राहिला. कोणाला भेटावयाला म्हणून गेलों, आणि तेथें पांचसात माणसें एकत्र जमलेलीं असलीं, तरी तेवढ्यानें माझ्या तोंडाला कुलूप बसत असे.

एकदां मी वेंटनरला गेलों. तेथें मजुमदारहि होते. त्या ठिकाणीं एक अन्ना-हारी कुटुंब होतें, त्यांचेकडे आम्ही दोघेंहि रहात असूं. 'एथिक्स् ऑफ डाएट' पुस्तकाचे कर्ते याच बंदरीं रहात असत. आम्ही त्यांना भेटलों. अन्नाहाराच्या पुरस्कारार्थ तेथें एक सभा भरली होती. तेथें बोलण्याचें आम्हां दोघांनाहि निमंत्रण मिळालें. आम्हीं उभयतांनींहि तें मान्य केलें. भाषण लिहून आणून वाचण्यास हरकत नाहीं एवढी माहिती मीं अगोदर काढून ठेविली होती. आपले विचार सुव्यवस्थित आणि थोडक्यांत मांडण्यासाठीं पुष्कळ लोक लिहून आणलेलें वाचीत

असत हें माझ्या पहाण्यांत होतें. मी आपलें भाषण लिहून काढलें. बोलण्याची हिंमत नव्हतीच. वाचायला उठलों तों वाचण्याचेंहि जुळेना. डोळ्यांपुढें अंधेरी आली, आणि हातपाय कांपूं लागले. माझें भाषण जेमतेम एक तासभर असेल. तें मजमुदारांनीं वाचून दाखविलें. मजमुदारांचें भाषण उत्कृष्ट झालें. श्रोतृवर्गानें त्यांच्या भाषणाचें टाळ्यांच्या गजरांनीं स्वागत केलें. मला शरम वाटली, व स्वतःला बोलतां येत नाहीं याबद्दल दुःख झालें.

विलायतेंत सभेंत बोलण्याचा प्रयत्न मला विलायतेहून निघतांना करावा लागला होता. विलायत सोडण्यापूर्वी अन्नाहारी मित्रांना हॉबर्न-भोजनगृहामध्यें मेजवानीला बोलावलें होतें. माझा विचार असा होता, कीं अन्नाहारी भोजनगृहांत अन्नाहार मिळणारच, पण जेथें मांसाहार सर्रास चालतो, अशा भोजनगृहांमध्येंहि अन्नाहाराचा प्रवेश झाला तर चांगलें. असा विचार करून त्या हॉटेलाच्या व्यवस्थापकाशीं खास ठराव करून तेथें मेजवानी दिली. हा नवीन प्रयोग अन्नाहारी मंडळींना पसंत पडला, पण माझी मात्र फजितीच झाली. मेजवानी म्हणजे कोठें झाली तरी मौज करण्यासाठींच व्हायची. परंतु पाश्चिमात्य देशांत तिचा एक कला म्हणून विकास करण्यांत आला आहे. मेजवानीच्या वेळीं आरास, डामडौल वगैरे होतो, वाजंत्रें वाजवितात, भाषणें होतात. या लहानशा मेजवानीमध्येंहि हें सर्व अवडंबर होतेंच. माझ्या भाषणाची वेळ आली. मी उभा राहिलों. खूप विचारपूर्वक भाषण तयार करून गेलों होतों. थोडकींच वाक्यें तयार करून ठेविली होतीं. परंतु पहिल्या वाक्यापलीकडे मकाण जाईच ना! ॲडिसनविषयीं वाचतांना त्याच्या लाजाळू स्वभावाचा उल्लेख आला होता. हाउस ऑफ कॉमन्समधील त्याच्या पहिल्या भाषणाविषयीं असें सांगतात, कीं तो 'मला वाटतें' मला वाटतें' 'मला वाटतें' असें तीन वेळां बोलला; पण पुढें तोंडून शब्द निघेना. 'वाटणें' हा ज्या इंग्रजी शब्दाचा अर्थ आहे, त्याचाच 'गर्भ धारण करणें' असाहि अर्थ आहे. म्हणून ॲडिसनचें जेव्हां घोडें अडलें, तेव्हां कॉमन्स सभेंतील एक थट्टेखोर सभासद चटकन् म्हणाला, "या गृहस्थांनीं तीन वेळां गर्भ धारण केला, परंतु उत्पत्ति तर मुळींच केली नाहीं!" ही गोष्ट मनांत घोळवून मीं एक छोटेंसें विनोदी भाषण योजिलें होतें. माझ्या भाषणाची सुरुवात मीं या गोष्टीनें केली, पण तेथेंच अडलों! जुळविलेले विचार विसरून गेलों, आणि विनोदी व खुबीदार भाषण करायला जातां मीच थट्टेला पात्र झालों! "सद्गृहस्थहो, तुम्हीं माझें निमंत्रण स्वीकारलें, याबद्दल मी आपला आभारी आहें" एवढेंच बोलून मला खालीं बसावें लागलें.

हा लाजाळू स्वभाव पुढें दक्षिण आफ्रिकेंत सुटला असें म्हणतां येईल. पूर्ण सुटला असें अजूनहि म्हणतां येणार नाहीं. बोलायचें म्हणजे विचार पडतोच. अपरिचित समाजापुढें बोलतांना संकोच वाटतो. भाषण करण्याचें चुकवितां येईल

तर अवश्य चुकवीन, आणि मंडळींत बसलों असतां कांहीं विशेष बोलूं शकेन किंवा बोलण्याची इच्छा होईल अशी आजहि स्थिति नाहीं.

परंतु असल्या लाजाळू स्वभावामुळें माझी फजिती होण्यापलीकडे माझें कांहीं नुकसान झालेलें नाहीं; उलट, फायदाच झाला आहे असें आतां वाटतें. बोलतांना वाटणाऱ्या संकोचाबद्दल पूर्वी मला खेद वाटे, त्याऐवजीं आतां आनंदच वाटतो. मोठा फायदा हा झाला, कीं मी शब्दांची काटकसर शिकलों. स्वतःच्या विचारांवर ताबा ठेवण्याची संवय सहजीं लागली. मी स्वतःला असें प्रमाणपत्र निःशंकपणें देऊं शकतों, कीं माझ्या जिभेंतून किंवा लेखणींतून विचार करून व तोलून घेतल्याशिवाय क्वचित्च एक तरी शब्द बाहेर पडत असेल. मला लाज किंवा पश्चात्ताप वाटावा अशा तऱ्हेचें माझ्या भाषणांमध्यें किंवा लेखांमध्यें कांहींहि आलें असेल असें मला स्मरत नाहीं; भय वाटण्यासारख्या अनेक प्रसंगांतून मी बचावून गेलों आहें; आणि माझा पुष्कळसा वेळ वांचला आहे, हा कांहीं थोडाथोडका लाभ नव्हे.

अनुभवांतीं मला असेंहि कळून आलें आहे, कीं सत्याच्या पुजाऱ्यानें मौन सेवन करणें इष्ट आहे. जाणतां-अजाणतांहि मनुष्य अनेक वेळां अतिशयोक्ति करीत असतो, किंवा जें सांगण्यासारखें असेल तें लपवीत असतो, किंवा बदलून सांगत असतो. असल्या संकटांतून बचावून जाण्यासाठींहि अल्पभाषी असणें आवश्यक आहे. ज्याला थोडेंच बोलायचें असतें, तो विचार केल्याशिवाय बोलणार नाहीं, स्वतःचा प्रत्येक शब्द तोलून बोलेल. अनेकदां मनुष्य बोलण्यासाठीं अगदीं उतावळा होतो. "मलाहि बोलायचें आहे" अशा मजकुराची चिठ्ठी कोणत्या अध्यक्षाला मिळाली नसेल? मग बोलायला वेळ द्यावा तो त्याला पुरत नाहीं, जास्त वेळाची मागणी करतो आणि अखेरीस परवानगी नसतांहि बोलत राहतो! या सर्वांच्या बोलण्यापासून जगाचा फायदा झालेला क्वचित्च आढळून येतो. तेवढ्या वेळाचा नाश होत असतांना तर स्पष्ट दिसतो. म्हणून आरंभीं जरी माझी संकोचवृत्ति मला जाचीत असे, तरी आज तिचें स्मरण आनंददायकच होत आहे. ही संकोचवृत्ति माझी ढाल होती. तिच्यामुळें मला परिपक्व होण्याची संधि मिळाली. सत्याच्या माझ्या उपासनेमध्यें मला तिची फार मदत झाली.

• • •

# १९

# असत्यरूपी हलाहल

चाळीस वर्षांपूर्वी विलायतला जाणारे लोक हल्लींच्या मानानें थोडे होते. लग्न झालेलें असलें तरी आपण अविवाहितच आहों, असा बहाणा करण्याचा त्यांच्यामध्यें रिवाजच पडून गेला होता. त्या देशांत शाळा-कॉलेजांतून शिकणारे विद्यार्थी विवाहित नसावयचेच. विवाहित असेल तो विद्यार्थी राहणार नाहीं. आपल्यामध्यें प्राचीन काळीं विद्यार्थी ' ब्रह्मचारी ' या नांवानेंच ओळखला जाई. बालविवाहाची चाल अलीकडचीच आहे. विलायतेंत बाल विवाह ही वस्तूच नाहीं असें म्हणतां येईल. त्यामुळें हिंदी तरुणांना आपण विवाहित आहों असें कबूल करण्याची लाज वाटते. विवाह लपवून ठेवण्याचें दुसरें एक कारण असें, कीं विवाहाची प्रसिद्धि झाल्यास ज्या कुटुंबांत राहायला मिळत असेल त्या कुटुंबांतील तरुण मुलींबरोबर हिंडण्या-फिरण्याला किंवा विनोद करावयाला मिळायचें नाहीं. हा विनोद बहुतांशीं निर्दोष असतो. अशा तऱ्हेची मैत्री वडील मंडळींनाहि पसंत असते. तरुण व तरुणी यांमध्यें अशा तऱ्हेनें साहचर्य होणें तिकडे आवश्यकहि आहे असें म्हणतां येईल. कारण तिकडे प्रत्येक तरुणाला स्वतःची सहधर्मचारिणी स्वतःच शोधून काढावी लागते. म्हणून जो परिचय विलायतेंत स्वाभाविक म्हणतां येईल तशा तऱ्हेचा परिचय हिंदुस्थानचे तरुण विलायतेंत पाऊल टाकतांच जर करून घेऊं लागले, तर त्याचा परिणाम भयंकर होणारच. कित्येक वेळां अशा तऱ्हेचे परिणाम घडून आल्याचें माहीत आहे. तरी पण या मोहिनी-मायेमध्यें आपल्याकडील तरुण सांपडले होते. इंग्रजांच्या दृष्टीनें कितीहि निर्दोष असला तरी आमच्या दृष्टीनें त्याज्य अशा सहवासासाठीं ते असत्याचरण पत्करीत. या जाळ्यांत मी पण सांपडलों. पांच-सहा वर्षांपासूनच विवाहित असतां व एका मुलाचा बाप असतांहि मी जणुं अविवाहित आहें असा बहाणा करण्यास मी कचरलों नाहीं ! या बहाण्यापासून मिळावयाचा लाभ ( ! ) मला थोडाच मिळाला. माझ्या लाजाळू स्वभावानें, माझ्या मूकवृत्तीनें, माझा भरपूर बचाव केला. मला गप्पागोष्टी करतां येत ना; इतक्याउपर माझ्याशीं बोलायला कोणती मुलगी रिकामी असणार ? माझ्याबरोबर फिरायलाहि क्वचित्‌च एखादी मुलगी निघे.

मी जसा लाजाळू तसाच भित्राहि होतों. वेंटनरमध्यें मी ज्या कुटुंबांत राहात असें तसल्या कुटुंबांत, घरांतील मुली शिष्टाचारासाठीं म्हणून तरी माझ्यासारख्या परक्या माणसाला फिरायला घेऊन जात. या शिष्टाचाराखातरच त्या घरवाल्या बाईची मुलगी मला एकदां वेंटनरच्या आसपासच्या सुंदर टेंकड्या पहायला घेऊन

गेली. माझी चाल कांहीं कमी नव्हती, पण तिची चाल तर माझ्यापेक्षांहि जोरदार. अर्थात् तिच्या मागूनच रखडत जावें लागत होतें. ती तर सबंध रस्ताभर गप्पा-गोष्टींचीं कारंजीं उडवीत चालली होती, तर माझ्या तोंडावाटे मात्र कधीं ' होय ' तर कधीं ' नाहीं ' एवढाच ध्वनि उमटत होता. फारच झालें तर " काय शोभा दिसते ! " एवढेच शब्द निघायचे ! ती तर जणुं हवेंतून उडत चाले, आणि मी परत घर केव्हां गांठीन याच विचारांत राहीं, तरी पण ' आतां आपण परत वळूं या ' म्हणण्याची छाती होईना. असें होतां होतां आम्ही एका टेंकडीच्या टोंकाशीं येऊन पोंचलों. पण आतां उतरायचें कसें ? तिचे बूट उंच टांचांचे असूनहि वीस-पंचवीसच्या वयांची ती रमणी बिजलीप्रमाणें खालीं उतरून गेली. मी इकडे शरमिंदा होऊन उतार कसा उतरावा याचा विचार करतों आहें, ती खालीं उभी उभी मला हंसते आहे, मला धीर देत आहे; वर येऊन हात धरून घेऊन येतें म्हणते आहे ! पण मी असा नामर्द कां म्हणून होईन ? कसाबसा पाय फरपटीत, मधून बसत, खालीं आलों. मला आधींच लाजेनें काय करूंसें झालें होतें. त्यांत आणखी तिनें ' शा-बा-स ! ' म्हणून मला अधिकच लाजविलें. अशी मस्करी करून मला लाजविण्याचा तिला हक्क पोंचतच होता.

परंतु सर्वच ठिकाणीं मी अशा तऱ्हेनें कसा बचावूं शकणार ? माझ्यांतून असत्याचें हलाहल काढून टाकण्याचा ईश्वराचा संकेत होता. जसें वेंटनर तसेंच ब्रायटन हेंहि समुद्रकांठीं असलेलें हवा खाण्याचें ठिकाण आहे. तेथें एकदां मी गेलों होतों. ज्या हॉटेलांत गेलों, तेथेंच एक साधारण श्रीमंतशी प्रौढ विधवा बाईहि हवा खाण्यासाठीं आली होती. हा माझ्या पहिल्या वर्षांतील प्रसंग होता वेंटनरच्या पूर्वींचा. येथें खाण्याच्या पदार्थांच्या यादींतील सर्व नांवें फ्रेंच भाषेंत लिहिलीं होतीं. मला समजत ना. ती बाई बसली होती त्याच टेबलापाशीं मीहि बसलों होतों. बाईनें पाहिलें, कीं मी नवखा आहें, आणि थोडा गोंधळलोंहि आहें. तिनें बोलायला सुरुवात केली,

" तुम्ही अपरिचित दिसतां. तुम्हांला कसला तरी विचार पडला आहे. अजून तुम्ही खाण्याचा कोणताच पदार्थ कां बरं मागविला नाहीं ? "

मी ती पदार्थांची यादी वाचीत होतों, आणि वाढप्याजवळ चौकशी करण्याच्या तयारींत होतों. अर्थात् मीं त्या भल्या बाईचे उपकार मानले आणि म्हटलें, " ही यादी मला समजत नाहीं; आणि मी अन्नाहारी असल्यामुळें कोणते पदार्थ निर्दोष आहेत तें मला समजून तर घेतलें पाहिजे."

ती बाई म्हणाली, " ठीक, तर मी तुम्हांला मदत करतें, आणि यादी समजावून देतें. तुम्हांला चालतील असे पदार्थ मी तुम्हांला दाखवूं शकेन."

मीं तिची मदत आभारपूर्वक स्वीकारली. येथून आमचा संबंध सुरू झाला, तों मी विलायतेंत होतों तोंवर व त्यानंतरहि कित्येक वर्षेपर्यंत टिकून राहिला. तिनें आपला लंडनचा पत्ता दिला, आणि आपल्याकडे दर रविवारीं जेवायला येण्याचें निमंत्रण दिलें. स्वतःच्या घरीं दुसरे विशेष प्रसंग येत, तेव्हांहि मला बोलावीत असे. मुद्दाम माझी लाज घालविण्याचा प्रयत्न करी, तरुण मुलींशीं परिचय करून देई आणि त्यांच्याबरोबर गप्पा-गोष्टी मारण्यास प्रोत्साहन देई. एक बाई तिच्याकडेच राहात असे. तिच्याबरोबर पुष्कळ बोलायला लावी. कधीं आम्हांला एकटीच सोडून जात असे.

प्रथम मला हें सर्व विपरीत वाटलें. बोलायचें सुचेच ना. विनोद तरी कसला करायचा ? परंतु ती बाई मला थोडे थोडे धडे देई. मी बनत चाललों. दर रविवारची वाट बघत असें. त्या बाईबरोबर बोलण्याचालण्याची आवड वाटूं लागली.

म्हातारी पण मला त्याच दिशेनें आकर्षित चालली. तिला या सहवासाचें कौतुक वाटत होतें. ती आम्हां दोघांचें कल्याणच इच्छीत असावी.

आतां मीं काय करावें ? मीं विचार केला, "मी जर या भल्या बाईला माझ्या लग्नाची गोष्ट सांगून टाकतों तर किती बरें झालें असतें ! मग तिनें माझें कोणाशीं लग्न जुळविण्याची इच्छा केली असती ? अजूनहि वेळ टळलेली नाहीं. मीं सत्य सांगून टाकलें, तर अधिक संकटांतून बचावेन." असा विचार करून मीं तिला पत्र लिहिलें. मला स्मरण आहे त्याचप्रमाणें त्याचें तात्पर्य देतों:—

आपली ब्रायटनमध्यें भेट झाली, तेव्हांपासून तुम्ही माझ्यावर लोभ करीत आहां. आई जशी मुलाची काळजी वाहते तशी तुम्ही माझी वाहात आहां. तुम्हांला असेंहि वाटतें, कीं मीं लग्न करावें आणि म्हणून तुम्ही माझा तरुण मुलींशीं परिचय करून देतां. असा परिचय जास्त वाढण्यापूर्वींच मला आपल्याला सांगितलें पाहिजे, कीं मी तुमच्या प्रेमाला लायक नाहीं. मी तुमच्या घरीं येऊं लागलों, तेव्हांच मीं तुम्हांला सांगून टाकायला पाहिजे होतें, कीं माझें लग्न होऊन चुकलेलें आहे. हिंदुस्थानचे विद्यार्थी विवाहित असले तरी या देशांत आपल्या विवाहाची गोष्ट कळूं देत नाहींत असें मला माहीत आहे. त्यामुळें मींहि त्याच रिवाजाचें अनुकरण केलें. आतां मला दिसतें कीं, मी माझ्या लग्नाची गोष्ट मुळींच छपवायला नको होती. मला आणखीहि सांगितलें पाहिजे, कीं माझें बालवयांतच लग्न झालें, व मला एक मुलगाहि आहे. ही गोष्ट आपल्यापासून लपवून ठेविल्याबद्दल मला आतां अत्यंत दुःख होत आहे. परंतु आतां तरी खरें सांगून टाकण्याचें धैर्य ईश्वरानें मला दिलें याबद्दल आनंद होत आहे. आपण मला क्षमा कराल का ? ज्या भगिनीबरोबर आपण माझा परिचय करून दिला, तिच्याशीं मीं कसल्याहि प्रकारचा अतिप्रसंग केला नाहीं याबद्दल खात्री देतों. मला तसें करण्यास मोकळीक नाहीं याची मला

पूर्ण जाणीव आहे. परंतु आपली इच्छा स्वाभाविकच माझें कोणाशीं तरी लग्न जुळलेलें पाहण्याची असणार. आपल्या मनांत या गोष्टीबद्दल जास्त विचार येऊं नयेत येवढ्यासाठीं तरी मीं आपल्याला खरा प्रकार सांगून टाकलाच पाहिजे.

" हें पत्र मिळाल्यानंतर जर आपण मला आपल्या घरीं येण्याला नालायक ठरविला, तर त्याबद्दल मला बिलकूल वैषम्य वाटणार नाहीं. आपल्या लोभाबद्दल मी आपला कायमचा ऋणी बनून चुकलों आहें. आपण माझा त्याग नाहीं केला, तर मला हर्ष होईल, हें मला कबूल केलें पाहिजे. आपल्या घरीं येण्याला अजूनहि मला आपण लायक समजाल, तर तें तुमच्या प्रेमाचें नवीन द्योतक असें मी समजेन, आणि त्या प्रेमाला पात्र होण्याचा मी सदैव प्रयत्न चालवीन."

असलें पत्र मीं चुटकीसारखें लिहून काढलें नाहीं हें वाचक समजूं शकतीलच. कोण जाणे मीं किती मसुदे केले असतील; पण अशा तऱ्हेचें पत्र पाठवून मीं माझ्या माथ्यावरील मोठा भार उतरला.

बहुतेक उलट टपालींच सदरहू बाईकडून उत्तर आलें, त्यांत तिनें कळविलें,

" तुमचें मोकळ्या मनानें लिहिलेलें पत्र मिळालें. आम्हां उभयतांस फार समाधान वाटलें आणि आम्ही खूप हसलोंहि. तुमचेकडून घडलेलें असत्याचरण मी क्षम्य समजतें. परंतु तुम्हीं आपली हकीकत कळविली हें ठीकच झालें. माझें निमंत्रण कायम आहे. येत्या रविवारीं आम्ही तुमची वाट पाहूंच; आणि तुमच्या बालविवाहाची गोष्ट ऐकूं आणि तुमची थट्टा करण्याचा आनंदहि मिळवूं. आपला स्नेह होता तसाच कायम राहील याबद्दल खात्री बाळगा."

अशा तऱ्हेनें माझ्यामध्यें असत्याचें हलाहल व्यापून राहिलें होतें, तें मीं काढून टाकलें; आणि यापुढें कोठेंहि माझ्या विवाहासंबंधीं वगैरे सांगून टाकण्याला मी कचरत नसें.

• • •

२०

# धार्मिक परिचय

विलायतेंत राहून वर्ष एक झालें असेल इतक्यांत दोन थिऑसॉफिस्ट मित्रांची ओळख झाली. दोघे सख्खे भाऊ होते, व अविवाहित होते. त्यांनीं माझेपाशीं गीतेसंबंधीं गोष्ट काढली. ते एड्विन् आर्नल्डचें गीतेचें भाषांतर वाचीत असत. परंतु मला त्यांनीं ती आपल्याबरोबर संस्कृतांत वाचण्यास बोलाविलें. मला लाज वाटली, कारण कीं मीं गीता संस्कृतांत किंवा प्राकृतांतहि वाचली नव्हती! मला त्यांना

सांगावें लागलें, कीं "मीं गीता वाचलेलीच नाहीं; पण तुमच्याबरोबर वाचण्याची माझी तयारी आहे. माझें संस्कृतचें अध्ययनहि नांवाचेंच आहे. मला तें इतपतच समजणार, कीं भाषांतरांत भलताच अर्थ असला तर तो दुरुस्त करतां येईल." अशा तऱ्हेनें त्या बंधूंबरोबर मीं गीता वाचण्याचा प्रारंभ केला. दुसऱ्या अध्यायाच्या अखेरच्या श्लोकांपैकीं,

ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।<br>
सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥<br>
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।<br>
स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात् प्रणश्यति* ॥

या श्लोकांचा माझ्या मनावर खोल ठसा उमटला. त्यांचे ध्वनि माझ्या कानांत घुमतच राहिले. भगवद्गीता हा अमूल्य ग्रंथ आहे अशी माझी त्या वेळीं समजूत झाली. ती समजूत हळूहळू दृढ होत गेली व आज तत्त्वज्ञानाच्या बाबतींत मी तिला सर्वोत्तम ग्रंथ समजतों. माझ्या निराशेच्या प्रसंगीं त्या ग्रंथानें मला अमूल्य मदत दिली आहे. तिचीं इंग्रजी भाषांतरें बहुतेक सर्व मीं वाचलीं आहेत. पण एड्विन् आर्नल्डचें भाषांतर मला सर्वांत उत्तम वाटतें. मूळ ग्रंथांतील भावार्थाला मुळींहि बाध आलेला नाहीं. तरीहि तो ग्रंथ भाषांतरसा वाटत नाहीं. मीं या वेळीं भगवद्गीतेचा अभ्यास केला म्हणतां येणारच नाहीं. गीता ही माझ्या नित्य वाचनाचा ग्रंथ पुढें अनेक वर्षांनंतर झाली.

याच मित्रांनीं मला आर्नल्डचें बुद्धचरित्र वाचण्याची शिफारस केली. तोंपर्यंत सर एड्विन् आर्नल्डच्या गीताभाषांतराचीच मला माहिती. बुद्धचरित्र मीं भगवद्गीतेपेक्षांहि अधिक आवडीनें वाचलें. पुस्तक हातांत धरल्यानंतर तें पुरें केल्यावरच खालीं ठेवूं शकलों.

ते मित्र मला एकदां ब्लॅवॅटस्की लॉजमध्येंहि घेऊन गेले. तेथें त्यांनीं मला मॅडम ब्लॅवॅट्स्कीचें दर्शन करून दिलें; तसेंच मिसेस् बेझंटचेंहि. मिसेस् बेझंट त्या वेळीं नुकत्याच थिऑसॉफिकल सोसायटींत दाखल झाल्या होत्या. त्यामुळें त्या संबंधींची चर्चा वर्तमानपत्रांत चाले. ती मी आवडीनें वाचीत असें. त्या मित्रांनीं मला सोसायटींत दाखल होण्याविषयींहि सुचविलें. मीं विनयपूर्वक नाकारलें. "माझें धर्मज्ञान जवळजवळ शून्य आहे; म्हणून मीं कोणत्याहि पंथांत सामील होऊं इच्छीत नाहीं." मला स्मरतें, कीं त्याच मित्रांच्या सांगण्यावरून मीं मॅडम ब्लॅवॅटस्कीचें 'की टु थिऑसॉफी' हें पुस्तक वाचलें. त्यावरून हिंदुधर्माचे

---

* विषयाचें चिंतन करणाराचा प्रथम त्यांच्याबद्दल संग उत्पन्न होतो; संगापासून कामना उत्पन्न होते. कामनेच्या पाठोपाठ क्रोध येतो; क्रोधातून संमोह, संमोहांतून स्मृतिभ्रम आणि स्मृतिभ्रमापासून बुद्धिनाश होतो. आणि अखेरीस त्या पुरुषाचा स्वतःचा नाश होऊन जातो.

ग्रंथ वाचण्याची इच्छा झाली; आणि हिंदुधर्म म्हणजे भ्रमाचें जाळें, अशा तऱ्हेचा जो अभिप्राय पाद्र्यांच्या तोंडून ऐकत असें, तो मनांतून पार नाहींसा झाला.

याच सुमाराला एका अन्नाहारी वसतिगृहामध्यें मला मँचेस्टरचे एक भले ख्रिस्ती भेटले. त्यांनीं माझ्याशीं ख्रिस्ती धर्माची गोष्ट काढली. मीं त्यांचेपाशीं माझ्या राजकोटच्या स्मरणाचें वर्णन केलें. तें ऐकून त्यांना वाईट वाटलें. ते म्हणाले, " मी स्वतः अन्नाहारी आहें. मद्यपानहि करीत नाहीं. पुष्कळ ख्रिस्ती लोक मांसाहार करतात, मद्यपान करतात हें खरें; परंतु या दोन्हींपैकीं कोणताहि पदार्थ घेण्याबद्दल ख्रिस्ती धर्माची आज्ञा नाहीं. तुम्हीं बायबल वाचावें, अशी मी आपणांस शिफारस करतों. " मीं त्यांची सूचना मान्य केली. बायबल त्यांनींच विकत घेऊन दिलें. मला अंधुक स्मरण आहे, कीं ते गृहस्थ स्वतः बायबलें विकीत असत. त्यांनीं नकाशे, अनुक्रमणिका वगैरे असलेलें बायबल मला विकत दिलें. मीं तें सुरू केलें, परंतु ' जुना करार ' माझ्यानें वाचवेच ना. ' जेनेसिस ' सृष्टिरचना–या प्रकरणापुढें तर वाचूं लागलों, कीं झोंपच येई. ' वाचलें ' म्हणतां यावें एवढ्याखातर लक्ष लागत नसतां व अर्थ न समजतांहि मीं बाकीचीं प्रकरणें मोठ्या कष्टानें वाचून काढलीं असें आठवतें. ' नंबर्स ' नांवाचें प्रकरण वाचतांना मला तिटकाराच आला.

' नव्या करारा 'वर आलों तेव्हां निराळाच परिणाम झाला. येशूच्या गिरिप्रवचनाची छाप फार चांगली पडली. तें हृदयांत उतरलें. बुद्धीनें त्याची गीतेशीं तुलना केली. ' तुझा सद्रा मागेल त्याला कोटहि दे. तुझ्या उजव्या गालावर थप्पड मारील त्याच्यासमोर डावा गालहि धर ! ' हें वाचून मला अपार आनंद झाला. शामळभट्टाचा छप्पा* आटवला. माझ्या बालमनानें गीता, आर्नल्डकृत बुद्ध-चरित्र आणि येशूचीं वचनें यांचें एकीकरण केलें. धर्म त्यागामध्यें आहे ही गोष्ट मनाला पटली.

या वाचनामुळें इतर धर्माचार्यांचीं चरित्रें वाचण्याची इच्छा झाली. कार्लाइलचें ' विभूतिमंत आणि विभूतिपूजा ' वाचण्याची एका मित्रानें शिफारस केली; त्यांत पैगंबराविषयीं वाचलें, व त्याची थोरवी, शौर्य व तपश्चर्या यांची कल्पना आली.

एवढ्या माहितीपलीकडे मी प्रगति करूं शकलों नाहीं. माझ्या परीक्षेच्या पुस्तकांव्यतिरिक्त इतर पुस्तकें वाचण्याला मला वेळच काढतां येईना. परंतु आपण धर्मग्रंथ वाचले पाहिजेत, आणि सर्व मुख्य धर्मांचें योग्य ज्ञान मिळविलें पाहिजे, एवढी गोष्ट मनाशीं ठरवून ठेवली.

नास्तिकवादासंबंधीं थोडेंबहुत जाणून घेतल्याशिवाय कसें चालेल ? ब्रॅडलॉचें

---

* सहा चरणांचें वृत्त. हा मागें दहाव्या प्रकरणाचे शेवटीं दिला आहे.

— भाषांतरकार

नांव सर्व हिंदी लोकांना माहीतच आहे. ब्रॅडलॉना नास्तिक म्हणतां येईल. म्हणून त्यांच्यासंबंधीं कोणचेंसें पुस्तक वाचलें, नांव आतां आठवत नाहीं. त्याची माझ्यावर कांहींच छाप पडली नाहीं. नास्तिकतारूपी सहाराचें रण मी ओलांडून गेलों होतों. मिसेस् बेझंटची कीर्ति पण त्या काळींसुद्धां मोठी होती. त्या नास्तिकवाद सोडून आस्तिक झाल्या आहेत, या बातमीनेंहि मला नास्तिकवादाबद्दल उदासीन बनविलें. ' मी थिऑसॉफिस्ट कां झालें ? ' हें मिसेस बेझंटचें चोपडें मीं वाचलें होतें. ब्रॅडलॉ यांचें देहावसान या सुमारालाच झालें. वोकिंग येथें त्यांची उत्तरक्रिया करण्यांत आली. तिला मीहि हजर राहिलों होतों. मला वाटतें, एकहि हिंदी गृहस्थ गैरहजर नसेल. त्यांच्याबद्दल आदर दर्शविण्यासाठीं कित्येक पाद्रीहि आले होते. परत येतांना एकाच ठिकाणीं आम्ही सर्व आगगाडीची वाट पाहात होतों. तेथें त्या जमावांतील एका पठ्या नास्तिकवाद्यानें एका पाद्र्याची उलटतपासणी सुरू केली :—

"—काय हो साहेब, तुम्ही ईश्वर आहे म्हणतां ना ? "

त्या भल्या माणसानें सौम्य स्वरानें जबाब दिला, " होय, मी असें म्हणतों खरें. "

पहिल्या इसमानें हंसून, जणूं काय आपण या पाद्र्यावर मात करीत आहों अशा स्वरानें म्हटलें, " ठीक; पृथ्वीचा परिघ २८००० मैलांचा आहे हें तर आपल्याला कबूल आहे ना ? "

" अवश्य ! "

" तर मग सांगा पाहूं, तुमचा ईश्वर केवढा मोठा आहे, आणि तो कोठें असेल ? "

" आपण समजून घेऊं तर तो आपल्या उभयतांच्या हृदयांत वास करीत आहे ! "

" असल्या उत्तरानें पोरें फसतील—" असें म्हणून त्या योद्ध्यानें आम्ही आसपास उभे होतों त्यांच्याकडे विजयी दृष्टीनें पाहिलें.

पाद्र्यानें नम्रपणें मौन धारण केलें.

या संवादामुळें नास्तिकवादाबद्दलची माझी नापसंती अधिकच दृढ झाली.

● ● ●

*

*

# २१
## ' निर्बलके बल राम '

धर्मशास्त्र आणि जगांतील धर्म यांची साधारण माहिती तर मला झाली; परंतु मनुष्याचा बचाव करण्यास असलें ज्ञान पुरें पडत नाहीं. संकटसमयीं जी गोष्ट मनुष्यास हात देते, तिचें त्याला त्या वेळीं भान नसतें, ज्ञान नसतें. नास्तिक मनुष्य संकटांतून बचावला तर म्हणतो, कीं यदृच्छेनें बचावून गेलों. अशा वेळीं आस्तिक म्हणतो, कीं मला ईश्वरानें बचावलें. धर्माच्या परिशीलनानें तो परिणाम घडून गेल्या-नंतर अनुमान करतो, कीं संयमामुळें ईश्वर आपल्या हृदयांत प्रगट होतो. अशा तऱ्हेचें अनुमान करण्याचा त्याला अधिकार आहे; परंतु सत्त्वरक्षणाच्या वेळीं मात्र आपल्याला संयम बचावतो आहे कीं आणखी कोणी तें त्याला समजत नसतें. ज्याला स्वतःच्या संयमाचा अभिमान वाटतो त्याचा संयम मातीमोल होऊन जातो, याचा अनुभव कोणाला नाहीं ? अशा वेळीं शास्त्रज्ञान तर चोथ्यासारखें निकामी ठरतें.

असलें बौद्धिक धर्मज्ञान फोल असल्याचा अनुभव मला विलायतेंत मिळाला. यापूर्वीं मी अशा संकटांतून बचावून गेलों, त्याचें पृथक्करण करतां येण्यासारखें नाहीं. माझें वय त्या वेळीं फारच लहान होतें असें म्हणतां येईल.

पण या वेळीं तर माझें वय वीस वर्षांचें होतें. गृहस्थाश्रमाचा अनुभव बराच मिळाला होता.

बहुधा माझ्या विलायतेंतील मुक्कामाच्या शेवटच्या वर्षीं म्हणजे सन १८९० सालीं पोर्टस्मथ्‌मध्यें अन्नाहारी मंडळींचें एक संमेलन झालें. त्याला येण्याबद्दल मला व एका हिंदी मित्राला निमंत्रण मिळालें होतें. आम्ही दोघेहि गेलों. आमची उतरण्याची सोय एका बाईकडे करण्यांत आली होती.

पोर्टस्मथ् हें खलाश्यांचें बंदर म्हणून प्रसिद्ध आहे. तेथें पुष्कळ घरें दुराचरणी स्त्रियांचीं असतात. त्या स्त्रिया केवळ वेश्याच नसल्या तरी निर्दोषहि नसतात. अशाच एका घरामध्यें आम्ही उतरलों होतों. स्वागतमंडळानें इरादापूर्वक असलीं घरें शोधून काढलीं असें म्हणण्याचा माझा इरादा नाहीं. परंतु पोर्टस्मथ्-सारख्या बंदरीं प्रवाश्यांना उतरण्यासाठीं बिऱ्हाडें शोधावयाला गेलें म्हणजे त्यांतलीं कोणतीं चांगलीं, कोणतीं खराब तें सांगणें कठिणच पडणार.

रात्र झाली. आम्ही सभेंतून घरीं आलों. जेवून पत्ते खेळण्यास बसलों. विलायतेंत कुलीन घरामध्येंहि अशा तऱ्हेनें गृहिणी पाहुण्यांबरोबर पत्ते खेळण्यास

बसते. खेळतांना निर्दोष विनोद कोणीहि करतो. येथें मात्र बीभत्स विनोद सुरू झाला. माझे जोडीदार त्या कामीं पटाईत होते, हें मला माहीत नव्हतें. मला त्या विनोदांत गोडी वाटूं लागली. मीहि त्यांत सामील झालों. शब्दावरून कृतीवर यायला वेळ नव्हता. पत्ते बाजूला राहून जाण्याच्या तयारींत होते; परंतु माझ्या भल्या जोडीदाराच्या हृदयांत रामानें प्रवेश केला. तो म्हणाला, "अरे तुझ्या अंगांत हा सैतान कसा काय संचारला ? तुझें हें काम नव्हे, येथून पळ काढ बरें !"

मी शरमिंदा झालों. भानावर आलों. मनांतून त्या मित्राचे उपकार मानले. आईपाशीं घेतलेली प्रतिज्ञा आठवली. मी पळ मारली. कांपत कांपत आपल्या खोलींत जाऊन पोंचलों. छाती धडधडत होती. खाटकाच्या हातून जनावर निसटून जावें आणि त्याची जशी स्थिति व्हावी तशी माझी झाली.

परस्त्रीला पाहून विकारवश झाल्याचा आणि तिच्याबरोबर खेळ खेळण्याची इच्छा झाल्याचा हा पहिलाच प्रसंग होता असें मला आठवतें. रात्रीं माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं. अनेक प्रकारच्या विचारांनीं डोक्यांत काहूर माजविलें. हें घर सोडूं ? पळूं ? मी आहें तरी कोठें ? मी सावध राहिलों नाहीं तर माझी काय दशा होणार ? मीं खूप सावधानपूर्वक वागण्याचा निश्चय केला. आतांच घर सोडण्याचें कारण नाहीं, पण कसेंहि करून पोर्टस्मथ् लवकर सोडून निघायचें ठरविलें. संमेलन दोन दिवसांपेक्षां अधिक वेळ लांबणार नव्हतें. त्यामुळें, मला असें स्मरतें, कीं मीं दुसऱ्याच दिवशीं पोर्टस्मथ्‌ला रामराम ठोकला. माझा जोडीदार पोर्टस्मथ्‌लाच कांहीं दिवस राहिला.

धर्म म्हणजे काय ? ईश्वर हा कोण ? तो आपल्या हृदयांत कसें काम करतो ? हें कांहीं मला त्या वेळीं समजत नव्हतें. सामान्य समजुतीनुरूप ईश्वरानें मला बचावलें, असें मी त्या वेळीं समजलों. परंतु मला निरनिराळ्या बाबतींत अशा तऱ्हेनें अनुभव आले आहेत. 'ईश्वरानें बचावलें' या वाक्याचा अर्थ आज मला पुष्कळ समजूं लागला आहे, असें मी मानतों; पण त्याबरोबरच याचीहि जाणीव आहे, कीं या वाक्याचें पुरें रहस्य अजूनहि मला समजलेलें नाहीं. अनुभवानेंच तें समजणार. परंतु अनेक आध्यात्मिक प्रसंगीं, वकिली करतांना, संस्था चालवितांना, राजकारणांत, 'ईश्वरानें मला बचावलें आहे.' असें मी सांगूं शकतों. सर्व आशा सुटावी, हातपाय गाळून बसण्याचा प्रसंग यावा, अशा प्रसंगीं कोठून तरी मदत येऊन पोंचते असे मला अनुभव आले आहेत. स्तुति, उपासना, प्रार्थना वगैरे गोष्टी झूट नाहींत; तर आपण खातों, पितों, बसतों, उठतों हें जितकें खरें आहे, त्याहूनहि या गोष्टी जास्त प्रमाणसिद्ध आहेत. नव्हे, याच गोष्टी खऱ्या आहेत, बाकी सर्व फोल आहेत, असें म्हणण्यांतहि अतिशयोक्ति नाहीं.

असली उपासना, असली प्रार्थना हा कांहीं वाणीचा विलास नव्हे, त्यांचें उगमस्थान कंठ नव्हे, तर हृदय होय. म्हणून जर आपण आपलें हृदय शुद्ध राखलें, तेथें असलेल्या तारा व्यवस्थित ठेविल्या, तर त्यांतून जो सूर निघेल तो गगनाला भेदून जाईल. त्यासाठीं जिभेची आवश्यकता नाहीं. ती स्वभावतःच अद्‌भुत वस्तु आहे. विकाररूपी मळाच्या क्षालनासाठीं अंतःकरणापासून केलेली उपासना ही एक महौषधि आहे, याबद्दल मला शंकाच वाटत नाहीं. परंतु तो प्रसाद मिळवायचा तर आपल्यामध्यें संपूर्ण नम्रता पाहिजे.

● ● ●

२२

# नारायण हेमचंद्र

याच सुमाराला स्व. नारायण हेमचंद्र विलायतेला आले होते. लेखक म्हणून त्यांचें नांव मीं ऐकलें होतें. मी त्यांना नॅशनल इंडियन असोसिएशनच्या मिस् मॅनिंग यांच्या घरीं भेटलों. मिस् मॅनिंगना माहीत होतें, कीं मला सर्वांबरोबर मिसळतां येत नाहीं. मी त्यांचेकडे जाई, तेव्हां गुपचूप बसून राहात असें; माझ्याशीं कोणी बोलला तरच मी तोंड उघडीं.

त्यांनीं नारायण हेमचंद्रांची ओळख करून दिली.

नारायण हेमचंद्रांना इंग्रजी समजत नव्हतें त्यांचा पोषाक विचित्र होता. घांकडीतिकडी पाटलोण घातली होती. वर चुरडलेला कडा मळलेला, बदामी रंगाचा कोट होता. नेकटाय किंवा कॉलर कांहीं नाहीं. कोट पारशी फॅशनचा, पण तोहि बेडौल. डोक्याला गोंड्याची लोंकरीची विणलेली टोपी होती. लांब दाढी राखलेली होती.

शरीर सडपातळ; ठेंगणें म्हटलें तरी चालेल. तोंडावर देवीचे वण होते. चेहरा वाटोळा. नाक अणीदारहि नाहीं किंवा बसकेंहि नाहीं. हात मधून मधून दाढीवरून फिरे.

साऱ्या नखरेबाज लोकांमध्यें नारायण हेमचंद्र विचित्र दिसत, आणि सर्वांहून निराळे पडत. "आपलें नांव तर मीं पुष्कळदां ऐकलें आहे. आपलीं कांहीं लिखाणेंहि वाचलीं आहेत. आपण माझ्या बिऱ्हाडीं याल का?"

नारायण हेमचंद्रांचा आवाज घोगरा होता. त्यांनीं हंसतमुख चेहऱ्यानिशीं जबाब दिला,

"तुम्हीं कोठें राहातां?"

" स्टोर स्ट्रीटमध्यें ! ".

" तर मग आपण शेजारींच आहों. मला इंग्रजी शिकायचें आहे. तुम्ही मला शिकवाल का ? "

मीं उत्तर दिलें, " मी आपल्याला कसलीहि मदत करूं शकलों, तर त्या बद्दल मला आनंद वाटेल. माझ्याकडून होणारी मेहनत अवश्य करीन. आपण म्हणाल तर मी आपल्याकडे येत जाईन. "

" नाहीं, नाहीं, मीच तुमच्याकडे येईन. माझ्याजवळ भाषान्तरपाठमाला आहे ती घेऊन येईन. "

आम्हीं वेळ नक्की केली. आमच्यामध्यें खूप स्नेह जमला.

नारायण हेमचंद्रांना व्याकरण मुळींच समजत नसे. ' घोडा ' क्रियापद होई, आणि ' धांवणें ' नाम बने. अशा तऱ्हेचे विनोदी दृष्टान्त मला किती तरी स्मरतात. नारायण हेमचंद्र मला पुरून उरणारे होते. माझ्या तुटपुंज्या व्याकरणानें ते भुलून जाण्यासारखे नव्हते. स्वतःला व्याकरण समजत नाहीं याबद्दल त्यांना मुळींच लाज वाटत नसे.

" मी कांहीं तुमच्याप्रमाणें शाळेंत शिकलों नाहीं, मला माझे विचार व्यक्त करण्याच्या कामीं व्याकरणाची जरूर भासलेली नाहीं. पहा ना, तुम्हांला बंगाली येतें ? मला येतें. मी बंगाल्यांत हिंडलों आहें. महर्षि देवेंद्रनाथ टागोरच्या पुस्तकाचें भाषान्तर गुजराथी लोकांना मींच करून दिलें आहे ना ? मला तर अनेक भाषांतून गुजराथी समाजाला भाषान्तरें द्यायचीं आहेत. तीं करतांनाहि मी शब्दार्थाला चिकटून बसत नाहीं; भावार्थ दिला कीं माझें समाधान झालें. माझ्या मागून इतरांनीं अधिक खुशाल द्यावें. मला तर व्याकरणांशिवाय मराठी समजलें, हिंदी समजतें आणि आतां तर इंग्रजीहि येऊं लागलें. मला फक्त शब्द-भांडार पाहिजे. एकट्या इंग्रजीनें माझें समाधान होणार आहे, असें तुम्ही समजूं नका. मला तर फ्रान्समध्यें जायचें आहे, आणि फ्रेंचहि शिकून घ्यायचें आहे. मला माहीत आहे, कीं फ्रेंच साहित्य अफाट आहे. जुळल्यास जर्मनीला जाईन आणि जर्मनहि शिकून घेईन.

अशा तऱ्हेनें नारायण हेमचंद्रांची वाग्धारा चालूच राही. भाषा शिकण्याचा व प्रवास करण्याचा त्यांचा हव्यास अपार होता.

" तर मग तुम्ही अमेरिकेला जाणारच असाल ? "

" अवश्य. ती नवी दुनिया पाहिल्याशिवाय मी परत वळेन का ? "

" पण तुमच्याजवळ एवढे पैसे कोठें आहेत ? "

" मला पैसे काय करायचे आहेत ? मला कुठें तुमच्यासारखी टापटीप ठेवायची आहे ? मला खायला प्यायला कितीसें लागणार ? माझ्या पुस्तकांपासून

मला कांहीं मिळतें तें आणि थोडें मित्रमंडळी देते तेवढें बस्स होतें. मी सगळीकडे तिसऱ्या वर्गांतूनच जाणारा मनुष्य. अमेरिकेला डेकवरून जाईन."

नारायण हेमचंद्रांचा साधेपणा कांहीं और होता. त्यांचा मनमोकळेपणाहि तितकाच होता. अभिमानाचें नांव नव्हतें. लेखक या नात्यानें स्वतःच्या शक्तीबद्दल असावा त्याहूनहि अधिक विश्वास होता.

आमची रोज भेट होई. आमच्यामध्यें विचाराचें व आचाराचें साम्य भरपूर होतें. आम्ही दोघेहि अन्नाहार करणारे होतों. दुपारचे पुष्कळदां एकत्र जेवीत असूं. हा माझा आठवड्याला सतरा शिलिंगांवर राहण्याचा आणि स्वयंपाक करण्याचा काळ होता. कधीं मी त्यांच्या खोलीवर जाई, तर कधीं ते माझ्या खोलीवर येत. मी इंग्रजी पद्धतीचा स्वयंपाक करीत असें. त्यांना देशी पद्धतीखेरीज समाधान वाटेना. डाळ पाहिजेच. मी गाजराचें वगैरे सूप बनवीत असें, त्याबद्दल ते माझी कींव करीत. त्यांनीं कोठूनसे मूग शोधून काढले होते. एके दिवशीं त्यांनीं माझ्यासाठीं मूग शिजवून आणले. ते मीं मोठ्या आवडीनें खाल्ले. पुढें तर आमचा हा देव-घेवीचा व्यवहार विशेषच वाढला. मी माझे पदार्थ त्यांना खाऊं घालीं, आणि ते स्वतः बनवलेले मला देत.

या वेळीं कार्डिनल मॅनिंगचें नांव सर्वांच्या तोंडीं होतें. गोदींतील मजुरांनीं संप केला होता. जॉन बर्न्स आणि कार्डिनल मॅनिंगच्या प्रयत्नानें संप लवकर बंद झाला. कार्डिनल मॅनिंगच्या साधेपणाविषयीं डिझरायलीनें लिहिलें होतें तें मीं नारायण हेमचंद्रांना वाचून दाखविलें.

"तर मग मला त्या साधुपुरुषाला भेटलें पाहिजे."

"ते तर फार मोठे माणूस पडले. तुम्हांला कसें भेटणार?"

"मी सांगतों कसें तें. तुम्ही माझ्या नांवाचें पत्र लिहा, मी लेखक आहें अशी ओळख द्या. त्यांच्या परोपकारी कामगिरीबद्दल समक्ष धन्यवाद देण्यासाठीं मला भेटायचें आहे असें लिहा. आणखी असेंहि लिहा, कीं मला इंग्रजींत बोलतां येत नाहीं, त्यासाठीं मला तुम्हांला दुभाषे म्हणून बरोबर न्यावें लागेल."

मीं त्या तऱ्हेचें पत्र लिहिलें. कार्डिनल मॅनिंगचा जबाब दोन-तीन दिवसांत एका कार्डावर आला; त्यांनीं भेटीसाठीं वेळ कळविला.

आम्ही दोघे गेलों. मीं तर रिवाजाप्रमाणें मुलाखती कपडे चढविले होते. नारायण हेमचंद्र मात्र होते तसेच आले. तोच कोट आणि तीच पाटलोण. मीं विनोद केला. त्यांनीं माझें बोलणें हसण्यावारी नेलें आणि ते म्हणाले,

"तुम्ही सुधारलेले लोक सर्व भित्रे असतां. थोर लोक कोणाच्या कपड्यांकडे पहातच नसतात. ते त्यांचें हृदय कसें आहे तें पाहतात."

आम्हीं कार्डिनलच्या महालांत प्रवेश केला. घर महालाप्रमाणेंच होतें. आम्ही बसतों इतक्यांत एका कृश, वृद्ध, उंच पुरुषानें प्रवेश केला; आम्हां दोघां-बरोबर हस्तान्दोलन केलें. नारायण हेमचंद्रांचें स्वागत केलें.

" मला आपला वेळ घ्यायचा नाहीं. मीं आपल्याविषयीं ऐकलेलें होतें. आपण संपामध्यें जें काम केलें त्याबद्दल आपले आभार मानावयाचे होते. जगभरच्या साधुपुरुषांचें दर्शन घेण्याचा मीं परिपाठ ठेवला आहे. म्हणूनच मीं आपल्याला एवढी तसदी दिली. " या वाक्यांचें भाषान्तर करून सांगण्याची मला नारायण हेमचंद्रांनीं आज्ञा केली.

" आपण आलां त्याबद्दल मला आनंद वाटला. मला उमेद आहे, कीं तुम्हांला येथील वास्तव्य सुखाचें होईल, आणि इकडच्या लोकांची आपण ओळख करून घ्याल. ईश्वर आपलें कल्याण करो. " असें बोलून कार्डिनल उभे राहिले.

एकदां नारायण हेमचंद्र माझेकडे सद्रा घालून व धोतर नेसून आले. भल्या घरवालीनें दार उघडलें, पण ती भ्याली. माझ्याकडे येऊन सांगूं लागली; ( माझें बिऱ्हाड मी वरच्यावर बदलीत असें, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. ) " कोणी वेड्यासारखा मनुष्य तुम्हांला भेटूं इच्छितो. " मी दरवाजाकडे जाऊन पाहातों तों नारायण हेमचंद्र ! मी आश्चर्यानें थक्क झालों. त्यांच्या तोंडावर मात्र नेहमींच्या हास्याखेरीज दुसरें कांहींच दिसत नव्हतें.

" पण पोरांनीं तुमची टवाळी नाहीं केली ? "

" माझ्यामागून धांवत होतीं. मीं लक्षच दिलें नाहीं, तेव्हां तीं शान्त होऊन गेलीं. " मला उत्तर मिळालें.

नारायण हेमचंद्र कांहीं महिने विलायतेंत राहून पॅरिसला गेले. तेथें त्यांनीं फ्रेंचचें अध्ययन सुरू केलें, आणि फ्रेंच पुस्तकांचें भाषान्तर आरंभिलें. त्यांचें भाषान्तर तपासण्यापुरतें फ्रेंच मला येत होतें; म्हणून मला तें पहायला सांगितलें. मला दिसून आलें, कीं तें भाषान्तर नव्हतें, भावार्थ होता.

शेवटीं त्यांनीं अमेरिकेला जाण्याचा आपला निश्चय पार पाडला. मोठ्या कष्टानें डेकचें, कीं तिसऱ्या वर्गाचें तिकिट मिळवूं शकले. अमेरिकेंत त्यांना सद्रा, धोतर वापरून बाहेर पडल्याबद्दल ' असभ्य पोषाक वापरण्याच्या ' आरोपावरून पकडण्यांत आलें होतें. मागाहून त्यांना मोकळे करण्यांत आलें, असें मला आठवतें.

● ● ●

# २३

# महाप्रदर्शन

१८९० सालीं पॅरिसमध्यें महाप्रदर्शन भरलें होतें. त्याच्या तयारीसंबंधाची हकीकत मी वाचीत असें. पॅरिस पाहाण्याची तर तीव्र इच्छा होतीच. हें प्रदर्शन पाहायला जाण्यानें दुहेरी फायदा होईल असा विचार केला. प्रदर्शनांत एफिल टॉवर पाहण्याचें आकर्षण विशेष होतें. हा टॉवर निव्वळ लोखंडाचा आहे. एक हजार फूट उंच आहे. एक हजार फूट उंचीचें घर उभेंच राहूं शकणार नाहीं अशी तोंपर्यंत समजूत होती. प्रदर्शनांत इतरहि पुष्कळ पाहण्यासारखें होतें.

पॅरिसमध्यें एक अन्नाहारी घर असल्याचें मीं वाचलें होतें. तेथें एक खोली घेतली. गरिबी पद्धतीनें प्रवास करून पॅरिसला गेलों. सात दिवस राहिलों. पाहण्यासारखें तेवढें बहुतेक पायीं हिंडूनच पाहिलें. बरोबर पॅरिसचा व त्या प्रदर्शनाचा 'मार्गदर्शक' व नकाशा ठेविला होता. त्यांच्या आधारानें रस्ते शोधून काढून मुख्य गोष्टी पाहून घेतल्या.

प्रदर्शनाची विशालता आणि विविधता यांखेरीज मला कांहींहि स्मरत नाहीं. एफिल टॉवर दोन-तीन वेळां चढलों होतों, त्यामुळें त्याचें स्मरण पूर्ण आहे. पहिल्या मजल्यावर फराळाची व्यवस्थाहि होती. म्हणून उंचावर भोजन केल्याचें लोकांना सांगतां यावें, एवढ्यासाठीं तेथें फराळ केला आणि साडेसात शिलिंग पाण्यांत टाकले.

पॅरिसचीं जुनीं देवळें लक्षांत राहिलीं आहेत. त्यांची भव्यता, त्यांचे आंत मिळणारी शान्ति हीं विसरणें अशक्य आहे. नोत्रदामची कारागिरी व आंतील चित्रकाम यांचें स्मरण आहे. अशा स्वर्गीय देवळांप्रीत्यर्थ ज्यांनीं लाखों रुपये खर्च केले, त्यांच्या हृदयांत खोलवर ईश्वरप्रेम असणारच असें वाटलें.

पॅरिसच्या फॅशनविषयीं, पॅरिसच्या स्वेच्छाचाराविषयीं, भोगविलासाविषयीं पुष्कळ वाचलें होतें, तें तर गल्लोगल्लीं दृष्टोत्पत्तीस येतच होतें. परंतु हीं देवळें मात्र त्या भोगविलासाहून अगदीं निराळीं दिसलीं. देवळांत पाऊल टाकतांच बाहेरच्या अशान्तीचा विसर पडे; लोकांच्या वर्तणुकींत फरक पडे. लोक अदबीनें वागूं लागत. गोंगाट वगैरे यत्किंचित् नाहीं. कुमारी मरीयमूच्या मूर्तीपुढें कोणी ना कोणी तरी प्रार्थना करीत असायचेच. हें सर्व खूळ नव्हे, परंतु हृदयाची भावना आहे, अशी छाप त्या वेळीं पडली व ती दृढ होत गेली आहे. कुमारिकेच्या मूर्तीसमोर गुडघे टेंकून प्रार्थना करणारे उपासक संगमरवरी दगडाची पूजा करीत नव्हते, तर त्यांत वास्तव्य करणाऱ्या कल्पनागम्य शक्तीची पूजा करीत होते. त्यामुळें ते

ईश्वराचा महिमा कमी करीत नव्हते, पण वाढवीतच होते, अशा तऱ्हेचा परिणाम माझे मनावर झाल्याचें मला आजहि स्मरण आहे.

एफिल टॉवरविषयीं दोन शब्द लिहिणें जरूर आहे. एफिल टॉवरचा हल्लीं काय उपयोग होतो, तें मला माहीत नाहीं. प्रदर्शन पाहून आल्यानंतर प्रदर्शनाचीं वर्णनें कोणीहि वाचतोच. त्यांत त्याची स्तुतीहि ऐकली आणि निंदाहि ऐकली. निंदा करणारांमध्यें अग्रेसर टॉलस्टॉय होते, असेंहि स्मरण आहे. त्यांनीं लिहिलें, कीं एफिल टॉवर हें माणसाच्या मूर्खपणाचें चिह्न आहे, त्याच्या ज्ञानाचा परिणाम नव्हे. आपल्या लेखांत त्यांनीं दाखविलें होतें, कीं दुनियेंत चालणाऱ्या अनेक कैफांमध्यें तंबाखूचें व्यसन एक तऱ्हेनें सर्वांत खराब आहे. जें कुकर्म करायचीं हिंमत दारू पिऊन येत नाहीं तें विडी पिऊन येतें. दारू पिणारा मूर्ख बनतो, तर विडी पिणाऱ्याची अक्कल धुंद होते, आणि त्यामुळें तो हवेंत किल्ले बांधूं लागतो. एफिल टॉवर असल्या व्यसनांचा परिणाम आहे, असें आपलें मत टॉलस्टॉयनीं जाहीर केलें होतें.

एफिल टॉवरमध्यें सौंदर्याचें नांवहि नाहीं. प्रदर्शनाला त्यामुळें यत्किंचित्‌हि शोभा आली, असें म्हणतां येणार नाहीं. एक नवी चीज आहे, मोठी वस्तु आहे, एवढ्यासाठीं तो पहायला हजारों माणसें चढलीं. हा टॉवर म्हणजे प्रदर्शनांतील एक खेळणें होतें; आणि जोंपर्यंत आपण मोहाला वश होतों, तोंपर्यंत आपणहि बालकच आहों, ही गोष्ट हा टॉवर चांगल्या तऱ्हेनें सिद्ध करतो, एवढाच त्याचा उपयोग आहे असें वाटल्यास म्हणावें.

●●●

## २४

# बॅरिस्टर तर झालों— पण पुढें!

ज्या कामासाठीं— बॅरिस्टर होण्यासाठीं— मीं विलायतेला गेलों त्याचें मीं काय केलें याचें वर्णन मीं आतांपर्यंत तहकूब ठेविलें आहे. आतां त्यासंबंधीं थोडें-बहुत लिहिण्याची वेळ आली.

बॅरिस्टर व्हावयाला दोन गोष्टींची जरूर होती. एक 'टर्म' भरणें म्हणजे सत्रें संभाळणें. वर्षाचीं चार सत्रें. अशा तऱ्हेनें बारा भरायचीं. दुसरी गोष्ट कायद्याची परीक्षा देणें. सत्रें भरणें याचा अर्थ 'जेवण जेवणें', म्हणजे दरएक सत्रांत सुमारें चोवीस जेवणें असत, त्यांपैकीं सहा जेवणें. जेवण जेवायचें म्हणजे

खाल्लेंच पाहिजे असा कांहीं नियम नाहीं; पण नेमलेल्या वेळीं हजर राहाणें व जेवण पुरें होण्याचा वेळ होईपर्यंत बसून राहाणें. साधारणपणें सर्वजण खातपीतच. जेवणांत चांगलीं चांगलीं पक्वान्नें असायचीं, आणि पिण्यासाठीं उत्तम गणली जाणारी दारू असायची. त्याचे पैसे तर दिलेच पाहिजेत. ते अडीच ते साडेतीन शिलिंग असत; म्हणजे दोनतीन रुपयांचा खर्च झाला. तिकडे ही किंमत बरीच अल्प म्हटली पाहिजे. कारण बाहेरच्या भोजनगृहांमध्यें अशा थाटाचें जेवण घेणाराला फक्त दारूचेच जवळजवळ तितके पैसे पडतील. जेवणाच्या खर्चापेक्षाहि दारू पिणाराला दारूचा खर्च अधिक येतो, ही गोष्ट आम्हां हिंदवासीयांना— आपण 'सुधारलेले' नसूं तर—आश्चर्यकारक वाटेल. मला तर विलायतेला गेल्यावर हें पाहून मोठा धक्का बसला. दारू पिण्यासाठीं इतक्या पैशाची खराबी करायला लोकांची हिंमत कशी चालते याचें मला गूढ पडलें. मागाहून समजूं लागलें ! प्रथम प्रथम मी कांहींच खात नसें. मला चालण्यासारखें तेथें रोटी, उकडलेले बटाटे आणि कोबी एवढेंच असे. सुरुवातीला त्या वस्तू आवडत नसत, म्हणून खात नसें. मागाहून केव्हां तरी त्यांतहि रुचि लागूं लागली, इतर पदार्थहि मिळविण्याची शक्ति माझ्यामध्यें आली होती.

विद्यार्थ्यांसाठीं एक तऱ्हेचें खाणें आणि बेंचरांसाठीं (विद्यामंदिरांतील मोठे लोक) निराळें श्रीमंती जेवण अशी व्यवस्था असे. माझ्याबरोबर एक पारशी विद्यार्थी होते. तेहि अन्नाहारी बनले होते. आम्ही उभयतांनीं अन्नाहाराच्या प्रचाराच्या दृष्टीनें बेंचराच्या खान्यामधून अन्नाहाऱ्यांना चालतील अशा पदार्थांची मागणी केली. ती मागणी मंजूर झाली. त्यामुळें आम्हांला बेंचरांच्या टेबलावरून फळफळावळ व जादा भाज्या मिळूं लागल्या.

दारू तर मला चालत नसेच. चौघांना मिळून दारूच्या दोन बाटल्या मिळत, त्यामुळें माझी मागणी अनेक चौकड्यांकडून होत असे. मी दारू प्यालों नाहीं म्हणजे बाकीच्या तिघांनाच दोन बाटल्या 'उडवावयाला' मिळत ना ! शिवाय या सत्रांमध्यें एक महारात्र (ग्रँड नाइट) होत असे. त्या दिवशीं 'पोर्ट' व 'शेरी' खेरीज शँपेन दारूहि मिळत असे. शँपेनची लज्जत कांहीं औरच मानली जाते. त्यामुळें या रात्रीं माझी किंमत विशेषच वाढे. आणि त्या रात्रीं हजर राहाण्याबद्दल मला आग्रहहि होत असे.

या खाण्यापिण्यापासून बॅरिस्टरीला काय लाभ होतो, तें मला त्या वेळीं समजलें नाहीं, कीं त्यानंतरहि समजलेलें नाहीं. एक काळ असा होता खरा, कीं तेव्हां या जेवणांना थोडेच विद्यार्थी असत; आणि त्यांच्यामध्यें व बेंचरांमध्यें बोलणेंचालणें होई व भाषणेंहि होत. त्यांतून ते व्यवहारज्ञान मिळवूं शकत; बरावाईट पण

एक प्रकारचा शिष्टाचार शिकत; आणि भाषण करण्याची शक्ति वाढवीत. माझ्या वेळीं तर हें सर्व अशक्य होतें. बेंचर दूर अस्पृश्यांसारखे बसत असत. या जुन्या रिवाजामध्यें मागाहून कांहीं अर्थ राहिला नाहीं; तरीहि तो प्राचीनताप्रेमी–धिम्म्या इंग्लंडमध्यें राहून गेला.

कायद्याचा अभ्यास सोपा होता. बॅरिस्टरांना विनोदानें ' डिनर ( भोजन-भाऊ ) बॅरिस्टर 'च म्हणत. सर्वांना समजत होतें, कीं परीक्षेची किंमत तितकीच. माझ्या वेळीं दोन परीक्षा होत्या; रोमन लॉ व इंग्लंडचा कायदा. दोन हप्त्यांनीं द्यावयाच्या या परीक्षांचीं पुस्तकें नेमलेलीं होतीं. परंतु तीं क्वचित्‌च कोणी वाचीत. रोमन लॉसाठीं छोट्या टिपणी लिहिलेल्या असत, त्या पंधरा दिवसांत वाचून पास होणारे मीं पाहिले आहेत. इंग्लंडच्या कायद्यावेंहि तेंच. त्याच्या टिपणीचींहि पुस्तकें होतीं, तीं दोन-तीन महिन्यांत वाचून टाकणारे विद्यार्थीहि मीं पाहिले. प्रश्न सोपे, परीक्षक उदार. रोमन लॉच्या परीक्षेंत ९५ ते ९९ टक्के उमेदवार पास होत, आणि शेवटच्या परीक्षेंत ७५ टक्के किंवा त्याहून जास्त; म्हणजे नापास होण्याची भीति फारच थोडी. शिवाय परीक्षा वर्षांतून एकदांच नाहीं, तर चारदां व्हायची. इतक्या सोयीची परीक्षा कोणालाहि जड वाटणें शक्यच नाहीं.

पण मीं तिला कठीण करून घेतली. मला वाटलें, कीं मीं मूळ पुस्तकें वाचून काढलीं पाहिजेत. न वाचणें म्हणजे फसवणूक होय, असें मला वाटलें. त्यामुळें मी मूळ पुस्तकें खरेदी करून खूप खर्चांत आलों. रोमन लॉ लॅटिनमधून वाचून काढण्याचा निश्चय केला. विलायतेंतील मॅट्रिक्युलेशनसाठीं मी लॅटिन शिकलों होतों. त्याचा या कामीं उपयोग झाला. हें वाचन फुकट गेलें नाहीं. दक्षिण आफ्रिकेंत रोमन डच लॉ प्रमाणभूत मानला जातो. तो समजून घेण्याच्या कामीं जस्टिनियनचें वाचन मला फार उपयोगीं पडलें.

इंग्लंडच्या कायद्याचें वाचन चांगली मेहनत घेऊन मी नऊ महिन्यांत पुरें करूं शकलों. कारण कीं, ब्रूमचें ' कॉमन लॉ 'चें बडें पण सुरस पुस्तक वाचण्यांतच किती तरी वेळ गेला. स्नेलच्या ' इक्विटी 'मध्यें गोडी वाटली; पण समजतां समजतां नाकीं नऊ आले. व्हाइट व डयूटरच्या मुख्य मुकदम्यांपैकीं जे नेमलेलें होतें तें वाचण्याची मला मौज वाटली, व तें वाचण्यापासून ज्ञानहि मिळालें. विलियम्स् आणि एडवर्डसचें स्थावर मिळकतीवरील पुस्तक आणि गुडीपचें जंगम मिळकतीवरील पुस्तक मी रसपूर्वक वाचूं शकलों. विलियम्सचें पुस्तक, तर मला कादंबरीइतकें मनोरंजक वाटलें. तें वाचतांना कंटाळा वाटलाच नाहीं. कायद्याच्या पुस्तकांपैकीं तितक्याच आवडीनें असें हिंदुस्थानांत आल्यानंतर मी मेनचा ' हिंदु लॉ ' हें पुस्तक वाचूं शकलों, पण हिंदुस्थानच्या कायद्याचा उल्लेख येथें करीत नाहीं.

परीक्षा पास केली. १८९१ सालीं जूनच्या १० तारखेला मला बॅरिस्टरचा किताब मिळाला. ११ तारखेला इंग्लंडच्या हायकोर्टांत अडीच शिलिंग भरून माझें नांव नोंदविलें. १२ जूनला हिंदुस्थानला परत येण्यासाठीं निघालों.

पण माझ्या निराशेला व भीतीला सीमा नव्हती. कायदे वाचले खरे; पण वकिली करतां येईल असें मला कांहीं एक येऊं लागलेलें नाहीं असें वाटे.

या माझ्या मनोव्यथेच्या वर्णनासाठीं स्वतंत्र प्रकरण पाहिजे.

•••

## २५

# माझी फिकीर

बॅरिस्टर म्हणवून घेणें सोपें होतें; पण बॅरिस्टरी करणें कठीण वाटलें. कायदे वाचले खरे, पण वकिली कशी चालवायची तें समजून घेतलें नाहीं. कायद्यामध्यें मीं कित्येक धर्मसिद्धान्त वाचले, ते आवडले. पण त्यांचा धंद्यांत कसा उपयोग करावयाचा याची समजूत पडली नाहीं. “ तुमची मत्ता अशा तऱ्हेनें वापरा, कीं जेगे-करून इतरांच्या मत्तेला हानि पोंचणार नाहीं.” हें धर्मवचन झालें. परंतु वकिलाचा धंदा करतांना अशिलाच्या दाव्याच्या कामीं त्याचा उपयोग कसा करायचा त्याची कल्पना होईना. ज्यामध्यें या सिद्धान्ताचा उपयोग केला होता असे दावे वाचले होते; पण त्यावरूनहि हा सिद्धान्त लागू करण्याची युक्ति सांपडली नाहीं.

शिवाय कायदे वाचले, त्यांत हिंदुस्थानच्या कायद्याचें नांवहि नाहीं. हिंदुशास्त्र, मुसलमानी कानून कोणत्या स्वरूपाचीं आहेत तें कळत नव्हतें. दावा कसा मांडावा, अर्ज कसा तयार करावा, वगैरे माहिती नव्हती. मी खूप फिकीरींत पडलों. फिरोजशा मेहतांचें नांव ऐकलें होतें. ते कोर्टांत सिंहाप्रमाणें गर्जना करतात, ते विलायतेंत कशा प्रकारें शिकले असतील ? त्यांच्याइतकी हुशारी या जन्मीं यायची नाहींच, पण वकिली करून पोट भरण्याची शक्ति तरी येईल कीं नाहीं याबद्दल मला मोठी शंका वाटूं लागली.

माझा कायद्याचा अभ्यास चालू असतांनाच माझ्या मनाचा असा गोंधळ चालू होता. माझी अडचण एक-दोन मित्रांपाशीं बोलून दाखविली. त्यांनीं दादा-भाईंचा सल्ला घ्यावा अशी सूचना केली. मी दादाभाईंना पत्र घेऊन गेलों होतों हें मागें सांगितलेंच आहे. या पत्राचा उपयोग मीं पुष्कळ वेळानंतर केला. अशा मोठ्या पुरुषाला भेटायला जाण्याचा मला काय अधिकार ? त्यांचें कोठें भाषण

असलें, तर मी ऐकायला जात असें आणि एका कोंपऱ्यांत बसून राहून कानां-डोळ्यांची तृप्ति करून निघून येत असें. त्यांनीं विद्यार्थ्यांशीं संबंध यावा अशासाठीं एक मंडळहि स्थापिलें होतें. त्याला मी हजर राहात असें. दादाभाईंची विद्यार्थ्यां-बद्दलची आस्था व विद्यार्थ्यांना त्यांचेबद्दल वाटणारा आदर पाहून मला आनंद होत असे. अखेरीला त्यांना तें परिचयपत्र देण्याची हिंमत मीं केली. त्यांना जाऊन भेटलों. त्यांनीं मला सांगितलें, "तुला मला भेटायचें असेल आणि कांहीं सल्ला वगैरे पाहिजे असेल, तर जरूर येऊन भेटत जा." परंतु मीं त्यांना कधीं तसदी दिली नव्हती. विशेष अडचणीखेरीज त्यांचा वेळ घेणें मला पाप वाटलें. त्यामुळें त्या मित्राचा सल्ला मान्य करून दादाभाईपुढें माझी अडचण मांडण्याचा मला धीर झाला नाहीं.

त्याच का दुसऱ्या कोणी मित्रानें मला मि. फ्रेडरिक पिंकटना भेटण्याची सूचना केली. मि. पिंकट कॉन्झर्वेटिव्ह पक्षाचे होते. परंतु हिंदी लोकांबद्दलचें त्याचें प्रेम निर्मळ आणि निःस्वार्थी होतें. पुष्कळ विद्यार्थी त्यांचा सल्ला घेत. त्यावरून त्यांना पत्र लिहून मीं भेटण्यासाठीं वेळ मागितला. त्यांनीं वेळ दिला. भेटलों. ही भेट कधींहि माझ्या स्मरणांतून गेलेली नाहीं. मित्राप्रमाणें ते मला भेटले. माझी निराशा, तर त्यांनीं हंसण्यावारी नेली. "तुला असें का वाटतें, कीं प्रत्येकानें फिरोजशा झालें पाहिजे? फिरोजशा किंवा बद्रुद्दीन एक-दोघेच होणार. तूं खात्री बाळग, कीं सामान्य वकील व्हायला फिरोजशा किंवा बद्रुद्दीन होण्याची जरूर नाहीं. सामान्य प्रामाणिकपणा, आणि सामान्य दक्षता एवढ्यानें मनुष्य वकिलीचा धंदा खुशाल चालवूं शकेल. सर्वच दाव्यांमध्यें कांहीं घोटाळा असतो असें नाहीं. बरें, तुझें सामान्य वाचन कितीसें आहे?"

मीं जेव्हां माझ्या वाचनाविषयीं सांगितलें तेव्हां ते कांहींसे निराश झालेले दिसले. परंतु ती निराशा क्षणिक होती. लगेच पुन्हां त्यांच्या चेहऱ्यावर हास्यछटा आली व ते म्हणाले,

"तुझी अडचण आतां समजलों. तुझें सामान्य वाचन फार कमी आहे. तुला दुनियेचें ज्ञान नाहीं. वकिलाचें त्याखेरीज चालायचें नाहीं. तूं तर हिंदुस्थानचा इतिहासहि वाचलेला नाहींस. वकिलाला मनुष्यस्वभावाची पारख असली पाहिजे. त्याला चेहऱ्यावरून माणसाचें अंतःकरण ओळखतां आलें पाहिजे. शिवाय प्रत्येक हिंदुस्थानी इसमाला हिंदुस्थानच्या इतिहासाचें ज्ञान, तर जरूर पाहिजे. याचा वकिलीशीं संबंध नाहीं, पण हें ज्ञान तुला असलें पाहिजे. तूं के आणि मॅलेसनचें १८५७ च्या बंडाचें पुस्तकहि वाचलेलें दिसत नाहीं. तेवढें तर लगेच वाचून टाक; आणि या दोन पुस्तकांचीं नांवें देतों तीं माणसाच्या पारखीसाठीं वाचून काढ."

असें म्हणून लॅवेटर आणि शेमलपेनिकच्या मुखसामुद्रिक-विद्ये (फिजियॉग्नॉमी)-वरील पुस्तकांचीं नांवें लिहून दिलीं.

मीं या थोर मित्राचे फार आभार मानले. त्यांच्या समागमांत असतांना तरी माझी भीति क्षणमात्र पळाली; पण बाहेर पडतांच माझी घाबरगुंडी पुन्हां सुरू झाली. 'चेहऱ्यावरून माणसाला ओळखायचा' हें वाक्य घोकीत आणि त्या दोन पुस्तकांचा विचार करीत करीत मी घरीं पोंचलों. दुसऱ्याच दिवशीं लॅवेटरचें पुस्तक विकत घेतलें. शेमलपेनिकचें त्या दुकानांत नव्हतें. लॅवेटरचें पुस्तक वाचलें; परंतु तें स्नेलच्या पुस्तकाहूनहि कठीण वाटलें. वाचतांना गोडीहि म्हणण्यासारखी वाटली नाहीं. शेक्स्पियरच्या चेहऱ्याचा अभ्यास केला, पण लंडनच्या रस्त्यावरून फिरणाऱ्या शेक्स्पियरांना ओळखण्याची शक्ति आली नाहीं.

लॅवेरटमधून मला ज्ञान असें मिळालें नाहीं. मि. पिंकटच्या सल्ल्याचा प्रत्यक्ष उपयोग मला थोडाच झाला, परंतु त्यांच्या स्नेहाचा उपयोग फार झाला. त्यांचा हास्यमुख, उदार चेहरा स्मरणांत खिळून राहिला. त्यांच्या सांगण्यावर श्रद्धा ठेविली, कीं वकिली करण्यासाठीं फिरोजशा मेहतांची बुद्धिमत्ता, स्मरणशक्ति वगैरेंची आवश्यकता नाहीं. प्रामाणिकपणा आणि कळकळ एवढयानें काम भागेल. या दोहोंचें भांडवल माझ्यापाशीं भरपूर प्रमाणांत होतें, त्यामुळें आंतल्या आंत थोडी आशा वाटूं लागली.

के. आणि मॅलेसनचें पुस्तक मला विलायतेंत वाचायला मिळालेंच नाहीं. पण तें वाचण्याची पहिली संधि घेण्याचा विचार होता. ती इच्छा दक्षिण आफ्रिकेंत पुरी झाली. अशा तऱ्हेनें निराशेमध्यें किंचित्सें आशेचें मिश्रण झालेलें आहे. पाय कांपतातच आहेत, अशा स्थितींत मी 'आसाम' बोटींतून मुंबई बंदरीं उतरलों. बंदरामध्यें समुद्र खवळलेला होता. लॉंचमधून उतरावें लागलें.

•••

# महात्माजींचे सत्याचे प्रयोग

अथवा

# आत्मकथा

## खंड २ रा

## १

# रायचंदभाई

शेवटल्या प्रकरणांत मीं लिहिलें, कीं मुंबई बंदरीं समुद्र खवळलेला होता. जून-जुलै महिन्यांत हिंदीमहासागराच्या बाबतींत ही गोष्ट नेहमींचीच आहे. एडन-पासूनच समुद्राला तुफान होतें. सर्वांना बोट लागली. मीच एकटा मजा करीत होतों. तुफान पाहाण्यासाठीं डेकवर जाऊन उभा राहात असें. भिजूनहि जात असें. सकाळच्या खाण्याच्या वेळीं उतारूंपैकीं आम्ही एक दोघेच असूं. आम्हांला ओटची लापशी पितांना बशी मांडींत घट्ट धरून ठेवावी लागे, नाहीं तर लापशीच मांडीवर सांडेल अशी स्थिति होती.

हें बाहेरचें वादळ माझ्या दृष्टीनें आंतील वादळाचेंच बाह्य चिन्हसें होतें. पण बाहेर वादळ असूनहि ज्याप्रमाणें मी शान्त राहूं शकलों त्याचप्रमाणें आंतरिक वादळाविषयींहि म्हणतां येईल असें वाटतें. ज्ञातीचा प्रश्न तर होताच. धंद्याच्या फिकीरीबद्दल पूर्वीं लिहिलेंच आहे. शिवाय मी पडलों सुधारक, तेव्हां कित्येक सुधारणा मनांत योजून ठेविल्या होत्या, त्यांचीहि काळजी होती. काळजीचीं आणखी कारणें कल्पना नसतांच उत्पन्न झालीं.

आईला भेटण्याची मला उत्कंठा लागली होती. आम्ही गोदींत पोंचलों, तों तेथें माझे वडील बंधु हजरच होते. त्यांनीं डॉ. मेहता व त्यांचे वडील बंधु यांची ओळख करून घेतली होती. डॉ. मेहतांचा मला आपल्याकडेच उतरायला नेण्याचा आग्रह होता. त्याप्रमाणें मला तिकडेच घेऊन गेले. अशा तऱ्हेनें विलायतेंत जडलेला संबंध हिंदुस्थानांतहि कायम राहिला, अधिक दृढ झाला, आणि उभयतांच्या कुटुंबांमध्येंहि पसरला.

मातुःश्रींच्या निधनाची मला वार्ताहि नव्हती. घरीं पोंचल्यानंतर मला ती माहिती देण्यांत आली, आणि स्नान घालण्यांत आलें. मला ही बातमी विलायतें-

तहि पोंचूं शकली असती; परंतु तिच्यापासून मला लागणारा धक्का कमी करण्याच्या इरायानें मी मुंबईस पोंचेपर्यंत मला बातमी लागूं न देण्याचा वडील बंधूंनीं निश्चय केला होता.

माझ्या दुःखावर मीं पडदाच घालूं इच्छितों. वडिलांच्या मृत्यूनें पोंचला त्याहूनहि मला ही बातमी ऐकून फारच मोठा अघात पोंचला. माझ्या मनांतील पुष्कळ आकांक्षा खुंटल्या. तरीहि मला आठवतें, कीं मी ही मृत्यूची बातमी ऐकून मी ओक्साबोक्शीं रडलों नाहीं. मी माझे अश्रूहि बहुतांशीं आवरूं शकलों, आणि जणुं काय मातेचा मृत्यु घडलेलाच नाहीं अशा तऱ्हेनें रोजचे व्यवहार सुरू केले.

डॉक्टर मेहतांनीं आपल्या घरीं कित्येक ओळखी करून दिल्या; त्यांपैकीं एकीसंबंधीं उल्लेख केल्याखेरीज चालणार नाहीं. त्यांचे बंधु रेवाशंकर जगजीवन यांच्याबरोबर जन्माचा ऋणानुबंध जमला; पण मला सांगायचें आहे तें कवि रायचंद अथवा राजचंद्र यांचेसंबंधीं. डॉक्टरांच्या वडील बंधूंचे ते जांवई होते, आणि रेवाशंकर जगजीवनच्या पेढीचे भागीदार व सर्वाधार होते. त्या वेळीं त्यांचें वय पंचवीस वर्षांवर नव्हतें, तरीहि ते चारित्र्यवान् आणि ज्ञानी आहेत हें पहिल्याच भेटीमध्यें माझ्या लक्षांत आलें. त्यांना लोक शतावधानी समजत. शतावधानाचे मासले पाहण्यास डॉ. मेहतांनीं मला सुचविलें. मीं माझ्या भाषाज्ञानाचा सांठा रिकामा केला आणि कवींनीं मीं सांगितलेले शब्द ज्या क्रमानें सांगितले होते त्या क्रमानेंच बोलून दाखविले ! या शक्तीबद्दल मला हेवा वाटला; परंतु तेवढ्यावरून मी त्यांच्या भजनीं लागलों नाहीं. माझें मन हरण करणाऱ्या गोष्टीची माहिती मला मागाहून झाली. ती गोष्ट म्हणजे त्यांचें विस्तृत शास्त्रज्ञान, शुद्ध चारित्र्य आणि आत्मदर्शन करण्याची त्यांची तीव्र उत्कंठा. आत्मदर्शनासाठीच ते आपलें जीवन व्यतीत करीत होते, असें पुढें मला दिसून आलें.

हसतां रमतां प्रगट हरि देखुं रे ।
मारुं[1] जीव्युं सफळ तैव[2] लेखुं रे; ।
मुक्तानंदनो नाथ विहारी[3] रे ।
ओधा जीवनदोरी अमारी[4] रे ।

हें मुक्तानंदाचें वचन त्यांच्या तोंडीं तर असेच, पण तें त्यांच्या हृदयावरहि कोरलेलें होतें.

स्वतः हजारों रुपयांच्या रकमेचा व्यापार करीत; हिऱ्यामोत्यांची पारख करीत; व्यापारांतलीं कोडीं सोडवीत, पण हा त्यांचा मुख्य विषय नव्हता. त्यांचा

---

१ माझें जीवन. २ तेव्हा. ३ ईश्वरवाचक नामें. ४ आमची.

विषय—त्यांचा पुरुषार्थ आत्मओळख—हरिदर्शन हाच होता. त्यांच्या पेढीवर इतर कोणत्या वस्तु असतील किंवा नसतीलहि; पण एकादें धार्मिक पुस्तक आणि रोजनिशी हीं असायचींच. व्यापाराची बोलणीं पुरीं झालीं, कीं धर्मग्रंथ उघडीत किंवा रोजनिशी अथवा टिपणवही उघडीत. त्यांच्या लेखांचा जो संग्रह प्रसिद्ध झाला आहे, त्यांतील बहुतेक भाग या टिपणवहीवरूनच घेतलेला आहे. जो मनुष्य लाखों रुपयांच्या सौद्यांच्या गोष्टी बोलून झाल्यावर लगेच आत्मज्ञानाच्या गूढ गोष्टी लिहायला बसतो, तो जातीचा व्यापारी नव्हे, तर शुद्ध ज्ञानी होय. त्यांच्या बाबतींत अशा तऱ्हेचा अनुभव मला एक वेळच नव्हे, पण अनेक वेळां आला. मला त्यांची वृत्ति विचलित झालेली कधींहि आढळली नाहीं. माझ्या-त्यांच्या संबंधांत त्यांच्या फायद्याची कांहीं बाब नव्हती. मी त्यांच्या अति निकट संबंधांत राहिलों आहें. त्या वेळीं मी भुकेकंगाल बॅरिस्टर होतों. मीं कधीं त्यांच्या दुकानावर गेलों, तर माझ्यापाशीं धार्मिक गोष्टीखेरीज ते इतर कोणतीच गोष्ट बोलत नसत. त्या वेळीं जरी माझें आयुष्यांतील ध्येय नक्की झालें नव्हतें, किंवा सामान्यपणें धार्मिक चर्चेबद्दल मला आवड वाटत होती असेंहि म्हणतां येणार नाहीं, तरी पण रायचंदभाईंच्या धार्मिक चर्चेबद्दल मला फार आवड वाटे. त्यानंतर अनेक धर्माचार्यांशीं माझी गांठ पडली आहे. प्रत्येक धर्माच्या आचार्यांना भेटण्याचा मीं प्रयत्न केलेला आहे; परंतु माझ्यावर रायचंदभाईंनीं जी छाप पाडलेली आहे, ती दुसऱ्या कोणींहि पाडलेली नाहीं. त्यांचीं कित्येक वचनें माझ्या हृदयाला जाऊन भिडत. त्यांच्या बुद्धीबद्दल मला आदर वाटे. त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दलहि तितकाच वाटे; आणि त्यावरून मला खात्री होती, कीं ते मला इरादापूर्वक आडवाटेनें नेणार नाहींत, व मनांत असेल तेंच बोलतील. त्यामुळें माझ्या आध्यात्मिक अडचणींच्या प्रसंगीं मी त्यांचा आश्रय घेत असें.

रायचंदभाईबद्दल मला इतका आदर वाटत असतांहि त्यांना माझे धर्मगुरु या नात्यानें आपल्या हृदयांत मी स्थान देऊं शकलों नाहीं. गुरूचा माझा शोध अजूनहि चालूच आहे.

हिंदु धर्मानें गुरुपदाला जें महत्त्व दिलें आहे, तें मला सर्वस्वीं मान्य आहे. गुरुशिवाय ज्ञान अशक्य आहे, हें वाक्य बहुतांशीं खरें आहे. अक्षरओळख करून देणारा शिक्षक अर्धकच्चा असला तरी काम चालूं शकेल; परंतु आत्मदर्शन करून देतों म्हणणारा अपूर्ण असून चालणार नाहीं. गुरूची पदवी संपूर्ण ज्ञान्यालाच देतां येईल. गुरूच्या शोधामध्येंच त्याचें फळहि राहिलेलें आहे, कारण कीं शिष्याला स्वतःच्या लायकीनुरूप गुरु भेटतो. तशी योग्यता प्राप्त करण्यासाठींच सर्व शक्तीनिशीं झटण्याचा प्रत्येक साधकाला अधिकार आहे; साधक याचा अर्थच तो. त्या प्रयत्नाचें फळ ईश्वराधीन आहे.

म्हणून जरी मी रायचंदभाईना आपल्या हृदयाचे स्वामी बनवूं शकलों नाहीं, तरीहि त्यांचा आश्रय मला वेळोवेळीं कसा मिळत गेला तें आपल्याला यापुढें दिसेलच. येथें एवढें सांगणें पुरे आहे, कीं माझ्या जीवनावर गाढ परिणाम करणारे आधुनिक पुरुष तीन आहेत. रायचंदभाईनीं आपल्या प्रत्यक्ष समागमानें, टॉल्स्टॉयनें 'वैकुंठ तुझ्या हृदयांत आहे.' ( The Kingdom of God is within you ) नांवाच्या पुस्तकानें आणि रस्किननें 'सर्वोदय' ( Unto this last ) नांवाच्या पुस्तकानें मला मुग्ध केलें आहे. परंतु ह्या प्रसंगाचें वर्णन त्या त्या स्थळीं येईल.

●●●

## २

# संसारप्रवेश

वडील बंधूंनीं तर माझ्या भरंवशावर किती तरी मनोराज्यें रचलीं होतीं. त्यांना पैशाचा, कीर्तीचा आणि हुद्द्याचा लोभ किती तरी होता. त्यांचें हृदय बादशाही होतें. त्यांच्या उदारपणाचें उधळपट्टीमध्यें पर्यवसान होत असे त्यामुळें तसेंच त्यांच्या भोळेपणामुळें त्यांना मैत्री जमविण्यास वेळ लागत नसे. या मित्र-वर्गामार्फत ते माझ्यासाठीं दावे मिळवून आणणार होते. मी खूप पैसे कमविणार असें त्यांनीं ठरवूनच टाकलें होतें आणि त्याच्या आधारावर घरच्या खर्चाचें प्रमाण वाढवून ठेवलें होतें. माझ्यासाठीं वकिलीचें क्षेत्र तयार करण्याच्या कामींहि त्यांनीं आपल्याकडून बाकी ठेविली नव्हती.

ज्ञातीचा झगडा तयारच होता. दोन पक्ष पडले होते. एका पक्षानें मला लगेच जातींत घेतला. दुसरा पक्ष न घेण्याबद्दल भक्कम राहिला. मला जातींत घेणाऱ्या पक्षाचें समाधान करण्यासाठीं वडील बंधु राजकोटला जाण्यापूर्वीं मला नाशिकला घेऊन गेले. तेथें गंगास्नान करविलें आणि राजकोटला पोंचतांच ज्ञाति-भोजन घातलें.

मला हें कांहींच आवडलें नाहीं. वडील बंधूंना माझ्याबद्दल खूप प्रेम वाटत असे. माझी त्यांच्याबद्दलची आदरबुद्धीहि तितकीच उत्कट होती अशी माझी खात्री आहे, म्हणून त्यांची इच्छा आज्ञारूप समजून मी यंत्राप्रमाणें डोळे मिटून त्यांच्या इच्छेप्रमाणें करीत गेलों. एवढ्यानें जातीचें समाधान झालें.

ज्या पक्षानें मला वाळीत टाकलें होतें, त्यांत प्रवेश मिळविण्याचा मी कधीं प्रयत्नहि केला नाहीं. त्याचप्रमाणें जातीच्या कोणाहि शेठजीविषयीं माझ्या मनांत

लवमात्र क्रोधहि आला नाहीं. माझ्याकडे तिरस्कारयुक्त दृष्टीनें पाहाणारे त्यामध्यें कांहींजण होते. त्यांच्याशींहि मी नम्रभावानें वागत असें. ज्ञातीच्या बहिष्काराच्या ठरावाला संपूर्णपणें मान देत असें. माझ्या सासू-सासऱ्यांकडे किंवा बहिणीकडे पाणीहि पीत नसें. तीं मला गुप्त रीतीनें खायला प्यायला द्यायला तयार असत; पण जी गोष्ट उघडपणें करतां येत नाहीं, ती लपून छपून करणें माझ्या मनालाच मान्य होईना.

माझ्या या वर्तनाचा परिणाम असा झाला, कीं ज्ञातीकडून मला कधीं कसलाहि उपसर्ग झाल्याचें मला स्मरत नाहीं एवढेंच नव्हे, पण ज्ञातीच्या एका भागाकडून अजूनहि मी कायदेशीर दृष्ट्या बहिष्कृतच आहें, तरी त्यांच्याकडूनहि मला आदर व उदारता अनुभवावयास मिळाली आहेत. त्यांनीं मला माझ्या कार्यामध्यें मदतहि केली आहे; आणि ज्ञातीच्या दृष्टीनें कांहीं करावें अशी माझ्यापासून त्यांनीं अपेक्षाहि ठेवलेली नाहीं. माझी समजूत आहे, कीं हा मधुर परिणाम अप्रतिकारामुळेंच घडून आला. ज्ञातींत सामील होण्याचा मीं प्रयत्न केला असता, आणखी आणखी तडा पाडण्याचा प्रयत्न केला असता, ज्ञातिबंधूंना त्रास दिला असता, तर ते खात्रीनें माझ्याविरुद्ध उठले असते, आणि मी विलायतेहून येतांच तटस्थ व अलिप्त राहाण्याऐवजीं लटपटी करण्यांत चूर होऊन असत्याचा पुरस्कर्ता बनलों असतों.

पत्नीबरोबरचा माझा संबंध अजूनहि माझी इच्छा होती तसा बनला नाहीं. माझा मत्सरी स्वभाव मी विलायतेंतहि ठेवून येऊं शकलों नाहीं. हरएक बाबतींत माझी धुसपूस आणि संशयी वृत्ति चालू असायची, त्यामुळें माझ्या मनाच्या इच्छा मला पार पाडतां आल्या नाहींत. पत्नीला अक्षरज्ञान असलेंच पाहिजे आणि मीच तें देईन असा विचार केला होता. परंतु माझ्या विषयासक्तीपुढें तें काम बाजूलाच पडलें, आणि माझ्या कमकुवतपणाचा राग मीं पत्नीवर काढला. एक प्रसंग तर असा आला, कीं मी तिला माहेरीं लावून दिली; आणि खूपशी पीडा दिल्यानंतर पुनः एकत्र राहूं देण्याचें कबूल केलें. यांत माझीच केवळ नादानगिरी होती हें मागून माझ्या लक्षांत आलें.

मुलांना लावायच्या वळणासंबंधींहि मला सुधारणा करावयाच्या होत्या. वडील बंधूंना मुलगे होते; आणि मीहि एक लहानगा मुलगा ठेवून गेलों, तो आतां चार वर्षांचा व्हायला आला होता. या मुलांकडून व्यायाम करवायचा, त्यांना मजबूत बनवावयाचीं आणि आपल्या सहवासांत ठेवायचीं असा विचार होता. बंधूंचीहि या कामीं सहानुभूति होती. कांहीं अंशीं मी या बाबतींत सफलता मिळवूं शकलों. मुलांचा सहवास मला फार आवडे, आणि त्यांच्याबरोबर विनोद करण्याची संवय अद्यापपर्यंत कायम आहे. तेव्हांपासूनच मला वाटत आलें आहे, कीं लहान मुलांचा योग्य शिक्षक होण्याजोगें मी काम करूं शकेन.

खाण्यापिण्याच्या बाबतींत सुधारणा करणें तर आवश्यकच होतें. घरांत चहा-कॉफीनें जागा पटाकावली होती. बंधूंना वाटलें, कीं भाऊ विलायतेहून येणार, त्यापूर्वी विलायतेचें थोडें तरी वातावरण घरीं तयार करून ठेवलें पाहिजे. त्यामुळें चिनी मातीचीं भांडीं, चहा वगैरे ज्या वस्तू आमच्या घरीं पूर्वी असल्याच तरी औषधासाठीं किंवा कोणी तसाच पाहुणा आला, तर त्यांच्यासाठीं वापरल्या जात असत, त्या आतां सर्रास सर्वांसाठीं प्रचारांत आल्या. या अगोदरच्याच वातावरणांत आणखी मी आपल्या 'सुधारणा' घेऊन आलों. ओटच्या कणकेची लापशी दाखल झाली; चहा-कॉफीच्याऐवजीं कोको. पण 'ऐवजीं' हें नांवापुरतेंच. चहा-कॉफीच्या जोडीला आणखी कोको आला. बूटपायमोजांनीं वसाहत केलीच होती. मीं कोटपाटलोणीनें घर पुनीत केलें !

अशा प्रकारें खर्च वाढत चालला. नवे नवे प्रकार सुरू झाले. घरीं पांढरा हत्ती बांधला; पण खर्च कोठून आणायचा ? राजकोटला लगेच धंदा सुरू केला तर हंसें मात्र व्हायचें. राजकोटांत पास झालेल्या वकिलाविरुद्ध उभें राहाण्यापुरतें माझ्याजवळ ज्ञान नाहीं आणि फी मात्र त्यांच्या दसपट पाहिजे ! मला वकील नेमायला असा कोणता वेडा अशील तयार होणार ? किंवा एखादा असा वेडपा निघाला म्हणून मीहि काय माझ्या अज्ञानांत आणखी प्रौढीची व फसवेगिरीची भर घालून माझ्या माथ्यावरील जगाच्या कर्जाचा बोजा वाढवावा ?

मित्रमंडळींचा असा सल्ला पडला, कीं मी थोडे दिवस मुंबईला जाऊन हायकोर्टाचा अनुभव घ्यावा, व हिंदुस्थानच्या कायद्याचा अभ्यास करावा. वकिलीचें काम काय मिळेल तें मिळविण्याच्या खटपटींत राहावेंच.

मी मुंबईला जायला निघालों. बिऱ्हाड थाटलें. आचारी ठेवला. माझी वकिलींत गति चालत होती, तितपतच त्या आचाऱ्याची स्वयंपाकांत चालत होती. ब्राह्मण होता. मी त्याला नोकराच्या नात्यानें ठेवलाच नव्हता. हा ब्राह्मण स्नान करायचा, पण पंचा धुवायचा नाहीं. पंचा मळकट, जानवें मळलेलें, शास्त्राभ्यासाचें नांवहि नाहीं. जास्त चांगला आचारी आणायचा कोठून ?

" कसें काय रविशंकर, ( त्यांचें नांव रविशंकर होतें. ) स्वयंपाक करतां येत नाहीं तर नाहीं, संध्या वगैरे तरी ? "

" काय भाईसाब, संध्या-तर्पण, खोरें, कुदळी, खटकरम् ( षट्कर्म ) आम्ही असलेंच भेंमण ( ब्राह्मण ). तुमच्यासारख्यांनीं आश्रय दिला, तर आमचें चालायचें. नाहीं तर अखेरीला शेती तर कुठें गेली नाहीं. "

मी समजलों. मलाच रविशंकराला शिकवून तयार केला पाहिजे. वेळ पुष्कळ असेच. अर्धा स्वयंपाक रविशंकर करी आणि अर्धा मी. विलायतेंतील अन्नाहाराचे प्रयोग इकडेहि चालविले. एक स्टोव्ह विकत आणला. मी स्वतः

पंक्तिभेद पाळीत नव्हतोंच. रविशंकरलाहि पंक्तीचा आग्रह नव्हता. त्यामुळें आमची जोडी ठीक जमली. मात्र एक अट होती ( अट म्हणण्यापेक्षां अडचणच म्हटली पाहिजे ! ) कीं मेहेरबानी का म्हणा ना— होती ती ही, कीं रविशंकरानें गलिच्छपणाची भाऊबंदकी तोडून टाकण्याची आणि स्वयंपाक स्वच्छ ठेवण्याची शपथ घेतली.

पण मला चार-पांच महिन्यांहून अधिक काळपर्यंत मुंबईत राहतां येण्यासारखें नव्हतेंच; कारण खर्च वाढतां आणि कमाई कांहींच नाहीं.

अशा तऱ्हेनें मीं संसारांत प्रवेश केला. बॅरिस्टरी मला नकोशी वाटूं लागली. अवडंबर मोठें, ज्ञान अल्प. जबाबदारीच्या जाणिवेनें माझी छाती दडपून गेली.

• • •

३

# पहिला मुकदमा

मुंबईत एका बाजूनें कायद्याचा अभ्यास सुरू केला. दुसरीकडून आहाराचे प्रयोग; आणि त्यात माझ्याबरोबर वीरचंद गांधी सामील झाले तिसरी गोष्ट म्हणजे बंधूंचे माझ्यासाठीं कामें मिळविण्याचे प्रयत्न सुरू झाले.

कायद्याचा अभ्यास मंद गतीनें चालला होता. सिव्हिल प्रोसीजर कोड कांहीं केल्या डोक्यांत उतरेना. पुराव्याचा कायदा बरा वाटला. वीरचंद गांधी सॉलिसिटर होण्याची तयारी करीत होते. साहजिकच ते वकिलांसंबंधीं पुष्कळ गोष्टी सांगत. फिरोजशाच्या हुशारीचें कारण कायद्याचें त्यांचें अगाध ज्ञान. 'एव्हिडन्स ॲक्ट' तर त्यांना तोंडपाठच आहे. बत्तिसाव्या कलमावरील एकन् एक मुकदमे त्यांना माहीत आहेत. बद्रुद्दिनची बुद्धिमत्ता तर एवढी आहे, कीं जज्जसुद्धां त्यांच्यापुढें दिपून जातात. आपली बाजू मांडण्याची त्यांची शक्ति अद्भुत आहे.

अशा तऱ्हेच्या महारथ्यांच्या गोष्टी ऐकें, तसतसें माझें अवसान अधिकच खचे.

" बॅरिस्टर कोर्टांत पांच-सात वर्षेंपर्यंत जांभयाच देत बसला, तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. म्हणून तर मीं सॉलिसिटर होण्याचें योजलें. तीन एक वर्षांअखेर तुम्हीं आपल्या खर्चापुरतें कमावूं लागलां तरी पुष्कळ म्हणतां येईल."

दर महिन्यागणिक खर्च वाढत जाई. बाहेर बॅरिस्टरची पाटी लावायची आणि आंत बॅरिस्टरी करण्यासाठीं तयारी करीत बसायचें ! माझें मन या दोन्ही गोष्टींचा मेळ कांहीं केल्या बसवूं शकेना. त्यामुळें माझें वाचनहि व्यग्र चित्तानें चाललें होतें. पुराव्याच्या कायद्यामध्यें मन कांहींसें रमल्याचें मीं पूर्वीं सांगितलेंच आहे. मेनचा ' हिंदु लॉ ' खूप आवडीनें वाचला. पण मुकदमा चालविण्याची हिंमत आली नाहीं. माझें दुःख कोणाला सांगावें ? सासरीं गेलेल्या नववधूप्रमाणें माझी स्थिति झाली !

इतक्यांत ममीबाईचा दावा माझ्या नशिबीं आला. स्मॉलकॉज कोर्टांत जायचें होतें.

" दलालाला कमिशन द्यावें लागेल. "

मीं साफ नाकारलें.

" पण फौजदारी कोर्टांत मुरलेले श्री......महिन्याला तीन-चार हजार पाडणारे, तेहि कमिशन देतात."

" पण मला कुठें त्यांच्या तोडीचा व्हायचें आहे ? मला दरमहा ३०० रुपये मिळाले तरी बस्स होतील. वडिलांना कुठें जास्त मिळत होते ? "

" पण ते दिवस गेले. मुंबईचे खर्च मोठे. व्यवहाराकडेहि पाहिलें पाहिजे."

मी माझ्या निर्धारापासून अणुमात्र ढळलों नाहीं. कमिशन नाहींच दिलें, तरीहि ममीबाईचें काम मिळालेंच. काम सोपें होतें. मला दावा तयार करण्याबद्दल रु. ३० मिळाले. दावा एक दिवसाहून अधिक वेळ चालण्यासारखा नव्हता.

स्मॉलकॉज कोर्टांत पहिल्यानेंच पाऊल टाकलें. मी प्रतिवादीतर्फे होतों, त्यामुळें मला उलटतपासणी करायची होती. मी उभा राहिलों खरा, पण पाय कांपूं लागले. डोकें फिरूं लागलें. मला वाटे कोर्टच फिरतें आहे. प्रश्न विचारण्याचें सुचेच ना. न्यायाधीश हंसले असतील. वकिलांना तर गंमत वाटलीच असणार. पण माझ्या दृष्टीला कुठें काय दिसतें आहे ?

मी बसलों. दलालाला सांगितलें, " हें काम माझ्यानें नाहीं चालवणार. पटेलांना नेमा. मला दिलेली फी परत घ्या." पटेलांना त्याच दिवसाचे एकावन्न रुपये देऊन नेमलें. त्यांना तो खेळासारखा होता.

मीं पळ मारली. अशीलाचा जय झाला कीं पराजय तो मला स्मरत नाहीं. मला शरम वाटली. पुरी हिंमत वाटूं लागेपर्यंत दावा न घेण्याचा मीं निश्चय केला, आणि दक्षिण आफ्रिकेंत जाईपर्यंत कोर्टांत गेलोंच नाहीं. हा निश्चय पाळण्यासाठीं संकल्पबळाची मुळींच जरूर नव्हती. स्वतःचा दावा बुडविण्यासाठीं तो माझ्या स्वाधीन करायला कोण बसलें आहे ? अर्थात् निश्चय केला नसता, तरीहि कोणीं मला कोर्टांत जाण्याची तसदी दिली नसती !

पण आणखी एक काम मुंबईत मिळायचें होतें खरें. हें काम अर्ज तयार करण्याचें होतें. एका गरीब मुसलमानाची जमीन पोरबंदरांत जप्त झाली होती. माझ्या वडिलांचें नांव माहीत असल्यामुळें त्यांच्या बॅरिस्टर चिरंजिवांकडे तो आला. मला त्याचा पक्ष लगडा दिसला, पण मीं त्याचा अर्ज तयार करून देण्याचें कबूल केलें. छपाईचा खर्च तेवढा अशीलानें द्यायचा होता. मीं अर्ज तयार केला. मित्रमंडळींना वाचून दाखविला. त्यांना पसंत पडला. त्यामुळें मला कांहींसा आत्मविश्वास आला, कीं मी अर्ज तयार करण्यापुरता तरी लायक होईन–होतों पण खरा.

पण माझा उद्योग वाढत चालला. फुकटचे अर्ज लिहून देण्याचा धंदा केला असता, तर काम भरपूर मिळालें असतें खरें; पण तेवढ्यानें दुपारची सोय थोडीच होणार !

मीं असें योजलें, कीं मला शिक्षकाचें काम जुळेल खरें. इंग्रजीचा अभ्यास मीं चांगला केला होता. त्यामुळें एकाद्या शाळेंत मॅट्रिक्युलेशन क्लासला इंग्रजी शिकविण्याचें काम मिळालें तर शिकवावें. काय मिळेल तेवढेंच !

मीं वर्तमानपत्रांत जाहिरात वाचली. " पाहिजे. इंग्रजी शिक्षक. रोज एक तास. पगार रु. ७५." ही एक एका प्रख्यात हायस्कूलची जाहिरात होती. मीं अर्ज केला. मला समक्ष भेटण्याची आज्ञा झाली. मी मोठ्या उत्कंठेनें गेलों; पण प्रिन्सिपॉलांना जेव्हां मी बी. ए. नाहीं असें समजलें तेव्हां त्यांनीं दिलगिरी प्रदर्शित करून मला रजा दिली.

" पण मीं लंडनची मॅट्रिक्युलेशन पसार केली आहे. माझी दुसरी भाषा लॅटिन् होती."

" तें खरें, पण आम्हांला ग्रॅज्युएटच पाहिजे. "

माझा निरुपाय झाला. माझे हातपाय गळाले. वडील बंधूहि काळजींत पडले. आम्हीं उभयतांनीं विचार केला, कीं मुंबईत अधिक वेळ घालविणें निरर्थक आहे; मीं राजकोटमध्येंच स्थिर व्हावें. बंधु स्वतः खालच्या पायरीवरचे वकील होते; मला थोडेंबहुत तरी अर्ज लिहिण्याचें काम देऊं शकलेच असतें. राजकोटचा घरखर्च चालूच होता, त्यामुळें मुंबईचें बिऱ्हाड उठविल्यानें पुष्कळसा खर्च वांचणार होता. मला हा विचार आवडला. सहा एक महिने राहिल्यानंतर मुंबईचें बिऱ्हाड उठवलें.

मुंबईमध्यें राहात होतों, त्या मुदतींत मी रोज हायकोर्टांत जात असें. पण तेथें कांहीं शिकलों असें सांगवत नाहीं. शिकण्याइतकी समजूतहि नव्हती. कित्येक वेळां, तर दावा समजत नसे किंवा त्याच्याकडे लक्ष लागत नसे, तेव्हां डुलक्याहि खात असें. इतरहि डुलक्या खाणारे जोडीदार भेटत, त्यामुळें माझी लाज हलकी

होई. शेवटीं तर हायकोर्टात बसून डुलक्या खाणें ही एक फॅशनच आहे असें समजण्यास हरकत नाहीं असें वाटूं लागलें. मग तर लाजेचें प्रयोजनच उरलें नाहीं.

हल्लींच्या काळींहि माझ्यासारखे बेकार बॅरिस्टर जर कोणी मुंबईत असले, तर त्यांच्यासाठीं एक लहानसा अनुभव येथें नमूद करून ठेवतों.

गिरगावांत बिऱ्हाड होतें; तरी पण मी क्वचितच कधीं गाडीभाड्याचा खर्च करीत असें. ट्रॅममध्येंहि क्वचितच बसें. गिरगांवाहून बहुधा नेहमीं चालतच जात असें. त्याला चांगलीं पंचेचाळीस मिनिटें लागत, आणि परत घरींहि बिनचूक पायींच येत असें. दिवसाचें ऊन लागे तें सहन करण्याची शक्ति कमावली होती. अशा तऱ्हेनें मीं पुष्कळ पैसे वांचविले, आणि मुंबईत माझे पुष्कळ स्नेही आजारी पडत, पण मी एकहि दिवस आजारी पडल्याचें मला स्मरण नाहीं. पैसे कमवूं लागलों, तेव्हांहि अशा तऱ्हेनें ऑफिसांत पायीं जाण्याची संवय मीं शेवटपर्यंत कायम ठेविली. त्याचा लाभ मला आजमितीपर्यंत मिळत आहे.

●●●

४

# पहिला अपघात

मुंबईहून निराश होऊन राजकोटला गेलों. निराळी कचेरी उघडली. गाडें थोडेंबहुत रेटलें. अर्ज लिहिण्याचें काम मिळूं लागलें; आणि दरमहा सरासरी तीनशें रुपयांची प्राप्ति होऊं लागली. हें अर्ज लिहिण्याचें काम मिळूं लागलें त्याचें कारण माझी हुषारी नव्हे, तर लागवग हेंच होय. वडील बंधूंच्या भागीदाराचा वकिलींत चांगला जम बसलेला होता. त्यांच्याकडे मोठ्या महत्त्वाचे अर्ज लिहिण्यासाठीं येत, किंवा जे त्यांना महत्त्वाचे वाटत, ते मोठ्या बॅरिस्टरांकडेच जात. त्यांचे गरीब अशील असत त्यांचे अर्ज तयार करण्याचें काम मला मिळे.

मुंबईमध्यें कमिशन न देण्याचा माझा निर्धार होता, तो येथें मोडला असें म्हणतां येईल. दोन ठिकाणच्या परिस्थितींतील भेद मला समजावून सांगण्यांत आला. तो असा:— मुंबईत दलालाला पैसे देण्याचा प्रश्न होता; येथें वकिलाला द्यायचे होते. मुंबईप्रमाणें येथेंहि सर्व बॅरिस्टर, एकहि अपवाद न सोडतां, अशा तऱ्हेनें अमूक टक्के देतात असें मला सांगण्यांत आलें. माझ्या बंधूंच्या युक्तिवादाला माझ्याजवळ जबाब द्यायला नव्हता. "असें पहा कीं, मी दुसऱ्या वकिलाचा भागीदार आहें. आमच्याकडे येणाऱ्या कामापैकीं तुला देण्यासारखे मुकदमे असतील ते देण्याकडे माझी प्रवृत्ति असणारच; पण जर तूं तुझ्या फीचा हिस्सा माझ्या

भागीदाराला दिला नाहींस, तर माझी स्थिति किती चमत्कारिक होईल बरें ! आपण एकत्र राहतों त्या अर्थीं तुला मिळणाऱ्या फीचा हिस्सा मला मिळणारच. परंतु माझ्या भागीदाराला काय ? बरें, त्यानें तोच मुकदमा दुसरीकडे दिला, तर मात्र त्याला हिस्सा मिळणारच." या युक्तिवादानें मी फसलों. मला वाटलें, कीं जर मला बॅरिस्टरी करायची असेल, तर असल्या कामामध्यें कमिशन न देण्याचा आग्रह मी चालवतां कामा नये. मी नरम आलों. मी माझ्या मनाची समजूत केली किंवा स्पष्ट शब्दांत सांगावयाचें, तर मनाला फसवलें. परंतु याखेरीज इतर कोणत्याहि कामाबाबत मीं कमिशन दिल्याचें मला स्मरत नाहीं.

माझें आर्थिक गाडें कसेंबसें चाललें खरें, पण आयुष्यांतील पहिला तडाखा याच सुमारास मिळाला. ब्रिटिश अंमलदार म्हणजे काय हें मी कानांनीं ऐकत असें. साक्षात् अनुभवण्याला मला आतां मिळालें.

पोरबंदरच्या माजी राणासाहेबांना गादी मिळाली, त्यापूर्वीं माझे बंधू त्यांचे मंत्री व सल्लागार होते. त्या मुदतींत राणासाहेबांना गैरसल्ला दिल्याचा आरोप त्यांच्यावर होता. ती फिर्याद त्या वेळच्या पोलिटिकल एजंटपुढें आली होती, आणि त्यांचा माझ्या बंधूंविरुद्ध ग्रह होऊन राहिला होता. हे अंमलदार मला विलायतेंत भेटले होते. तेथें त्यांनीं माझ्याशीं चांगली मैत्री केली होती असें म्हणावयाला हरकत नाहीं. बंधूंचा विचार पडला, कीं या ओळखीचा फायदा घेऊन मीं पोलिटिकल एजंटला दोन शब्द सांगावें आणि त्यांची करण्यांत आलेली भलतीच समजूत दूर करण्याचा प्रयत्न करावा. मला ही गोष्ट बिलकूल पसंत पडली नाहीं. विलायतच्या तात्पुरत्या ओळखीचा मीं फायदा घेतां कामा नये. माझ्या बंधूंनीं खरोखरीच कांहीं गैरकृत्य खरोखरच केलें असल्यास माझी शिफारस काय कामाची ? केलें नसेल तर रीतसर अर्ज करावा किंवा स्वतःच्या निर्दोषीपणावर विश्वास ठेवून निर्धास्त राहावें. हें म्हणणें बंधूंना पटेना. "तुला काठेवाडची ओळख नाहीं. जगाची पण तुला माहिती व्हायची आहे. इकडे सगळीं वशिल्याचीं कामें. तुझ्यासारखा भाऊ असतांना, तुझ्या ओळखीच्या अंमलदारापाशीं थोडी शिफारस करण्याचा प्रसंग पडला असतां जर तूं चुकवाचुकव केलीस, तर तें योग्य म्हणतां येणार नाहीं."

बंधूंचें म्हणणें नाकबूल करवेना. जीवावर येत असतांहि गेलों. मला अंमलदाराकडे जाण्याचा कांहीं अधिकार नव्हता. जाण्यामध्यें स्वाभिमानाचा भंग होत आहे हें मला समजत होतें. मीं भेटण्यासाठीं वेळ मागितला, त्याप्रमाणें मिळाला. मी गेलों. जुनी ओळख काढली. पण माझ्या लगेच लक्षांत आलें, कीं विलायत व काठेवाड यांमध्यें अंतर आहे. अधिकाराच्या खुर्चीवर बसलेला अंमलदार आणि रजेवर गेलेला अंमलदार यांमध्येंहि फरक होता. अंमलदारानें ओळख, तर दिली

पण त्याबरोबरच त्यानें अधिक आढ्यता स्वीकारली. "ओळखीचा फायदा घ्यायला तर तूं आलेला नाहींस ना?" हें मला त्याच्या आढ्यतेवरून, त्याच्या दृष्टीवरून दिसून आलें. हें दिसत असतांहि मीं माझें पुराण सुरू केलें. साहेब अधीरे झाले. "तुझे बंधु लटपटी करणारे आहेत. मीं तुझ्याकडून अधिक कांहीं ऐकूं इच्छीत नाहीं. मला वेळ नाहीं. तुझ्या भावाला जर कांहीं सांगायचें असेल, तर त्यानें रीतसर अर्ज करावा." हें उत्तर पुरें होतें, योग्य होतें, पण गरजवंताला अक्कल कोठून सुचणार? मीं माझें पुराण चालूच ठेवलें. साहेब उठले, "आतां तुला गेलेंच पाहिजे."

मीं म्हटलें, "पण माझें म्हणणें तर अखेरपर्यंत ऐकून घ्या."

साहेब खूप चिडले. "पट्टावाला, इसको दरवाजा बताओ."

"हुजूर," म्हणत पट्टेवाला धांवत आला. मी अजूनहि कांहीं बडबडतच होतों. पट्टेवाल्यानें मला हात लावला, आणि मला खोलीबाहेर नेलें.

साहेब गेले. पट्टेवाला गेला. मीहि निघालों, गोंधळून गेलों, चिडलों. मी तर चिठी खरडली, "तुम्हीं माझा अपमान केला आहे. पट्टेवाल्यामार्फत माझ्यावर आक्रमण केलें आहे. तुम्ही माफी मागितली नाहीं, तर तुमच्यावर रीतसर फिर्याद करीन." ही चिठी मीं पाठविली. थोड्याच वेळांत साहेबाचा स्वार जबाब देऊन गेला.

"तुम्हीं माझ्याशीं असभ्य वर्तन केलें. तुम्हांला जायला सांगितलें असतां गेलां नाहीं, त्यावरून मीं जरूर माझ्या पट्टेवाल्याला तुम्हांला दरवाजा दाखवायला सांगितलें. पट्टेवाल्यानें सांगितलें तरीहि तुम्ही कचेरी सोडून गेला नाहीं. म्हणून त्यानें तुम्हांला कचेरींतून बाहेर काढण्यापुरतें बळ वापरलें. तुम्हांला चाहेल तें करायला तुम्ही मोकळे आहां." अशा अर्थाचा तो जबाब होता.

हा जबाब खिशांत घालून मान खालीं घालून घरीं आलों. बंधूंना हकीकत सांगितली. त्यांना वाईट वाटलें, पण तें माझें सान्त्वन काय करणार? वकील मित्रांना हकीकत सांगितली. मला स्वतःला दावा थोडाच तयार करतां येत होता! या वेळीं फिरोजशा मेहता स्वतःच्या कोणत्या तरी दाव्यासाठीं राजकोटमध्यें आलेले होते त्यांना माझ्यासारखा नवखा बॅरिस्टर कोठून भेटूं शकणार? पण त्यांना आणविणाऱ्या वकीलार्फत त्यांचेकडे कागद पाठवून त्यांचें मत मागविलें. "गांधीला सांगा, असले प्रसंग सर्वच वकील-बॅरिस्टरांच्या अनुभवाला आले असतील. तूं नवीन आहेस. तुला अजून विलायतेची खुमखुमी आहे. तुला ब्रिटिश अंमलदारांची ओळख नाहीं. तुला सुखानें दिवस काढायचे असतील आणि दोन पैसे कमवायचे असतील, तर तुला आलेली चिठी फाडून टाक आणि झालेला आपमान गिळून

जा. फिर्याद करण्यापासून तुला एक कवडी मिळणार नाहीं, आणि तूं मात्र जमीनदोस्त होशील. आयुष्याचा अनुभव तुला अजून मिळायचा आहे."

मला हा उपदेश कडू विषाप्रमाणें वाटला. पण तो कडू घोंट घशाखालीं उतरविण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. मी अपमान विसरूं शकलों नाहीं. पण त्याचा सदुपयोग केला : "अशा स्थितींत पुन्हां कधीं सांपडणार नाहीं; अशा तऱ्हेनें कोणाची रदबदली करायला जाणार नाहीं." या नियमाचा मीं कधीं भंग केलेला नाहीं. या तडाक्यानें माझ्या जीवितानें मुराड फिरविलें.

●●●

## ५

# दक्षिण आफ्रिकेची तयारी

त्या अंमलदाराकडे जाण्यामध्यें माझी चूक होती, पण त्याचा अधीरेपणा, क्रोध, उद्धटपणा यांपुढें माझा दोष फारच अल्प बनून गेला. धक्का मारणें ही माझ्या दोषालायक शिक्षा नव्हती. मी त्याचेजवळ पांच मिनिटेंहि बसलों नसेन. माझें बोलणेंच त्याला असह्य वाटलें. तो मला सभ्यपणें जा म्हणून सांगूं शकला असता; पण त्याचा अधिकाराचा कैफ अमर्याद होता. मागून मला समजलें, कीं या अंमलदाराला सोशिकपणा म्हणजे काय तें माहीतच नव्हतें. त्याच्याकडे जाणारांचा अपमान करणें हा त्याचा नित्याचा परिपाठच होता. स्वतःला न आवडणारी गोष्ट निघाली, कीं लगेच साहेबांचें पित्त खवळें.

माझें पुष्कळसें काम त्याच्याच कोर्टांत असे. खुशामत माझ्याकडून होण्यासारखीच नव्हती. या अंमलदाराला भलत्या मार्गांनीं खूष करण्याची माझी इच्छाच नव्हती. त्याला फिर्यादीची लेखी धमकी देऊन पुन्हां फिर्याद न करणें किंवा त्याला कांहींहि न लिहिणें हेंहि मला पटलें नाहीं.

मध्यंतरीं काठेवाडच्या लटपटींचाहि मला थोडाबहुत अनुभव मिळाला. काठेवाड म्हणजे अनेक लहान लहान राज्यांचा प्रदेश. येथें मुत्सद्यांचें पीक भरपूरच असणार. संस्थानांसंस्थानांमध्यें बारीकसारीक झटापटी, हुद्दा मिळविण्यासाठीं लटपटी, हलक्या कानाचे संस्थानिक, संस्थानिकांची परवशता, साहेबांच्या पट्टेवाल्यांची खुशामत, शिरस्तेदार म्हणजे सवाईसाहेब,—कारण शिरस्तेदार म्हणजे साहेबांचे डोळे, कान आणि त्याचा दुभाष्या. शिरस्तेदार मनांत आणील तो कायदा. शिरस्तेदाराची प्राप्ति साहेबाच्या प्राप्तीपेक्षांहि अधिक असते असें लोक बोलत.

यांत अतिशयोक्ति असण्याचा संभव आहे. पण शिरस्तेदाराच्या अल्प पगाराच्या मानानें त्याचा खर्च निःसंशय अधिक चाले.

हें वातावरण मला विषासमान वाटलें. मी माझा स्वतंत्र बाणा कसा टिकवूं शकेन याचा मला नेहमीं विचार पडे.

मीं उदासीन झालों. माझी उदासीनता बंधूंच्या लक्षांत आली. कोठें तरी नोकरी धरून बसलों, तर मी या लटपटींमधून मुक्त होऊन जाईन असेंहि वाटे; पण लटपटींखेरीज दिवाणाची किंवा न्यायाधीशाची जागा तरी कोठून मिळणार ?

वकिली करावी तर साहेबांबरोबर झालेला झगडा आड येणार.

पोरबंदरमध्यें ॲडमिनिस्ट्रेशन होतें. तेथें राणासाहेबांना थोडे तरी अधिकार मिळावे अशासाठीं प्रयत्न करायचा होता. 'मेर' लोकांकडून 'विघोटी' कर प्रमाणाबाहेर घेतला जात असे. त्यासाठीं मला तेथच्या ॲडमिनिस्ट्रेटरला भेटावें लागलें. ॲडमिनिस्ट्रेटर देशीच होते; पण त्यांचा रुबाब पाहातों तो साहेबांच्याहि पलीकडे. हुषार होते, पण त्यांच्या हुषारीचा फायदा रयतेला विशेष मिळाल्याचें मला दिसलें नाहीं. राणासाहेबांना थोडे अधिकार मिळाले. 'मेर' लोकांना कांहींच मिळालें नाहीं असें म्हणतां येईल. त्यांच्या गाऱ्हाण्याचा पुरा तपास झाल्याचेंहि मला दिसलें नाहीं.

अशा तऱ्हेनें येथेंहि मी कांहीं अंशीं निराश झालों. मला वाटलें कीं, न्याय मिळालेला नाहीं. न्याय मिळवायला माझ्यापाशीं साधन नव्हतें. फार झालें, तर वरिष्ठ साहेबांकडे अपील करतां येईल. त्यांचा शेरा येणार 'आम्ही या कामीं ढवळाढवळ करूं शकत नाहीं.' असल्या निकालांमागें कांहीं कायदेकानू असले तर आशेला जागा. येथें साहेबांची मर्जी हाच कायदा.

मला काय करूं असें झालें.

इतक्यांत बंधूंकडे पोरबंदरच्या एका मेमण पेढीकडून माझ्यासाठीं काम चालून आलें. "दक्षिण आफ्रिकेंत आमचा व्यापार आहे. आमची मोठी पेढी आहे. आमचा एक मोठा दावा चालू आहे. दावा चाळीस हजार पौंडाचा आहे. पुष्कळ दिवसांपासून चालू आहे. आमच्याजवळ उत्तमांत वकील, बॅरिस्टर आहेत. तुमच्या भावाला पाठवलात, तर त्याची आम्हांला मदत होईल; आणि त्यालाहि कांहीं मदत मिळेल. तो आमची बाजू आमच्या वकीलाला चांगल्या तऱ्हेनें समजावून देऊं शकेल. त्याला नवा मुलूख पाहायला मिळेल. नवीन ओळखीदेखील होतील तें निराळेंच."

बंधूंनीं मला हकीकत सांगितली. या सगळ्यांचा अर्थ माझ्या लक्षांत आला नाहीं. मला फक्त वकीलाला समजावून देण्याचेंच काम करावें लागेल, कीं कोर्टांतहि जावें लागेल तें स्पष्ट झालें नाहीं, पण एकंदरींत बरें वाटलें.

दादा अबदुल्लाचे भागीदार मरहूम शेठ अबदुल करीम झवेरीची व माझी भेट माझ्या बंधूंनीं करवून दिली. शेठजींनीं सांगितलें, "तुम्हांला विशेष मेहनत पडणार नाहीं. आमची मोठमोठ्या गोऱ्या लोकांशीं दोस्ती आहे. त्यांची-तुमची ओळख होईल. आमच्या दुकानांतहि तुमची मदत होईल. आम्हांला इंग्रजी पत्रव्यवहार पुष्कळ करावा लागतो. त्यांतहि तुम्ही मदत करूं शकाल. तुमची राहायची सोय आमच्या बंगल्यांतच होईल. म्हणजे तुम्हांला कसलाच खर्च पडणार नाहीं."

मीं विचारलें, "माझी नोकरी तुम्हांला किती मुदतीपर्यंत पाहिजे आहे? मला तुम्ही काय पगार द्याल?"

"तुमची जरूर एक वर्षाहून अधिक काळ पडणार नाहीं. तुम्हांला येण्याजाण्याचें फर्स्ट क्लासचें भाडें आणि राहाण्याजेवणाच्या खर्चाखेरीज १०५ पौंड देऊं."

ही कांहीं वकिली म्हणतां यायची नाहीं. ही नोकरी झाली. पण मला कोठूनहि हिंदुस्थान सोडून जायचें होतें. नवा मुलूख पाहायला मिळेल, आणि अनुभव मिळेल तो निराळा. १०५ पौंड बंधूंकडे पाठवीन म्हणजे घरखर्चामध्यें कांहीं मदत होईल, असें म्हणून पगाराबद्दल घासाघीस न घालतां मीं शेठ अबदुल करीमचें म्हणणें कबूल केलें, आणि दक्षिण आफ्रिकेला जायला सिद्ध झालों.



६

# नाताळला जाऊन पोंचलों

विलायतेला जातांना वाटलें होतें तसें दक्षिण आफ्रिकेला जातांना वियोगदुःख वाटलें नाहीं. मातुःश्री तर निवर्तलेलीच होती. मीं जगाचा आणि प्रवासाचा अनुभव घेतला होता. राजकोट–मुंबई दरम्यान खेपा चालूच होत्या त्यामुळें या वेळीं मला वियोग विशेष जाणवला तो फक्त पत्नीचा. विलायतेहून आल्यानंतर आणखी एक मुलगा झाला होता. आमच्या उभयतांतील प्रेम अजूनहि विषयदूषित तर होतेंच. तरी पण त्याच्यामध्यें निर्मळता येऊं लागली होती. मी विलायतेहून आल्यानंतर आम्ही एकत्र असें थोडेंच राहिलों होतों. आणि वाईट बरा पण मी स्वतः तिचा शिक्षक बनलों होतों त्यामुळें, तसेंच पत्नीकडून कित्येक सुधारणा करविल्या होत्या त्या टिकविण्यासाठींहि, एकत्र राहाणें जरूरीचें आहे असें आम्हां उभयतांना वाटत होतें पण आफ्रिकेचें आकर्षण होतें ना! त्यानें वियोग सह्य

करून टाकला. " वर्षाच्या अखेरीस तर आपण एकत्र येणारच ना ! " असें म्हणून सान्त्वन करून मीं राजकोट सोडलें आणि मुंबईस आलों.

दादा अबदुल्लाच्या मुंबईच्या एजंटामार्फत मीं तिकीट काढायचें होतें, पण बोटींत केबिन रिकामी मिळेना. ही वेळ चुकली, तर एक महिनाभर मला मुंबईची हवा खात बसावें लागणार होतें. एजंटानें सांगितलें, " आम्हीं खूप प्रयत्न केला पण आम्हांला तिकीट मिळूं शकत नाहीं. डेकवरून जातां तर पहा, खाण्याची व्यवस्था सलूनमध्यें होऊं शकेल." हे दिवस माझे पहिल्या वर्गातून प्रवास करण्याचे होते. बॅरिस्टर काय डेकचा पॅसेंजर होऊन जाणार ? डेकवरून जाण्याचें मीं नाकारलें. मला एजंटाबद्दल शंका आली. पहिल्या वर्गाचें तिकीट मिळतच नाहीं हें मला खरें वाटेना. एजंटाची परवानगी घेऊन मीच तिकीट मिळविण्याचा प्रयत्न केला. बोटीवर गेलों. वरिष्ठ मालिमाला भेटलों. त्याला विचारतां त्यानें मला खात्रीपूर्वक जबाब दिला, " आमच्याकडे इतकी गर्दी क्वचितच असते. पण मोझांबिकचे गव्हर्नर–जनरल या बोटींतून जात असल्यामुळें सगळी जागा भरून गेली आहे. "

" मग तर काय तुम्ही कसेंहि करून माझ्यासाठीं जागा नाहींच काढूं शकत ? "

मालिमानें माझ्याकडे पाहिलें. तो हंसून म्हणाला, " एक उपाय आहे. माझ्या केबिनमध्यें एक झोंपाळा रिकामा आहे. त्यावर आम्ही उतारू घेत नाहीं; पण तुम्हाला ती जागा द्यायला मी तयार आहे." मला आनंद झाला. शेठला हकीकत सांगितली; आणि तिकीट काढवलें. १८९३ सालच्या एप्रिल महिन्यात मी हौसेनें दक्षिण आफ्रिकेंत माझ्या नशिबाची परीक्षा पाहाण्यासाठीं निघालों.

पहिलें बंदर लामू होतें. तेथें पोंचायला सुमारे तेरा दिवस लागले. रस्त्यांत कप्तानाबरोबर चांगली दोस्ती जमली. कप्तानाला बुद्धिबळें खेळण्याचा शौक होता. परंतु तो अजून नवशिक्या होता. त्याला आपल्याहूनहि कच्चा खेळणारा चालण्यासारखा होता. म्हणून त्यानें मला बोलावलें. मी बुद्धिबळांचा खेळ कधीं पाहिलाहि नव्हता. त्याच्याविषयीं पुष्कळ ऐकलें मात्र होतें. या खेळांत बुद्धीचा भरपूर उपयोग करावा लागतो असें खेळणारे सांगत. आपण तुम्हांला शिकवतों असें कप्तानानें मला सांगितलें. मी त्याला योग्य शिष्य मिळालों. कारण माझा नौशिकपणा गंभीर होता. माझा नेहमीं पराभव होई. तसतसा कप्तानाला शिकवण्याचा जोर चढे. मला बुद्धिबळाचा खेळ आवडला; पण तो कधीं त्या बोटीवरून खालीं मात्र उतरला नाहीं. राजाराणी वगैरे कशीं चालतात तें समजण्यापलीकडे गतीहि झाली नाहीं.

लामू बंदर आलें. तेथें बोट तीन-चार तास थांबायची होती. मी बंदर पहाण्यासाठीं खालीं उतरलों. कप्तान पण गेला होता. त्यानें मला म्हटलें, " हें बंदर बेभरंवशी आहे. तुम्ही लवकरच परत वळा. "

गांव अगदीं लहानच होतें. तिथल्या पोस्ट ऑफिसांत गेलों तों तेथें हिंदी नोकर दिसले. त्यांना पाहून आनंद वाटला. त्यांच्याबरोबर बोलत राहिलों. हबशी लोकांना भेटलों. त्यांच्या रहाणीबद्दल जिज्ञासा उत्पन्न झाली. तिकडे कांहीं वेळ गेला, दुसरे कांहीं डेकचे उतारू होते. त्यांची मीं ओळख केली होती. स्वयंपाक करून स्वस्थपणें जेवण्यासाठीं ते खालीं उतरले होते. मी त्यांच्या होडींत बसलों. बंदरांत जोराची भरती होती. आमच्या होडींत भरपूर वजन होतें. पाण्याचा जोर एवढा होता, कीं होडीनें दोरखंड बोटीच्या शिडीला [illegible] बांधतांच येईना. होडी बोटीच्या शिडीशीं जाते तों निसटून जाई. बोट सुरू होण्याची पहिली शिटी झाली. मी घाबरलों. कप्तान वरून पहात होता. त्यानें पांच मिनिटें बोट थांबवून धरण्यास सांगितलें. बोटीच्या जवळच एक मचवा होता. तो दहा रुपये देऊन माझ्यासाठीं एका मित्रानें भाड्यानें घेतला. त्या मचव्यानें मला त्या होडींतून उचलून घेतला. बोटीची शिडी वर घेतली होती. दोऱ्यानीं मला वर उचलून घेतला, आणि बोट चालू झाली! बाकीचे उतारू राहून गेले. कप्तानानें दिलेल्या सूचनेचा अर्थ आतां लक्षात आला.

लामूहून मोंबासा व तेथून झांजीबारला पोंचलों. झांजीबारला पुष्कळच वेळ थांबायचें होतें— आठ-दहा दिवस. येथें दुसऱ्या बोटींत बसायचें होतें.

कप्तानाचा मजवर अमर्याद लोभ होता. या प्रेमानें माझ्या बाबतींत उलटें स्वरूप धारण केलें. त्यानें मला आपल्याबरोबर सहल करायला बोलाविलें एका इंग्रज मित्रालाहि बोलाविलें होतें. आम्ही तिघेहि कप्तानाच्या मचव्यांतून उतरलों. या सहलीचें मर्म मला मुळींच समजलें नव्हतें. कप्तानाला काय माहीत, कीं मी असल्या बाबतींत पूर्ण अज्ञानी असेन! पहातों तर आम्ही हबशी स्त्रियांच्या वाडींत जाऊन पोंचलों. एक दलाल आम्हांला तिकडे घेऊन गेला. दर एक जण एकाएका खोलींत कोंडलें गेलों. पण माझी तर शरमेनें गठडी वळली, आणि मी खोलींत जशाचा तसाच राहिलों. त्या बिचाऱ्या बाईच्या मनात काय विचार आले असतील ईश्वर जाणे. कप्तानानें हांक मारली. मी जसा आंत गेलों तसाच बाहेर पडलों. माझा भोळेपणा कप्तानाच्या लक्षांत आला. प्रथम तर मला शरमल्यासारखें झालें; परंतु असली गोष्ट मला केव्हांहि पटण्यासारखी नव्हतीच. त्यामुळें ओशाळपणा क्षणभरच टिकला; आणि त्या बाईला पाहून माझ्या मनांत तिळमात्र विकार जागृत झाला नाहीं, याबद्दल मी ईश्वराचें आभार मानलें. खोलींत शिरण्याचाच इनकार करण्याची मला हिंमत झाली नाहीं, या माझ्या दुर्बलतेचा मला तिरस्कार वाटूं लागला.

माझ्या आयुष्यांतील ही अशा प्रकारची तिसरी कसोटी होती, किती तरी तरुण मुळांत निष्पाप असूनहि भलत्याच लाजेमुळें पापांत पडत असतील. मी

बचावलों, त्यांत माझा कांहीं पुरुषार्थ नव्हता. मीं खोलींत पाय टाकण्याचेंच साफ नाकारलें असतें; तर तो माझा पुरुषार्थ झाला असता. माझ्या बचावाबद्दल मला फक्त ईश्वराचाच पाड मानला पाहिजे. पण या बचावामुळें माझी ईश्वरावरील श्रद्धा दुणावली, आणि मीं खोटी लाज सोडून देण्याची हिंमतहि कांहीं अंशीं संपादली.

झांजीबारमध्यें एक आठवडा घालवायचा होता; म्हणून मी एक घर भाड्यानें घेऊन शहरांत राहिलों. खूप हिंडून हिंडून शहर पाहिलें. झांजीबारच्या हिरवळीची कल्पना मलबारांतच येऊं शकेल. तिथले विशाल वृक्ष, मोठमोठीं फळें वगैरे पाहून मी चकित होऊन गेलों.

झांजीबारहून मोझांबिकला आणि तेथून मे महिन्याच्या जवळजवळ अखेरीला नाताळला पोंचलों.

•••

## ७

# कांहीं मासलेवाईक अनुभव

डरबन हें नाताळचें बंदर म्हणतां येईल; त्याला नाताळ बंदर असेंहि म्हणतात. मला न्यायला अबदुल्ला शेठ आले होते. बोट धक्क्याशीं आली, आणि नाताळचे लोक आपआपल्या मित्रांना आणायला बोटीवर आले. तेवढ्यांतच माझ्या ध्यानांत आलें, कीं इकडे हिंदी लोकांना फारसा मान नाहीं. अबदुल्ला शेठला ओळखणारे त्यांच्याशीं ज्या तऱ्हेनें वागत होते, त्यात एक प्रकारची तुच्छता दिसून येत होती, ती मला बोंचल्याशिवाय राहिली नाहीं. ही तुच्छता अबदुल्ला शेठच्या अंगवळणीं पडली होती. माझ्याकडे ज्यांची नजर जाई, ते माझ्याकडे कौतुकानें पाहत. माझ्या पोषाकामुळें मी इतर हिंदी लोकांहून निराळासा दिसत होतों. मीं त्या वेळीं फ्रॉक कोट, वगैरे पोषाक केला होता, आणि डोक्याला बंगाली घाटाची पगडी घातली होती.

अबदुल्ला शेठ मला घरीं घेऊन गेले. स्वतःच्या खोलीशेजारींच एक खोली होती ती अबदुल्ला शेठनीं मला दिली. ते माझें मन समजूं शकत ना. मी त्यांचें समजूं शकलों नाहीं. त्यांच्या बंधूंनीं माझ्याबरोबर दिलेलीं पत्रें त्यांनीं वाचलीं, त्यांवरून ते अधिकच फिकीरींत पडले. त्यांना वाटलें, कीं आपल्या भावानें हा सफेत हत्तीच घरांत आणला. माझी साहेबी राहाणी त्यांना खर्चाची वाटूं लागली. मला देण्यासारखें विशेषसें काम त्या वेळीं नव्हतें. त्यांची फिर्याद ट्रॅन्सवॉलमध्यें चालू होती. लगेच मला तिकडे पाठवून काय करायचें ? शिवाय माझ्या कर्तबगारीबद्दल किंवा

प्रामाणिकपणाबद्दल कितीशी खात्री बाळगावी ? प्रिटोरियामध्यें ते माझ्याबरोबर नसणार. प्रतिवादी प्रिटोरियाचेच होते. त्यांनीं माझ्याशीं भलतेंच संधान बांधलें तर ? या फिर्यादीचें काम मला न दिलें, तर इतर काम त्यांचा कारकून माझ्यापेक्षां कितीतरी चांगलें करूं शकेल. कारकुनानें चूक केली, तर त्याला ठपका तरी देतां येईल; मी चूक केली, तर तेंहि नाहीं. फिर्यादीचें किंवा कारकुनीचें याशिवाय तिसरें काम नव्हतें. अर्थात् फिर्यादीचें काम ग्यायचें नसेल, तर मला घरबसल्या खाऊं घातलें पाहिजे.

अबदुल्ला शेठचें पुस्तकी ज्ञान फार थोडें होतें; पण अनुभवज्ञान खूप होतें. त्यांची बुद्धि तीव्र होती, आणि याची त्यांनाहि जाणीव होती. इंग्रजीचें ज्ञान बोलण्याचालण्यापुरतें त्यांनीं सवयीनें मिळविलें होतें. पण इतपत इंग्रजीनेंहि ते स्वतःचें सर्व काम चालवूं शकत. बँकांच्या मॅनेजरांबरोबर संभाषण करीत, युरोपियन व्यापाऱ्यांशीं सौदे ठरवून येत, वकिलांना स्वतःचे दावे समजावून देत. हिंदी लोकांमध्यें त्यांच्याबद्दल भरपूर आदर होता. त्यांची पेढी त्या वेळीं सर्व हिंदी पेढ्यांत मोठी होती, निदान मोठ्या पेढ्यांपैकीं एक होती. त्यांचा स्वभाव संशयी होता.

त्यांना इस्लामबद्दल अभिमान होता. त्यांना तत्त्वज्ञानाच्या चर्चेची आवड असे. अरबी येत नव्हतें, तरी पण कुराणेशरीफची आणि सामान्यपणें इस्लामी धर्मसाहित्याची माहिती चांगल्यापैकीं होती. त्यांच्याजवळ दृष्टान्त नेहमीं हजर असायचे. त्यांच्या सहवासामुळें मला इस्लामचें व्यावहारिक ज्ञान भरपूर मिळालें. आम्हांला एकमेकांचें हृद्गत समजूं लागलें. त्यानंतर तर ते माझ्याशीं पुष्कळ धर्मचर्चा करीत.

दुसऱ्या का तिसऱ्या दिवशीं मला डरबनचें कोर्ट पाहायला घेऊन गेले. तेथें कांहीं ओळखी करून दिल्या. कोर्टात स्वतःच्या वकिलापाशीं मला बसविला. मॅजिस्ट्रेट माझ्याकडे एकसारखें पाही. त्यानें मला माझी पगडी काढून टाकण्यास सांगितलें. मीं काढण्याचें नाकारलें आणि कोर्ट सोडून निघालों.

येथेंहि माझ्या नशिबीं झगडेच होते !

पगडी काढण्याच्या बाबतींतील रहस्य अबदुल्ला शेठनीं मला समजावून दिलें. ज्यानें मुसलमानी पोषाक केला असेल त्यानें मुसलमानी पगडी वापरली तरी चालेल. बाकीच्या हिंदी लोकांनीं कोर्टात दाखल होताच स्वतःची पगडी काढली पाहिजे.

ह्या सूक्ष्म भेदाचा खुलासा करण्यासाठीं मला थोडा आगापिछा सांगितला पाहिजे.

या दोन-तीन दिवसांतच माझ्या लक्षांत आलें होतें कीं, हिंदी लोकांनीं आपापसांतच तट पाडून टाकले होते. एक भाग मुसलमान व्यापाऱ्यांचा—ते

स्वतःला ‘ अरब ’ म्हणवून घेत. दुसरा भाग हिंदु किंवा पारशी कारकुनांचा. हिंदु कारकुनांची त्रिशंकूसारखी स्थिति होती. कोणी अरबांत मिसळून जात. पारशी आपल्याला पर्शियन म्हणवीत. या तिघांचा व्यापाराव्यतिरिक्तहि आपापसांत थोडाबहुत संबंध असे. पण चौथा व सर्वांत मोठा वर्ग म्हणजे तामीळ, तेलगू व हिंदुस्थानी गिरमिट्यांचा व गिरमीटयुक्त हिंदी लोकांचा. गिरमीट म्हणजे, जो करार करून पांच वर्षेपर्यंत मजुरी करण्यासाठीं गरीब हिंदी त्या वेळीं नाताळला जात असत, तो करार म्हणजे “ ॲग्रीमेंट.” ॲग्रीमेंटचा अपभ्रंश गिरमीट झाला, आणि गिरमीटवरून गिरमिट्या झालें. या वर्गाबरोबर इतर तीन वर्गांचा संबंध मात्र कामापुरताच राही. या गिरमिट्यांना इंग्रज ‘ कूली ’ या नांवानें संबोधीत आणि त्याचीच संख्या मोठी, त्या अर्थी इतर हिंदी लोकांनाहि कूलीच म्हणत. कूलीच्याऐवजीं ‘सामी’हि म्हणत. सामी पुष्कळशा तामीळ नांवाच्या अखेरीला येणारा प्रत्यय होता. ‘ सामी ’ म्हणजे स्वामी. याचा अर्थ धनी होतो. त्यामुळें एखाद्या हिंदी माणसाला स्वामी शब्दाची चीड येई, आणि त्याच्यांत कांहीं हिंमत असली, तर तो त्या इंग्रजाला म्हणे, “ तुम्ही मला स्वामी म्हणतां खरें, पण तुम्हांला माहीत आहे का कीं सामी म्हणजे धनी ? मी कांहीं तुमचा धनी नाहीं.” हें ऐकून एखाद्या इंग्रजाला शरम वाटे, तर एखादा संतापे आणि अधिकच शिव्या देऊं लागे किंवा साधल्यास ठोक पण देई. कारण कीं, त्याच्या समजुतीनें ‘ सामी ’ शब्द निंदाव्यंजक होता. त्याचा अर्थ धनी करणें म्हणजे आपला अपमान झालासें त्याला वाटे.

अर्थात् मला “ कूली बॅरिस्टर ” अशी संज्ञा मिळाली. व्यापाऱ्यांना “ कूली व्यापारी ” म्हणत. कूलीचा मूळ अर्थ—मजूर—विसरला गेला. व्यापाऱ्यांना या शब्दाचा राग येई. व ते म्हणत, “ मी कूली नाहीं, मी अरब आहें.” किंवा व्यापारी आहें. ” गरीबसा इंग्रज असला, तर असें ऐकून माफीहि मागे.

अशा स्थितींत पगडी वापरण्याचा प्रश्न भानगडीचा होऊन बसला. पगडी उतरावी, तर मानभंग सहन करण्याप्रमाणें होतें. मीं असा विचार केला, कीं हिंदुस्थानी पगडीला रजा द्यावी, आणि मुळींच इंग्रजी टोपी वापरावी. कारण ती काढण्यांत कांहीं मानभंग नाहीं, आणि झगडाहि करीत बसायला नको.

अबदुल्ला शेटला हा विचार पसंत पडला नाहीं. ते म्हणाले, “ तुम्ही आतांच अशा तऱ्हेचा फेरफार केला, तर त्यापासून अनर्थ होईल. इतरांना देशी पगडीच वापरावयाची असेल, तर त्यांच्या मार्गांत विघ्न येईल. शिवाय आपली देशी पगडीच तुम्हांला शोभेल. तुम्ही इंग्रजी टोपी घातलीत, तर तुमची ‘ वेटरांत ’ गणना होणार.

या वाक्यामध्यें व्यावहारिक चातुर्य होतें, देशाभिमान होता आणि कांहींशी संकुचित वृत्तीहि होती. व्यावहारिक चातुर्य स्पष्टच आहे. देशाभिमानाशिवाय पगडी-बद्दलचा आग्रह संभवतच नाहीं. ' वेटर 'संबंधींची टीका संकुचितपणाशिवाय शक्य नाहीं. गिरमिट्या हिंदी लोकांमध्यें हिंदु, मुसलमान आणि ख्रिस्ती असे तीन वर्ग होते. ख्रिस्ती म्हणजे जे गिरमिट्ये बाटून ख्रिस्ती होत त्यांची प्रजा. यांची संख्या १८९३ मध्येंहि मोठी होती. ते सर्व इंग्रजी पोषाकच वापरीत. त्यांच्या-पैकीं पुष्कळसे हॉटेलांत नोकरी करून पोट भरीत. या लोकांना उद्देशून अबदुल्ला शेठची इंग्रजी टोपीची टीका होती. हॉटेलांत ' वेटर ' म्हणून काम करण्यांत कमीपणा आहे, ही समजूत त्या टीकेच्या मुळाशीं होती. आजहि पुष्कळांना तें काम कमीपणाचें वाटतेंच.

एकंदरींत अबदुल्ला शेठचें म्हणणें मला पटलें. मीं पगडीच्या चकमकीसंबंधीं स्वतःचें व पगडीचें समर्थन करणारें पत्र वर्तमानपत्राकडे पाठविलें. वर्तमानपत्रांत माझ्या पगडीची खूप चर्चा झाली. ' अन्वेल्कम् व्हिजिटर—आगंतुक पाहुणा ' अशा मथळ्याखालीं मला प्रसिद्धि मिळाली; आणि तीन-चार दिवसांच्या आंतच अनायासें दक्षिण आफ्रिकेभर माझी जाहिरात झाली. कोणी माझा पक्ष घेतला, कोणी माझ्या उद्धटपणाची खूप निंदा केली.

माझी पगडी तर जवळजवळ अखेरपर्यंत टिकून राहिली. केव्हां गेली तें आपणाला अखेरच्या भागांत समजेल.

●●●

८

# प्रिटोरियाला जातांना

डरबनमध्यें राहाणाऱ्या ख्रिस्ती हिंदी लोकांची ओळखदेखहि मीं अल्पावधींत केली. तेथील कोर्टातील दुभाष्ये मि. पॉल, रोमन कॅथॉलिक होते. त्यांची ओळख केली आणि प्रोटेस्टंट मिशनपैकीं एक शिक्षक मरहूम मि. सुभान ग्रॉडफ्रे यांचीहि ओळख करून घेतली. त्यांचेच चिरंजीव जेम्स ग्रॉडफ्रे गेल्या वर्षीं इकडे दक्षिण आफ्रिकेच्या हिंदी प्रतिनिधी-मंडळामधून आले होते. याच दिवसांमध्यें मरहूम पारशी रुस्तुमजीची ओळख झाली. आणि मरहूम आदमजी मियाखान यांचीहि याच वेळीं. हे सर्व गृहस्थ कामाप्रसंगाशिवाय एकमेकांना कधीं भेटत नसत. ते यापुढें भेटूं लागायचे आहेत.

अशा तऱ्हेनें मी ओळखी करीत होतों, इतक्यांत पेढीच्या वकिलाकडून पत्र आलें, कीं फिर्यादीची तयारी केली पाहिजे. अबदुल्ला शेठजींनीं स्वतः तरी प्रिटोरियाला आलें पाहिजे, किंवा दुसऱ्या कोणाला पाठविला पाहिजे.

हें पत्र अबदुल्ला शेठनीं मला दाखविलें आणि विचारलें, "तुम्ही प्रिटोरियाला जाता?" मीं म्हटलें, "मला दावा समजावून दिलांत तर मी सांगू शकेन. तिकडे काय काय करावें लागेल याची सध्यां मला कांहींच कल्पना नाहीं!" त्यांनीं आपल्या कारकुनांना दाव्याची माहिती देण्याच्या कामीं नेमलें.

मीं पाहिलें, कीं मला एकीएकपासून सुरुवात करावी लागणार. झांजीबारला मी उतरलों, तेव्हां तेथील कोर्टाचें काम पाहायला गेलों होतों. एक पारशी वकील एका साक्षीदाराची जबानी घेत होते, आणि जमाखर्चाचे प्रश्न विचारीत होते. मला जमाखर्चाची कांहीं कल्पनाच नव्हती. शाळेंतहि जमाखर्च शिकलों नव्हतों, किंवा विलायतेंतहि शिकलों नव्हतों.

मीं पाहिलें, कीं या दाव्याचा सर्व आधार हिशेबाच्या वह्यांवर आहे. जमाखर्चाची माहिती असेल तोच दावा समजूं किंवा समजावूं शकणार. मेथाजी जमाखर्चाच्या गोष्टी करीत, त्या ऐकूनच माझी गाळण उडे. पी. नोट म्हणजे काय तें समजेना. कोशांत हा शब्द सांपडेना. मीं माझें अज्ञान मेथाजींपुढें उघडें केलें. तेव्हां त्यांच्याकडून समजलें, कीं पी. नोट म्हणजे प्रॉमिसरी नोट. जमाखर्चाचें पुस्तक घेतलें आणि तें वाचून टाकलें. थोडासा आत्मविश्वास आला. दाव्याची समजूत पडली. मीं पाहिलें, कीं अबदुल्ला शेठना जमाखर्च लिहितां येत ना; परंतु व्यावहारिक ज्ञान इतकें मिळवलेलें होतें, कीं जमाखर्चाचीं कोडीं झटपट ते सोडवीत. मीं त्यांना सांगितलें, "माझी प्रिटोरियाला जाण्याची तयारी आहे."

"तुम्ही उतराल कुठें?" शेठजींनीं विचारलें.

"तुम्ही सांगाल तिथें." मीं उत्तर दिलें.

"तर मग मी माझ्या वकिलाला लिहितों. ते तुमची व्यवस्था करतील. प्रिटोरियांत माझे मेमण स्नेही आहेत. त्यांना लिहायला हरकत नाहीं. पण तुम्ही त्यांचेकडे उतरणें बरें नाहीं. त्याचा प्रतिवादीचा बराच स्नेहसंबंध आहे. तुम्हांला मी खाजगी पत्रें लिहीन, तीं त्यांच्यापैकीं कोणी वाचलीं, तर दाव्याचें मोठें नुकसान होईल; त्यांच्याशीं संबंध बेताचा राहील तेवढा चांगला."

मीं म्हटलें, "तुमचा वकील सांगेल तेथें मी राहीन, किंवा मी एखादें स्वतंत्र घर शोधून काढीन. तुम्ही निर्धास्त असा. तुमची एकहि गुप्त गोष्ट बाहेर फुटणार नाहीं. पण मी भेटेनसवरेन मात्र सर्वांना. मला प्रतिवादीबरोबरहि मैत्री जुळवायची आहे. माझ्याकडून झालें, तर हा वाद घरच्या घरीं मिटावा असें मी करीन. किती झालें तरी तैय्यब शेठ तुमचे सोयरेच ना!"

प्रतिस्पर्धी मरहूम तैय्यब हाजी खानमहमद हे अब्दुल्ला शेठचे निकटचे सोयरे होते.

अब्दुल्ला शेठ कांहींसे चमकले असें मीं पाहिलें. पण हा संवाद झाला, तेव्हां मला डरबनला पोंचल्याला सहा दिवस होऊन गेले होते. आम्ही एकमेकांना आळखूं लागलों होतों, समजूं लागलों होतों. मी आतां 'सफेत हत्ती' राहिलों नव्हतों. ते म्हणाले,

"हो–ओ–ओ. आपसांत समजूत झाली, तर त्यासारखी आनंदाची गोष्टच नाहीं. पण आम्ही सोयरे पडलों, त्यामुळें एकमेकांना पूर्ण ओळखून आहों. तैय्यब शेठ चटकन् ऐकणारे नाहींत. आपण भोळेपणा चालवला, तर आमच्या पोटांतील गोष्ट काढून घेतील आणि मागून आम्हांला तोंडघशीं पाडतील. म्हणून जें काय करायचें तें सावधपणें करा."

मीं म्हटलें, "तुम्ही मुळींसुद्धां फिकीर करूं नका. मला तैय्यब शेठशीं काय किंवा इतरांशीं काय दाव्यासंबंधीं कांहीं बोलण्याचें कारणच नाहीं. मी एवढेंच म्हणणार, कीं तुम्हीं दोघांनीं घरच्या घरीं समजूत करून घेतलीत, तर वकिलांचीं घरें भरावीं लागणार नाहींत."

सातव्या कीं आठव्या दिवशीं मी डरबनहून रवाना झालों. माझ्यासाठीं पहिल्या वर्गाचें तिकीट काढविलें. तेथें झोंपण्याचा बिछाना पाहिजे असेल, तर पांच शिलिंगांचें स्वतंत्र तिकीट काढावें लागे. अब्दुल्ला शेठनीं तें काढण्याबद्दल आग्रह केला, पण मीं हट्टानें, तोऱ्यानें आणि पांच शिलिंग वांचविण्यासाठीं बिछान्याचें तिकीट काढण्याचें नाकारलें.

अब्दुल्ला शेठनीं मला बजावलें, "पहा हो; हा मुलूख निराळा आहे. हिंदुस्थान नव्हे. खुदाची मेहरबानी आहे, तुम्ही पैशाचा कंजुषपणा करूं नका. जरूर ती सोय करून घ्या."

मीं आभार मानले आणि त्यांना काळजी करूं नका म्हणून सांगितलें.

नाताळची राजधानी मॅरित्सबर्ग येथें गाडी नऊ एक वाजतां पोंचली. येथें बिछाने पुरविण्यांत येत होते. एका रेल्वे नोकरानें येऊन विचारलें, "तुम्हांला बिछाना पाहिजे ?"

मीं म्हटलें, "माझ्यापाशीं माझा बिछाना आहे."

तो निघून गेला. इतक्यांत एक उतारू आला. त्यानें माझ्याकडे पाहिलें. मी गौरेतर आहें असें पाहून त्याचें बिनसलें. तो बाहेर पडला. एकदोन अंमलदारांना घेऊन आला. कोणी कांहीं बोलला नाहीं. शेवटीं एक अंमलदार आला. तो म्हणाला, "असे इकडे या, तुम्ही शेवटल्या डब्यांत जायचें आहे."

मीं म्हटलें, "माझ्याजवळ पहिल्या वर्गाचें तिकीट आहे."

तो म्हणाला, " त्याची चिंता नाहीं. मी सांगतों कीं, तुम्हीं शेवटल्या डब्यांत जावें. "

" मीहि सांगतों कीं, मला या डब्यांत डरबनहून बसविण्यांत आलेलें आहे, आणि त्यांतूनच प्रवास करण्याचा माझा इरादा आहे."

अंमलदार म्हणाला, " तें कांहीं चालायचें नाहीं. तुम्हांला उतरावेंच लागेल; आणि उतरलां नाहीं, तर शिपाई खालीं काढील."

मीं म्हटलें, " तर मग शिपाई खुशाल खालीं काढूं द्या. मी आपण होऊन नाहीं उतरणार."

शिपाई आला. त्यानें हात पकडला आणि मला धक्का मारून खालीं काढला. माझें सामान उतरून घेतलें. मी दुसऱ्या डब्यात जाण्याचें नाकारलें. ट्रेन निघून गेली. मी वेटिंगरूममध्यें शिरलों. माझ्या हातांतलें पाकीट तेवढें बरोबर ठेवलें. बाकीच्या सामानाला मीं हात लावला नाहीं. रेल्वेच्या नोकरांनीं तें सामान कोठें तरी ठेवलें.

हिंवाळ्याचे दिवस होते. दक्षिण आफ्रिकेचा हिंवाळा उंचावरील भागामध्यें कडाक्याचा असतो. मॅरित्सबर्ग उंच भागामध्यें आहे. त्यामुळें थंडी खूप लागली. माझा ओव्हरकोट सामानांत होता. सामान मागण्याची हिंमत होईना. फिरून अपमान झाला तर ! थंडीनें कुडकुडलों. खोलींत दिवा नव्हता. मध्यरात्रीच्या सुमाराला एक उतारू आला. त्याची कांहीं बोलण्याची इच्छा दिसली. पण त्याचेबरोबर माझी बोलण्यासारखी मनःस्थिति नव्हती.

माझें कर्तव्य काय याचा मीं विचार केला. एक तर मीं माझ्या हक्कांसाठीं झगडलें पाहिजे, नाहीं तर हिंदुस्थानची वाट धरली पाहिजे. नाहीं तर होतील ते अपमान सहन करून प्रिटोरियाला जावें आणि दाव्याचें काम पुरें करून स्वदेशीं जावें. दावा अर्धा टाकून जाणें म्हणजे नामर्दपणा होय. मला दुःख सोसावें लागलें हें वरवरचें दुःख आहे. आंत खोलांत असलेल्या एका महारोगाचें तें बाह्य लक्षण आहे. हा महारोग म्हणजे वर्णद्वेष. हा दृढमूल रोग नाबूद करण्याची शक्ति असेल तर तिचा उपयोग केला पाहिजे. तो करतांना स्वतःवर पडतील तीं दुःखें सहन केलीं पाहिजेत. वर्णद्वेष काढून लावण्यासाठीं जरूर पडेल तेवढ्यापुरतेंच स्वतःच्या दुःखाचें परिमार्जन करण्याचा प्रयत्न करावा.

असा निर्णय करून दुसऱ्या गाडीनें कसेंहि करून पुढें जायचेंच असा निश्चय केला.

सकाळच्या प्रहरीं मी जनरल मॅनेजरला तक्रारीची लांबलचक तार केली. दादा अबदुल्लांना पण कळविलें. अब्दुल्ला शेठ लगेच जनरल मॅनेजरला भेटले. जनरल मॅनेजरनें स्वतःच्या नोकरांच्या वर्तनाची तरफदारी केली, पण सांगितलें

कीं, मला बिनहरकत प्रिटोरियाला पोंचविण्याबद्दल आपण स्टेशनमास्तरला शिफारस केली आहे. अबदुल्ला शेठनीं मॅरित्सबर्गच्या हिंदु व्यापाऱ्यांना तार करून मला भेटण्याबद्दल व माझी बरदास्त ठेवण्याबद्दल कळविलें. आणि इतर स्टेशनांवरहि तशाच तारा केल्या. त्यावरून व्यापारी मला स्टेशनवर भेटण्यास आले. त्यांनीं स्वतःवर पडणाऱ्या दुःखांचें माझेपाशीं वर्णन केलें; आणि मला म्हटलें कीं, तुमच्यावर आलेला प्रसंग हा कांहीं नवा नव्हे. पहिल्या-दुसऱ्या वर्गांतून प्रवास करणाऱ्या हिंदी उतारूंना रेल्वेच्या अधिकाऱ्यांकडून व इतर उतारूंकडून उपसर्ग पोंचायचाच. अशा तऱ्हेच्या गोष्टी ऐकण्याखालीं दिवस गेला. रात्र पडली. गाडी आली. माझ्यासाठीं जागा ठेवलेलीच होती बिछान्याचें तिकीट घेण्याचें मीं डरबनमध्यें नाकारलें होतें तें मॅरित्सबर्गमध्यें घेतलें. गाडी मला चार्लस्टाऊनकडे घेऊन चालली.

●●●

## ९

# आणखी हालअपेष्टा

चार्लस्टाऊनला गाडी सकाळीं पोंचली. चार्लस्टाऊनहून जोहानिसबर्गला जायला त्या दिवसांत आगगाडी नव्हती; तर घोड्याची शिग्राम असे, आणि मध्यें स्टॅंडरटनला एक रात्र राहावें लागे. माझ्यापाशीं शिग्रामचें तिकीट होतें. मी एक दिवस उशिरा पोंचलों म्हणून कांहीं तें तिकीट रद्द होत नव्हतें. शिवाय अबदुल्ला शेठनीं चार्लस्टाऊनच्या शिग्रामवाल्याला तारहि केली होती. पण त्याला कांहीं तरी सबबच काढायची होती; त्यासाठीं मीं नवखा आहें असें पाहून तो म्हणूं लागला, "तुमचें तिकीट रद्द झालें." मीं योग्य तो जबाब दिला. तिकीट रद्द झालें म्हणून मला सांगायचें खरें कारण निराळेंच होतें. सर्व उतारू शिग्रामीच्या आंतच बसत. परंतु माझी तर कूलींत गणना, आणि मी नवखा दिसत होतों. त्या अर्थीं मला गोऱ्या उतारूंपाशीं बसवावें लागलें नाहीं तर बरें, असा त्या शिग्रामवाल्याचा मतलब. शिग्रामीच्या बाहेरच्या बाजूला म्हणजे हांकणाराला लागून उजव्या आणि डाव्या बाजूला अशा दोन बैठका होत्या त्यांपैकीं एका बैठकीवर शिग्राम-कंपनीचा एक गोरा 'नायक' बसत असे. तो आंत बसला आणि मला हांकणाराशेजारीं त्यानें बसविलें. मी तेव्हांच समजलों, कीं हा केवळ अन्याय आहे, अपमान आहे. हा अपमान गिळून टाकणेंच मला योग्य वाटलें. मला जोर जुलमानें आंत बसतां येण्यासारखें नव्हतेंच. मी तक्रार करीत बसलों तर शिग्राम निघून

जायची आणि माझी मात्र आणखी एक दिवस खोटी व्हायची. दुसऱ्या दिवशीं काय होईल तें तरी कोणी सांगावें ? म्हणून मीं शहाणपणा केला, आणि बाहेर बसलों. मनांतून खूप चरफडलों.

तीन एक वाजतां शिग्राम पारडीकोपला पोंचली. आतां त्या गोऱ्या नायकाची मी बसलों होतों तेथें बसण्याची लहर लागली. त्याला विडी प्यायची होती. थोडी हवा पण खावयाची असेल म्हणून त्यानें एक मळकेसें गोणपाट पडलें होतें, तें त्या हांकणारापासून घेतलें आणि तें पाय ठेवण्याच्या फळीवर पसरून मला म्हटलें, "सामी तूं इथें बैस. मला हांकणारापाशीं बसायचें आहे." हा अपमान सहन करणें माझ्या शक्तीबाहेर होतें. म्हणून मीं भीत भीत त्याला सांगितलें, "तुम्हीं मला येथें बसवलात तो एक अपमान मीं सहन केला; माझी जागा तर आंत बसण्याची, पण तुम्ही आंत बसून मला येथें बसवलात. आतां तुम्हांला बाहेर बसण्याची इच्छा झाली आहे, आणि विडी ओढायची आहे. म्हणून तुम्ही मला आपल्या पायापाशीं बसवूं पाहतां. मी आंत जायला तयार आहें, पण तुमच्या पाया-जवळ बसायला कबूल नाहीं."

इतकें मी बोलतों त्यापूर्वींच माझ्यावर तडाक्यांचा वर्षाव झाला, आणि तो मनुष्य माझा दंड धरून मला खालीं ओढूं लागला. बैठकीपाशीं पितळेचा दांडा होता तो मीं घट्ट पकडून धरला, आणि मनगट तुटलें तरी दांडा सोडायचा नाहीं, असा निर्धार केला. माझ्यावर गुदरलेला प्रसंग ते उतारू पाहातच होते. तो मला शिव्या देत होता, ओढीत होता आणि मारीतहि होता. मी मात्र गप्प होतों. तो धटिंगण आणि मी बलहीन. उतारूंपैकीं कांहींना दया आली व ते म्हणाले, "अरे ए, त्या बिचाऱ्याला तिथें बसूं दे ना; त्याला विनाकारण मारूं नकोस. त्याचें म्हणणें रास्त आहे. तिथें नाहीं तर त्याला आंत आमच्याजवळ बसूं दे." तो उसळून म्हणाला, "तें कालत्रयीं होणार नाहीं." पण किंचित् नरम पडला खरा. मला मारायचें त्यानें बंद केलें. माझा दंड सोडला. चार-दोन शिव्या आणखी हांसडल्या; पण एक हॉटेंटाट नोकर पलीकडच्या बाजूला होता, त्याला स्वतःच्या पायांजवळ बसवला आणि आपण बाहेर बसला. उतारू आंत बसले. शिटी वाजली. शिग्राम सुरू झाली. माझी छाती धडधडत होती. मी जिवंत मुक्कामाला पोंचेन कीं नाहीं याबद्दल मला शंका होती. तो माझ्याकडे डोळे वटारून पाहातच होता. बोट दाखवून पुटपुटे, "याद राख; स्टँडरटन तर येऊं दे, मग तुला सांगतों काय तें !" मी गप्प बसलों आणि स्वतःच्या रक्षणासाठीं प्रभूचा धांवा करीत राहिलों.

रात्र पडली. स्टँडरटनला पोंचलों. कित्येक हिंदी चेहरे दिसले. कांहींसें बरें वाटलें. खालीं उतरतांच हिंदी लोकांनीं सांगितलें, "आम्ही तुम्हांला ईसा शेठच्या दुकानावर घेऊन जाण्यासाठींच उभे आहों; आम्हांला अबदुल्ला शेठची

तार आली आहे." मला फार आनंद झाला. त्यांच्याबरोबर शेठ ईसा हाजी सुमारच्या दुकानीं गेलों. शेठ व त्यांचे कारकून यांनीं मला वेढा दिला. माझ्यावर बेतलेल्या प्रसंगाची त्यांना हकीकत सांगितली. त्यांना फार वाईट वाटलें; आणि स्वतःचे कडवे अनुभव सांगून त्यांनीं मला धीर दिला. माझ्या मनांतून शिग्राम कंपनीच्या एजंटाला ही सर्व खबर द्यायची होती. मीं एजंटाला चिठी लिहिली, नायकानें धमकी दिली होती तेंहि लिहिलें. आणि सकाळीं पुढें प्रवास करायचा आहे, तेव्हां मला आंत इतर उतारूंबरोबर जागा मिळण्याची खात्री पाहिजे अशी मागणी केली. एजंटानें मला निरोप पाठविला, "स्टँडरटनहून पुढें मोठी शिग्राम असते, आणि हांकणारे वगैरे बदलतात, ज्यांच्याविरुद्ध तुमची तक्रार आहे तो मनुष्य उद्यां नसणार. तुम्हांला इतर उतारूंच्या शेजारींच जागा मिळेल." या निरोपामुळें मला कांहींसें आश्वासन मिळालें. त्या मला मारणाऱ्या इसमाविरुद्ध कांहीं करण्याचा माझा विचारच नव्हता, अर्थात् या माराचें प्रकरण येथेंच संपलें. सकाळीं मला ईसा शेठचे लोक शिग्रामावर घेऊन गेले. मला योग्य जागा मिळाली. कोणत्याहि तऱ्हेच्या त्रासाखेरीज त्या रात्रीं जोहानिसबर्गला पोंचलों.

स्टँडरटन हें लहान खेडें होतें. जोहानिसबर्ग विशाल शहर. तेथेंहि अबदुल्ला शेठनीं तार तर केलीच होती. मला महंमद कासम कमरुद्दीनच्या दुकानचा ठावठिकाणाहि दिला होता, त्यांचा मनुष्य शिग्राम उभी राहण्याच्या ठिकाणीं आला होता; परंतु मीं त्याला पाहिला नाहीं, किंवा त्यानेंहि मला ओळखलें नाहीं. मीं हॉटेलांत जाण्याचा विचार केला. दोन-चार हॉटेलांचीं नांवेंहि विचारून घेतलीं होतीं. गाडी केली. ग्रँड नॅशनल हॉटेलमध्यें घेऊन जायला त्याला सांगितलें. तेथें पोंचतांच मॅनेजरपाशीं गेलों. जागा मागितली. मॅनेजरनें क्षणभर माझ्याकडे न्याहाळून पाहिलें. गोड शब्दांत म्हणाला, "मला दिलगिरी वाटते, सर्व खोल्या भरून गेल्या आहेत." असें म्हणून मला चालता केला! तेव्हां मग मी गाडीवानाला महंमद कासम कमरुद्दीनच्या दुकानीं मला घेऊन जाण्यास सांगितलें, तेथें तर अबदुल गनी शेठ माझी वाटच पहात बसले होते. त्यांनीं माझें प्रेमपूर्वक स्वागत केलें. हॉटेलमध्यें जागा न मिळाल्याची हकीकत त्यांना सांगितली. ते खदखदां हंसले. "हॉटेलांत आम्हांला उतरूं देणार आहेत का?"

मीं विचारलें, "कां नाहीं?"

"तुम्ही थोडे दिवस इकडे राहिला म्हणजे कां तें समजेल. या देशांत आमच्यानेंच रहावतें; कारण आम्हांला पैसे कमवायचे असतात, त्यासाठीं किती तरी अपमान सहन करीत असतों, आणि हीन स्थितींत दिवस काढतों." असें म्हणून त्यांनीं ट्रान्सवालमध्यें भोगाव्या लागणाऱ्या आपत्तींचा इतिहास सांगितला.

या अबदुल गनी शेटचा परिचय आपल्याला पुढें अधिक करावा लागणार आहे. त्यांनीं सांगितलें, " हा मुलूख तुमच्यासारख्यांसाठीं नाहीं. पहा ना, तुम्हांला उद्यां प्रिटोरियाला जायचें आहे. तिथें तुम्हांला तिसऱ्या वर्गांतच जागा मिळेल. ट्रॅन्सवालमध्यें नाताळापेक्षांहि अधिक दुःख. येथें आमच्या लोकांना पहिल्या किंवा दुसऱ्या वर्गाचें तिकीटच देत नाहींत."

मीं म्हटलें, " तुम्ही त्यासाठीं पुरा प्रयत्न केला नसेल ? "

अबदुल गनी शेठ म्हणाले, " आम्हीं पत्रव्यवहार तर चालवला आहे, पण आमचे लोक विशेष करून पहिल्या-दुसऱ्या वर्गांत बसूं इच्छितात तरी कुठें ? "

मीं रेल्वेचे कायदे मागवले; पाहिलें. त्यात एक पळवाट होती. ट्रॅन्सवालचे मूळचे कायदे बारकाईनें तयार केलेले नसत. रेल्वेच्या कायद्यांचें तर विचारायलाच नको.

मीं शेटला सांगितलें, " मी फर्स्ट क्लासमधूनच जाणार. तसें नाहीं जुळलें तर प्रिटोरिया येथून साडे तीस मैलच आहे; तेथपर्यंत मी घोडागाडी करून जाईन."

अबदुल गनी शेटनीं तसें करण्यामध्यें लागणारा वेळ व द्रव्याचा खर्च माझ्या नजरेस आणून दिला. पण माझा विचार त्यांनीं कबूल केला. आणि स्टेशनमास्तरला चिठी पाठविली. चिठीमध्यें मी बॅरिस्टर आहे, नेहमीं पहिल्या वर्गांतूनच प्रवास करतों वगैरे लिहिलें होतें. प्रिटोरियाला जलदीनें पोंचण्याची जरूरी असल्याबद्दल कळविलें होतें. आणि असेंहि लिहिलें, कीं तुमच्या जबाबाची वाट पाहाण्यापुरता मला वेळच उरणार नाहीं; म्हणून चिठीचा जबाब घेण्यास मी स्वतःच स्टेशनवर येईन, त्या वेळीं मला पहिल्या वर्गाचें तिकीट मिळेल अशी आशा आहे. असें लिहिण्यांत माझा एक डाव होता. मीं असा विचार केला कीं, स्टेशनमास्तर लेखी जबाब नकारात्मकच पाठविणार. त्यांतून ' कुली बॅरिस्टरची ' झाली तरी राहाणी कशी काय असेल याची त्याला काय कल्पना येणार ? म्हणून मी बिनचूक इंग्रजी पोषाकांत त्यांच्यापुढें जाऊन उभा राहिलों, आणि त्याच्या-बरोबर बोललोंचाललों म्हणजे त्याची समजूत पडेल, आणि तो कदाचित् मला तिकीट देईल. असा विचार करून मी फ्रॉककोट, नेकटाय वगैरे चढवून स्टेशनावर गेलों. मास्तरापुढें एक गिनी ठेवली आणि पहिल्या वर्गाचें तिकीट मागितलें.

त्यानें म्हटलें, " तुम्हींच मला चिठी लिहिली आहे का ? "

मीं म्हटलें, " तोच मी. तुम्ही मला तिकीट दिल्यास मी आभारी होईन. मला आजच प्रिटोरियाला पोंचलें पाहिजे. "

स्टेशनमास्तर हंसले त्यांना दया आली. ते म्हणाले, " मी ट्रॅन्सवालर नाहीं, हॉलंडर आहें. तुमच्या भावना मी समजूं शकतों. तुमच्याबद्दल मला सहानुभूति

आहे. तुम्हांला तिकीट देण्याची माझी इच्छा आहे. पण एका शर्तीवर—रस्त्यांत गार्डानें जर तुम्हांला खालीं काढलें आणि तिसऱ्या वर्गांत बसवलें, तर तुम्हीं मला गोत्यांत आणूं नये, म्हणजे रेल्वेवर दावा करूं नये. तुमचा प्रवास निर्विघ्नपणें पार पडावा अशी माझी इच्छा आहे. आपण सद्‌गृहस्थ आहां, हें मला दिसतेंच आहे." असें म्हणून त्यानें तिकीट दिलें. मी त्याचे आभार मानले आणि त्याला निश्चिंत राहाण्याबद्दल सांगितलें. अबदुल गनी शेठ पोंचवायला आले होते. हें कौतुक पाहून त्याना आनंद झाला व आश्चर्य वाटलें; पण त्यांनीं मला सावधगिरीचा इषारा दिला. "प्रिटोरियाला सहीसलामत पोंचलेंत म्हणजे झालें. मला धास्ती वाटते, कीं गार्ड तुम्हांला सुखानें पहिल्या वर्गांत बसूं देणार नाहीं. आणि गार्डानें बसूं दिलें, तर उतारू बसूं देणार नाहींत."

मी पहिल्या वर्गाच्या डब्यांत बसलों तर खरा. गाडी चालू झाली. जर्मीस्टन स्टेशन आलें. तेथें गार्ड तिकिटें तपासायला निघाला. मला पहातांच संतापला. बोटानें अभिनय करून म्हणाला, "तिसऱ्या वर्गांत चल." मीं माझें पहिल्या वर्गाचें तिकीट दाखविलें. तो म्हणाला, "त्याचें कांहीं नाहीं; तिसऱ्या वर्गांत जा."

त्या डब्यांत एकच इंग्रज उतारू होता. त्यानें त्या गार्डाला तंबी दिली, "या गृहस्थांना निष्कारण कां बरें सतावतो आहेस? त्यांच्याजवळ पहिल्या वर्गाचें तिकीट आहे, तें दिसत नाहीं? मला तो राहिल्यापासून मुळींसुद्धां अडचण नाहीं." असें म्हणून त्यानें माझ्याकडे पाहिलें आणि म्हटलें, "तुम्ही खुशाल बसून रहा."

गार्ड पुटपुटला, "तुम्हांला कूलीबरोबरच बसायचें असलें, तर माझें काय जातें!"

रात्रीं आठ एक वाजतां ट्रेन प्रिटोरियाला पोंचली.

●●●

## १०

# प्रिटोरियांतील पहिला दिवस

प्रिटोरिया स्टेशनवर दादा अबदुल्लांच्या वकिलातर्फेचा कोणी तरी मनुष्य मला भेटेल अशी मीं अपेक्षा केली होती. कोणी हिंदी मला न्यायला येणार नाहीं हें मी समजून होतों. आणि कोणाहि हिंदी माणसाकडे राहायला जायचें नाहीं अशाबद्दल मी वचनबद्ध होतों. वकिलानें कोणालाहि स्टेशनवर पाठवलें नव्हतें. मागून मला समजलें कीं, तो रविवार असल्यामुळें थोडीबहुत अडचण सोसल्याखेरीज त्याला कोणाला पाठवितां येण्यासारखें नव्हतें. मी फिकीरींत पडलों: कोठें जावें

याचा विचार करूं लागलों. कोणतेंहि हॉटेल मला जागा देणार नाहीं अशी मला धास्ती वाटत होती. १८९३ चें प्रिटोरिया स्टेशन १९१४ च्या स्टेशनहून अगदींच भिन्न होतें. मंदमंद दिवे जळत होते. उतारू पण विशेषसे नव्हते. मीं सर्व उतारूंना जाऊं दिलें आणि विचार केला कीं, तिकीट-कलेक्टर जरा मोकळा झाला म्हणजे त्याला तिकीट देईन आणि तो मला लहानसें एकादें हॉटेल किंवा दुसरें एकादें घर दाखवील तिकडे जाईन; किंवा रात्रभर स्टेशनवर पडून राहीन. एवढें विचारायलाहि मन घेत नव्हतें; कारण अपमानाचें भय वाटतच होतें.

स्टेशन रिकामें झालें. मीं तिकीट-कलेक्टरला तिकीट दिलें आणि प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. त्यानें विनयपूर्वक जबाब दिले. पण मला दिसलें, कीं त्याची विशेष मदत होण्यासारखी नाहीं. त्याच्या शेजारीं एक अमेरिकन हबशी गृहस्थ उभा होता, त्यानें माझ्याशीं बोलायला सुरुवात केली.

"तुम्ही अगदीं नवखे दिसतां; आणि तुम्हांला कोणी मित्र नसावा. माझ्याबरोबर याल, तर मी तुम्हांला एक लहानसें हॉटेल आहे त्यांत घेऊन जाईन. त्याचा मालक अमेरिकन असून माझ्या चांगल्या परिचयाचा आहे. मला वाटतें तो तुम्हांला जागा देईल."

मला किंचित् शंका वाटतच होती, पण मीं त्या गृहस्थाचे आभार मानले आणि त्याच्याबरोबर जाण्याचें कबूल केलें. तो मला जॉन्स्टनच्या फॅमिली हॉटेलांत घेऊन गेला. मि. जॉन्स्टनला एका बाजूला नेऊन कांहीं सांगितलें. मि. जॉन्स्टननीं मला रात्रभर राहूं देण्याचें कबूल केलें; तेंहि या शर्तीवर, कीं माझें जेवण मला माझ्या खोलींत पोंचवायचें.

"मी तुम्हांला खात्री देतो, कीं मला काळ्यागोऱ्याचा बिलकुल भेदभाव नाहीं. पण माझी गिऱ्हाइकी फक्त गोऱ्या लोकांचीच आहे आणि जर मीं तुम्हांला जेवणाच्या खोलींत जेऊं दिलें, तर माझ्या आश्रयदात्यांना राग येईल, ते कदाचित् हॉटेल सोडूनहि जायचे." मि. जॉन्स्टन म्हणाले.

मीं म्हटलें, "तुम्ही मला रात्रभर राहूं देतां हाच मी तुमचा उपकार समजतों. ह्या मुलुखांतील परिस्थिति मला थोडीबहुत समजूं लागली आहे. तुमची अडचण मला समजते. तुम्ही खुशाल मला माझ्या खोलींत वाढा. उद्यां मी दुसरी कांहीं तरी व्यवस्था करूं शकेन अशी मला उमेद वाटते."

मला खोली दिली. मी आंत गेलों. एकान्तांत जेवणाची वाट पाहात विचार करीत बसलों. या हॉटेलांत फारसे उतारू राहात नव्हते. थोड्या वेळानें वेटर जेवण घेऊन येण्याऐवजीं मि. जॉन्स्टनच येतांना दिसले. ते म्हणाले, "मीं तुम्हांला खोलींत जेवण पाठवीन म्हटलें त्याची मला लाज वाटली. म्हणून मीं माझ्या गिऱ्हाइकांना तुमच्याबद्दल सांगून त्यांचें मत घेतलें. तुम्हीं जेवणाच्या खोलींत

जेवलां, तरी त्यांची कांहीं हरकत नाहीं. तरी आतां तुमची इच्छा असल्यास भोजनगृहांत चला, आणि तुमच्या मर्जीला येईल तोंपर्यंत येथें राहा."

मीं पुन्हां आभार मानले, आणि जेवणाच्या खोलींत गेलों. निश्चिन्तपणें जेवलों.

दुसऱ्या दिवशीं वकिलाकडे गेलों. त्यांचें नांव ए. डब्ल्यू बेकर. त्यांना भेटलों. अबदुल्ला शेठनीं माझ्यापाशीं त्यांचें थोडेसें वर्णन केलें होतें. त्यामुळें पहिल्या भेटींत मला कांहीं आश्चर्य वाटलें नाहीं. त्यांनीं माझी प्रेमपूर्वक भेट घेतली. आणि माझी थोडी हकीकत विचारून घेतली. मीं ती सांगितली. ते म्हणाले, "बॅरिस्टर या नात्यानें तुमचा येथें कांहींच उपयोग होण्यासारखा नाहीं. आम्हीं उत्तमांत उत्तम बॅरिस्टरांना या दाव्यासाठीं नेमले आहेत. दावा लांबलचक आणि गुंतागुंतीचा आहे, त्यामुळें तुमच्यापासून फक्त जरूर तेवढी माहिती मिळविण्याचेंच काम मला घेतां येईल. मला माझ्या अशीलाबरोबर पत्रव्यवहार करणेंहि आतां सोपें पडेल. आणि त्यांच्याकडून पाहिजे ती माहिती मी तुमच्यामार्फत मागवूं शकेन, एवढी सोय आहे खरी. तुमच्यासाठीं मीं घर अजून शोधलेलें नाहीं. तुम्हांला पाहिल्यानंतरच शोधावें असा विचार केला होता. येथें रंगभेद फार आहे, त्यामुळें घर शोधणें सोपें नाहीं. पण एक बाई माझ्या माहितीची आहे. गरीब आहे. रोटीवाल्याची बायको आहे. ती तुमची उतरण्याची सोय करील असें वाटतें. तिलाहि थोडी मदत होईल. चला, आपण तिच्याकडेच जाऊं या."

असें म्हणून मला तिकडे घेऊन गेले. बाईबरोबर मि. बेकरनीं एका बाजूला जाऊन थोड्या गोष्टी केल्या, आणि तिनें मला ठेवून घेण्याचें मान्य केलें. आठवड्याचे ३५ शिलिंग ठरवून मला तेथें ठेवलें.

मि. बेकर वकील होते तसेच धर्मनिष्ठ पाद्री होते. अजून ते हयात आहेत; आणि आतां फक्त पाद्र्याचेंच काम करतात. वकिलीचा धंदा त्यांनीं सोडून दिला आहे. खाऊनपिऊन सुखी आहेत. त्यांनीं अजून माझ्याशीं पत्रव्यवहार कायम ठेवला आहे. पत्रांतील विषय ठराविक एकच. निरनिराळ्या रीतीनें ख्रिस्ती धर्माच्या श्रेष्ठतेबद्दल आपल्या पत्रांत माझ्याबरोबर चर्चा करतात; आणि येशूला ईश्वराचा एकुलता एक पुत्र आणि जगताचा उद्धारकर्ता म्हणून मानल्याखेरीज परम शांति मिळणें अशक्य आहे, या गोष्टीचें प्रतिपादन करीत असतात.

आमच्या पहिल्याच भेटींत मि. बेकरनीं माझी धर्मासंबंधींची मनोदशा विचारून घेतली. मीं त्यांना सांगितलें, "मीं जन्मानें हिंदु आहें. त्या धर्माचेंहि मला फारसें ज्ञान नाहीं. इतर धर्मांचें त्याहून कमी. मी कोणत्या स्थितींत आहें, माझीं धर्ममतें काय, तीं काय असलीं पाहिजेत, हें कांहीं मला कळत नाहीं. माझ्या

स्वतःच्या धर्माचें सखोल अध्ययन करण्याची इच्छा आहे. इतर धर्मांचाहि यथाशक्ति अभ्यास करण्याचा इरादा आहे. ''

हें सर्व ऐकून मि. बेकरना बरें वाटलें आणि ते म्हणाले, '' मी स्वतः साउथ आफ्रिका जनरल मिशनचा एक डिरेक्टर आहें. स्वतःच्या खर्चानें मी एक देऊळ बांधलें आहे. त्यांत मी वेळोवेळीं धर्मप्रवचनें करतों. मी रंगभेद मानीत नाहीं. माझ्याबरोबर काम करणारे कित्येक जोडीदारहि आहेत. आम्ही रोज एक वाजतां थोडीं मिनिटें एकत्र जमतों आणि आत्म्याची शांति व प्रकाश ( ज्ञानाचा उदय ) यासाठीं प्रार्थना करतों. त्यांत तुम्ही आलेत, तर आम्हांला आनंद होईल. तेथें माझ्या जोडीदारांची ओळख करून देईन. त्या सर्वांना तुम्हांला पाहून आनंद होईल; आणि तुम्हांलाहि त्यांचा सहवास आवडेल, अशी माझी खात्री आहे. मी कांहीं धर्मपुस्तकेंहि तुम्हांला वाचायला देईन. पण खरें पुस्तक बायबल हेंच. तें तुम्हीं वाचावें अशी माझी खास शिफारस आहे. ''

मीं मि. बेकरचे आभार मानले, आणि एक वाजतां त्यांच्या मंडळांत प्रार्थनेसाठीं शक्य तोंपर्यंत येत जाण्याचें कबूल केलें.

'' तर मग उद्यां एक वाजतां येथेंच या. मग आपण बरोबरच प्रार्थनामंदिरांत जाऊं.''

आम्हीं एकमेकांची रजा घेतली. विशेष विचार करायला मला अजून फुरसतच नव्हती. मि. जॉन्स्टनकडे गेलों. बिल चुकवलें. नव्या घरीं गेलों; तिथें जेवलों. घरवाली बाई भली होती. तिनें माझ्यासाठीं अन्नाहार तयार केला होता. या कुटुंबांत लगेच मिसळून जायला मला वेळ लागला नाहीं. जेवणखाण उरकल्यानंतर दादा अबदुल्लांनीं आपल्या एका मित्राला मला पत्र दिलें होतें. त्यांना भेटायला गेलों. त्यांची ओळख करून घेतली. त्यांच्याकडून हिंदी लोकांच्या क्लेशांची विशेष माहिती समजली. त्यांनीं स्वतःकडे राहाण्याबद्दल मला आग्रह केला. मीं आभार मानले आणि माझी व्यवस्था झाली होती त्याबद्दल माहिती सांगितली. कांहीं लागलें संवरलें, तर मागून घ्यायला त्यांनीं आग्रहपूर्वक सांगितलें.

संध्याकाळ झाली. संध्याकाळचें जेवण आटपून आपल्या खोलींत जाऊन विचारमग्न झालों. मला स्वतःला सध्यां तरी कांहीं काम असल्याचें दिसलें नाहीं. अबदुल्ला शेठला पत्र लिहिलें. मि. बेकरच्या मैत्रीचा काय अर्थ करायचा ? त्यांच्या धर्मबंधूंपासून मीं काय मिळविणार ? मी खिस्ती धर्माच्या अभ्यासांत कोठपर्यंत पडावें ? हिंदुधर्माचें साहित्य कोठून मिळवावें ? हिंदुधर्माचें स्वरूप समजल्याखेरीज खिस्ती धर्माचें स्वरूप तरी मी कसें समजूं शकणार ? एकच निर्णय करूं शकलों. मला मिळेल तो अभ्यास निःपक्षपातपणें करावा आणि मि. बेकरच्या मंडळीला ईश्वर त्या त्या वेळीं बुद्धि देईल त्याप्रमाणें जबाब द्यावे. माझ्या धर्माची मला पुरी माहिती

झाली नाहीं, तोंपर्यंत इतर धर्म स्वीकारण्याचा मीं विचार करूं नये असा विचार करीत असतां मी निद्रावश झालों.

●●●

११

# ख्रिस्ती संबंध

दुसऱ्या दिवशीं एक वाजतां मी वेकरच्या प्रार्थनासमाजामध्यें गेलों. तेथें मिस् हॅरिस्, मिस् गेब्र, मि. कोट्स् इत्यादींची ओळख झाली. सर्वांनीं गुडघे टेकून प्रार्थना केली. मींहि त्यांचें अनुकरण केलें. प्रार्थनेमध्यें ज्याच्या जें इच्छेला येईल तें तो ईश्वरापाशीं मागे. दिवस शांतिपूर्वक जावो, ईश्वर आमच्या हृदयांचीं द्वारें खोलो, वगैरे हें असायचेंच. माझ्यासाठींहि प्रार्थना झाली. "आमच्यामध्यें जो नवीन बंधु आला आहे, त्याला तूं मार्ग दाखव. जी शांति तूं आम्हांला दिली आहेस ती त्यालाहि दे. ज्या येशूनें आम्हांला मुक्त केलें आहे, तो त्यालाहि करो. हें सर्व आम्ही येशूच्या नांवानें मागत आहों." या प्रार्थनेंत भजन, कीर्तन वगैरे कांहीं नाहीं. फक्त कांहीं तरी विशिष्ट मागणी ईश्वराजवळ करायची, आणि आपापल्या स्थळीं जायचें. सर्वांचा हा दुपारच्या जेवणाचा वेळ असे; अर्थात् प्रार्थना करून दर एकजण जेवायला जाई. प्रार्थनेला पाच मिनिटांहून अधिक वेळ लागत नसे.

मिस् हॅरिस व मिस् गेब्र या दोघी प्रौढ कुमारिका होत्या. मि. कोट्स् क्वेकर पंथाचे होते. या दोन बाया एकत्र राहात. त्यानीं मला दर रविवारीं आपल्याकडे चार वाजतां चहा घेण्यास बोलावलें. मि. कोट्स् भेटले म्हणजे दर रविवारीं मीं त्यांना आठवड्याची धार्मिक रोजनिशी सांगायची असे. कोणकोणतीं पुस्तकें वाचलीं, माझ्या मनावर त्यांचा काय परिणाम झाला, याची चर्चा करीत असूं. त्या बाया स्वतःचे आनंददायक अनुभव वर्णीत आणि स्वतःला वाटणाऱ्या परम शांतीविषयीं सांगत.

मि. कोट्स् हे एक निष्कपट मनाचे धर्मनिष्ठ तरुण क्वेकर होते. त्यांच्याशीं माझा गाढ संबंध आला. आम्ही पुष्कळदां फिरायलाहि जात असूं. ते मला इतर ख्रिस्ती मंडळींकडे घेऊन जात.

कोट्स्नीं मला पुस्तकांनीं लादून काढला. जसजसा आमचा परिचय वाढत चालला, तसतसे ते त्यांना योग्य वाटत तीं तीं पुस्तकें मला वाचायला देत. मींहि

केवळ श्रद्धेनें तीं पुस्तकें वाचण्याचें कबूल केलें. त्या पुस्तकांसंबंधीं आम्हीं चर्चाहि करीत असूं.

अशा तऱ्हेचीं पुस्तकें सन १८९३ मध्यें मीं पुष्कळ वाचलीं. त्यांचीं सर्वांचीं नांवें मला स्मरतहि नाहींत. पण त्यांत सिटीटेंपलच्या डॉ. पार्करची टीका, पियर्सनचें ' मेनी इनफॅलिबल् प्रूफ्स्, ' बटलरची ' ॲनॅलॉजी ' वगैरे होतीं. त्यांतलें कांहीं समजत नसे; कांहीं आवडे, कांहींचा कटाळा येई. मी हें सर्व कोट्सना सांगत असें. ' मेनी इनफॅलिबल् प्रूफ्स् ' म्हणजे अनेक सबळ पुरावे;—अर्थात् बायबलामध्यें ग्रंथकर्त्यांच्या समजुतीनें जो धर्म प्रतिपादलेला आहे, त्याचें समर्थन करणारे पुरावे. या पुस्तकाचा माझ्यावर कांहीं एक परिणाम झाला नाहीं. पार्करची टीका नीतिवर्धक म्हणतां येईल; परंतु ज्याला ख्रिस्ती धर्मांतील प्रचलित समजुतीं-बद्दल शंका असेल अशाला मदत करूं शकण्यासारखी नव्हती. बटलरची ॲनॅलॉजी हें फार गहन व कठिण पुस्तक वाटलें. तें पांच-सातदां वाचलें पाहिजे. तें नास्तिकाचा आस्तिक बनविण्यासाठीं लिहिलेलें असावें असें दिसलें. त्यातील ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं केलेल्या युक्तिवादांचा मला उपयोग नव्हता. कारण हा काळ माझा नास्तिकपणाचा नव्हता. पण येशू हाच काय तो अवतार आहे, आणि तो ईश्वर आणि मनुष्य यांची जोड करून देणारा आहे, अशाबद्दल जो युक्तिवाद होता त्याचा माझ्यावर कांहींहि परिणाम झाला नाहीं.

पण कोट्स् कांहीं असे हातपाय गाळणारे नव्हते. त्यांचें प्रेम अमर्याद होतें. त्यांनीं माझ्या गळ्यांत वैष्णवाची कंठी पाहिली. त्यांना हें खूळ वाटलें, आणि ती पाहून वाईट वाटलें. " असलें खूळ तुमच्यासारख्याला शोभत नाहीं ! आणा इकडे, तोडून टाकतों. "

" ही कंठी तुटतां कामा नये; मातुःश्रीची भेट आहे. "

" पण तुमचा तिच्यावर विश्वास आहे ? "

" तिचा गूढार्थ मला समजत नाहीं. ती वापरली नाहीं तर माझें कांहीं अनिष्ट होईल असें मला वाटत नाहीं. परंतु जी माळ मातुःश्रीनें प्रेमपूर्वक माझ्या गळ्यांत बांधली, जिच्यापासून माझें कल्याण होईल अशी तिची समजूत तिचा मी विना-कारण त्याग करणार नाहीं. कालांतरानें ती जुनी होऊन तुटून गेली, तर दुसरी आणून बांधण्याचा लोभ मला वाटणार नाहीं. पण ही कंठी तुटायची नाहीं."

कोट्सना माझ्या या युक्तिवादाची किंमत वाटली नाहीं. कारण त्यांना माझ्या धर्माबद्दल अनास्था वाटत होती. त्यांची तर मला अज्ञानकूपांतून वर काढण्याची उमेद होती. अन्य धर्मांत थोडेंसें सत्य असलें तर असेल, पण सत्यरूप ख्रिस्ती धर्म स्वीकारल्याशिवाय मला मोक्ष मिळायचाच नाहीं, येशूच्या मध्यथी-शिवाय पापप्रक्षालन व्हायचेंच नाहीं, तिच्याविना सर्व पुण्यकर्में निरर्थक आहेत,

हें त्यांच्या मनांतून मला दाखवून द्यायचें होतें. कोट्स्नीं ज्याप्रमाणें पुस्तकांचा परिचय मला करून दिला, त्याचप्रमाणें ज्यांना ते धर्मनिष्ठ खिस्ती समजत असत अशा लोकांच्याहि त्यांनीं मला ओळखी करून दिल्या.

या ओळखींमध्यें एक ' प्लीमथ ब्रधरनचें ' कुटुंब होतें. ' प्लीमथ ब्रधरन् ' नांवाचा एक खिस्ती संप्रदाय आहे. कोट्स्नीं परिचय करून दिलेली पुष्कळ मंडळी चांगली वाटली. ते लोक ईश्वराला भिऊन वागणारे दिसले. या कुटुंबाकडून मात्र माझ्याशीं पुढीलप्रमाणें युक्तिवाद करण्यांत आला : " आमच्या धर्माची खुबीच तुम्हांला समजलेली नाहीं. तुमच्या बोलण्यावरून मला दिसतें, कीं तुम्हांला प्रतिक्षणीं आपल्या चुकांचा विचार करावा लागतो, प्रतिक्षणीं त्या सुधारून घ्याव्या लागतात, न सुधारल्या तर तुम्हांला पश्चात्ताप केला पाहिजे. प्रायश्चित्त केलें पाहिजे. या क्रियाकाण्डांतून तुम्ही सुटणार कधीं ? तुम्हांला शांति मिळणें अशक्य. आपण पापी आहों हें तर तुम्ही कबूलच करतां. आतां आमच्या धर्ममताची परिपूर्णता पहा. मानवी प्रयत्न फुकट आहे. तरी पण मुक्तिहि पाहिजेच. पापाचा बोजा कसा उठावा ? आपण तो येशूवर सोंपवावा. तो तर ईश्वराचा एकुलता एक निष्पाप पुत्र आहे. त्यानें वरदान दिलेलें आहे कीं, जे त्याच्यावर विश्वास ठेवतात, त्यांची पापें तो धुऊन टाकतो. ईश्वराचें हें अगाध औदार्य आहे. येशूच्या ह्या मुक्तीच्या योजनेचा आम्हीं स्वीकार केलेला आहे, त्यामुळें आमचीं पापें आम्हांला चिकटत नाहींत. पाप हें घडणारच. या जगांत पापाशिवाय पाऊल तरी टाकतां येईल का ? म्हणूनच येशूनें सर्व जगाच्या पापाचें एकाच वेळीं प्रायश्चित्त करून टाकलें. ज्यांना त्याच्या महाबलिदानाचा स्वीकार करायचा असेल, त्यांनीं तसें करून शांति मिळविणें त्यांच्या हातचें आहे. तुमची अस्वस्थता कोणीकडे आणि आमची शांति कोणीकडे ? "

मला हा युक्तिवाद मुळींच पटला नाहीं. मीं नम्रतापूर्वक उत्तर दिलें, " सर्वमान्य खिस्ती धर्म हाच असेल तर तो मला पटण्यासारखा नाहीं. मला पापाच्या परिणामांतून मोकळीक नको आहे; मला मुक्ति पाहिजे, ती पापवृत्तीपासून पापी कर्मोपासून. ती मिळाली नाहीं तोंपर्यंत अस्वस्थताच मला प्रिय आहे."

प्लीमथ ब्रधरन यावर म्हणाले, " मी तुम्हांला निक्षून सांगतों, कीं हा तुमचा प्रयत्न फुकट आहे. माझ्या म्हणण्याचा पुन्हां विचार करून पहा."

आणि या इसमानें बोलून दाखविलें तसें प्रत्यक्ष आचरूनहि दाखविलें : इरादापूर्वक अनीति आचरल्याचा प्रत्यय आणून दिला.

पण सर्वच खिश्चनांची असली समजूत नसते हें या परिचयापूर्वीच मला माहीत होतें. खुद्द कोट्स् पापभीरु होते, त्यांचें हृदय निर्मळ होतें. हृदयशुद्धीची शक्यता त्यांना मान्य होती. वर निर्देश केलेल्या भगिनीहि तशाच होत्या.

माझ्या हातांत आलेल्या पुस्तकांपैकीं पुष्कळ पुस्तकें भक्तिपूर्ण होतीं. त्यामुळें या एका परिचयावरून कोट्सना वाटूं लागलेल्या भीतीचें मीं निराकरण केलें, आणि त्यांना आश्वासन दिलें, कीं एकट्या प्लीमथ ब्रधरनच्या अनुचित समजुतीवरून मी सगळ्या खिस्ती धर्माविरुद्ध ग्रह करून घेणार नाहीं. मला अडचण वाटे, ती बायबल-विषयीं व त्याच्या रूढ अर्थाविषयीं.

●●●

१२

# हिंदी लोकांची ओळखदेख

खिस्ती ओळखीविषयीं अधिक लिहिण्यापूर्वी त्याच वेळच्या इतर अनुभवांचा निर्देश करणें आवश्यक आहे.

नाताळमध्यें दादा अबदुल्लांना जें स्थान होतें तेंच प्रिटोरियामध्यें शेठ तैय्यब हाजी खान महंमद यांना होतें. त्यांच्याशिवाय एकहि सार्वजनिक काम चालत नसे. त्यांची ओळख मीं पहिल्याच आठवड्यांत करून घेतली. प्रिटोरियां-तील हरएक हिंदी माणसाची माहिती करून घेण्याचा माझा विचार असल्याचें मीं त्याना सांगितलें. हिंदी लोकांच्या स्थितीचा अभ्यास करण्याची माझी इच्छा आहे, व त्या कामीं आपली मदत मिळावी अशी अपेक्षा आहे असेंहि सांगितलें. त्यांनीं आनंदानें मदत करण्याचें कबूल केलें.

माझें पहिलें काम म्हणजे, सर्व हिंदी लोकांची एक सभा भरवून त्यांच्यापुढें त्यांच्या स्थितीचें चित्र मांडणें हें होतें. शेठ हाजी महंमद हाजी जूसब यांच्यावर मला शिफारसपत्र मिळालें होतें, त्यांच्या घरीं ही सभा भरली. तिला मुख्यत्वेंकरून मेमण व्यापारी हजर होते; थोडे हिंदु पण होते. प्रिटोरियामध्यें हिंदूंची वस्ती फार थोडी होती.

हे माझें माझ्या आयुष्यांतील पहिलेंच भाषण म्हणायचें. मीं तयारी भरपूर केली होती. मला सत्यासंबंधीं बोलायचें होतें. व्यापारांत सत्य चालायचें नाहीं, असें मी व्यापाऱ्यांच्या तोंडून ऐकत आलों होतों. ही गोष्ट मला त्या वेळींहि खरी वाटत नव्हती; आजहि वाटत नाहीं. व्यापार आणि सत्य यांचें परस्पर पटायचें नाहीं असें प्रतिपादणारे मित्र आजलाहि आहेतच. ते व्यापाराला व्यवहार म्हणतात आणि सत्याला धर्म; आणि पुढें युक्तिवाद असा लढवतात, कीं व्यवहार तो व्यवहार आणि धर्म तो धर्म. व्यवहारांत शुद्ध सत्य चालायचेंच नाहीं, त्यांत यथा-शक्तिच सत्य बोलतां चालतां येणार अशी त्यांची समजूत. या भूमिकेचा मीं

आपल्या भाषणांत चांगला समाचार घेतला आणि व्यापाऱ्यांना त्यांच्या दुहेरी कर्तव्याची जाणीव करून दिली. परदेशांत आल्यामुळें त्यांची जबाबदारी स्वदेशामध्यें असती त्यापेक्षां वाढली आहे. कारण मूटभर हिंदी लोकांच्या चालचलणुकीवरून हिंदुस्थानच्या करोडो लोकांचें माप ठरत होतें.

इंग्रजांच्या राहाणीच्या मानानें आमच्या राहाणीमध्यें असलेला गलिच्छपणा माझ्या दृष्टोत्पत्तीस आला होता. त्याचाहि श्रोत्यांपुढें उल्लेख केला.

हिंदु, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती वगैरे अथवा मद्रासी, पंजाबी, सिंधी, कच्छी, सुरती वगैरे भेद विसरले पाहिजेत या गोष्टीवर विशेष जोर दिला.

आणि शेवटीं एक मंडळ स्थापून त्याच्यामार्फत अंमलदारांच्या भेटी घेणें, अर्ज करणें इत्यादि मार्गांनीं हिंदी लोकांना सोसाव्या लागणाऱ्या क्लेशांवर इलाज करण्यांत यावे असें सुचविलें; व त्या कामीं मला मिळेल तेवढा वेळ निरपेक्षपणें देण्याची माझी तयारी आहे असेंहि सांगितलें.

सभेवर भाषणाचा ठीक परिणाम झालेला दिसला.

चर्चा झाली. कित्येकांनीं माझ्याजवळ हकीकती सांगूं म्हणून सांगितलें. मला हिंमत चढली. मला दिसलें कीं, त्या सभेंत इंग्रजी जाणणारे फारच थोडे होते. असल्या परकी मुलखांत इंग्रजीचें ज्ञान असलेलें चांगलें असें मला वाटलें. म्हणून ज्याला फुरसद असेल त्यानें इंग्रजी शिकावें, अशी मीं शिफारस केली. मोठी उमर झाल्यानंतरहि अभ्यास करता येतो असें सांगून तशा तऱ्हेनें अभ्यास केलेल्या लोकांचीं उदाहरणें दिलीं. वर्ग निघाल्यास त्याला, किंवा सुटेसुटेच कोणी इच्छीत असतील तरी त्यांना, शिकविण्याचें मीं स्वतःचे शिरावर घेतलें. वर्ग तर नाहीं निघाला, पण तीनजण आपापल्या सवडीच्या वेळीं, आणि त्यांच्या घरीं शिकवायला गेलों, तर शिकायला तयार झाले. त्यांपैकीं दोन मुसलमान होते; एक हजाम व दुसरा कारकून होता. एक हिंदु लहानसा दुकानदार होता. सर्वांच्या सोयी मीं संभाळल्या. माझ्या शिकविण्याच्या शक्तीविषयीं मला यत्किंचित्हि अविश्वास नव्हता. माझे शिष्य दमले म्हटलें तरी चालेल, पण मी दमलों नाहीं. कधीं कधीं त्यांच्याकडे जावें, तर त्यांना फुरसद नसायची. पण मीं धीर सोडला नाहीं. त्यांपैकीं कोणाला इंग्रजीचा संगीन अभ्यास करायचाच नव्हता. पण दोघांनीं आठ महिन्यांत चांगली प्रगति केली म्हणायला हरकत नाहीं. दोघांनाहि जमाखर्च लिहिण्याचें आणि सामान्य पत्रें लिहिण्याचें ज्ञान मिळालें. हजामाला आपल्या गिऱ्हाइकाबरोबर बोलण्यापुरतेंच शिकायचें होतें. त्या दोघांजणांनीं आपल्या शिक्षणाच्या योगानें चांगले पैसे कमविण्याची शक्तिहि मिळविली.

सभेच्या परिणामावरून माझें समाधान झालें. अशा तऱ्हेची सभा दर महिन्याला किंवा दर आठवड्याला भरण्याचें ठरलें. कमजास्त नियमितपणें ही

सभा भरत असे आणि विचारविनिमय होत असे. त्यामुळें प्रिटोरियांत एकादाच कोणी हिंदी राहून गेला असला तर न कळे, कीं ज्याची माझी ओळख नाहीं, किंवा ज्याची मला माहिती नाहीं. हिंदी लोकांच्या स्थितीचें अशा तऱ्हेनें ज्ञान झाल्यावरून मला प्रिटोरियामध्यें राहाणाऱ्या ब्रिटिश एजंटाची ओळख करून घेण्याची इच्छा झाली. मी मि. जेकोब्स् डि-वेटला भेटलों. हिंदी लोकांबद्दल त्यांना कळकळ वाटत होती. त्यांचें वजन फारसें नव्हतें, परंतु होईल ती मदत करण्याचें व वाटेल तेव्हां भेटण्याचें त्यांनीं कबूल केलें. रेल्वेच्या अधिकाऱ्यांबरोबर पत्र-व्यवहार चालविला, आणि त्यांच्या कायद्याप्रमाणेंच हिंदी लोकांना मज्जाव होतां कामा नये असें सुचविलें. त्यांतून एवढें निष्पन्न झालें कीं, चांगला पोषाख केला असेल अशा हिंदी लोकांना वरच्या वर्गाचीं तिकिटें मिळतील असें पत्र आलें. एवढ्यानें पुरी सोय झालीच नाहीं; कारण चांगला पोषाख कोणाचा आहे हें ठरविणारा स्टेशनमास्तरच !

ब्रिटिश एजंटानें मला आपल्याशीं झालेल्या पत्रव्यवहारासंबंधीं कांहीं कागदपत्र वाचायला दिले; तैय्यब शेठजींनींहि दिले होते. त्यावरून ऑरेंज फ्री स्टेटमधून हिंदी लोकांचे पाय किती निर्दयपणें काढून लावण्यांत आले तें मला दिसून आलें. थोडक्यांत म्हणजे, ट्रॅन्सवाल आणि फ्री स्टेटमधील हिंदी लोकांच्या आर्थिक, सामाजिक आणि राजकीय परिस्थितीचा सखोल अभ्यास मी प्रिटोरिया-मध्यें करूं शकलों. या अभ्यासाचा पुढें मला भरपूर उपयोग व्हायचा आहे, याची मला त्या वेळीं कल्पनाहि नव्हती. मला एका वर्षाअखेर, किंवा दावा आधीं आटपला तर त्यापूर्वींहि, स्वदेशीं निघून जायचें होतें.

पण ईश्वरी संकेत वेगळाच होता.

• • •

१३

## कूलीपणाचा अनुभव

ट्रॅन्सवाल आणि ऑरेंज फ्री स्टेट यांमधील हिंदी लोकांच्या परिस्थितीचें सविस्तर वर्णन करण्याचें हें स्थळ नव्हे. तिची पूर्ण कल्पना मिळवूं इच्छिणाऱ्यानें ‘ दक्षिण आफ्रिकेच्या सत्याग्रहाचा इतिहास ’ वाचला पाहिजे. पण तिची रूपरेषा देणें आवश्यक आहे.

ऑरेंज फ्री स्टेटमध्यें एक कायदा करून १८८८ मध्यें, किंवा त्यापूर्वींच, हिंदी लोकांचे सर्व हक्क हिरावून घेण्यांत आले. तेथें फक्त हॉटेलांत वेटर म्हणून

किंवा अशाच तऱ्हेची मजूरी करून राहाण्यापुरती हिंदी लोकांना सूट मिळाली. हिंदी व्यापारी होते त्यांना नांवाची भरपाई देऊन काढून लावण्यांत आलें. हिंदी व्यापाऱ्यांनीं अर्ज वगैरे केले; पण त्यांचा टिमकीचा आवाज कोणाला ऐकूं येणार?

ट्रॅन्सवालमध्यें १८८५ सालीं कडक कायदा झाला. १८८६ सालीं त्यांत कांहीं सुधारणा झाली. त्या अन्वयें प्रत्येक हिंदी माणसानें प्रवेश फी म्हणून तीन पौंड द्यावे असें ठरलें. त्यांच्यासाठीं वाडे नेमलेले होते, त्यांतच फक्त त्यांना जमिनीची मालकी भोगतां येई. तिलासुद्धां मालकी म्हणतां यायचें नाहीं. त्यांच्या मताधिकाराचा तर प्रश्नच नाहीं. हें झालें खास एशियावासियांसाठीं केलेले कायदे. शिवाय श्यामवर्णी लोकांना लागू केलेले जे कायदे तेहि एशियावासियांना लागू होतेच. त्या कायद्यांअन्वयें हिंदी लोकांना पायवाटेवरून ( फूटपाथवरून ) चालण्याचा हक्क नव्हता, रात्रीं नऊ वाजल्यानंतर परवान्याखेरीज बाहेर पडतां येत नव्हतें. या शेवटल्या कायद्याचा अंमल हिंदी लोकांविरुद्ध कमीजास्त प्रमाणांत होत असे. ज्यांची अरबांत गणना होत असे, त्यांना मेहेरबानीदाखल या निर्बंधांतून मोकळें केलें होतें. म्हणजे अशा तऱ्हेची सूट पोलिसांच्या मर्जीवर राहात असे.

या दोन्ही नियमांचा परिणाम मला स्वतःच्या बाबतींतहि अनुभवावा लागला. मि. कोट्स्‌बरोबर मी पुष्कळ वेळां रात्रींचा फिरायला जात असें. घरी यायला दहाहि वाजत. मग मला पोलिसानें पकडलें तर? ही धास्ती मला वाटे त्याहूनहि कोट्स्‌ना अधिक वाटे. कारण कीं, स्वतःच्या हबशी नोकरांना ते स्वतःच परवाना देत, पण मला कसा परवाना देणार? मालकाला फक्त स्वतःच्या नोकरांना परवाना देण्याचा अधिकार असे. मी घ्यायचा म्हटलें आणि कोट्स्‌च्या मनांतून द्यायचा असला, तरी देतां येण्याजोगा नव्हता कारण, कीं ती लबाडी झाली असती.

म्हणून कोट्स्‌ कीं त्यांचे कोणी मित्र मला येथील सरकारी वकील डॉ. क्राउझे यांचेकडे घेऊन गेले. आम्ही दोघेहि एकाच ' इन 'चे बॅरिस्टर निघालों. रात्रीं नऊ वाजल्यानंतर बाहेर पडण्यासाठीं मला परवाना घेतला पाहिजे, ही गोष्ट त्यांना असह्य वाटली. त्यांनीं माझ्याबद्दल सहानुभूति दर्शविली. मला परवाना देण्याऐवजीं आपल्यातर्फे एक पत्र दिलें त्याचा आशय असा होता कीं, मीं वाटेल तेव्हां वाटेल तेथें खुशाल जावें, त्यांत पोलिसानें मला अडथळा करूं नये. हा कागद सर्वकाळ आपल्याजवळ ठेवून मी फिरत असें. त्याचा कधीं उपयोग करावा लागला नाहीं. पण हा योगायोगच म्हटला पाहिजे.

डॉ. क्राउझेनीं मला आपल्या घरीं बोलावलें. आमच्यामध्यें मैत्री जमली म्हणायला हरकत नाहीं. मधूनमधून मी त्यांचेकडे जाऊं लागलों. त्यांच्यामार्फत त्यांचेहूनहि अधिक विख्यात अशा त्यांच्या बंधूंची ओळख झाली. जोहानिसबर्गमध्यें

पब्लिक् प्रॉसिक्यूटर म्हणून त्यांची नेमणूक झाली होती. बोअर लढाईच्या वेळीं त्यांचेवर एका इंग्रज अधिकाऱ्याचा खून करण्याचा कट केल्याच्या आरोपावरून खटला झाला आणि सात वर्षे तुरुंगवासाची शिक्षा झाली होती. त्यांची सनदहि बेंचरांनीं परत घेतली होती. लढाई आटोपल्यानंतर तेच डॉ. क्राउझे तुरुंगांतून सुटले, सन्मानपूर्वक ट्रॅन्सवालच्या कोर्टांत पुन्हां दाखल झाले, आणि स्वतःचा धंदा पुन्हां करूं लागले. या ओळखीचा मला पुढें सार्वजनिक कामीं उपयोग झाला, आणि यांच्याचमुळें माझें पुष्कळसें सार्वजनिक काम सरळ झालें.

पायवाटेवरून चालण्याच्या बाबीचा मात्र माझ्या बाबतींत जास्त गंभीर परिणाम घडून आला. मी नेहमीं प्रेसिडेंट स्ट्रीटमधून मोकळ्या मैदानांत फिरायला जात असें. या पेटेमध्यें प्रेसिडेंट क्रूगरचें घर होतें. या घराला डामडौल मुळींच नव्हता, त्याच्या सभोंवार कंपाऊंडहि नव्हतें. शेजारचीं इतर घरें आणि हें यांच्यामध्यें कांहीं फरक दिसत नसे. प्रिटोरियामध्यें पुष्कळ श्रीमान् लोकांचीं घरें या घरांहून खूप मोठीं व शोभिवंत आणि कंपाउंड असलेलीं अशीं होतीं. प्रेसिडेंटचा साधेपणा प्रख्यात होता. हें घर कोणा अंमलदाराचें आहे हें त्याच्या समोर एक शिपाई फिरत असे तेवढ्यावरूनच लक्षांत येई. मी नेहमीं या शिपायाच्या अगदीं जवळून जात असें, पण शिपाई मला कांहीं करीना. शिपाई वरच्यावर बदले. एकदां एका शिपायानें सूचना दिल्याशिवाय, वाटेवरून उतरून जाण्यास न सांगतां, मला धक्का दिला, लाथ मारली आणि खालीं काढलें. मी प्रथम थक्कच झालों. त्याला जाब विचारणार त्यापूर्वींच कोट्स् घोड्यावर बसून जवळून जात होते, त्यांनीं मला हांक मारून म्हटलें,

"गांधी, मीं सर्व पाहिलें आहे, तुला खटला करायचा असेल तर मी साक्ष देईन. तुझ्यावर अशा तऱ्हेनें हल्ला व्हावा, याबद्दल मला वाईट वाटतें."

"त्यांत वाईट वाटून घेण्याचें कारण नाहीं. शिपायाला बिचाऱ्याला काय कळे? त्याच्या समजुतीनें काळे तेवढे काळेच. हबशी लोकांना तो पायवाटेवरून असाच उतरवीत असेल, म्हणून त्यानें मलाहि धक्का दिला. मीं नियमच केला आहे, कीं मला व्यक्तिशः सहन कराव्या लागणाऱ्या क्लेशांसाठीं कोर्टांत जायचें नाहीं, अर्थात् मला फिर्याद करायची नाहीं."

"हें तूं आपल्या स्वभावानुरूपच बोललास; पण तूं पुन्हां विचार करून पहा, असल्या माणसाला कांहीं धडा मिळालाच पाहिजे." असें म्हणून ते त्या शिपायाकडे वळले व त्यांनीं त्याला ठपका दिला. मला त्यांच्या बोलण्याचा सर्व अर्थ समजला नाहीं. शिपाई डच होता, त्याच्याबरोबर संभाषणहि डचमध्येंच झालें. पण शिपायानें माझी माफी मागितली. मीं ती मागण्यापूर्वींच देऊन टाकली होती.

पण मीं तेव्हांपासून तो रस्ता सोडून दिला. दुसऱ्या शिपायाला ही हकीकत कोठून समजणार ? आपण होऊन पुन्हां लाथ कां मारून घ्यावी ? म्हणून मीं फिरायला जाण्यासाठीं दुसरा रस्ता पसंत केला.

या प्रसंगामुळें हिंदी लोकांबद्दलचा माझा कळवळा अधिक तीव्र झाला. या कायद्यासंबंधीं ब्रिटिश एजंटाबरोबर चर्चा करून प्रसंग पडल्यास एक टेस्ट केस ( नमुन्यासाठीं दावा ) करण्यासंबंधीं हिंदी लोकांबरोबर चर्चा केली.

अशा तऱ्हेनें मीं हिंदी लोकांच्या हालअपेष्टाचा वाचून, ऐकून आणि प्रत्यक्ष अनुभवून, अभ्यास केला. ठरवलें कीं, स्वाभिमान टिकवूं इच्छिणाऱ्या हिंदी माणसासाठीं दक्षिण आफ्रिका हा योग्य मुलूख नव्हे, ही स्थिति कशी बदलतां येईल, याच्या विचारांत माझें मन अधिकाधिक गुंतूं लागलें. पण अद्याप माझें मुख्य कर्तव्य दादा अब्दुल्लांचा दावा सांभाळणें हेंच होतें.

● ● ●

## १४

# दाव्याची तयारी

प्रिटोरियामध्यें मला जें एक वर्ष मिळालें, तें माझ्या आयुष्यांत अमूल्य होतें. सार्वजनिक काम करण्याच्या माझ्या शक्तीचा कांहींसा अंदाज मला येथें मिळाला. काम शिकायलाहि मिळालें; धार्मिक वृत्ति आपोआपच तीव्र होऊं लागली; आणि खरी वकिली पण येथेंच शिकलों असें म्हणतां येईल. नवा बॅरिस्टर जुन्या बॅरिस्टरच्या ऑफिसांत राहून जें शिकतो तें मला येथें शिकायला मिळालें-वकील या नात्यानें मी अगदींच नालायक राहाणार नाहीं, अशा तऱ्हेचा आत्मविश्वास मला येथें आला. वकील होण्याची चावीहि येथेंच माझ्या हातीं लागली.

दादा अब्दुल्लांचा दावा लहानसहान नव्हता. चाळीस हजार पौंडांचा, म्हणजे सहा लाख रुपयांचा होता. तो व्यापाराच्या बाबतींतला असल्यामुळें त्याच्यामध्यें जमाखर्चाच्या गुंतागुंती पुष्कळ होत्या. दाव्याचा आधार कांहीं अंशीं प्रॉमिसरी नोटींवर आणि कांहीं अंशीं प्रॉमिसरी नोटी लिहून देण्याच्या वचनांवर होता. प्रतिवादीचें म्हणणें होतें, कीं प्रॉमिसरी नोटी फसवेगिरीनें घेण्यांत आल्या, आणि नोटींचा पुरा ऐवज मिळाला नव्हता. यांत वस्तुस्थिति आणि कायदा यांच्या दृष्टीनें पळवाटा पुष्कळ होत्या. जमाखर्चाची गुंतागुंतहि पुष्कळ होती.

दोन्ही बाजूंनीं उत्तमांत उत्तम सॉलिसिटर व बॅरिस्टर नेमण्यांत आले होते. त्यामुळें मला त्या दोघांच्याहि कामाचा अनुभव मिळविण्याची सुंदर संधि मिळाली. वादीची बाजू सॉलिसिटरसाठीं तयार करण्याचा व तिच्या पुष्टीसाठीं हकीकत धुंडाळून काढण्याचा भार सर्वस्वीं माझ्यावर होता. त्यांतून सॉलिसिटर किती ठेवून घेतो, आणि सॉलिसिटरनें तयार केलेल्यापैकीं बॅरिस्टर केवढ्याचा उपयोग करतो तें मला पहायला मिळे. माझी खात्री झाली, कीं हा दावा तयार करण्याच्या कामीं माझ्या ग्रहणशक्तीचें आणि मुद्दे व्यवस्थित तऱ्हेनें जुळविण्याच्या शक्तीचें माप माझें मला चांगलें मिळेल.

मीं दाव्यामध्यें पूर्ण लक्ष घातलें. मी त्याच्याशीं तन्मयच होऊन गेलों. मागचे-पुढचे सर्व कागदपत्र वाचले. अशीलाचा माझ्यावर परिपूर्ण विश्वास होता, आणि त्याची बुद्धिमत्ताहि अगाध होती; त्यामुळें माझें काम पुष्कळ सोपें झालें. मीं जमाखर्चाचा बारकाईनें अभ्यास केला. पुष्कळ गुजराथी पत्रें होतीं, त्यांचीं भाषान्तरें मलाच करावीं लागत; त्यामुळें भाषान्तर करण्याची शक्ति वाढली.

मी भरपूर मेहनत घेत असें. वर लिहिल्याप्रमाणें धार्मिक चर्चा वगैरेची व सार्वजनिक कामाची आवड असली आणि तिकडे वेळ जात असला, तरी त्या गोष्टी माझ्या दृष्टीनें गौण होत्या. दाव्याच्या तयारीला मी प्रधानपद देत असें. त्यासाठीं कायद्याचें किंवा इतर कांहीं जरूर पडेल तें वाचन मी अगोदर करून घेत असें. त्यामुळें दाव्याच्या हकीकतीवर मला इतका ताबा मिळाला कीं, माझ्याइतकी माहिती कदाचित् वादी-प्रतिवादींनाहि नसेल. कारण माझ्यापाशीं दोघांचेहि कागदपत्र होते.

मला मरहूम मि. पिंकटच्या शब्दांचें स्मरण झालें. त्यांचें आणखी समर्थन मागून दक्षिण आफ्रिकेंतील सुप्रसिद्ध बॅरिस्टर मरहूम मि. लॅनर्ड यांनीं एका प्रसंगीं केलें. " वस्तुस्थिति म्हणजे तीनचतुर्थांश कायदा—" हें मि. पिंकटचें वचन होतें. एका दाव्याचे वेळीं मला माहीत होतें कीं, न्याय सर्वस्वीं अशीलाच्या बाजूला आहे, पण कायदा विरुद्ध जातांना दिसत होता. मी निराश होऊन मि. लॅनर्डची मदत घ्यायला गेलों. त्यांनाहि हकीकतीवरून दावा भक्कम असल्याचें दिसलें; ते उद्गारले, " गांधी, मी एक गोष्ट शिकलों आहें ती ही, कीं हकीकत जर आपल्या लक्षांत आली असेल, तर कायदा आपोआपच आपल्याला सांपडतो. या दाव्याची हकीकत आपण पाहूं या." असें म्हणून त्यांनीं मला पुन्हां एकदां हकीकतीचें चांगलें पचन करून मग पुन्हां आपल्याकडे येण्यास सांगितलें. मी तीच हकीकत पुन्हां तपासली, तिचें मनन केलें, तेव्हां मला तिच्यासंबंधीं निराळी दृष्टि सुचली आणि या नमुन्याचा दक्षिण आफ्रिकेंत झालेला एक जुना दावाहि सांपडला. मी हर्षभरानें मि. लॅनर्डपाशीं गेलों. ते खूष झाले आणि म्हणाले, " चल, आपण हा दावा जिंकलाच पाहिजे. न्यायासनावर कोणता जज्ज आहे तें मात्र जरा लक्षांत ठेवलें पाहिजे."

दादा अब्दुल्लांच्या दाव्याची तयारी करीत असतांना हकीकतीला इतकें महत्त्व आहे ही गोष्ट माझ्या ध्यानांत आली नव्हती. हकीकत म्हणजे खरी गोष्ट. खऱ्याला चिकटून राहिल्यास कायदे आपण होऊनच आपल्याला अनुकूल अशी जुळवाजुळव करून घेतात.

अशीलाच्या दाव्याचा पुरा अभ्यास केल्यावर माझ्या लक्षांत आलें कीं, त्यांची बाजू भक्कम आहे, कायदा त्यांच्या मदतीला आलाच पाहिजे.

पण दावा कोर्टांत लढत बसले तर दोघेहि सोयरे, एकाच शहरचे रहिवाशी धुळीला मिळणार हें उघड दिसत होतें. कोर्टांतच राहिला तर दावा मनाला येईल तितके दिवस तो लांबवितां येईल. तो लांबविण्यापासून दोघांपैकीं एकाचाहि फायदा नाहीं. म्हणून दाव्याचा निकाल लागेल तर तो दोघांनाहि पाहिजे होता.

तैय्यब शेठना मीं विनवलें. घरच्या घरीं तोडण्याची सल्ला दिली. त्यांच्या वकिलाला भेटतों म्हटलें. दोघांचाहि विश्वास असेल असे पंच त्यांनीं नेमले तर दावा चटकन आटोपेल. वकिलांचा खर्च इतका वाढत चालला होता कीं, मोठे व्यापारीहि त्याच्याखालीं चिरडून जायचे. दोघेहि इतक्या कांहीं चिंतापूर्वक दावा लढत होते, कीं त्यांना स्वस्थ मनानें दुसरें कोणतेंहि काम करतां येईना. हा सर्व वेळ परस्परांमधील वैमनस्यहि वाढत चाललें होतें. मला वकिलीबद्दल तिरस्कार वाटूं लागला. वकील या नात्यानें दोघांच्याहि वकिलांचें काम म्हणजे दुसऱ्यावर मात करण्यासाठीं कायद्यांत सांपडतील तेवढ्या फटी शोधून काढण्याचें. जिंकणाराला सर्व खर्च कधींच मिळणें शक्य नाहीं, हें प्रथम या दाव्यात मला समजलें. पक्षकारापासून नियमानें घ्यावयाच्या फीचा आंकडा निराळा, आणि त्या उपरांत वकील-अशील यांचा आपापसांतील निराळा. हें सर्व मला असह्य वाटलें. मला तर वाटलें, कीं माझें कर्तव्य दोघांची मैत्री जुळवून देणें, उभयतां सोयऱ्यांचा मिलाफ करणें, हें होय. तडजोडीसाठीं मीं जिवापाड मेहेनत केली. तैय्यब शेठ वळले. अखेरीला पंच नेमले गेले. त्यांच्यापुढें दावा चालला. दादा अब्दुल्लांचा जय झाला.

परंतु एवढयानें माझें समाधान झालें नाहीं. पंचांच्या ठरावांची अंमलबजावणी झाली, तर तैय्यब हाजी खानमहंमद इतके पैसे एकदमच देऊं शकणार नाहींत. दक्षिण आफ्रिकेमध्यें राहाणाऱ्या पोरबंदरच्या मेमणांमध्यें एक घरगुती अलिखित कायदा होता, कीं मरण पत्करतील पण दिवाळें काढणार नाहीं. तैय्यब शेठ ३७००० पौंड आणि खर्च एकाएकीं देऊं शकणारच नाहींत. त्यांना एक दमडीसुद्धां कमी द्यायची नव्हती; दिवाळेंहि काढायचें नव्हतें. याला एकच मार्ग होता. तो हा कीं दादा अब्दुल्लांनीं त्यांना पुरेशी मुदत दिली पाहिजे. दादा अब्दुल्लांनीं उदारता दाखविली, आणि भरपूर वेळ दिला. पंच नेमून घेण्याच्या

कामीं पडली त्यापेक्षां हे लांब मुदतीचे हप्ते ठरविण्याच्या कामीं मला अधिक मेहनत करावी लागली. दोन्ही पक्ष खूष झाले; दोघांची प्रतिष्ठा वाढली. मला माझ्या संतोषाला सीमा राहिली नाहीं. मी खरी वकिली शिकलों. मनुष्याची चांगली बाजू शोधून काढायला शिकलों. मनुष्याच्या हृदयांत प्रवेश करण्याची कला साधली. मीं ठरविलें कीं, वकिलाचें कर्तव्य पक्षकारांमध्यें पडलेली फूट भरून काढण्याचें आहे. हा पाठ माझ्या मनांत इतका दृढमूल झाला, कीं माझ्या वीस वर्षांतील वकिलीचा बराचसा वेळ स्वतःच्या ऑफिसांत बसून शेंकडों दाव्यांच्या तडजोडी करविण्यांतच गेला. त्यापासून माझें कांहीं नुकसान झालें नाहीं. द्रव्याचें नुकसान झालें असें म्हणतां येणार नाहीं, आत्म्याचें नुकसान तर नाहींच झालें.

● ● ●

# १५
# धार्मिक मंथन

आतां पुनः ख्रिस्ती मित्रांबरोबरचे संबंध तपासण्याची वेळ आली आहे.

माझें पुढें कसें होईल याबद्दलची मि. बेकरची चिंता वाढत जात होती. ते मला वेलिंग्टन कन्व्हेन्शन्‌ला घेऊन गेले. प्रोटेस्टंट ख्रिश्चनांमध्यें थोडथोडया वर्षांनंतर धर्मजागृति किंवा आत्मशुद्धि यांच्यासाठीं विशेष प्रयत्न करण्याचा रिवाज आहे. याला आपण धर्माची पुनःप्रतिष्ठा किंवा धर्माचें पुनःसंस्करण असें म्हणूं शकूं. तशा तऱ्हेचें संमेलन वेलिंग्टन्‌मध्यें झालें. त्याचे अध्यक्ष येथील प्रख्यात धर्मनिष्ठ पाद्री रेव्ह अँड्र्यू मरे हे होते. मि. बेकरना अशी आशा होती कीं, त्या संमेलनापासून होणारी जागृति, तेथें येणाऱ्या लोकांची धार्मिक उत्कटता, त्यांची एकनिष्ठता यांची माझ्या हृदयावर इतकी छाप पडेल, कीं माझ्यानें ख्रिस्ती झाल्याशिवाय राहवणारच नाहीं.

पण मि. बेकरचा अंतिम आधार प्रार्थनेच्या शक्तीवर होता. त्यांची प्रार्थनेवर खूप श्रद्धा होती. अंतःकरणपूर्वक केलेली प्रार्थना ईश्वर ऐकतोच, असा त्यांचा विश्वास होता. मुलर-(एक प्रख्यात भाविक ख्रिस्ती)-सारखे लोक प्रार्थनेच्या बळावरच आपले व्यवहार चालवीत. त्यांचीं उदाहरणें ते मला देत. प्रार्थनेच्या महिम्याविषयीं मीं सर्व तटस्थपणें ऐकून घेतलें. ख्रिस्ती होण्याबद्दल मला अंतःप्रेरणा मिळेल, तर तसें करतांना मी कशाचीहि अडचण मानणार नाहीं, असें मीं त्यांना सांगितलें. यापूर्वीच कित्येक वर्षांपासून मी अंतःप्रेरणेनुरूप वागायला शिकलों

होतों. तिच्याप्रमाणें वागण्यापासून मला आनंद वाटत असे. तिच्याविरुद्ध जाणें मला कठिण व दुःखदायक वाटे.

आम्हीं वेलिंग्टनला गेलों. मला—"काळ्या आदमी"-ला नेणें मि. बेकरना गरम पडलें. अनेक प्रसंगीं त्यांना माझ्यामुळें अडचण सोसावी लागे. रस्त्यांत आम्हांला एक दिवस मुक्काम करावा लागला. कारण कीं मि. बेकरचा संघ रविवारीं प्रवास करायचा नाहीं, आणि मध्यें रविवार पडत होता. रस्त्यावरील त्याचप्रमाणें स्टेशनवरील हॉटेलांत मालक अगोदर मला आंत येऊं देत ना; आणि बऱ्याचशा कटकटीनंतर येऊं दिलें, तरी भोजनगृहांत जेऊं देत ना. पण मि. बेकर असे नमते घेणारे नव्हते. ते हॉटेलांत उतरणाराच्या हक्कांविषयीं दृढ राहात. पण त्यांना पडणाऱ्या अडचणी माझ्या लक्षांत आल्या. वेलिंग्टनमध्यें त्यांच्याबरोबरच उतरलों होतों. तेथेंसुद्धां बारीकसारीक अडचणी दडवून ठेवण्याचा त्यांचा सौजन्यपूर्ण प्रयत्न असे. तरी त्या माझ्या लक्षांत आल्याशिवाय राहात ना.

संमेलनांत भाविक ख्रिश्चनांची भेट झाली. त्यांची श्रद्धा पाहून मला आनंद वाटला. मि. मरेची भेट घेतली. माझ्यासाठीं पुष्कळजण प्रार्थना करतांना दिसले. त्यांचीं कित्येक भजनें मला फार गोड वाटलीं.

संमेलन तीन दिवस चाललें. संमेलनांत येणारांची धर्मनिष्ठा मी समजूं शकलों. तिच्याबद्दल मला आदर वाटला. परंतु मला माझ्या समजुतीमध्यें—माझ्या धर्मामध्यें—फेरफार करण्याला कांहीं एक कारण मिळालें नाहीं. मी स्वतःला ख्रिश्चन म्हणविलें तरच मी स्वर्गाला जाईन, किंवा मोक्ष मिळवीन असें मला वाटलें नाहीं. ही गोष्ट जेव्हां मीं भल्या ख्रिश्चन मित्रांना सांगितली, तेव्हां त्यांच्या मनाला धक्का बसला; पण त्याला माझा नाइलाज होता.

माझी अडचण मूलभूत होती. 'येशू ख्रिस्त हाच एक काय तो ईश्वराचा पुत्र, त्याच्यावर विश्वास ठेवतील तेवढेच तरणार' ही गोष्ट माझ्या मनाला पटेना. ईश्वराला जर पुत्र असूं शकत असतील, तर आम्ही सर्व त्याचे पुत्रच आहों. येशू जर ईश्वरासम असेल, ईश्वरच असेल, तर मनुष्यमात्र ईश्वरसम आहे, ईश्वर होऊं शकेल. येशूच्या मृत्यूनें आणि त्याच्या रक्तानें जगांतील पाप धुऊन गेलें ही गोष्ट अक्षरशः अर्थानें खरी मानण्यास बुद्धि तयार होईना. रूपक या नात्यानें तिच्यामध्यें सत्य असेल. शिवाय ख्रिश्चन समजुतीप्रमाणें मनुष्यालाच मात्र आत्मा आहे, इतर जीवांना नाहीं, देहाच्या नाशाबरोबरच त्यांचा संपूर्ण नाश होतो; पण माझी समजूत त्याच्या उलट होती. येशूला एक त्यागी, महात्मा, दैवी पुरुष म्हणून स्वीकारण्याची माझी तयारी होती, पण त्याला अद्वितीय पुरुष म्हणून मी स्वीकारूं शकत नव्हतों. येशूच्या मृत्यूपासून जगाला एक थोर उदाहरण मिळालें. पण त्याच्या त्या मृत्यूमध्यें कांहीं गूढ अतर्क्य शक्ति होती हें माझें हृदय कबूल करूं

शकत नव्हतें. ख्रिश्चन लोकांच्या पवित्र जीवनामध्यें मला असें कांहींहि आढळलें नाहीं, कीं जें अन्यधर्मीयांच्या जीवनामध्येंहि आढळत नाहीं. त्यांच्यामध्यें झालेल्या परिवर्तनासारखींच परिवर्तनें इतरांच्या आयुष्यांत झालेलींहि मीं पाहिलीं होतीं. सिद्धान्ताच्या दृष्टीनें पहायचें, तर ख्रिस्ती सिद्धान्तांमध्यें मला अलौकिकता दिसली नाहीं. त्यागाचा विचार करायचा, तर हिंदु धर्मीयांचा त्याग मला अधिक वाटला. एकंदरींत ख्रिस्ती धर्माचा मी संपूर्ण धर्म किंवा सर्वश्रेष्ठ धर्म म्हणून स्वीकार करूं शकलों नाहीं.

हें हृदयमंथन प्रसंग आले तेव्हां तेव्हां ख्रिस्ती मित्रांपुढें मांडलें. माझें समाधान करण्यासारखा त्याचा जबाब ते देऊं शकले नाहींत.

पण ज्याप्रमाणें मी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करूं शकलों नाहीं, त्याचप्रमाणें हिंदु धर्माच्या संपूर्णपणाबद्दल किंवा सर्वश्रेष्ठपणाबद्दलहि माझी त्या वेळीं खात्री नव्हती. हिंदु धर्मातील वैगुण्यें मला डोळ्यांसमोर दिसत होतीं. अस्पृश्यता हें जर हिंदु धर्माचें अंग असेल, तर तें सडलेलें आणि निरुपयोगी अंग असावें असें वाटे. अनेक संप्रदाय, अनेक जाती व पोटजाती यांचा मला अर्थ समजेना; व वेद मात्र ईश्वरप्रणीत, म्हणजे काय? वेद जर ईश्वरप्रणीत तर बायबल आणि कुराण कां नाहींत?

ज्याप्रमाणें ख्रिस्ती मित्रांनीं माझ्यावर परिणाम घडवून आणण्यासाठीं प्रयत्न चालवले होते, त्याप्रमाणें मुसलमान मित्रांचेहि प्रयत्न चालू होते. अबदुल्ला शेठ मला इस्लामचा अभ्यास करण्याबद्दल चुचकारीत होते; त्यांतील खुब्यांची चर्चा करीतच असत.

मी माझ्या शंका रायचंदभाईपुढें मांडल्या. हिंदुस्थानांतील इतर धर्मशास्त्र्यांबरोबरहि पत्रव्यवहार चालविला. त्यांचे जबाब आले. रायचंदभाईच्या पत्रानें माझें कांहींसें समाधान झालें. त्यांनीं मला धीर धरण्याबद्दल आणि हिंदु धर्माचा खोल अभ्यास करण्याबद्दल शिफारस केली. त्यांच्या एका वाक्याचा भावार्थ असा होता : हिंदु धर्मामध्यें जे गूढ आणि सूक्ष्म विचार आहेत, आत्म्याचें निरीक्षण आहे, दया आहे, तेवढें दुसऱ्या धर्मांत नाहीं; अशी माझी निःपक्षपातपणें केलेल्या विचारान्तीं खात्री झाली आहे.

मीं सेलचें कुराण घेऊन तें वाचण्यास सुरुवात केली. इतर इस्लामी पुस्तकेंहि मिळविलीं. विलायतेंतील ख्रिश्चन मित्रांबरोबर पत्रव्यवहार चालवला. त्यांच्यापैकीं एकानें एडवर्ड मेटलंडची ओळख करून दिली. त्यांच्याबरोबर पत्रव्यवहार सुरू झाला. त्यांनीं ॲना किंग्सफर्डच्या सहकारितेनें 'परफेक्ट वे' (उत्तम मार्ग) नांवाचें पुस्तक लिहिलें होतें, तें मला वाचायला पाठविलें. त्यामध्यें प्रचलित ख्रिस्ती धर्माचें खंडन होतें. 'बायबलचा नवा अर्थ' नांवाचें पुस्तकहि त्यांनीं मला पाठविलें. हीं पुस्तकें

मला आवडलीं. त्यांच्यांतून हिंदु मताला पुष्टि मिळाली. टॉलस्टॉयच्या 'वैकुंठ तुमच्या हृदयांत आहे' नांवाच्या पुस्तकानें मला पछाडलें. त्याची माझ्यावर फार खोल छाप पडली. या पुस्तकाची स्वतंत्र विचारशैली, त्यांतील प्रौढ नीति, त्यांतील सत्य यांच्यापुढें कोट्सनीं दिलेलीं सर्व पुस्तकें शुष्क वाटलीं.

अशा तऱ्हेनें माझा अभ्यास, खिस्ती मित्रांची इच्छा होती त्याहून भलत्याच दिशेनें मला घेऊन चालला. एडवर्ड मेटलंडबरोबरचा माझा पत्रव्यवहार बराच लांबला. कवी-(रायचंदभाई)-बरोबर तर शेवटपर्यंत चालला. त्यांनीं कित्येक पुस्तकें पाठविलीं तींहि मीं वाचलीं. त्यांत 'पंचीकरण,' 'मणिरत्नमाला,' योगवासिष्ठाचें 'मुमुक्षु प्रकरण', हरिभद्रसूरींचें 'षड्दर्शनसमुच्चय' इत्यादि होतीं.

अशा तऱ्हेनें जरी मी खिस्ती मित्रांनीं योजलेल्याहून निराळ्याच मार्गानें चाललों होतों, तरी त्यांच्या समागमामुळें माझ्यामध्यें जी धर्मजिज्ञासा जागृत झाली, तिच्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी बनलों. हा माझा संबंध माझ्या नित्य स्मरणांत राहील. अशा तऱ्हेचे मधुर व पवित्र संबंध यापुढील आयुष्यामध्यें वाढतच गेले, कमी झालें नाहींत.



## १.६

# को जाने कलकी ?

खबर नही इस् जुगमे पलकी
समज मन ! को जाने कलकी ?

दावा संपला, त्या अर्थी मला प्रिटोरियांत राहाण्याचें प्रयोजनच राहिलें नाहीं. मी डरबनला गेलों. तेथें जाऊन हिंदुस्थानांत परत जाण्याची तयारी केली. अबदुल्ला शेठ मला मानपानाखेरीज जाऊं देण्यासारखे नव्हते. त्यांनीं सिडनहॅममध्यें माझ्यासाठीं मंडळी जमवून मेजवानी केली. तेथें सबंध दिवस घालवायचा होता.

माझ्यापाशीं कांहीं वर्तमानपत्रें पडलीं होतीं. तीं मी चाळींत होतों. त्यांच्या एका कोंपऱ्यांत मीं एक लहानसा छेदक पाहिला. मथळा 'इंडियन् फ्रँचाइझ्' असा होता. त्याचा अर्थ 'हिंदी मताधिकार.' छेदकाचा मतितार्थ असा होता, कीं हिंदी लोकांना नाताळच्या विधिमंडळामध्यें सभासदांची निवडणूक करण्याचा हक्क होता, तो काढून घ्यावा. यांसंबंधींच्या कायद्याची विधिमंडळामध्यें चर्चा

चालू होती. मला या कायद्याची माहिती नव्हती. मिजलशींतील कोणालाहि हिंदी लोकांचे हक्क काढून घेणाऱ्या या खर्ड्याबद्दल कांहीं गंध नव्हता.

मीं अबदुल्ला शेठना विचारलें. ते म्हणाले, "असल्या बाबतींत आम्हांला काय कळे ? व्यापारावर कांहीं अरिष्ट आलें, तर तेवढें आम्हांला समजणार. पहा ना, ऑरेंज फ्री स्टेटमधून आमचा व्यापार पाळांमुळांसह खणून काढला. त्या बाबतींत आम्हीं मेहनत केली. पण आम्ही पडलों अपंग. वर्तमानपत्रें वाचलीं, तरी बाजारभाव तेवढे आम्हांला समजणार. कायद्यांच्या गोष्टी कोठून समजणार ? आमचे गोरे वकील हेच आमचे कान आणि डोळे."

"परंतु येथें जन्मलेले आणि इंग्रजी शिकलेले इतके तरुण हिंदी आपल्यापाशीं आहेत, ते काय करतात ?" मीं विचारलें.

"ओ हो," अबदुल्ला शेठनीं कपाळाला हात लावून म्हटलें, "त्यांच्यापासून काय मिळणार ? त्या बिचाऱ्यांना यांतलें काय समजणार ? ते आमच्या जवळपासहि फिरकत नाहींत, आणि खरें विचाराल, तर आम्हीहि त्यांना ओळखीत नाहीं. ते ख्रिस्ती पडले, त्यामुळें पाद्र्यांच्या जाळ्यांत; आणि पाद्री गोरे, ते सरकारच्या गोटांतले."

माझे डोळे उघडले. या वर्गाला आपलासा केला पाहिजे. "ख्रिस्ती धर्माचा हाच अर्थ का ? ख्रिस्ती झाले म्हणून त्यांनीं देशहि सोडला कीं काय ? ते काय परदेशी झाले ?"

परंतु मला परत स्वदेशीं जायचें होतें म्हणून मी हे विचार बोलून दाखविले नाहींत. अबदुल्ला शेठना विचारलें,

"पण हा कायदा जर आहे असाच पास झाला, तर तुम्हांला जड जाईल. हें तर हिंदी लोकांचा नायनाट करण्याच्या मार्गावरील पहिलें पाऊल आहे. यामध्यें मानहानि आहे."

"असेल. पण मी तुम्हांला या फरेंचाइझचा (इंग्रजी भाषेंतील पुष्कळ शब्द अशा तऱ्हेनें उच्चारांत फरक होऊन देशी लोकांमध्यें रूढ होऊन राहिले होते. 'मताधिकार' म्हटलें तर कोणाला समजायचें नाहीं.) इतिहास सांगतों. आम्हांला त्यांतलें कांहींच माहीत नव्हतें. पण आमचा मोठा वकील मि. एस्कंब आहे हें तुम्हांला माहीतच आहे. तो जबरा लढवय्या आहे. तो व येथील धक्क्याचा एंजीनियर यांच्यामध्यें खूप चुरस चालते. मि. एस्कंबला विधिमंडळावर निवडून येण्याच्या बाबतींत या वितुष्टांमुळें धोका उद्भवला म्हणून त्यानें आम्हांला आमच्या मताधिकाराची माहिती दिली. त्यांच्या सांगण्यावरून आम्ही आमचीं नांवें मताधिकार पत्रामध्यें नोंदविलीं, आणि तीं सर्व मतें मि. एस्कंबला दिलीं. यावरून तुम्हांला समजेल कीं, तुम्हांला वाटतें तितकी आम्हांला या गोष्टीची किंमत

वाटलेली नाहीं. पण तुम्ही म्हणतां तें आतां आम्हांला समजतें. बरें तर तुमची सल्ला काय ? ”

हा संवाद इतर पाहुणे लक्षपूर्वक ऐकत होते. त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला, “ मी तुम्हांला खरेंच सांगूं ? जर तुम्ही या बोटीनं न जातां महिनाभर थांबलां, तर तुम्ही सांगाल त्याप्रमाणें आम्ही लढूं. ”

दुसरेहि आवेशानें म्हणाले, “ बरोबर बोललेत. अबदुल्ला शेठ, तुम्ही गांधी-भाईना ठेवून घ्या.”

अबदुल्ला शेठ वस्ताद होते. ते म्हणाले, “ यापुढें त्यांना ठेवून घेण्याचा मला अधिकार नाहीं. किंवा मला आहे तेवढाच तुम्हांलाहि आहे. पण तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे. आपण सगळे मिळून त्यांना राहावून घेऊं या. पण ते तर बॅरिस्टर आहेत. त्यांच्या फीचें काय ? ”

फीचा उल्लेख ऐकून मला दुःख झालें. मीं मध्यें पडून म्हटलें, “ अबदुल्ला शेठ, या कामीं माझ्या फीचा प्रश्नच येत नाहीं; सार्वजनिक कामगिरीबद्दल फी कसली ? मीं राहिलों तर एक सेवक म्हणून राहाणार. ही सर्व मंडळी माझ्या पूर्ण परिचयाची नाहींत, पण तुम्हांला जर वाटत असेल, कीं सगळे मेहनत करतील तर मी एक महिना राहाण्यास तयार आहें. एवढें मात्र खरें कीं, जरी तुम्हांला मला कांहीं द्यायला नको, तरी पण असलीं कामें अगदींच पैशाखेरीज चालायचीं नाहींत. आपल्याला तारा कराव्या लागतील. कांहीं छापावें लागेल. निरनिराळ्या ठिकाणीं गेलें पाहिजे, त्याला गाडीभाडें लागणार. कदाचित् आपल्याला स्थानिक वकिलांचीहि सल्ला घ्यावी लागेल. मला इकडच्या कायद्याची माहिती नसणार. कायद्याचीं पुस्तकें तपासावीं लागतील. शिवाय असलीं कामें एकट्यानें होत नसतात. अनेकांनीं त्यांत सामील झालें पाहिजे.”

पुष्कळसे आवाज एकदम ऐकूं आले, “ खुदाची कृपा आहे, पैसे तर जमतीलच. माणसेंहि आहोंतच. तुम्ही राहाण्याचें कबूल करा म्हणजे झालें. ”

मिजलस आटोपली, आणि तिचें कार्यवाहक समितीमध्यें रूपांतर झालें. खाणेंपिणें लवकर आटोपून घरीं जावें असें मीं सुचविलें. चळवळीची रूपरेषा मीं मनांत जुळविली. मताधिकार कितीकांना आहे तें विचारून घेतलें. मीं एक महिना राहाण्याचा निश्चय केला.

अशा तऱ्हेनें दक्षिण आफ्रिकेंतील माझ्या चिरवास्तव्याचा पाया ईश्वरानें रचला, आणि स्वाभिमानाच्या लढ्याचें बीजारोपण झालें.



## १७

# राहिलों

सन १८९३ सालीं नाताळांतील हिंदी समाजाचें अग्रगण्य पुढारी शेठ हाजी महमद हाजी दादा हे गणले जात. सांपत्तिक स्थितीनें शेट अबदुल्ला हाजी आदम मुख्य होते; परंतु ते स्वतः व इतर लोक सार्वजनिक कामामध्यें शेठ हाजी महमदलाच अग्रस्थान देत; म्हणून त्यांच्या अध्यक्षत्वाखालीं अबदुल्ला शेठच्या घरीं एक सभा भरली. तिच्यामध्यें फ्रेंचाइझ बिलाचा विरोध करण्याचें ठरलें. स्वयंसेवकांचीं नांवें नोंदण्यांत आलीं. या सभेमध्यें नाताळांत जन्मलेल्या एकंदर हिंदी लोकांना, अर्थात् खिस्ती तरुणांनाहि, एकत्र केलें होतें. मि. पॉल डरबनच्या कोर्टांतील दुभाष्ये होते, मि. सुभान गॉडफ्रे मिशन स्कूलचे हेडमास्तर होते; तेहि सभेला हजर राहिले होते; आणि त्यांच्या वजनामुळें त्या समाजांतील तरुणहि बऱ्याच मोठ्या संख्येनिशीं हजर होते. हे सर्व स्वयंसेवकामध्यें सामील झाले. व्यापारी तर पुष्कळच होते. त्यांच्यापैकीं जाणण्यासारखीं नांवें, शेठ दाऊद महमद, महमद कासम कमरुद्दिन, शेठ आदमजी मियांखान, ए. कोलंदावेल्लू पिले, मी. लछीराम, रंगसामी पडियाची, आमद जीवा वगैरे होतीं. पारशी रुस्तुमजी असायचेच. कारकूनवर्गापैकी पारशी माणेकजी, जोशी, नरसीराम वगैरे दादा अबदुल्ला इत्यादीच्या मोठ्या पेढ्यांवरील नोकर होते. या सर्वांना सार्वजनिक कामांत सामील होण्याचें कौतुकच वाटलें; सार्वजनिक काम करण्याची मागणी किंवा प्रसंग हीं त्यांच्यावर पहिल्यानेंच आलीं होती. येऊन पडलेल्या आपत्तीपुढें उच्चनीच, लहान मोठे, शेठ नोकर, हिंदु-मुसलमान, पारशी, इसाई, गुजराथी, मद्रासी, सिंधी वगैरे सर्व भेद विसरून गेले होते. सर्वजण हिंदुस्थानचे संतान व सेवक होते.

बिलाचें दुसरें वाचन झालें होतें कीं व्हायचें होतें. त्या वेळीं विधिमंडळांत झालेल्या भाषणांमध्यें अशी टीका आली होती, कीं कायदा इतका कडक असतांहि हिंदी लोकांकडून यत्किंचित् विरोध झालेला नाहीं, हाच हिंदी समाजाच्या बेदरकारीचा आणि मताधिकार भोगण्याच्या नालायकीचा पुरावा आहे.

मीं सभेला वस्तुस्थिति समजावून सांगितली. पहिलें काम हें झालें, कीं विधिमंडळाच्या अध्यक्षांना तार करण्यांत आली, कीं त्यांनीं बिलाचा अधिक विचार तहकूब ठेवावा. अशाच अर्थाची तार मुख्य प्रधान सर जॉन रॉबिन्सन यांना करण्यांत आली, आणि आणखी एक तार दादा अबदुल्लांचे मित्र म्हणून मि. एस्कंबांना केली. या तारांचा जबाब आला, कीं बिलाची चर्चा दोन दिवसपर्यंत तहकूब राहील. सर्वांना आनंद वाटला.

अर्ज तयार केला. त्याच्या तीन नकला पाठवायच्या होत्या. वर्तमानपत्रां-साठींहि एक नक्कल तयार करावयाची होती. अर्जावर शक्य तेवढ्या सह्या घेण्याचा विचार होता, हें सर्व काम एका रात्रींत आटपायचें होतें. ते सुशिक्षित स्वयंसेवक व त्यांचेबरोबर इतर जवळजवळ रात्रभर जागले. मि. आर्थर नांवाच्या त्यांच्यां-तील एका वृद्ध इसमाचें हस्ताक्षर चांगलें होतें. त्यांनीं सुंदर अक्षरानें अर्जाची नक्कल केली. इतरांनीं त्याच्या आणखी नकला केल्या. एक सांगे आणि पांचजण लिहीत. अशा तऱ्हेनें एकदम पांच नकला झाल्या. व्यापारी स्वयंसेवक आपापल्या गाड्यांतून किंवा स्वतःच्या खर्चानें गाड्या भाड्यानें घेऊन सह्या मिळवायला बाहेर पडले.

अर्ज गेला. वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाला. त्याच्यासंबंधीं अनुकूल अभिप्राय प्रसिद्ध झाले. विधिमंडळावरहि त्याचा चांगला परिणाम झाला. त्याची चर्चाहि खूप झाली. अर्जातील युक्तिवाद खोडून काढण्याचे प्रयत्न झाले; पण ते ज्याचे त्यालाच लुले वाटले, तरी पण बिल पास झालेंच.

बिल पास होणार हें सर्व जाणून होते. पण समाजामध्यें नवीन स्फुरण चढलें. आपण एक समाज आहों; केवळ व्यापारी हक्कांसाठीच नव्हे, तर राष्ट्रीय हक्कांसाठीहि झगडणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे, हें सर्वांच्या लक्षांत आलें.

या वेळीं लॉर्ड रिपन वसाहतींचे प्रधान होते. त्यांना एक जंगी अर्ज पाठ-विण्याचा ठराव केला. त्या अर्जावर शक्य तेवढ्यांच्या सह्या घ्यावयाच्या होत्या. हें काम एका दिवसांत होणारें नव्हतें. स्वयंसेवकांची नेमणूक झाली, आणि सर्वांनीं काम उचलण्याची तयारी केली.

अर्ज लिहिण्याचें कामीं मी खूप मेहनत घेतली. माझ्या हातीं लागलें तेवढें सर्व साहित्य वाचून काढलें. हिंदुस्थानांत आम्हांला एक प्रकारचा मताधिकार आहे, आणि नाताळांत हिंदी लोकांची वस्ती अगदींच अल्प आहे हे दोन मुद्दे प्रामुख्यानें मांडले होते.

अर्जावर दहा हजार सह्या झाल्या. एका पंधरवड्यांत अर्ज पाठविण्या-जोग्या सह्या जमल्या. एवढ्या मुदतींत नाताळांत दहा हजार सह्या मिळविणें ही वाचकांनीं लहानसहान गोष्ट समजूं नये. सह्या सबंध नाताळांतून घ्यायच्या होत्या. लोकांना असल्या कामाची माहिती नव्हती. आपण कशावर सही करतों याची नीट समजूत पडल्याशिवाय सही घ्यायची नाहीं असा निश्चय होता. त्यामुळें मुद्दाम स्वयंसेवक समक्ष पाठवूनच सह्या घ्याव्या लागत. खेडीं दूरदूर होतीं. अर्थात् पुष्कळशा मंडळींनीं कसून मेहनत केली, तरच असलीं कामें पुरीं होतात. तसेंच झालें. सर्वांनीं उत्साहपूर्वक काम केलें. त्यांपैकीं शेठ दाऊद महमद, पारशी रुस्तुमजी, आदमजी मियांखान आणि आदम जीवा यांच्या मूर्ति अजूनहि माझ्या

दृष्टीसमोर उभ्या आहेत. त्यांनीं पुष्कळ सह्या आणल्या. दाऊद शेठ सबंध दिवस आपली गाडी घेऊन फिरत असत. कोणी किरकोळ खर्चाचीसुद्धां मागणी केली नाहीं.

दादा अबदुल्लांचें घर धर्मशाळा किंवा सार्वजनिक कार्यालयसें बनून गेलें. सुशिक्षित मंडळी माझ्या हाताशीं असत. त्यांच्या व इतर कामगारांच्या जेवणा-खाण्याची सोय दादा अबदुल्लांकडे होई. अशा तऱ्हेनें सर्वजण खूप खर्चांत आले.

अर्ज रवाना झाला. त्याच्या एक हजार नकला छापल्या होत्या. त्या अर्जावरून हिंदुस्थानच्या सर्वसामान्य लोकांना नाताळची प्रथम माहिती झाली. ज्या ज्या वर्तमानपत्रांचीं आणि पुढाऱ्यांची नांवें मला माहीत होतीं, तेवढ्या सर्वांकडे त्या अर्जाच्या नकला पाठविल्या.

'टाइम्स् ऑफ् इंडिया 'नें त्या प्रश्नावर अग्रलेख लिहिला, आणि हिंदी लोकांच्या मागणीला चांगला पाठिंबा दिला. विलायतेंतहि सर्व पक्षांच्या पुढाऱ्यां-कडे नकला पाठविण्यांत आल्या होत्या. तिकडून लंडनच्या 'टाइम्स 'चा पाठिंबा मिळाला. त्यावरून बिलाला मंजुरी मिळणार नाही, अशी आशा वाटूं लागली.

आतां मी नाताळ सोडून जाण्यासारखी स्थिति राहिली नाहीं. लोकांनीं मला चोहीकडून घेरला आणि नाताळांतच कायम राहण्याचा अतिशय आग्रह केला. मी माझ्या अडचणी दाखवून दिल्या. मनाशीं मीं निश्चय केला होता कीं, मी सार्वजनिक पैशावर राहूं नये. निराळें बिऱ्हाड करण्याचीहि मला आवश्यकता भासत होती. घरहि चांगलें आणि चांगल्या वस्तींत असलें पाहिजे अशी माझी त्या वेळी समजूत होती.

इतर बॅरिस्टर राहातात त्याप्रमाणें मीहि राहिल्यानें हिंदी समाजाचा दर्जा वाढेल असा मीं विचार केला. अशा तऱ्हेचें घर चालवायचें तर वर्षाचे ३०० पौंडांहून कमी पुरायचेच नाहीत असें मला वाटलें. तेवढ्या पैशांच्या वकिलीची हमी मिळाली तरच मला राहतां येणार, असें मीं ठरविलें आणि त्याप्रमाणें मंडळीला सांगितलें.

"पण एवढे पैसे तुम्हीं समाजाच्या कामासाठीं घेत गेलेत, तरी आम्हांला परवडण्यासारखें आहे; आणि तेवढें जमा करणें आम्हांला सोपें आहे. वकिली करून मिळेल तें तुमचें." असें सहकारी मंडळींचें म्हणणें पडलें.

"मी अशा तऱ्हेनें पैसे घेतां येणार नाहीं. माझ्या सार्वजनिक कामाची मी एवढी किंमत समजूं शकत नाहीं. मला कांहीं त्या कामामध्यें वकिली ज्ञान वापरायचें नाहीं, मला फक्त लोकांकडूनच काम घ्यायचें आहे. त्याबद्दल पैसे कसे घ्यावे ? शिवाय मला तुमच्यापासून सार्वजनिक कामासाठीं पैसे काढावे लागणार.

मी स्वतःसाठीं पैसे घेऊं लागलों, तर तुमच्याकडून मोठमोठ्या रकमा काढायला मला संकोच वाटेल आणि शेवटीं आपलें गाडें अडकून पडेल. समाजाकडून तर मी दर वर्षीं ३०० पौंडांपेक्षां जास्त खर्च करवणारच." मीं उत्तर दिलें.

"पण आतां आम्ही तुम्हांला पुरे ओळखतों. तुम्हांला स्वतःसाठीं पैसे थोडेच मागायचे आहेत? तुमचा राहण्याचा खर्च आम्हांला द्यायला नको का?"

"प्रेमामुळें व तात्कालिक उत्साहामुळें तुम्हीं असें बोलतां. हाच उत्साह आणि हेंच प्रेम सर्वकाळ टिकेल अशी कोणी खात्री द्यावी? तुम्हांला माझ्याकडून कधींकाळीं कडवी उत्तरेंहि ऐकण्याचा प्रसंग येईल. तेव्हांहि तुमचा माझ्यावरील लोभ मी टिकवूं शकेन कीं नाहीं तें एक ईश्वर जाणें. पण मुख्य मुद्दा तर हा आहे, कीं सार्वजनिक कामासाठीं मला पैसे घ्यायचे नाहींत. तुम्ही सर्वजण आपलें वकीलकाम देण्याची हमी दिलीत, कीं तेवढें मला पुरें आहे. हेंहि तुम्हांला जरा जडच जाईल. मी कांहीं गोरा बॅरिस्टर नव्हे. कोर्ट मला दाद देईल, कीं नाहीं तें तरी मी काय सांगूं? मला वकिली कितपत साधेल तेंहि मला माहीत नाहीं! म्हणून मला आधींपासून वकील-फी देण्यामध्येंमुद्धा तुम्हांला धाडस हें करावें लागणारच आहे. इतक्याउपर तुम्ही मला वकील-फी दिलीत, तर ती माझ्या सार्वजनिक कामगिरीबद्दलच म्हटली पाहिजे नाहीं का?"

अशा तऱ्हेनें चर्चा करतां करतां अखेरीला वीस एक व्यापाऱ्यांनीं मला एका वर्षाचें वर्षासन बांधून दिलें. त्याखेरीज दादा अबदुल्ला मला निरोप देतेवेळीं भेट देणार होते, त्याऐवजीं त्यांनीं मला जरूर तें फर्निचर घेऊन दिलें, आणि मी नाताळांत राहिलों.

●●●

## १८

# काळ्याला मज्जाव

न्यायालयाचें चिन्ह ताजवा आहे. तो एका निःपक्षपाती आंधळ्या परंतु चतुर बाईच्या हातांत दिलेला असतो. विधात्यानें तिला आंधळी केली; अशा-साठीं, कीं तिनें तोंडाकडे पाहून टिळा लावूं नये, तर जो गुणांनीं लायक असेल त्यालाच टिळा लावावा. याच्या उलट नाताळच्या न्यायालयाकडून तोंडाकडे पाहून टिळा लावविण्याला तेथील वकीलसभेनें उद्योग आरंभिला. न्यायालय या प्रसंगीं आपल्या चिन्हाला जागलें.

मला वकिलीची सनद घ्यायची होती. माझ्यापाशीं मुंबईच्या हायकोर्टाचें प्रमाणपत्र होतें. विलायतचें प्रमाणपत्र मुंबई हायकोर्टाच्या दप्तरीं राहिलें. दाखल होण्याच्या अर्जाबरोबर चांगल्या वर्तणुकीबद्दलचीं दोन प्रमाणपत्रें पाहिजे असत. मला वाटलें, कीं हीं प्रमाणपत्रें गोऱ्या इसमांचीं असलेलीं विशेष बरीं, म्हणून अबदुल्ला शेठमार्फत ज्यांच्याशी माझी ओळख झाली होती, अशा दोन प्रसिद्ध गोऱ्या व्यापाऱ्यांचीं प्रमाणपत्रें घेतलीं होतीं. अर्ज कोणा तरी वकिलामार्फत पाठविला पाहिजे होता; आणि सामान्य रिवाज असा होता, कीं अशा तऱ्हेचा अर्ज ॲटर्नी जनरलनें फी न घेतां करायचा. मि. एस्कंब ॲटर्नी जनरल होते. ते अबदुल्ला शेठचे वकील होते. त्यांनीं आनंदानें माझा अर्ज पाठविण्याचें मान्य केलें.

इतक्यांत अवचितच वकीलसभेकडून मला नोटीस मिळाली. नोटिशीमध्यें मला सनद मिळण्याला हरकत घेतली होती. त्याचें एक कारण असें दाखविलें होतें, कीं मी सनदेसाटीं केलेल्या अर्जासोबत अस्सल प्रमाणपत्र जोडलेलें नाहीं. पण हरकतींतील मुख्य मुद्दा हा होता, की कोर्टांत वकिलांना दाखल करण्यासंबंधींचे नियम करण्यांत आले, त्या वेळीं कोणीहि काळा किंवा पिवळा आदमी अर्ज करील असा संभवहि वाटला नसावा. नाताळची वाढ गोऱ्या लोकांच्या साहसामुळें झालेली आहे. त्यामुळें त्यामध्यें गोऱ्यांनाच मुख्य स्थान मिळालें पाहिजे. काळे वकील दाखल झाले, तर हळूहळू गोऱ्या लोकांचें प्राधान्य नाहींसें होईल आणि त्यांच्या रक्षणाचें कुंपण मोडून पडेल.

या विरोधाचें समर्थन करण्यासाटीं वकीलसभेनें एक प्रख्यात वकील नेमला होता. या वकिलांचाहि दादा अबदुल्लांशीं संबंध होता. त्यांच्यामार्फत त्यांनीं मला बोलावून नेलें. त्यांनीं माझ्याशीं निर्भीडपणें संभाषण केलें. माझी पूर्वपीठिका विचारून घेतली. मीं ती सांगितली; तेव्हां ते म्हणाले,

" मला तुमच्याविरुद्ध कांहीं बोलायचें नाहीं. मला भय वाटत होतें कीं, तुम्ही येथेंच जन्मलेले कोणी लफंगे तर नाहीं ! शिवाय तुमच्याजवळ अस्सल प्रमाणपत्रहि नाहीं. त्यामुळें माझ्या शंकेला जोर आला. दुसऱ्याच्या प्रमाणपत्रांचा उपयोग करणारेहि लोक असतातच ना ? तुम्ही गोऱ्या लोकांचीं प्रमाणपत्रें आणलीं आहेत, त्यांचा माझ्यावर कांहींच परिणाम झालेला नाहीं. त्यांना तुमची काय माहिती ? तुमची त्यांची ओळख ती कितीशी ? "

" पण येथें मला सर्वच नवें. अबदुल्ला शेटची ओळखहि येथेंच झाली. " मी मध्येंच बोललों.

" असेल; पण तुम्हींच तर म्हणतां, कीं ते तुमच्या गांवचे आहेत. आणि तुमचे वडील तेथें दिवाण होते, त्या अर्थीं त्यांना तुमच्या घराण्याची तरी माहिती असणारच ना ? त्यांची शपथपत्रिका तुम्हीं हजर केलीत, तर मग मला कांहीं

म्हणायचें नाहीं. मी वकीलसभेला लिहून कळवीन, कीं माझ्याकडून तुमचा विरोध होऊं शकत नाहीं. ''

मला राग आला, पण मीं तो दाबला. मला वाटलें, जर मी अबदुल्ला-शेटचें प्रमाणपत्र आणलें असतें, तर त्याची अवगणना झाली असती, आणि गोऱ्यांची ओळख मागितली असती. शिवाय माझ्या कुळाचा आणि वकिलीच्या लायकीचा संबंध काय? मी दुष्ट किंवा कंगाल आईबापांचा मुलगा असलों म्हणून माझी लायकी ठरवितांना त्याचा बाध कां म्हणून यावा? पण हे सर्व विचार मनांतल्या मनांत ठेवून मीं जबाब दिला :—

" जरी अशा तऱ्हेची हकीकत मागण्याचा वकीलसभेला अधिकार असल्याचें मला कबूल नाहीं, तरीहि मी तुमच्या इच्छेनुरूप शपथपत्र मिळवून द्यायला तयार आहे. ''

अबदुल्ला शेठचें शपथपत्र तयार केलें आणि त्या वकिलाला दिलें. त्यानें समाधान व्यक्त केलें. पण वकीलसभेचें समाधान झालें नाहीं. तिनें कोर्टापुढें माझ्या दाखल होण्याला हरकत घेतली. कोर्टानें मि. एस्कंबचा जबाब ऐकण्यासहि न थांबतां सभेची हरकत रद्द केली. मुख्य न्यायाधीश म्हणाले :—

" अर्जदारानें अस्सल प्रमाणपत्र हजर केलेलें नाहीं, या तक्रारींत राम नाहीं. त्यानें शपथेवर खोटें सांगितलें असेल, तर त्याच्यावर खोट्या शपथेबद्दल फौजदारी चालूं शकेल, आणि त्याचें नांव वकिलांतून काढून टाकण्यांत येईल. कोर्टाच्या नियमांत काळ्या-गोऱ्यांचा भेद नाहीं. आम्हांला मि. गांधींना वकिलीची बंदी करण्याचा अधिकार नाहीं. अर्ज मंजूर करण्यांत येत आहे. मि. गांधी, तुम्ही शपथ घेऊं शकतां. ''

मी उठलों. रजिस्ट्रारपुढें शपथ घेतली. शपथ घेतांच मुख्य जज्ज म्हणाले, " आतां तुम्ही आपली पगडी उतरली पाहिजे. वकील या नात्यानें वकिलांच्या पोषाखासंबंधींचा कोर्टाचा नियम तुम्हांलाहि पाळावा लागणार ! ''

मी माझी मर्यादा समजलों. डरबनच्या मॅजिस्ट्रेटच्या कचेरींत जी पगडी न काढण्याचा मीं आग्रह राखला होता, ती मीं येथें उतरली. उतरण्याविरुद्धहि बोलतां येण्यासारखें होतें. परंतु मला मोठे लढे लढायचे होते. पगडी घालण्याच्या हट्टांतच मला माझी युद्धकला संपवून टाकायची नव्हती. त्या हट्टामुळें थोरल्या लढयांना कमीपणाहि येण्याचा संभव होता.

अबदुल्ला शेठ व इतर मित्र यांना माझा मृदुपणा (कीं दुबळेपणा?) आवडला नाहीं. त्यांच्या मतें वकील या नात्यानेंहि मीं पगडी घालून ठेवण्याचा आग्रह चालवायला पाहिजे होता. मीं त्यांची समजूत पाडण्याचा प्रयत्न केला. ' देश तसा वेश ' या म्हणींतील रहस्य समजावून सांगितलें. हिंदुस्थानांत गोरा

अंमलदार किंवा जज्ज पगडी काढण्याची सक्ती करूं पाहील, तर त्याचा विरोध केला पाहिजे. पण नाताळसारख्या देशांत आणि तेंहि कोर्टातील एक हुद्देदार या नात्यानें, मी कोर्टाच्या रिवाजांचा विरोध करणें शोभणार नाहीं.

या व अशा तऱ्हेच्या युक्तिवादांनीं मीं मित्रमंडळीला कांहींसें शान्त तर केलें, परंतु एकाच वस्तूकडे निरनिराळ्या तऱ्हेनें पाहाण्याची युक्तता समाधानकारक तऱ्हेनें मी त्या वेळीं त्यांना पटवून देऊं शकलों असें मला वाटत नाहीं. पण माझ्या जीवनामध्यें आग्रह आणि अनाग्रह नेहमींच एकत्र चालत आले आहेत. सत्याग्रहामध्ये हें अनिवार्य आहे, असा मला मागून अनेक वेळां अनुभव आला आहे. या समाधानवृत्तीबद्दल मला जिवावरील धोके आणि मित्रांचा असंतोष अनेक वेळां सहन करावी लागली आहेत. पण सत्य वज्रासारखें कठिण आणि कमळासारखें मृदु आहे.

वकीलसभेच्या विरोधामुळें दक्षिण आफ्रिकेंत माझी प्रसिद्धि करण्यासाठीं अन्य उपायांची जरूरी राहिली नाहीं! बहुतेक वर्तमानपत्रांनीं मला झालेला विरोध अयोग्य ठरविला आणि वकीलमंडळावर मत्सराचा आरोप केला. या प्रसिद्धीमुळें माझें कार्य कांही अंशीं सोपें झालें.

●●●

१९

# नाताळ–इंडियन–कॉंग्रेस

वकिलीचा धंदा करणें ही माझ्या बाबतींत गौण बाब होती व अखेरपर्यंत ती गौणच राहिली. माझ्या नाताळांतील वास्तव्याचें सार्थक करायचें, तर मला सार्वजनिक कामामध्यें तन्मय होऊन जाणें जरूर होतें. हिंदी मताधिकार-प्रतिबंधक कायद्याविरुद्ध निव्वळ अर्ज करून भागण्यासारखें नव्हतें. त्याबद्दलची चळवळ चालू राहिली तरच वसाहत-मंत्र्यांवर कांहीं परिणाम होणार. त्यासाठीं एखाद्या संस्थेची स्थापना करणें आवश्यक वाटलें. म्हणून अबदुल्ला शेठबरोबर त्यासंबधीं चर्चा केली. इतर सहकाऱ्यांना भेटलों, आणि एक सार्वजनिक संस्था स्थापण्याचा आम्हीं निश्चय केला.

तिचें नांव ठरवितांना कांहींसें धर्मसंकट पडलें. या संस्थेला कोणत्याहि विशिष्ट वर्गाबद्दल पक्षपात करायचा नव्हता. हिंदुस्थानांतील कॉंग्रेसचें नांव कॉंझर्व्हेटिव (प्राचीन) पक्षाला अप्रिय वाटत असे, हें मला माहीत होतें. पण कॉंग्रेस म्हणजे हिंदुस्थानचा प्राण होता. तिची शक्ति वृद्धिंगत झाली पाहिजे. तें नांव

लपवून ठेवणें किंवा धारण करतांना संकोच करणें हें नामर्दपणाचें वाटलें. म्हणून मीं माझीं कारणें सांगून संस्थेला 'काँग्रेस' हेंच नांव देण्याविषयीं सुचविलें. अशा तऱ्हेनें २२ मे १८९४ रोजीं "नाताळ-इंडियन-काँग्रेस"चा जन्म झाला.

दादा अबदुल्लांची माडी भरून गेली होती. लोकांनीं या संस्थेचा उत्साहपूर्वक स्वीकार केला. घटना साधी ठेवलेली होती. वर्गणी भारी होती. दरमहा कमींत कमी पांच शिलिंग देईल तोच सभासद होऊं शकत होता. धनिक व्यापाऱ्यांपासून त्यांचें मन वळवून अधिकांत अधिक काढतां येईल तेवढें काढायला मोकळीकच होती. अबदुल्ला शेठकडून मासिक दोन पौंडांचा आंकडा घालविला. दुसऱ्या दोन गृहस्थांकडूनहि तितकेच लिहविले. मीं स्वतःशी विचार केला, कीं मीहि अंगचोरपणा करून उपयोगी नाही; म्हणून मी दरमहा एका पौंडाचा आंकडा घातला. माझ्या मानानें ही रक्कम भारीच होती; पण मी विचार केला, कीं कोणीकडूनहि माझा खर्च चालायचा असेल, तर मला दरमहा एक पौंड भरणेंहि जड नाही. ईश्वरानें माझें गाडें ढकललें. एक पौंडवाले पुष्कळ मिळाले; दहा शिलिंगवाले त्याहूनहि अधिक. त्याखेरीज सभासद न होतांहि कोणीहि आपल्या इच्छेनुरूप देणगी म्हणून कांही दिलें, तर तें घ्यायचें होतेंच.

अनुभवान्तीं असें आढळलें, कीं मागायला गेल्याशिवाय कोणी वर्गणी भरीना. डरबनबाहेरच्या लोकांकडे वेळोवेळी जाणें अशक्य होतें. 'आरंभशूरत्वा'चा दोष थोडक्याच काळांत दिसून आला. डरबनमध्येंसुद्धां पुष्कळ हेलपाटे घालावे तेव्हां पैसे मिळावयाचे. मी कार्यवाह होतों. वर्गणी वसूल करण्याचें काम माझ्या शिरावर होतें. मला माझ्या कारकुनाला बहुतेक सारा दिवस वसुलीच्या कामांतच गुंतवावा लागे, अशी स्थिति झाली. कारकूनहि त्रासला. मला वाटूं लागलें, कीं मासिक नाहीं पण वार्षिक वर्गणी असावी; आणि ती सर्वांनीं आगाऊ दिली पाहिजे. सभा बोलाविली. सर्वांनीं सूचना मान्य केली आणि कमींत कमी वार्षिक तीन पौंड वर्गणी घेण्याचें ठरलें व वसुलीचें काम सोपें झालें.

सुरुवातीपासून मीं एक धडा घेतला होता, कीं सार्वजनिक काम कधीं कर्ज काढून करूं नये. इतर गोष्टींत लोकांच्या वचनांवर विश्वास ठेवतां येईल, परंतु पैशाच्या वायद्यांवर कधी विश्वास ठेवूं नये. आंकडा घातल्याप्रमाणें रक्कम देण्याचा धर्म लोक कोठेंच नियमित रीतीनें पाळीत नाहींत असें मीं पाहिलें होतें. नाताळचे हिंदी लोक याला अपवाद नव्हते म्हणून 'नाताळ-इंडियन-काँग्रेस'नें कधीं कर्ज काढून काम केलें नाहीं.

सभासद करण्याच्या कामीं सहकाऱ्यांनीं अमर्याद उत्साह दाखविला. त्यांना तें काम आवडे. त्यापासून अमूल्य अनुभव मिळत होता. पुष्कळ लोक

आनंदानें नांवें नोंदवीत आणि पैसेहि लगेच देऊन टाकीत. दूरदूरच्या गांवीं जरा पंचाईत पडे. सार्वजनिक कार्य म्हणजे काय याची लोकांना कल्पनाहि नसे. पुष्कळ ठिकाणांहून तर लोक आपल्या तिकडे येण्याबद्दल निमंत्रणहि पाठवीत; अग्रगण्य व्यापाऱ्यांकडे उतरण्याची व्यवस्था करीत. पण या दौऱ्यामध्यें एके ठिकाणीं आम्हांला सुरुवातीला अडचण आली. त्या घरून सहा पौंड मिळायला पाहिजे होते, पण तो व्यापारी तिहींच्या वर जाईच ना. तेवढेच घ्यावे तर इतरांपासूनहि जास्त मिळालें नसतें. उतरलों होतो त्यांच्याकडेच. आम्हां सर्वांना भूक लागली होती. पण वर्गणी काढल्याशिवाय जेवायचें कसें ? त्या गृहस्थाची खूप विनवणी केली; परंतु त्याचें तेंच खरें. गांवांतील इतर व्यापाऱ्यांनींहि त्यांना सांगून पाहिलें. सगळी रात्र घासाघीस घालण्यांत गेली. बरोबरच्या मंडळींपैकीं पुष्कळ रागावलेहि; पण कोणीहि विनय सोडला नाहीं. अगदीं उजाडतां उजाडतां त्या गृहस्थाच्या हृदयाला पाझर फुटला, आणि त्यानें सहा पौंड दिले. आम्हांला जेवू घातलें. हा प्रसंग टोंगाट येथें घडून आला. त्याचा परिणाम उत्तर किनाऱ्यावर थेट स्टेंगरपर्यंत आणि आंत थेट चार्लस्टाऊनपर्यंत पोंचला. आमचें वसुलीचें काम सोपें झालें.

पण पैसे गोळा करणें हा मुख्य हेतु नव्हताच. जरूरीपेक्षां जास्त पैशाचा संग्रह करावयाचा नाहीं हें तत्त्वहि माझ्या लक्षांत आलें होतें.

सभा जरूरीप्रमाणें दर आठवड्याला किंवा दर महिन्याला होत असे. सभेंत अगोदरच्या सभेचा अहवाल वाचण्यांत येई, व अनेक प्रकारची चर्चा होई. चर्चा करण्याची किंवा थोडक्यांत मुद्देसूद बोलण्याची सवय लोकांना मुळींच नव्हती. त्यांना उभे राहून बोलण्याचा संकोच वाटे. मीं त्यांना सभेचे नियम समजावून सांगितले, त्यानंतर ते त्या नियमांचें पालन करीत. त्यापासून त्यांना होणारा फायदा दिसून आला. ज्यांना कधीं सभेंत बसण्याची सवय नव्हती असे लोक सार्वजनिक कार्याबद्दल बोलायला व विचार करायला शिकले.

सार्वजनिक कामासंबंधानें बारीकसारीक खर्चच पुष्कळसे पैसे घेऊन जातो हेंहि मला माहीत होतें. सुरुवातीला पावतीपुस्तकेंहि न छापण्याचा मीं निश्चय केला होता. माझ्या ऑफिसांत सायक्लोस्टाइल ठेवला होता. त्यावर पावत्या छापून काढल्या. अहवालहि त्याच पद्धतीनें छापवीत असें. तिजोरींत जेव्हां पैसा भरपूर जमला, सभासद वाढले, काम वाढलें तेव्हांच पावत्या वगैरे छापविण्याची पद्धत सुरू केली. अशा तऱ्हेची काटकसर प्रत्येक संस्थेंत आवश्यक आहे; तरीहि तिचा अंमल होत नाहीं हें मला माहीत आहे. म्हणूनच या लहानशा वाढत्या संस्थेच्या बालपणच्या बारीकसारीक गोष्टीहि येथें नमूद करणें मला योग्य वाटलें. लोक पावतीची फिकीर करीत नसत, तरीहि त्यांना आग्रहपूर्वक पावती देत असें.

त्यामुळें सुरुवातीपासून पैनपैचा हिशेब चोख राहिला. आणि मला वाटतें, आजहि नाताळ कॉंग्रेसच्या दप्तरामध्यें १८९४ च्या संपूर्ण तपशीलवार जमाखर्चाच्या वह्या सांपडल्या पाहिजेत. पैनपैचा चोख हिशेब हें कोणत्याहि संस्थेचें नाक आहे. त्याच्या अभावीं ती संस्था अखेरीला कुजून प्रतिष्ठाशून्य बनून जाते. चोख हिशेबाखेरीज शुद्ध सत्य टिकवणें अशक्य आहे.

कॉंग्रेसचें दुसरें एक काम वसाहतींत जन्मलेल्या सुशिक्षित हिंदी लोकांची सेवा करणें हें होतें. त्यासाटीं "कोलोनियलबॉर्न इंडियन एज्युकेशनल ॲसोसिएशन" ची ( वसाहतीत जन्मलेल्या हिंदी लोकांची शिक्षणसंस्था ) स्थापना केली. तिचे सभासद मुख्यत्वेंकरून सुशिक्षित तरुणच होते. त्यांनीं द्यावयाची वर्गणी अल्प होती. या सभेमार्फत त्यांच्या गरजा व अडचणी व्यक्त होऊं शकत; त्यांची विचारशक्ति वाढे, त्यांचा व्यापाऱ्यांशीं संबंध येई आणि त्यांना स्वतःला कार्य करण्याला संधि मिळे. ही संस्था चर्चामंडळासारखी होती. तिच्या नियमित सभा होत. त्यांत ते निरनिराळ्या विषयांवर भाषणें करीत किंवा निबंध वाचीत. तिला जोडून एका छोट्याशा पुस्तकालयाची स्थापना झाली.

कॉंग्रेसचें तिसरें काम बाहेरची चळवळ; म्हणजे दक्षिण आफ्रिकेंतील इंग्रज लोकांमध्यें त्याचप्रमाणें बाहेर इंग्लंड व हिंदुस्थानमध्यें खऱ्या माहितीचा प्रसार करणें. त्यासाटी मी दोन चोपडीं लिहिलीं. पहिलें चोपडें "दक्षिण आफ्रिकेंत राहाणाऱ्या प्रत्येक इंग्रजास विनंति" या नांवाचें होतें. त्यामध्यें नाताळांतील हिंदी लोकांच्या सामान्य स्थितीचें दिग्दर्शन साधार केलेलें होतें. दुसरें "हिंदी मताधिकार—एक विनंति" नांवाचें होतें. त्यांत हिंदी मताधिकाराचा इतिहास आंकड्यांनिशीं व पुराव्यांनिशी दिलेला होता. हीं दोन्हीं चोपडी खूप मेहनत आणि अभ्यास करून लिहिलेलीं होतीं. त्यांचा उपयोगहि तसाच झाला. त्यांचा मोठ्या प्रमाणावर प्रसार करण्यांत आला. या प्रयत्नामुळें दक्षिण आफ्रिकेमध्यें हिंदी लोकांचे मित्र निर्माण झाले, इंग्लंडांतील व हिंदुस्थानांतील सर्व पक्षांकडून मदत मिळाली आणि काम करण्याची दिशा सांपडली व नक्की झाली.

● ● ●

# २०

# बालासुंदरम्

जशी ज्याची भावना तसें त्याला फळ मिळतें, हा नियम माझ्या बाबतींत अनेक वेळां लागू पडलेला माझ्या अनुभवास आला आहे. लोकांची म्हणजे गरीबांची सेवा करण्याच्या माझ्या तीव्र इच्छेनें गरीबांबरोबर नेहमीं माझी अनायासानेंच गांठ घालून दिली आहे.

'नाताळ-इंडियन-काँग्रेस' मध्यें नाताळांत जन्मलेल्या हिंदी लोकांनीं भाग घेतला होता. मेहतावर्ग त्यामध्यें दाखल झाला होता; तरी पण अगदीं खालचा वर्ग मजूर, गिरमिट्ये यांनीं तींत प्रवेश केला नव्हता. काँग्रेस त्यांची बनली नव्हती. त्यांनाहि तिची वर्गणी भरून, तिच्यांत दाखल होऊन तिला आपलीशी करण्याची मोकळीक होती. परंतु काँग्रेस त्यांची सेवा करील तेव्हांच त्यांना काँग्रेसबद्दल आपुलकी वाटूं लागणार. असा प्रसंग आपण होऊन चालून आला, आणि तोहि अशा वेळीं, की जेव्हां माझी किंवा काँग्रेसची त्या प्रसंगा-साठीं तयारीहि झालेली नव्हती. कारण, कीं या वेळीं मला वकिली सुरू करून चारदोन महिने झाले असतील नसतील. काँग्रेसचेंहि बालवय होतें. अशा वेळीं एके दिवशीं एक फाटके कापडे घातलेला, अंगाला कंप सुटलेला आहे, तोंडांतून रक्त गळतें आहे, पुढचे दोन दांत पडले आहेत असा एक मद्रासी हिंदी फेटा हातांत धरून रडत माझ्यासमोर येऊन उभा राहिला. त्याला त्याच्या मालकानें सख्त ठोक दिला होता. माझ्या कारकुनाला तामीळ कळत होतें, त्याच्यामार्फत मीं त्याची माहिती मिळविली. बालासुंदरम् एका प्रतिष्ठित गोऱ्या इसमाकडे मजूरी करीत असे. मालकाला कांहीं कारणानें राग आला असावा. त्याला भान राहिलें नाहीं आणि त्यानें बालासुंदरम्ला खूप मार दिला. त्यांत बालासुंदरम्चे दोन दांत मोडून पडले.

मीं त्याला डॉक्टरांकडे पाठविला. त्या वेळीं गोरे डॉक्टरच उपलभ्य होते. झालेल्या इजेबद्दलचें डॉक्टरचें प्रमाणपत्र मला पाहिजे होतें. तें घेऊन मी बाला-सुंदरम्ला मॅजिस्ट्रेटकडे घेऊन गेलों. तेथें बालासुंदरम्ची शपथेवर जबानी नमूद केली. ती वाचून मॅजिस्ट्रेट मालकावर संतापले; त्याच्यावर समन्स् काढण्याचा हुकूम दिला.

माझा हेतु मालकाला शिक्षा करविण्याचा नव्हता. माझ्या मनांतून फक्त बालासुंदरम्ला त्याच्यापासून सोडवावयाचा होता. गिरमिट्यांसंबंधींचा कायदा मीं वाचून पाहिला. सामान्य नोकरानें नोकरी सोडली, तर मालक त्याच्यावर दिवाणी

दावा करूं शकतो, फौजदारी करूं शकत नाहीं. गिरमिट आणि सामान्य नोकरी यांमध्यें पुष्कळ फरक होता, पण मुख्य मुद्दा हा होता कीं, गिरमिट्या मालकाला सोडून गेला, तर तो फौजदारी गुन्हा होई आणि त्याबद्दल त्याला कैदेची शिक्षा भोगावी लागे. म्हणूनच सर विल्यम विल्सन हंटरनें या स्थितीला गुलामगिरीची उपमा दिली. गुलामाप्रमाणें गिरमिट्या हा मालकाची मालमत्ता समजला जाई. बालासुंदरम्ला सोडविण्याचे दोनच मार्ग होते, एक तर गिरमिट्यांसाठीं नेमलेल्या अंमलदारानें—याला कायद्यांत त्यांचा 'रक्षक' असें नांव दिलेलें होतें—गिरमिट रद्द करावें किंवा दुसऱ्याच्या नांवावर चढवून द्यावें; किंवा मालक स्वतः त्याला सोडायला तयार झाला तर. मी मालकाला भेटलों. त्याला म्हटलें, "माझ्या मनांत तुम्हांला शिक्षा करावयाची नाहीं आहे. या माणसाला सखत मार बसला आहे हें तुम्हांला दिसतेंच आहे. तुम्ही त्याचें गिरमिट दुसऱ्याच्या नांवावर चढवायला कबुली दिलीत तरी मला पुरें आहे." मालकाला तरी तेंच पाहिजे होतें. मग मी 'रक्षकाला' भेटलों. त्यांनीहि परवानगी देण्याचें मान्य केलें. मात्र एका शर्तीवर कीं, मीं बालासुंदरम्साठीं दुसरा शेट शोधून काढला पाहिजे.

नवीन मालक शोधायचा तो इंग्रजच पाहिजे होता. हिंदी लोकांना गिरमिट्ये ठेवायला परवानगी नव्हती. अजून माझी थोड्याच इंग्रजांशीं ओळख झाली होती. त्यांपैकीं एकजणाला भेटलों. त्यानें माझ्यावर मेहेरबानी म्हणून बालासुंदरम्ला ठेवून घेण्याचें कबूल केलें. मी त्याच्या मेहेरबानीचा स्वीकार केला. मॅजिस्ट्रेटनें मालकाला गुन्हेगार ठरवून त्यानें बालासुंदरम्चें गिरमिट दुसऱ्याच्या नांवावर चढवून देण्याचें कबूल केल्याची नोंद केली.

बालासुंदरम्च्या केसची हकीकत गिरमिट्यांमध्यें चोहोंकडे पसरली, आणि मी त्यांचा बंधु ठरलों. मला हें नातें आवडलें. माझ्या कचेरीपुढें गिरमिट्यांची मालिका सुरू झाली, आणि त्यांचीं सुखदुःखें जाणण्याची मला उत्तम संधि प्राप्त झाली.

बालासुंदरम्च्या केसचे प्रतिध्वनि थेट मद्रास इलाख्यापर्यंत ऐकूं गेले. त्या इलाख्याच्या ज्या प्रदेशांतून लोक नाताळच्या गिरमिटांत जात, त्या त्या प्रदेशांतील लोकांना गिरमिट्यांनींच ही हकीकत कळविली. या केसचें खुद्द विशेष महत्त्व नव्हतें; पण आपल्यासाठीं सार्वजनिकरीत्या काम करणारा कोणी तरी निघाला आहे याचेंच लोकांना मोठें कौतुक वाटलें. त्यामुळें त्यांना एक तऱ्हेचा धीर मिळाला.

मीं वर लिहिलें आहे, कीं बालासुंदरम् आपला फेटा काढून हातांत धरून आंत आला होता. या गोष्टीमध्यें फार करुण रस भरलेला आहे; तिच्यावरून आपली हीन स्थिति दिसून येते. माझा पगडी उतरण्याचा प्रसंग आपल्याला पूर्वीं

कळलाच आहे. गिरमिट्या किंवा इतर नवखे हिंदी कोणाहि गोऱ्या इसमाकडे गेले असतां त्याच्या सन्मानार्थ डोक्याचें काढीत, मग ती टोपी असो, बांधलेली पगडी किंवा गुंडाळलेला फेटा असो. दोन हातांनीं सलाम करण्यानें भागत नसे. बालासुंदरमूला वाटलें, कीं माझ्यापुढेंहि त्याच तऱ्हेनें आलें पाहिजे. बालासुंदरमूचें अशा तऱ्हेचें दृश्य माझ्या अनुभवांत पहिलेंच होतें. मला शरम वाटली. बालासुंदरमूला फेटा बांधायला सांगितलें. तो बांधतांना त्यानें फार संकोच केला, पण त्यामुळें त्याला झालेला आनंद मी पाहूं शकलों. दुसऱ्याला उणेपणा आणण्यांत लोकांना आपला मान झालासें कसें वाटतें, हें कोडें मी अद्याप उलगडूं शकलेलों नाहीं.

●●●

## २१

# तीन पौंडांचा कर

बालासुंदरमूच्या बनावामुळें माझा हिंदी गिरमिट्यांशीं संबंध आला. पण त्यांच्यावर कर लादण्याची जी चळवळ चालली तिच्यामुळें मला त्यांच्या स्थितीचा खोल अभ्यास करावा लागला.

या १८९४ सालीं हिंदी गिरमिट्यांवर दर वर्षीं पंचवीस पौंडांचा म्हणजे ३७५ रुपयांचा कर लादण्याचा कायद्याचा मसुदा नाताळसरकारनें तयार केला. तो मसुदा वाचून मी तर दिङ्मूढच होऊन गेलों. स्थानिक कॉंग्रेसपुढें मीं तो विचारासाठीं मांडला. कॉंग्रेसनें त्या बाबतींत योग्य ती चळवळ करण्याचा ठराव केला.

या कराची थोडी हकीकत समजून घेतली पाहिजे.

सुमारें १८६० सालीं जेव्हां नाताळांत उसाचें पीक उत्तम होऊं शकेल, असें वसाहतवाल्या गोऱ्या लोकांना दिसलें तेव्हां ते मजुरांचा तपास करूं लागले. मजूर मिळाले नाहींत, तर ऊस पिकणार नाहीं, साखर पाडतां येणार नाहीं. नाताळांतील हबशी लोकांकडून ही मजुरी होण्यासारखी नव्हती. त्यासाठीं नाताळांतील गोऱ्या लोकांनीं हिंदुस्थान सरकारबरोबर खलबत करून हिंदी मजुरांना नाताळांत घेऊन जाण्याची परवानगी मिळविली. त्यांना पांच वर्षेंपर्यंत मजुरी करायला बांधून घेतलें. पांच वर्षांअखेर नाताळांत स्वतंत्रपणें बसण्याची त्यांना मोकळीक होती. जमिनीची मालकी धारण करण्याचा पूर्ण हक्कहि ठेवलेला होता. अशा तऱ्हेची लालूच त्यांना ठेवण्यांत आली होती. त्या वेळीं गोऱ्या लोकांनाहि

पाहिजेच होतें, कीं हिंदी मजुरांनीं आपलीं पांच वर्षें भरल्यानंतर जमीन कसावी आणि आपल्या उद्योगाचा लाभ नाताळला द्यावा.

हा लाभ हिंदी मजुरांनीं त्यांच्या अपेक्षेपलीकडे दिला. भाजीपाला खूप केला. हिंदुस्थानांतील कित्येक मधुर भाज्या नेऊन लावल्या. पूर्वींपासून होत असलेल्या भाज्या स्वस्त केल्या. हिंदुस्थानांतून नेऊन आंब्याची लागवड केली. पण त्याबरोबर त्यांनीं व्यापारहि करायला सुरुवात केली. घरें बांधण्यासाठीं जमिनी खरेदी केल्या आणि कित्येकजण मजुरांचे मोठे घरंदाज जमीनदार बनले. मजुरां-मधून तयार झालेल्या असल्या घरंदाज लोकांच्या पाठोपाठ स्वतंत्र व्यापारीहि आले. त्यांपैकीं मरहूम शेठ अबुबकर आमद हे प्रथम दाखल झाले. त्यांनीं स्वतःच्या धंद्याचा चांगला जम बसविला.

गोरे व्यापारी चपापले. हिंदी मजूर आल्याबद्दल प्रथम त्यांना संतोष वाटला, पण तेव्हां त्यांना त्यांच्या अंगच्या व्यापारी कौशल्याची कल्पना झाली नव्हती. ते स्वतंत्र होऊन शेतकरी बनून राहिले, तरी त्या वेळीं त्यांना हरकत वाटत नव्हती. पण व्यापारांत त्यांची स्पर्धा त्यांना सहन होईनाशी झाली.

हें हिंदी लोकांच्या विरोधाचें मूळ.

त्यांत इतर गोष्टींची भर पडली. आमची निराळ्या तऱ्हेची राहाणी, आमचा साधेपणा, आम्हांला थोडक्या नफ्यांत होणारा संतोष, आरोग्याच्या नियमांबद्दलची आमची बेफिकिरी, घर, अंगण वगैरे साफ ठेवण्याच्या बाबतींतील आळस, त्यांच्या बांधणी-दुरुस्तींतील कंजूषपणा, आमचे निराळे धर्म—ह्या सर्वांमुळें विरोधाला आणखी बळ चढलें.

तो विरोध मताधिकार काढून घेण्याच्या आणि गिरमिट्यांवर कर लाद-ण्याच्या कायद्यांच्या रूपानें प्रकट झाला. कायद्यांखेरीजहि हरतऱ्हेचीं खुरपाखुरपीं सुरू झालीच होती.

पहिला विचार तर असा होता, कीं गिरमिट पुरें व्हायला आलें, कीं हिंदी लोकांना जबरदस्तीनें परत पाठवावें, जेणेंकरून त्यांचा करार हिंदुस्थानांत पुरा व्हावा. ही सूचना हिंदुस्थान–सरकारकडून कबूल होण्याचा संभव नव्हता म्हणून अशी सूचना झाली कीं—

१ मजुरीचा करार पुरा होतांच गिरमिट्यानें परत हिंदुस्थानांत जावें; किंवा

२ दोनदोन वर्षांचें गिरमीट पुनःपुनः करावें; आणि अशा प्रत्येक प्रसंगीं त्यांना थोडी पगारवाढ देण्यांत यावी.

३ परतहि गेला नाहीं, किंवा पुनः मजुरीचा करारनामाहि केला नाहीं, तर त्यानें वर्षाला २५ पौंड कर म्हणून भरावे.

ही सूचना कबूल करून घेण्याकरतां सर हेन्री बीन्स व मि. मेसन् यांचें डेप्युटेशन हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें. लॉर्ड एल्जिन व्हाइसरॉय होते. त्यांनीं पंचवीस पौंडांचा कर तर नामंजूर केला; पण तशा तऱ्हेच्या प्रत्येक हिंदी माणसापासून तीन पौंडांचा कर घेण्यांत यावा याला संमति दिली. मला त्या वेळीं वाटलें, आणि अजूनहि वाटतें कीं, व्हाइसरॉयची ही घोडचूक झाली. त्यांनीं संमति देतांना हिंदुस्थानच्या हिताचा मुळींच विचार केला नाहीं. नाताळांतील गोऱ्या लोकांची अशा तऱ्हेनें सोय करून देणें त्यांना मुळींच शोभणारें नव्हतें. तीन-चार वर्षांनीं हाच कर गिरमीटमुक्त हिंदी लोकांच्या बायकांपासून, सोळा किंवा अधिक वयाच्या प्रत्येक मुलापासून आणि तेरा किंवा अधिक वयाच्या प्रत्येक मुलीपासूनहि घेण्याचें ठरलें. अशा तऱ्हेनें पतिपत्नी आणि दोन मुलें, ज्यांपैकीं पतीला फार फार तर मासिक चौदा शिलिंग मिळत असतील; एवढ्या कुटुंबापासून बारा पौंड, म्हणजे १८० रुपये, कर घेणें हा महाजुलूम म्हटला पाहिजे. अशा तऱ्हेचा कर दुनियेंत कोठेंहि अशा स्थितींतल्या गरीब माणसांपासून घेतला जात नव्हता.

या कराविरुद्ध तीव्र झगडा सुरू झाला. नाताळ-इंडियन-कॉंग्रेसकडून मुळींच ओरड झाली नसती, तर व्हाइसरॉयांनीं कदाचित् २५ पौंडहि कबूल केले असते. पंचविसांचे तीन पौंड झाले हाहि कॉंग्रेसच्या चळवळीचाच परिणाम असण्याचा पूर्ण संभव आहे. पण ही माझी चुकीची कल्पनाहि असूं शकेल. असेंहि असेल कीं, व्हाइसरॉयांनीं प्रथमपासूनच २५ पौंडांचा इनकार केला, आणि कॉंग्रेसनें विरोध केला नसता तरी त्यांनीं तीन पौंडांचा करच मान्य केला असता. तसें असलें तरी तो हिंदुस्थानच्या हिताचा भंग तर होताच. हिंदुस्थानचा हितरक्षक या नात्यानें व्हाइसरॉयानें असला अमानुष कर कधींच कबूल करायला नको होता.

पंचविसांचे तीन पौंड (३७५ रुपयांचे ४५ रुपये) झाले यांत कॉंग्रेस फुशारकी कसली सांगणार? कॉंग्रेस गिरमिट्यांचें हितरक्षण पूर्णपणें करूं शकली नाहीं हीच गोष्ट तिला सलत होती. आणि तीन पौंडांचा कर आज उद्यां निघालाच पाहिजे, हा निश्चय कॉंग्रेसनें कधींहि डोळ्यांआड केला नाहीं. तो निश्चय पार पाडतां वीस वर्षें लोटलीं. त्याच्यासाठीं नाताळच्याच नव्हे तर सर्व दक्षिण आफ्रिकेच्या हिंदी लोकांना कष्ट करावे लागले. त्यांच्यासाठीं गोखल्यांना निमित्तमात्र व्हावें लागलें. त्यामध्यें गिरमिट्या हिंदी लोकांना परिपूर्ण भाग घ्यावा लागला. त्याच्यापायीं कित्येकांना गोळीबाराखालीं मरावें लागलें. दहा हजारांवर हिंदी लोकांना तुरुंगवास भोगावा लागला.

पण अंतीं सत्याचा विजय झाला. सत्य हिंदी लोकांच्या तपश्चर्येच्या रूपानें प्रकट झालें. या विजयासाठीं अढळ श्रद्धा, धैर्य आणि सतत प्रयत्न यांची

आवश्यकता होती. हिंदी समाज जर हताश होऊन बसला असता, कॉंग्रेसला जर लढ्याचा विसर पडला असता, किंवा कर अनिवार्य आहे असें समजून ती गप्प बसली असती, तर हा कर आजतागायत हिंदी गिरमिट्यांपासून वसूल करण्यांत आला असता, आणि त्याचें लांच्छन तिकडील हिंदी लोकांबरोबर समस्त हिंदुस्थानालाहि लागलें असतें.

●●●

## २२

# धर्मनिरीक्षण

अशा तऱ्हेनें मी जो समाजाच्या सेवेमध्यें तन्मय होऊन गेलों, त्याचें कारण आत्मदर्शनाची अभिलाषा हेंच होतें. ईश्वराची ओळख सेवेनेंच होईल असें समजून मीं सेवाधर्माचा स्वीकार केला. हिंदी लोकांचीच सेवा करण्याचें कारण ती सेवा मला सहजप्राप्त होती, ती कशी करायची तें मला समजत होतें. मला तिचे मार्ग शोधायला जावें लागलें नव्हतें. मी माझ्या समजुतीनें प्रवास करण्यासाठीं, काठेवाडच्या लटपटींतून सुटण्यासाठीं आणि निर्वाहाचें साधन मिळविण्यासाठीं दक्षिण आफ्रिकेला गेलों पण तेथें सांपडलों ईश्वराच्या शोधांत—आत्मदर्शनाच्या प्रयत्नांत. खिश्चन मित्रांनीं माझी धर्मजिज्ञासा फार तीव्र करून सोडली ती कांहीं केल्या शान्त होण्यासारखी नव्हती; मी शान्त बसायचें म्हटलें असतें, तरी खिस्ती मित्र मला थोडेंच बसूं देणार होते ! कारण कीं, डरबनमध्यें मि. स्पेन्सर वॉल्टन हे दक्षिण आफ्रिकेच्या मिशनचे प्रमुख होते—यांनीं मला हुडकून काढला. त्यांच्या घरीं मी कुटुंबांतल्यासारखा बनून गेलों. या परिचयाचें मूळ प्रिटोरियामध्यें झालेल्या भेटीमध्यें होतें. मि. वॉल्टनची शैली कांहीं और होती. त्यांनीं मला खिस्ती होण्याचा कधीं आग्रह केल्याचें स्मरत नाहीं. परंतु त्यांनीं आपलें जीवन माझ्यापुढें धरलें, आणि आपलीं सर्व कार्यें मला पाहूं दिलीं. त्यांची धर्मपत्नी अति नम्र परंतु तेजस्वी बाई होती.

मला या जोडप्याची पद्धति पसंत पडली. आमच्यामध्यें मुळांतच असलेले मतभेद आम्हां दोघांनाहि कळत होते. हे भेद चर्चा करून काढून टाकतां येण्यासारखे नव्हते. जेथें उदारता, सहिष्णुता आणि सत्य हीं वास करीत असतात तेथें मतभेदहि लाभदायक ठरतात. मला या जोडप्याची नम्रता, उद्योगिता आणि कार्यपरायणता फार आवडली. त्यामुळें आम्ही वरच्यावर भेटत असूं.

त्यांच्याशीं झालेल्या संघट्टणामुळें मी जागृत राहिलों. धार्मिक वाचनासाठीं मला जशीं प्रिटोरियामध्यें फुरसत मिळत असे तशी आतां मिळणें अशक्य होतें. पण जो कांहीं वेळ मिळे, त्याचा उपयोग मी तसल्या वाचनाच्या कामीं करीत असें. माझा धार्मिक पत्रव्यवहार चालू होताच. रायचंदभाई मला मार्गदर्शन करीत असत. एका मित्रानें मला नर्मदाशंकरांचें धर्मविचार पुस्तक पाठवलें. त्याची प्रस्तावना माझ्या उपयोगी पडली. नर्मदाशंकरांच्या विलासी जीवनासंबंधाच्या गोष्टी मीं ऐकल्या होत्या. त्यांच्या जीवनामध्यें झालेल्या फेरफाराचें वर्णन प्रस्तावनेंत आलें होतें, तें मला फार चित्ताकर्षक वाटलें व त्यामुळें त्या पुस्तकाबद्दल मला आदर वाटूं लागला. मीं तें लक्षपूर्वक वाचलें. मॅक्समुलरचें 'हिंदुस्थान काय शिकवतो' हें पुस्तक मी मोठ्या आवडीनें वाचलें. थिऑसॉफिकल सोसायटीनें प्रसिद्ध केलेलें उपनिषदांचें भाषांतर वाचलें. माझा हिंदुधर्माबद्दलचा आदर वाढत चालला. त्यांतील खुब्या मला समजूं लागल्या. पण म्हणून मला इतर धर्मांबद्दल तिरस्कार मात्र वाटला नाहीं. वॉशिंग्टन अर्व्हिंगकृत महमदचरित्र आणि कार्लाईलची महमदप्रशस्ति वाचली. पैगंबराबद्दल माझी आदरबुद्धि दुणावली. 'जरदुस्ताची वचनें' नांवाचें पुस्तकहि वाचलें.

अशा तऱ्हेनें मीं निरनिराळ्या संप्रदायांचें कमीजास्त ज्ञान मिळविलें. आत्मनिरीक्षण वाढलें. वाचून जें पसंत पडेल तें अंमलांत आणण्याची संवय दृढ झाली. त्यामुळें हिंदुधर्मग्रंथांमध्यें सुचविलेल्या प्राणायामासंबंधींच्या कित्येक क्रिया पुस्तकावरून समजल्या तशा करण्यास मीं सुरुवात केली. पण मला जमेना. हिंदुस्थानांत परत जाईन तेव्हां कोणा तरी शिक्षकाच्या देखरेखीखालीं त्यांचा अभ्यास करावा असा बेत केला. तो कधीं पार पडूं शकला नाही.

टॉलस्टॉय्च्या पुस्तकांचें वाचन वाढवलें. त्याच्या 'गॉस्पेलस् इन् ब्रीफ' (नव्या कराराचा सारांश), 'व्हॉट टु डू' (तर मग काय करावें बरें?) वगैरे पुस्तकांचा मनावर फार दृढ परिणाम झाला. विश्वप्रेम माणसाला कोठवर घेऊन जाऊं शकेल हें माझ्या अधिकाधिक लक्षांत येऊं लागलें.

याच वेळीं दुसऱ्या एका ख्रिस्ती कुटुंबाशीं माझा संबंध जमला. त्यांच्या इच्छेवरून मी दर रविवारीं वेस्लियन देवळांत जात असें. बहुतेक दर रविवारीं संध्याकाळीं जेवायलाहि मी त्यांच्याकडे असायचा. वेस्लियन देवळाची माझ्या मनावर बरीशी छाप पडली नाहीं. तेथें होणारीं प्रवचनें मला नीरस वाटत. प्रेक्षकांमध्ये मला भक्तिभाव दिसून आला नाहीं. हें अकरा वाजतांचें मंडळ मला भक्तजनांचेंसें दिसलें नाहीं, तर कांहीं अंशीं करमणुकीसाठीं आणि कांहीं अंशीं रिवाज आहे म्हणून आलेल्या संसारी जीवांचेंच दिसलें. कधीं कधीं या सभेमध्यें इच्छा नसतांहि मला डुलक्या येत. मला लाज वाटे, पण माझ्या आसपासच्या

एकाद्या इसमालाहि डुलक्या घेतांना पाहिलें म्हणजे माझी लाज हलकी होई. माझी ही स्थिति मला आवडली नाहीं. शेवटीं मीं त्या देवळांत जाण्याचें सोडून दिलें.

ज्या कुटुंबाकडे मी दर रविवारीं जात असें, त्याच्याकडून मला रजाच मिळाली म्हटलें तरी चालेल. घरधनीण भली, भोळी, पण संकुचित मनाची होती. तिच्याबरोबर दर वेळीं कसली तरी धर्मचर्चा चालेच. त्या वेळीं मी घरीं 'लाइट ऑफ एशिया' वाचीत होतों. आम्ही जीझस आणि बुद्ध यांच्या जीवनाची तुलना करूं लागलों.

"गौतमाची दयाबुद्धि पहा ना! ती मनुष्यजातीपलीकडे जाऊन इतर प्राण्यांपर्यंत पोंचली होती. त्याच्या खांद्यावर खेळणाऱ्या बकऱ्याच्या पिल्लाचें चित्र डोळ्यांसमोर उभें राहिलें म्हणजे तुमचें हृदय प्रेमानें भरून येत नाहीं? प्राणिमात्राबद्दलचें हें प्रेम मला येशूच्या चरित्रांत कोठें आढळत नाहीं."

बाईला वाईट वाटलें. माझ्या तें लक्षांत येतांच मीं तो विषय पुढें चालविला नाही. आम्ही जेवणाच्या खोलींत गेलों. त्यांचा पांच एक वर्षांचा हंसतमुख मुलगाहि आमच्याबरोबर होता. मला मुलें भेटलीं म्हणजे आणखी काय पाहिजे? त्याच्याबरोबर माझी दोस्ती जमलेली होतीच, मीं त्याच्या ताटांत असलेल्या मांसाच्या तुकड्याची थट्टा केली आणि माझ्या बशींत शोभून राहिलेल्या सफरचंदाची स्तुति केली. निष्कपट मूल तें, त्याचें मन वळलें; तोहि सफरचंदाच्या स्तुतींत सामील झाला.

पण आईचें काय? माझें बोलणें बिचारीच्या मनाला लागलें!

मी सावधगिरी केली. गप्प बसलों. भाषणाचा विषय बदलला.

पुढच्या आठवड्याला मीं सावधपणेंच त्यांच्याकडे गेलों खरा, परंतु मला धास्ती वाटतच होती. आपणच होऊन त्यांच्याकडे जाणें बंद करावें हें मला सुचलें नाहीं, ठीकहि वाटलें नाही. भल्या बाईनेंच माझी अडचण दूर केली. ती म्हणाली, "मि. गांधी, तुम्ही वाईट वाटून घेऊं नका. पण मला तुम्हांला सांगितलें पाहिजे कीं, तुमच्या संगतीचा माझ्या मुलावर वाईट परिणाम होऊं लागला आहे. आतां तो रोज मांस खायला आढेवेढे घेतो आणि त्या दिवसाच्या तुमच्या चर्चेची आठवण देऊन फळें मागूं लागतो. मला हें परवडायचें नाहीं. माझ्या मुलानें मांस सोडलें, तर तो आजारी नाहीं पडला तरी अशक्त खास बनेल. तें मीं कसें सहन करावें? तुमची चर्चा आम्हां मोठ्या माणसांशीं केलेली शोभेल. मुलावर तिचा दुष्ट परिणामच होणार."

"मिसेस—,मला वाईट वाटतें. आईच्या नात्यानें तुम्हांला वाटणारी चिंता मी समजूं शकतों. मलाहि मुलें आहेतच. या आपत्तींतून तोड काढणें सोपें आहे. माझ्या बोलण्याचा होईल त्यापेक्षां मीं काय खातों, न खातों. तें पाहून

मुलावर फारच अधिक परिणाम होणार. म्हणून उत्तम मार्ग म्हणजे मीं यापुढें रविवारीं तुमच्याकडे येऊं नये, त्यामुळें आपल्या स्नेहांत फरक पडण्याचें कांहींच कारण नाहीं."

बाई आनंदित होऊन म्हणाली, "तुमचे आभार मानतें."

•••

## २३

# गृहव्यवस्था

मुंबईत आणि विलायतेंत मीं बिऱ्हाड थाटलें होतें त्यांत आणि नाताळांतील घरच्या व्यवस्थेंत फरक होता. नाताळांत पुष्कळसा खर्च निव्वळ प्रतिष्ठेसाठीं चालविला होता. नाताळांत हिंदी बॅरिस्टर व हिंदी लोकांचा प्रतिनिधि या नात्यानें मला चांगल्या थाटांत राहिलें पाहिजे अशी माझी समजूत होती, म्हणून श्रीमंत वस्तीमध्यें चांगलेंसें घर घेतलें होतें. घरांत सामानसुमानाची मांडणीहि सुरेख केली होती. अन्न साधेंच असे, पण इंग्रज मित्रांना जेवायला बोलवायचें असे, त्याचप्रमाणें हिंदी मित्रांनाहि बोलवीत असें; त्यामुळें तिकडूनहि खर्च बराच येई.

नोकराची अडचण सगळीकडेच असते. कोणाला नोकर म्हणून ठेवण्याचें मला कधीं जुळलेलेंच नाहीं.

माझ्याबरोबर एक सोबती राहात असे. एक आचारी ठेवला होता, तो कुटुंबांतलाच बनला. ऑफिसांत जे कारकून ठेवले होते, त्यांपैकी शक्य तेवढ्यांना घरींच ठेवीत असें.

हा प्रयोग यशस्वी झाला अशी माझी समजूत आहे; पण त्यांतून मला जगाचे कडवे अनुभवहि मिळाले.

माझा तो सोबती फार हुशार आणि माझ्या समजुतीनें भरंवशाला जागणारा होता. पण मला त्याची पारख झाली नाहीं. ऑफिसांतील एका कारकुनांना मी घरीं ठेवलें होतें. या सोबत्याला त्याचा हेवा वाटला. त्यानें असें जाळें रचलें, कीं त्यामुळें त्या कारकुनांविषयीं मीं संशय घ्यावा. ते कारकून फार स्वतंत्र बाण्याचे होते. त्यांनीं घर आणि ऑफिस दोहोंवरीह लाथ मारली. मला वाईट वाटलें. त्यांच्यावर अन्याय झाला असला तर? हा विचार मला जाचीत राहिला.

इतक्यांत मीं जो आचारी ठेवला होता, त्याला कांहीं कारणानें दुसरीकडे जावें लागलें. मी त्याला मित्राच्या शुश्रूषेसाठीं ठेवला होता. त्यामुळें त्याच्याऐवजीं दुसरा आचारी आणावा लागला. हा मनुष्य पक्का पाताळयंत्री होता असें मला

मागून कळलें. जणूं काय मला तसल्याच माणसांची जरूर असावी नाहीं, त्याप्रमाणें त्यांचा मला उपयोग झाला.

या आचाऱ्याला ठेवून दोनतीन दिवस झाले असतील नसतील, तेवढ्यांत त्याला माझ्या घरांत माझ्या न कळत चाललेल्या कृष्णकृत्यांचा सुगावा लागला, आणि त्यानें मला सूचना देण्याचा निश्चय केला. मी भावार्थी आणि साधारण मानानें चांगला मनुष्य आहे अशी माझ्याबद्दलची समजूत लोकांमध्यें पसरली होती. त्यामुळें या आचाऱ्याला माझ्याच घरांत चाललेली ती घाण भयानक वाटली.

मी ऑफिसांतून दुपारच्या जेवणासाठीं एक वाजतां घरीं जात असें. बारा वाजण्याचा सुमार होता, इतक्यांत आचारी धांपा टाकीत टाकीत आला आणि मला म्हणाला, " तुम्हांला कांहीं पाहायचें असलें तर असेच्या असे घरीं चला. "

मीं म्हटलें, " याचा अर्थ काय ? काय काम आहे तें सांगशील कीं नाहीं ? या वेळीं मीं घरीं येऊन पाहायचें काय असणार ? "

" नाहीं आला तर पश्चात्ताप पावाल. तुम्हांला याहून जास्त सांगत नाहीं. " आचारी म्हणाला.

त्याच्या दृढतेचा माझ्यावर परिणाम झाला. कारकुनाला बरोबर घेऊन मी घरीं गेलों. आचारी पुढें चालला.

घरीं पोंचतांच तो मला माडीवर घेऊन गेला. ज्या खोलींत तो सोबती राहात असे, तिच्याकडे बोट दाखवून म्हणाला, " ही खोली उघडून पहा."

आतां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. मीं खोलीचा दरवाजा ठोकला. जबाब कसला मिळणार ? मीं खूप जोरानें दरवाजा ठोकला. भिंतसुद्धां हादरली, तेव्हां कोठें दरवाजा उघडला. आंत पहातों, तर एक बदफैली बाई ! मीं तिला म्हटलें, " बाई, तूं येथून निघून चल. पुन्हां कधीं या घरांत पाऊल टाकूं नकोस." सोबत्याला म्हटलें, " आजपासून तुझा माझा संबंध तुटला. मीं सपशेल फसलों, आणि मूर्खपणा केला. माझ्या विश्वासाची ही योग्य फेड नव्हे. "

सोबत्याचें बिनसलें. माझें सर्व चवाठ्यावर आणण्याची मला धमकी देऊं लागला.

" माझ्यापाशीं गुप्त व्यवहार कांहीं एक नाहीं. मीं जें कांहीं केलें असेल तें तुम्ही खुशाल जाहीर करा. पण तुमचा माझा संबंध मात्र तुटला. "

सोबती अधिकच संतापला. मीं खालीं उभ्या असलेल्या कारकुनाला म्हटलें, " तुम्ही जा, पोलीस सुपरिंटेंडंटला माझा सलाम सांगा आणि म्हणावें, माझ्या एका जोडीदारानें मला दगा दिला आहे. त्याला मी आपल्या घरांत ठेवूं इच्छीत नाहीं, तरी तो निघून जात नाहीं. मेहेरबानी करून मला मदत पाठवा. "

गुन्हेगारामध्यें धमक कोठून असणार? मी एवढें म्हणतांच तो सोबती नरम आला. त्यानें माफी मागितली. सुपरिंटेंडंटकडे मनुष्य न पाठविण्याबद्दल गयावया करूं लागला, आणि लगेच घर सोडून जाण्याचें कबूल केलें. गेलाहि.

या बनावामुळें माझ्या आयुष्याची चांगली झडती झाली. त्या इसमाची सोबत किती अनिष्ट होती, आणि त्यानें मला कसें भारलें होतें तें माझ्या आतांच स्पष्टपणें लक्षांत आलें. या सोबत्याला ठेवण्यामध्यें मीं चांगलें करण्यासाठीं वाईट साधन चालूं दिलें होतें; कारंटीच्या वेलाला कांकड्या धरतील अशी मीं आशा केली होती. सोबत्याची चालचलणूक चांगली नव्हती, तरी पण तो माझ्याशीं इमानानें वागेल अशी माझी समजूत होती. त्याला सुधारायला पहात असतां मीच जवळजवळ मारला गेलों. माझ्या हितचिंतकांचा सल्ला मीं मनावर घेतला नाहीं. मोहामुळें मी आंधळ्या भिंतीसारखा झालों.

या अनपेक्षित बनावानें जर माझे डोळे उजडले नसते, मला खरा प्रकार समजला नसता, तर संभव आहे कीं, जें स्वार्पण मी करूं शकलों, तें कधींहि करूं शकलों नसतों. माझी सेवा शेवटपर्यंत अपूर्ण राहिली असती; कारण कीं, त्या सोबत्यानें माझ्या प्रगतीला आडकाठी आणली असती. मला माझा बराचसा वेळ त्याच्याकडेच द्यावा लागला असता. मला अंधारांत ठेवून माझ्या मनांत भलभलतेंच भरवून देण्याचें कसब त्याच्या अंगीं होतें.

पण देव तारी त्याला कोण मारी? माझी निष्ठा शुद्ध होती. त्यामुळें माझ्या चुका होत असतांहि मी निभावून आलों आणि पहिल्याच अनुभवानें मला सावध केला.

त्या आचाऱ्याला जसा काय देवानेंच पाठविला! त्याला स्वयंपाक करतां येत नसे. तो माझ्याकडे चालण्यासारखा नव्हता. पण तो येता ना, तर दुसऱ्या कोणी मला जागा केला नसता. ती बाई प्रथमच माझ्या घरांत आली होती असें नाहीं. पण या आचाऱ्याइतकी दुसऱ्या कोणाला हिंमत होईल तर ना! सोबत्यावर माझा परिपूर्ण विश्वास असल्याचें सर्वांना माहीत होतें.

एवढा उपकार करून आचाऱ्यानें त्याच दिवशीं, नव्हे त्याच क्षणी निरोप मागितला.

"मला तुमच्या घरीं राहून चालायचें नाहीं. तुम्ही पडलेत भोळे. माझें इथें काम नाहीं."

मी आग्रह केला नाहीं.

त्या कारकुनांवर संशय उपस्थित करणारा हा सोबतीच होता, हें मला या वेळींच समजलें. त्याला झालेल्या अन्यायाचें निराकरण करण्याचा मी खूप प्रयत्न

केला. परंतु शेवटपर्यंत मी त्याचें पूर्ण समाधान करूं शकलों नाहीं; ही गोष्ट मला नेहमींच दुःख देत राहिली. फुटलेलें भांडें कितीहि मजबूत सांधलें, तरी तें सांधलेलेंच; अखंड कांहीं केल्या व्हायचें नाहीं.

● ● ●

## २४

# स्वदेशीं परत आलों

आतां मला दक्षिण आफ्रिकेंत येऊन तीन वर्षें होऊन गेलीं होतीं. मी लोकांना ओळखूं लागलों होतों, लोक मला ओळखूं लागले होते. १८९६ सालीं सहा महिने घरीं जाण्याची मीं परवानगी मागितली. मला दक्षिण आफ्रिकेंत बराच काळपर्यंत राहावें लागणार हें मला दिसत होतें. माझी वकिली चांगली चालली होती असें म्हणायला हरकत नाहीं. सार्वजनिक कार्यासाठीं लोकांना माझी जरूर वाटत होती, मलाहि वाटत होती. म्हणून मीं दक्षिण आफ्रिकेमध्यें सहकुटुंब राहण्याचा विचार केला आणि त्यासाठीं स्वदेशीं जाऊन येणें मला योग्य वाटलें. शिवाय हिंदुस्थानांत गेलों, तर तेथें कांहीं सार्वजनिक कामहि करतां येईल असें वाटलें. हिंदुस्थानांत लोकमत जागृत करून या प्रश्नाकडे अधिक लक्ष वेधून घेतां येईल अशी समजूत होती. तीन पौंडांचा कर म्हणजे तर वाहती जखम होती. तो नाबूत होईपर्यंत गप्प बसणें शक्य नव्हतें.

पण मी स्वदेशीं गेलों, तर काँग्रेसचें आणि शिक्षणसंस्थेचें काम कोण संभाळणार? दोन सहकाऱ्यांवर दृष्टि गेली. आदमजी मियांखान आणि पारशी रुस्तुमजी. व्यापारी वर्गांतून पुष्कळ कार्यकर्ते निघाले होते, पण कार्यवाहाचें काम करूं शकतील असे नियमित काम करणारे आणि दक्षिण आफ्रिकेंत जन्मलेल्या हिंदी लोकांचीं मनेंहि आकर्षूं शकतील असे हे दोघेच पहिल्या श्रेणींत घालण्या-सारखे होते. कार्यवाहाला सामान्य इंग्रजी ज्ञानाची जरूर होतीच. या दोघांपैकीं मरहूम आदमजी मियांखान यांस कार्यवाहाचें काम देण्याची मीं काँग्रेसला शिफारस केली आणि ती मान्य झाली. अनुभवानें ही निवड फार उत्तम ठरली. कळकळ, उदारता, गोडा स्वभाव व विवेक यांमुळें शेठ आदमजी मियांखाननीं सर्वांना संतोष दिला; व सर्वांना विश्वास आला, कीं कार्यवाहाचें काम करण्या-साठीं वकील-बॅरिस्टरची किंवा पुष्कळसें इंग्रजी शिकलेल्या पदवीधराची जरूर आहे असें नाहीं.

१८९६ सालच्या मध्याच्या सुमाराला मी स्वदेशीं येण्यासाठीं पोंगोला आगबोटीनें निघालों. ही बोट कलकत्त्याला जाणार होती.

बोटीवर उतारू खूप होते. दोन इंग्रज अंमलदार होते, त्यांची माझी सोबत जमली. त्यांपैकीं एकाबरोबर मी रोज तासभर बुद्धिबळें खेळत असें. बोटीवरील डॉक्टरानें मला एक तामीळशिक्षक नांवाचें पुस्तक दिलें, त्याचा मीं अभ्यास सुरू केला.

नाताळांत माझ्या लक्षांत आलें होतें, कीं मुसलमानांशीं जास्त निकट संबंध जोडण्यासाठीं मला उर्दू शिकलें पाहिजे, आणि मद्रासी लोकांबरोबर तसाच संबंध जोडण्यासाठी तामीळ शिकलें पाहिजे.

उर्दूसाठी इंग्रज मित्राच्या मागणीवरून मीं डेकच्या उतारूंमधून एक चांगला मुनशी शोधून काढला, आणि आमचा अभ्यास जोरांत सुरू झाला. इंग्रज अंमलदाराची स्मरणशक्ति माझ्यापेक्षां वरच्या दर्जाची होती. उर्दू अक्षरें ओळखतांना मला पंचाईत पडे. पण त्यानें एकदां शब्द पाहिला कीं पुनः विसरायचा नाहीं. मी जास्त मेहनत घेऊन पाहिली तरी मला त्याच्या जोडीला येतां येईना.

तामीळचा अभ्यासहि ठीक चालला. त्यांत कोणाची मदत मिळण्यासारखी नव्हती. पुस्तकहि अशा तऱ्हेनें लिहिलेलें होतें कीं, मदतीची विशेष जरूर पडूं नये.

मला उमेद वाटत होती, कीं हा आरंभलेला अभ्यास देशी पोंचल्या-नंतरहि मी चालू ठेवूं शकेन. पण तें जमलें नाहीं. १८९३ नंतरचें माझें वाचन व माझा अभ्यास हीं मुख्यत्वेंकरून तुरुंगांतच झालीं. या दोन्ही भाषांचें ज्ञान मी पुढें चालविलें खरें, पण तें सर्व तुरुंगांतच. तामीळचें दक्षिण आफ्रिकेंतील तुरुंगांत आणि उर्दूचें येरवड्याला. पण तामीळ बोलतां कधींच आलें नाहीं. वाचायला नीट येऊं लागलें होतें, त्यावर संवय नसल्यामुळें गंज चढत आहे. हें न्यून मला अद्याप सलत आहे. दक्षिण आफ्रिकेंतील मद्रासी लोकांकडून मीं प्रेमरसाचा यथेच्छ आस्वाद घेतला आहे. त्यांचें स्मरण मला प्रतिक्षणीं होतें. त्यांची श्रद्धा, त्यांचा उद्योग, त्यांच्यापैकीं अनेकांचा निःस्वार्थ त्याग हें सर्व कोणी तामीळ, तेलगू माझ्या दृष्टीला, पडला कीं आठवल्याशिवाय रहात नाहीं. आणि ते सर्व जवळजवळ निरक्षर होते. जसे पुरुष तशा स्त्रियाहि होत्या. दक्षिण आफ्रिकेंतील लढा निरक्षर लोकांचाच होता; त्यांतील लढवय्येहि निरक्षरच होते. तो लढा गरीबांचा होता आणि गरीबच त्यामध्यें झगडले.

या भल्या भोळ्या हिंदी लोकांचें चित्त हरण करण्याच्या कामीं मला भाषेचा अडथळा कधींच आला नाहीं. त्यांना मोडकीतोडकी हिंदुस्थानी समजे, जेमतेम इंग्रजी समजे, तेवढ्यावरून आमचें गाडें चालत असे. पण मी या प्रेमाचा मोबदला म्हणून तामीळ तेलगू शिकू इच्छीत होतों. तामीळ थोडेंबहुत शिकलों.

तेलगू शिकण्याचा प्रयत्न हिंदुस्थानांत असतांना केला, पण मुळाक्षरें पाहाण्या-पलीकडे मजल गेलीच नाहीं.

मीं तामीळ तेलगू हस्तगत केलें नाहीं. यापुढें करणें दुरापास्तच. म्हणून हे द्रविड भाषाभाषी लोक हिंदुस्थानी शिकतील अशी मी आशा करीत आहें. दक्षिण आफ्रिकेंतील द्रविड ' मद्रासी ' तर थोडथोडें हिंदी बोलतातच. अडचण येते ती इंग्रजी शिकलेल्यांशींच. जसा काय इंग्रजीचें ज्ञान हा आमचा देशी भाषा शिकण्याच्या मार्गांत एक अडाणाच आहे.

पण हें विषयान्तर झालें. आपल्याला प्रवास पुरा करावयाचा आहे.

अजून पोंगोला बोटीच्या कप्तानाची ओळख करून द्यायची राहिली आहे. आमची मैत्री जमली. हा भला कप्तान प्लीमथ ब्रधरन्च्या संप्रदायापैकीं होता. त्यामुळें नौकानयनविद्येपेक्षां अध्यात्मविद्येच्याच गोष्टी आमच्यामध्यें अधिक होत. त्यानें नीति आणि धर्मश्रद्धा यांच्यामध्यें भेद केला. त्याच्या मतें बायबलचा अभ्यास म्हणजे पोरखेळ होता. बायबल सोपें आहे हीच तर त्याची खुबी. स्त्री-पुरुषांनीं, मुलांनीं, कोणीहि येशूवर आणि त्याच्या बलिदानावर विश्वास ठेवला, कीं त्यांचीं पापें धुऊन जातात. या प्लीमथ ब्रधरन्ला पाहून मला प्रिटोरियांतील ब्रधरन्च्या परिचयाची आठवण झाली. ज्यांत नीतीला जपावें लागतें तो धर्म त्याला कुचकामाचा वाटे. ही मैत्री व ही आध्यात्मिक चर्चा मूळ माझ्या अन्नाहारावरून सुरू झाली. मी मांस कां खाऊं नये ? गोमांस खाण्यांत दोष कोणता ? पशुपक्ष्यांनाहि ईश्वरानें झाडपाल्याप्रमाणें मनुष्याच्या सुखसोयीसाठीं व आहारासाठींच निर्माण केलें नाहीं का ? असल्या त्याच्या प्रश्नांवरून आध्यात्मिक चर्चा उपस्थित झाल्याशिवाय राहीच ना.

आम्हीं एकमेकांची समजूत पाडूं शकलों नाहीं. माझा स्वतःचा विचार अधिकच दृढ झाला, कीं धर्म आणि नीति हीं एकाच वस्तूचीं दोन नांवें आहेत. कप्तानालाहि स्वतःच्या मताच्या सत्यतेबद्दल बिलकुल शंका नव्हती.

चोवीस दिवसांच्या शेवटीं हा सुखाचा प्रवास पुरा झाला, आणि हुगळीचें सौंदर्य पाहात पाहात मी कलकत्त्याला उतरलों. मी त्याच दिवशीं मुंबईचें तिकीट काढलें.



# २८

# हिंदुस्थानांत

कलकत्त्याहून मुंबईला जातांना वाटेंत प्रयाग लागलें. तेथें गाडी ४५ मिनिटें थांबत होती. तेवढ्या वेळांत मी शहरांत फेरी मारून येण्याचा विचार केला. मला केमिस्टाकडून औषधहि घ्यायचें होतें. केमिस्ट डोळे चोळीतच बाहेर आला. औषध देईपर्यंत त्यानें खूप वेळ घेतला. मी स्टेशनावर पोंचतों तोंच गाडी चालू झालेली दिसली. भल्या स्टेशनमास्तरानें गाडी मिनिटभर थांबवून धरली, पण मी येत नाहींसें पाहून माझें सामान उतरून घेण्याची त्यानें खबरदारी घेतली.

मी केलनरच्या हॉटेलांत उतरलों, आणि तेथूनच माझ्या कामाला सुरुवात करण्याचें ठरविलें. येथील 'पायोनियर' पत्राची कीर्ति मी ऐकली होती. तें राष्ट्रीय-आकांक्षांना विरोध करीत असल्याचेंहि मला माहीत होतें. त्या वेळीं धाकटे मि. चेझ्नीं संपादक असल्याचें मला स्मरत आहे. मला सर्व पक्षांच्या गांठी घेऊन प्रत्येकाची मदत मिळवायची होती. म्हणून मी मि. चेझ्नींना भेटीसाठीं चिठ्ठी लिहिली, गाडी चुकल्याचें लिहिलें आणि दुसऱ्याच दिवशीं मला प्रयाग सोडून जायचें आहे असें कळविलें. उत्तरीं त्यांनीं मला लगेच भेटण्यास सांगितलें. मला बरें वाटलें. त्यांनीं माझें म्हणणें लक्षपूर्वक ऐकून घेतलें. मी कांहीं लेख वगैरे लिहिले, तर आपण त्यांचें लगेच समालोचन करूं असें सांगितलें; व आणखी म्हणाले, "पण तुमच्या सगळ्याच मागण्या मला मान्य होतील असें सांगवत नाहीं. वसाहतींच्या दृष्टिबिंदूहि आम्हांला समजून घेतला पाहिजे व हिशेबांत घेतला पाहिजे."

मीं उत्तर दिलें, "तुम्ही या प्रश्नाचा अभ्यास करावा व त्याची चर्चा करावी एवढें मला पुरे आहे. शुद्ध न्यायापलीकडे मी कांहींहि मागत नाहीं किंवा इच्छीत नाहीं." बाकीचा दिवस प्रयागच्या भव्य त्रिवेणी संगमाच्या दर्शनामध्यें आणि पुढील कामाचा विचार करण्यामध्यें घालविला.

या अनपेक्षित मुलाखतीनें माझ्यावर नाताळांत झालेल्या हल्ल्याचें बीज पेरलें गेलें.

मुंबईला न थांबता राजकोटला गेलों आणि एक चोपडें लिहिण्याची तयारी केली. चोपडें लिहून छापून काढण्याखालीं सुमारें एक महिना गेला. चोपड्याला हिरवा पुठ्ठा घातलेला होता. त्यावरून पुढें त्याची 'हिरवें चोपडें' या नांवानें प्रसिद्धि झाली. त्यांत मीं दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या स्थितीचें चित्र इरादापूर्वक सौम्य रेखाटलें होतें. नाताळांतील दोन चोपड्यांमध्यें, ज्यांचा मीं पूर्वी

उल्लेख केलेलाच आहे, मीं जी भाषा वापरली होती त्याहून यामध्यें नेमस्त भाषा वापरली. कारण कीं, मला माहीत होतें कीं, लहान दुःखहि दुरून पाहिलें असतां भयंकर वाटतें.

हिरव्या चोपड्याच्या दहा हजार प्रती छापविल्या, व त्या सबंध हिंदुस्थान-भर वर्तमानपत्रांना आणि सर्व पक्षांच्या प्रसिद्ध लोकांना पाठविल्या. पायोनियर-मध्यें त्याच्यावर सर्वांत आधीं लेख प्रसिद्ध झाला. त्याचा सारांश विलायतेला गेला, आणि त्या सारांशाचा सारांश पुनः रॉयटरमार्फत नाताळला गेला. ही तार अवघी तीन ओळींची होती. तींत नाताळांत हिंदी लोकांना कशा तऱ्हेनें वागविण्यांत येतें याचें जें चित्र मीं रेखाटलें होतें, त्याची लहान आवृत्ति होती. ती माझ्या शब्दांत नव्हती. तिचा परिणाम काय झाला तें पुढें पाहूं. हळूहळू सर्व प्रमुख वर्तमानपत्रांमध्यें या प्रश्नाची सविस्तर चर्चा झाली.

हीं चोपडीं टपालांत टाकण्यासाठीं कागद वगैरे गुंडाळून तीं तयार करण्याचें काम त्रासाचें होतें; तें पैसे देऊन करून घ्यावें, तर फार खर्च आला असतां. मी एक सोपी युक्ति शोधून काढली. आळीतील सर्व मुलांना एकत्र केलें आणि त्यांच्यापैकीं जेवढ्यांना आपल्या सकाळच्या वेळापैकीं दोन-तीन तास देतां येण्या-सारखे असतील त्यांनीं ते द्यावे अशी त्यांच्यापाशीं मागणी केली. मुलांनीं खुषीनें एवढें काम करण्याचें मान्य केलें. माझ्याकडून मी त्यांना माझ्याकडे जमणारी वापरलेलीं पोस्टाचीं तिकिटें आणि आशीर्वाद देण्याचें कबूल केलें. मुलांनीं हंसत खेळत माझें काम पुरें करून दिलें. लहान मुलांनाहि अशा तऱ्हेनें स्वयंसेवक बनविण्याचा हा माझा पहिला प्रयोग होता. या मुलांपैकीं दोघेजण आजहि माझ्या बरोबर काम करीत आहेत.

याच सुमाराला मुंबईत पहिल्या प्रथम प्लेग सुरू झाला. चोहीकडे लोक घाबरे झाले. राजकोटमध्येंहि प्लेग फैलावण्याची भीति होती. मला वाटलें, कीं आपण आरोग्यखात्यामध्यें काम करूं शकूं. मी माझी सेवा संस्थानला देऊं केली. संस्थाननें कमिटी नेमली, व तिच्यामध्यें मलाहि नेमला. शौचकूपांच्या स्वच्छतेवर मीं विशेष जोर दिला, व कमिटीनें गल्लोगल्लीं जाऊन शौचकूप तपासण्याचा निश्चय केला. गरीब रहिवाश्यांनीं आपापले शौचकूप तपासूं देण्याला मुळींच आढेवेढे घेतले नाहींत; एवढेंच नव्हे पण त्यांना सुचविल्याप्रमाणें त्यांनीं सुधार-णाहि केल्या. पण, जेव्हां आम्ही मुत्सद्दीवर्गाचीं घरें तपासायला निघालों, तेव्हां कित्येक ठिकाणीं, तर आम्हांला शौचकूप पहाण्याचीहि परवानगी मिळेना, मग सुधारण्याची गोष्ट दूरच राहिली. आम्हांला सर्वसामान्य अनुभव असा आला, कीं धनिक वर्गाचे शौचकूप अधिक घाणेरडे असत. यांत अंधेर, दुर्गंधी आणि अमर्याद घाण असायची. पाय ठेवण्याच्या जागी किडे लुवलुवत असायचे. जिवंत-

पणीं रोज नरकवास भोगण्याप्रमाणें हें होतें. आम्हीं सुचवलेल्या सुधारणा अगदीं साध्या होत्या. मळ जमिनीवर पडूं देण्याऐवजीं कुंडींत पडेलसें करावें; पाणीहि जमिनींत जिरूं देण्याऐवजीं कुंडींत जाईलसें करावें; बैठक आणि भंगी येण्याची जागा यांच्यामध्यें जी भिंत ठेवण्यांत येत असे ती काढून टाकावी, म्हणजे भंगी सर्व भाग बरोबर स्वच्छ करूं शकेल, आणि शौचकूपांचा आकारहि कांहींसा मोठा होऊन त्यांत हवा आणि उजेड खेळूं शकेल. थोर लोकांनीं या सुधारणा करण्याच्या बाबतींत पुष्कळ वांधे आणले; आणि शेवटीं पुरा अंमल नाहींच केला.

कमिटीला घेडवाड्यांतहि जायचें होतेंच. कमिटीच्या सभासदांपैकीं फक्त एकच इसम माझ्याबरोबर तिकडे यायला तयार झाला. तेथें जायचें, आणि तेंहि शौचकूप तपासायला ! पण मला घेडवाडा पाहून सानंदाश्चर्य वाटलें. घेडवाड्यांत मी हा जन्मांत प्रथमच गेलों होतों. घेड बंधुभगिनींनाहि आम्हांला पाहून आश्चर्य वाटलें. " तुमचे शौचकूप तपासायचे आहेत " म्हणून मीं सांगितलें. ते म्हणाले,

" आमच्याकडे शौचकूप कोठून आले आहेत ? आमचे शौचकूप जंगलांत. शौचकूप तुम्हां बड्या लोकांसाठीं. "

" तर मग आम्हांला तुमचीं घरें पाहूं द्याल ? "

" या ना, भाईसाहेब ! तुमच्या मर्जीला येईल तिथें चला. आमचीं घरें असलींच. "

मी आंत गेलों आणि घराची त्याचप्रमाणें अंगणाची सफाई पाहून खूष होऊन गेलों. घरांत सर्व भाग नीट सारवलेले दिसले. अंगण झाडलेलें, आणि जीं थोडीशीं भांडीं होतीं तीं साफ आणि चकचकीत होतीं. त्यांच्याकडे आजाराचें भय नव्हतें.

एका शौचकूपाचा विशेष उल्लेख केल्याशिवाय राहावत नाहीं. प्रत्येक घराला मोरी असायचीच. त्यांत पाणी सांडीत आणि लघुशंकाहि होत असे. त्यामुळें दुर्गंधी नाहीं अशी खोली सांपडणें विरळा. पण एका घरांत तर निजायच्या खोलींत मोरी आणि पायखाना दोन्हीं आढळलीं; आणि ती सर्व घाण नळींतून खालीं पडत असे. या खोलींत उभें राहावत नव्हतें. त्यांत घरधनी कसे झोंपत त्याचा वाचकांनींच विचार करावा.

कमिटीनें हवेलींनाहि भेट दिली. हवेलीच्या मुख्याचा गांधींकुटुंबांशीं स्नेह-संबंध होता. मुख्यानें हवेली पाहूं देण्याचें आणि शक्य त्या सुधारणा करण्याचें कबूल केलें. त्यानें स्वतः तो भाग कधींच पाहिला नव्हता. हवेलींतलें खरकटें आणि पत्रावळी मागच्या बाजूला भिंतीवरून फेंकून देण्यांत येत; आणि तो भाग कावळे आणि घारी यांचें निवासस्थान होऊन राहिला होता. पायखाने तर गलिच्छ होतेच. मुख्यानें कितीशी सुधारणा केली तें मला पहायला मिळालें नाहीं. हवेलीं-

तील घाण पाहून वाईट तर वाटलेंच. ज्या हवेलीला आपण पवित्र स्थान मानतों तिच्यांत तरी आरोग्याच्या नियमांचें कसून पालन व्हावें अशी आशा बाळगणें अयोग्य होणार नाहीं. स्मृतिकारांनीं अंतर्बाह्य शुचितेवर खूप जोर दिलेला आहे, ही गोष्ट त्या वेळीहि माझ्या माहितींत होती..

• • •

## २६

# राजनिष्ठा आणि शुश्रूषा

शुद्ध राजनिष्ठा मला स्वतःच्या ठायीं जितकी आढळली तितकी इतरांचे ठिकाणीं क्वचितच दिसून आली आहे. या राजनिष्ठेच्या मुळाशीं सत्याबद्दलचें माझें स्वाभाविक प्रेम होतें अशी माझी समजूत आहे. राजनिष्ठेचें किंवा दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीचें प्रदर्शन माझ्याकडून कधीच घडलेलें नाहीं. नाताळांत मी कोणत्याहि सभेला गेलों तरी तेथें 'गॉड सेव्ह दी किंग' ईश्वर राजाचें रक्षण करो, हें पद गायिलें जायचेंच. मला वाटलें मीहि तें म्हटलें पाहिजे. ब्रिटिश राजवटीमध्यें मला त्या वेळींहि दोष दिसत होते, तरी पण एकंदरींत ती राजवट मला चांगली वाटे. ब्रिटिश अंमल व ब्रिटिश अंमलदार यांचें धोरण एकंदरींत प्रजेला हितकारक आहे असें मला त्या वेळीं वाटत असे.

दक्षिण आफ्रिकेमध्यें याच्या उलट धोरण दिसत होतें; वर्णद्वेष दिसत होता. या गोष्टी तात्पुरत्या व स्थानिक आहेत असें मला वाटे. त्यामुळें राजनिष्ठेच्या बाबतींत मी इंग्रजांनाहि मागें टाकूं पहात असें. इंग्रजांचें राष्ट्रगीत 'गॉड सेव्ह दी किंग'ची चाल मीं आस्थापूर्वक शिकून घेतली. तें सभांमध्यें गात त्या वेळीं त्यामध्यें मी आपला सूर मिळवीत असें; आणि पुढें पुढें केल्याशिवाय राजनिष्ठा व्यक्त करण्याचे जे जे प्रसंग येत, त्यांमध्यें मी भाग घेत असें.

उभ्या जन्मांत मीं या राजनिष्ठेचा कधीं व्यापार केला नाहीं. स्वतःचा खासगी स्वार्थ साधण्याचा विचारहि कधीं माझ्या मनाला शिवला नाहीं. राजनिष्ठा हें एक ऋण आहे, असें समजून मी तें नेहमीं फेडीत आलों आहें.

मी हिंदुस्थानांत आलों, तेव्हां राणीच्या डायमंड ज्युबिलीची तयारी सुरू झाली होती. राजकोटमध्येंहि एक समिति नेमण्यांत आली. मला तिचा सभासद. होण्याबद्दल निमंत्रण आलें. मीं तें मान्य केलें. मला त्यामध्यें दंभाचा वास आला फक्त देखाव्यासाठींच पुष्कळ चाललेलें दिसलें. हें पाहून मला. वाईट वाटलें.

समितीमध्यें राहावें कीं नाहीं याचाहि मला प्रश्न पडला. शेवटीं माझ्या वांट्याचें काम करून संतोष मानण्याचा मीं निश्चय केला.

वृक्षारोपण करणें हा एक कार्यक्रमांतील भाग होता. हा तर मला दंभ वाटला. वृक्षारोपण करण्यामध्यें साहेब लोकांना खूष करण्यापलीकडे हेतु नव्हता. मीं लोकांच्या मनांवर ठसविण्याचा प्रयत्न केला, कीं वृक्षारोपण केलेंच पाहिजे अशी कांहीं सक्ति नाहीं; ती एक सूचना म्हणून आहे. झाडें लावायचीं तर मनापासून लावावीं, नाहीं तर मुळीच लावूं नयेत. मला साधारण आठवतें कीं, मीं असें म्हटलें कीं, माझें बोलणें हंसण्यावारी नेत. मी माझ्या वांट्याचें झाड काळजीपूर्वक लावलें; खतपाणी घालून त्याची जोपासनाहि केली; एवढें मला आठवतें.

'गॉड सेव्ह दी किंग' मी घरांतील मुलांनाहि शिकवीत असें. मीं तें ट्रेनिंग कॉलेजच्या विद्यार्थ्यांनाहि शिकविल्याचें मला स्मरतें. पण तें याच प्रसंगीं कीं, सातव्या एडवर्ड बादशहांच्या राज्यारोहणप्रसंगीं तें बरोबर आठवत नाहीं. पुढें हें पद गाण्यांत मला हरकत वाटूं लागली. अहिंसेसंबंधींचे माझे विचार जसजसे बळावत गेले तसतसा मी स्वतःचे विचार व वाणी यांबद्दल अधिकाधिक जपूं लागलों. या पदाच्या दोन ओळी अशाहि आहेत—

'त्याच्या शत्रूचा नाश कर.'

'त्यांचीं कारस्थानें लटकीं पाड.'

ह्या ओळी गाणें अयोग्य वाटलें. माझे मित्र डॉ. बूथ यांचेपाशीं याबद्दल बोललों. त्यांनींहि कबूल केलें, कीं हें गाणें अहिंसक माणसाला शोभणार नाहीं. ज्यांना शत्रू म्हटलें ते घातकीच असतील असें कसें म्हणावें? आपल्याला जे शत्रु वाटतात, त्यांचा पक्ष चुकीचाच असला पाहिजे, अशी खात्री कोणी द्यावी? ईश्वरापाशीं आपण फक्त न्यायाची मागणी करावी. डॉ. बूथना हें म्हणणें पटलें. त्यांनीं स्वतःच्या मंडळांत गाण्यासाठी निराळें पद रचलें. डॉ. बूथचा विशेष परिचय पुढें होईल.

ज्याप्रमाणें राजनिष्ठेचा गुण माझ्यामध्यें स्वाभाविक होता त्याचप्रमाणें शुश्रूषेचा. आजारी माणसांची, मग तीं सोयरीं असोत किंवा परकीं असोत, शुश्रूषा करण्याचा मला शोक होता असें म्हटलें तरी चालेल. राजकोटमध्यें माझें दक्षिण आफ्रिकेचें काम चालू असतां मध्यंतरीं मी मुंबईला जाऊन आलों. मोठमोठ्या शहरी सभा करून लोकमताला विशेष चालना देण्याचा विचार होता. त्यासाठींच मी गेलों होतों. प्रथम न्यायमूर्ति रानड्यांना भेटलों. त्यांनीं माझें म्हणणें लक्षपूर्वक ऐकलें आणि मला सर फिरोजशहांना भेटण्याची सल्ला दिली. नंतर मी जस्टिस बद्रुद्दिन तैय्यबजींना भेटलों. त्यांनींहि माझें म्हणणें ऐकून तीच सल्ला दिली. "जस्टिस रानडे किंवा मी तुमचे विशेष मार्गदर्शक होऊं शकत

नाहीं. आमची स्थिति तुम्हांला कळतेच. आम्ही सार्वजनिक कामांत भाग घेऊं शकत नाहीं. आमची सहानुभूति मात्र तुमच्या कार्याला पूर्णपणें आहे. खरे पुढारी तर फिरोजशहाच होत. ”

सर फिरोजशहांना भेटायचें मी ठरविलेंच होतें; परंतु या दोन वडील मंडळींनीं त्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याबद्दल सांगितल्यावरून सर फिरोजशहांच्या लोकांवरील वजनाची मला विशेष कल्पना आली.

सर फिरोजशहांना भेटलों; त्यांच्याकडून दिपावला जाण्याची माझी तयारीच होती. त्यांना देण्यांत येणाऱ्या पदव्या ऐकल्याच होत्या. ‘मुंबईच्या सिंहाला’ ‘ मुंबईच्या अनभिषिक्त बादशहाला ’ भेटायला मला जायचें होतें. परंतु बादशहानें मला घाबरवलां नाहीं. बाप ज्या प्रेमानें आपल्या तरुण मुलाला भेटतो त्याच प्रेमानें ते मला भेटले. मीं त्यांना त्यांच्या चेंबरमध्यें भेटायचें होतें. त्यांच्या सभोंवार त्यांच्या अनुयायांचें मंडळ जमलेलें असायचेंच. वाच्छा होते, कामा होते. त्यांची माझी ओळख करून दिली. वाच्छांचें नांव मीं ऐकलेंच होतें. त्यांना फिरोजशहांचे उजवे हात समजत. वीरचंद गांधींनीं त्यांची आंकडेशास्त्री म्हणून माहिती सांगितली. ते म्हणाले, “ गांधी, आपण पुन्हां एकदां भेटूं. ”

एवढें होईपर्यंत फार तर दोन मिनिटें गेलीं असतील, त्यानंतर सर फिरोजशहांनीं माझें म्हणणें ऐकून घेतलें. न्यायमूर्ति रानडे व तैय्यबजी यांना भेटलों होतों, तेंहि त्यांना सांगितलें. “ गांधी, तुझ्यासाठीं मला जाहीर सभा करावी लागेल. तुला मदत केलीच पाहिजे. ” मुनशींकडे वळले, आणि त्यांना सभेचा दिवस नक्की करायला सांगितला. दिवस नक्की करून मला रजा दिली. सभेच्या अगोदरच्या दिवशीं आपल्याला भेटण्याची आज्ञा केली. माझी भीति निवारली, आणि मी हर्षयुक्त अंतःकरणानें घरीं गेलों.

मुंबईतील मुक्कामामध्यें मुंबईत राहणाऱ्या माझ्या मेव्हण्यांना मी भेटायला गेलों. ते आजारी होते. त्यांची स्थिति गरीबीची होती. बहिणीच्यानें एकटीनें शुश्रूषा होण्यासारखी नव्हती. दुखणें भारी होतें. मी त्यांना माझ्याबरोबर राजकोटला चला म्हटलें. त्यांना आनंद झाला. बहिणीला व मेव्हण्याला बरोबर घेऊन मी राजकोटला गेलों. दुखणें वाटलें होतें त्याहून अधिक विकोपाला गेलें. मीं त्यांना आपल्याच खोलींत ठेवलें. सबंध दिवस मी त्यांच्याजवळ बसत असें. रात्रींचेंहि जागावें लागे. त्यांची शुश्रूषा करीत असतांना मीं दक्षिण आफ्रिकेचें कामहि करीत असें. मेव्हण्यांना देवाज्ञा झाली. पण अखेरच्या दिवसांत मला त्यांची सेवाचाकरी करायला मिळाली, याबद्दल मला फार समाधान वाटलें.

शुश्रूषेबद्दलच्या या माझ्या शोकानें पुढें पुढें विशाल स्वरूप धारण केलें; येथपर्यंत, कीं त्यासाठीं मी आपला धंदा बाजूला ठेवीत असें; माझ्या धर्मपत्नीला

त्याच कामांत गुंतवीत असें; घरच्या साऱ्या मंडळींनाहि गुंतवीत असें. या वृत्तीला मीं शोक असेंच नांव दिलें आहे. कारण कीं, माझी अशी खात्री झाली आहे कीं, ह्या सत्कर्मापासून स्वतःला आनंद होत असला तरच त्याचें चीज होतें; ओढून ताणून, देखाव्यापुरत्या, किंवा जनलज्जेस्तव केली तर या गोष्टीखालीं मनुष्य दडपून जातो, आणि त्याचें जीवन खुरटल्यासारखें होतें. ज्या सेवेमध्यें आनंद वाटत नाहीं तिच्यापासून सेवकाला लाभ होत नाहीं, आणि सेव्यालाहि सुख वाटत नाहीं. ज्या सेवेमध्यें आनंद वाटतो, त्या सेवेपुढें ऐषआराम किंवा द्रव्यार्जन इत्यादि गोष्टी तुच्छ वाटतात.

●●●

## २७
# मुंबईची सभा

मेव्हण्याच्या मृत्यूच्या दुसऱ्याच दिवशीं मला मुंबईच्या सभेसाठीं जायचें होतें. जाहीर सभेसाठीं भाषण योजून ठेवण्यापुरती फुरसत मला मिळाली नव्हती. जागरणाचा थकवा जाणवत होता. घसा बसून गेला होता. ईश्वर कसा तरी मला निभावून नेईल असा विचार करीत मी मुंबईला गेलों. भाषण लिहून काढलें पाहिजे ही गोष्ट माझ्या स्वप्नींहि नव्हती.

सभेच्या तारखेच्या आदल्या दिवशीं संध्याकाळीं पांच वाजतां आज्ञेनुरूप मी फिरोजशहांच्या ऑफिसांत हजर झालों.

“ गांधी, तुमचें भाषण तयार आहे का ? ”

“ जी, नाहीं. भाषण तोंडींच करण्याचा माझा विचार आहे. ” मीं भीत भीत उत्तर दिलें.

“ हें मुंबईत चालण्यासारखें नाहीं. इथें रिपोर्टिंग खराब आहे. त्यामुळें या सभेपासून जर आपल्याला कांहीं फलनिष्पत्ति पाहिजे असेल, तर भाषण लिहिलेलेंच पाहिजे, आणि तें रातोरात छापून काढलें पाहिजे. भाषण रातोरात लिहून काढूं शकाल ना ? ”

मी घाबरलों, पण मीं लिहिण्याचा प्रयत्न करण्याचें कबूल केलें.

“ मग तर मुनशींनीं भाषण घ्यायला तुमच्याकडे केव्हां यावें ? ” मुंबईचे सिंह म्हणाले.

“ अकरा वाजतां. ” मीं उत्तर दिलें.

सर फिरोजशहांनीं त्या तासाला माझ्याकडून भाषण घेऊन रातोरात छापवून घेण्याला आज्ञा केली, आणि मला निरोप दिला.

दुसऱ्या दिवशीं सभेंत गेलों. भाषण लिहून काढायला सांगण्यांत किती चतुरपणा होता तें माझ्या लक्षांत आलें. फ्रामजी कावसजी इन्स्टिट्यूटच्या हॉल-मध्यें सभा होती. मीं ऐकलें होतें कीं, सर फिरोजशहा बोलायचे असले, की त्या सभेंत उभे राहायलाहि जागा मिळत नाहीं. त्यांत विशेषेंकरून विद्यार्थीवर्गाला आवड वाटे.

असल्या सभेचा हा माझा पहिलाच अनुभव होता. माझा स्वर कोणालाहि ऐकूं जाणें शक्य नाहीं अशी माझी खात्री झाली. मीं कांपत कांपत भाषण वाचण्यास सुरुवात केली. सर फिरोजशहा मला उत्तेजन देत, ' अजून जरा उंच स्वरांत ' असा इशारा देत, तसतसा मला वाटतें माझा आवाज आणखी आणखी खालींच पडत चालला होता.

जुने मित्र केशवराव देशपांडे माझ्या साहाय्याला धांवून आले. मी त्यांच्या हातांत भाषण दिलें. त्यांचा आवाज ठीकच होता. पण श्रोतृवर्ग कोटचा ऐकायला? ' वाच्छा, वाच्छा, ' नें हॉल गजबजून गेला. वाच्छा उठले. त्यांनीं देशपांड्यांकडून कागद घेतला. माझें काम झालें. सभा लगेच शान्त झाली आणि अथपासून इती-पर्यंत सभेनें भाषण ऐकून घेतलें. शिरस्त्याप्रमाणें योग्य त्या ठिकाणीं ' शेम, शेम, ' योग्य तेथें टाळ्या या असायच्याच. मला बरें वाटलें.

सर फिरोजशहांना भाषण आवडलें. मला गंगेंत घोडे न्हाल्यासारखें झालें.

या सभेमुळें देशपांडे आणि एक पारशी गृहस्थ या दोघांचीं मनें द्रवली. पारशी गृहस्थ आज मोठ्या हुद्दयावर आहेत म्हणून त्यांचें नांव प्रसिद्ध करण्याची भीति वाटते. त्यांचा निश्चय न्या. खरशेदजी यांनीं डळमळवला; आणि तो डळमळण्याचे मुळाशीं एक पारशी भगिनीहि होती. " विवाह करावा कीं दक्षिण आफ्रिकेला यावें? " त्यांनीं विवाह करण्याचेंच पसंत केलें. पण या मित्राच्या वतीनें पारशी रुस्तुमजींनीं प्रायश्चित्त केलें, आणि पारशी भगिनीच्या वतीचें प्रायश्चित्त इतर पारशी भगिनी सेविकांचें काम करून आणि खादीप्रीत्यर्थ सर्वस्वावर पाणी सोडून करीत आहेत आणि म्हणून मी या दंपतीना क्षमा करतों. देशपांड्यांना लग्नाचें आकर्षण नव्हतें, पण ते येऊं शकले नाहींत. त्याचें प्रायश्चित्त ते स्वतःच करीत आहेत. आफ्रिकेला परत जातांना झांजिबारला एक तैय्यबजी भेटले. त्यांनींहि येण्याचें आश्वासन दिलें; पण ते आणि दक्षिण आफ्रिकेला येणार? या न येण्याच्या गुन्ह्याची भरपाई अब्बास तैय्यबजी आतां करीत आहेत. पण त्या

वेळीं बॅरिस्टर मित्रांचे दक्षिण आफ्रिकेला येण्याबद्दल मन वळविण्याचे माझे प्रयत्न व्यर्थ गेले.

येथें मला पेस्तनजी पातशहांची आठवण होते. त्यांचा माझा विलायतेंत होतों तेव्हांपासूनचा स्नेह होता. पेस्तनजींची माझी ओळख लंडनमधील अन्नाहारी भोजनगृहामध्यें झाली. त्यांचे बंधु बरजोरजी यांची वेडे म्हणून मी कीर्ति ऐकत होतों. भेट झाली नव्हती; पण मित्रमंडळी ते 'चक्रम' असल्याचें सांगत. घोड्याची दया येऊन ट्रॅममध्यें बसत ना; शतावधान्यासारखी स्मरणशक्ति असूनहि डिग्री घेत ना; स्वतंत्र बाणा म्हणजे अशा तऱ्हेचा, कीं कोणाची ताबेदारी पत्करायची नाहीं; आणि पारशी असून अन्नाहारी! पेस्तनजी कांहीं अगदींच त्यांच्याच तोडीचे समजले जात नसत. पण त्यांची बुद्धिमत्ताहि सुप्रसिद्ध होती. विलायतेंतहि तिची ख्याति होती. पण आमचा संबंध आला तो त्यांच्या अन्नाहारामुळें, त्यांच्या बुद्धिमत्तेची बरोबरी करणें माझ्या आवांक्याबाहेरचें होतें.

मीं पेस्तनजींचा मुंबईत शोध लावला. ते हायकोर्टांत प्रोथोनोटरी (मुख्य कारकून) होते. मी भेटलों त्या वेळी बृहद् गुजराथी कोशाच्या कामांत गुंतलेले होते. दक्षिण आफ्रिकेच्या कामीं मदत मागण्याच्या बाबतींत मी एकाहि मित्राला सोडलें नव्हतें. पेस्तनजी पातशहांनीं तर मलाच दक्षिण आफ्रिकेला न जाण्याचा सल्ला दिला! "मीं तुम्हांला मदत ती काय करणार? पण तुम्हीं दक्षिण आफ्रिकेला परत जावें हेंच मला तरी पसंत नाही. इकडे आपल्या देशांत काम कमी का आहे? पहा ना आपल्या भाषेची सेवा काय थोडी करायची आहे? मला विज्ञानशास्त्राच्या पारिभाषिक शब्दांचे अर्थ काढायचे आहेत. हें एक क्षेत्र झालें. देशाच्या गरीबीचा विचार करा. दक्षिण आफ्रिकेमध्यें आमच्या लोकांची दुःस्थिति आहे, पण त्यांच्यासाटीं तुमच्यासारखा मनुष्य खर्ची पडावा हें मला सहन होण्यासारखें नाहीं; आपण येथेंच जर राजसत्ता आपल्या हातीं आणली तर आपोआपच तिकडे मदत पोंचेल. तुमचें मन मीं वळवूं शकणार नाहीं, पण तुमच्यासारख्या इतर कार्यकर्त्यांना तुमच्याबरोबर जाऊं देण्याच्या कामीं माझ्याकडून मदत व्हायचीच नाहीं." हें म्हणणें मला पटलें नाहीं, पण पेस्तनजी पातशहांबद्दलचा माझा आदर द्विगुणित झाला. त्यांचें देशप्रेम, भाषाप्रेम पाहून माझा त्यांच्याबद्दल फार अनुकूल ग्रह झाला. आमच्यामधील प्रेमगांठ या प्रसंगामुळें अधिक दृढ झाली. त्यांचा दृष्टिबिंदु मी पूर्णपणें समजूं शकलों. पण त्यांच्या दृष्टीनें पाहतांहि मी दक्षिण आफ्रिकेंतील काम सोडून देण्याऐवजीं तेंच जास्त चिकाटीनें चालविलें पाहिजे असें मला वाटलें. देशभक्तानें देशसेवेच्या एकाहि मार्गाची उपेक्षा करून चालणार नाहीं; आणि माझ्या मदतीला गीतेचा श्लोक तयारच होताः—

श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ *

वरच्या दर्जाच्या परधर्मापेक्षां कमी दर्जाचा स्वधर्म अधिक बरा. स्वधर्मामध्यें मरणहि पत्करलें; परधर्म भयावह आहे.

• • •

## २८

# पुणें शहरीं

सर फिरोजशहांनीं माझा रस्ता सरळ करून दिला. मुंबईहून मी पुण्याला गेलों. पुण्यांत दोन पक्ष असल्याचें मला माहीत होतें. मला सर्वांची मदत पाहिजे होती. लोकमान्यांना भेटलों. ते म्हणाले,

"सर्व पक्षांची मदत मिळविण्याचा तुमचा विचार अगदीं बरोबर आहे. तुमच्या प्रश्नाबद्दल मतभेद संभवतच नाहीं. पण तुम्हांला पक्षातीत अध्यक्ष पाहिजे. तुम्ही प्रो. भांडारकरांना भेटा. ते आजकाल कोणत्याहि चळवळींत भाग घेत नाहींत, परंतु कदाचित् ते या कामासाठीं बाहेर पडतील. त्यांना भेटून ते काय म्हणतात तें मला सांगा. माझी तुम्हांला शक्य ती मदत करण्याची इच्छा आहे. तुम्हीं प्रो. गोखल्यांना भेटालच. माझ्याकडे यायचें असेल तेव्हां संकोच न मानतां येत चला."

लोकमान्यांचें हें पहिल्यानेंच दर्शन झालें. त्यांच्या लोकप्रियतेचें कारण माझ्या तेव्हांच लक्षांत आलें.

तेथून मी गोखल्यांकडे गेलों. ते फर्ग्युसन कॉलेजमध्यें होते. ते मला खूप प्रेमानें भेटले, आणि त्यांनीं मला आपलासा करून घेतला, त्यांचाहि हा प्रथमच परिचय होता. पण कोण जाणें, आमची पूर्वीचीहि ओळख असावी नाहीं! तसा भास झाला. सर फिरोजशहा तर मला हिमालयासारखे वाटले; लोकमान्य समुद्रासारखे वाटले; गोखले गंगेसारखे वाटले. तिच्यांत मला स्नान करतां येण्यासारखें होतें. हिमालय चढून जाणें अशक्य; समुद्रांत बुडण्याची धास्ती असते, पण गंगेच्या मांडीवर खुशाल क्रीडा करावी; तिच्यावर होडी खेळवावी. गोखल्यांनीं माझी बारीक चौकशी केली; एखादा विद्यार्थी शाळेंत नवीन दाखल होण्यासाठीं आला म्हणजे त्याची परीक्षा घ्यावी त्याप्रमाणें कोणाकोणाला भेटावें, कसें भेटावें तें सांगितलें. माझें भाषण पाहायला मागितलें. मला कॉलेजची व्यवस्था दाखविली.

---

* अध्याय ३, श्लोक ३५.

वाटेल तेव्हां पुनः आपल्याला भेटण्यास सांगितलें, डॉ. भांडारकरांचा जबाब कळविण्यास सांगितलें आणि मला निरोप दिला. राजकीय क्षेत्रामध्यें जें स्थान गोखल्यांनीं जिवंतपणीं माझ्या हृदयांत व्यापलें, व देहावसान झालें तरी अजूनहि व्यापून राहिले आहेत, तें स्थान दुसऱ्या कोणीहि पटकावलेलें नाहीं.

बाप ज्याप्रमाणें मुलाला भेटतो, त्याप्रमाणें रामकृष्ण भांडारकर मला भेटले. त्यांच्याकडे गेलों त्या वेळीं दुपार झाली होती. अशा वेळीहि मी आपलें काम चालविलें होतें, ही गोष्टच त्या दीर्घोद्योगी शास्त्रज्ञांना प्रिय वाटली; आणि पक्षातीत अध्यक्षाबद्दलचा माझा आग्रह ऐकून ' दॅट्स् इट् ' ' दॅट्स् इट ' ' बरोबर आहे ' ' बरोबर आहे ' असे उद्गार सहजीं त्यांच्या तोंडावाटे बाहेर पडले.

संभाषणाच्या अखेरीला ते म्हणाले, की " कोणालाहि विचारलेंत तरी ते तुम्हांला सांगतील, की मी हल्लीं कोणत्याहि राजकीय चळवळींत भाग घेत नसतों. पण तुम्हांला मी विन्मुख पाठवूं शकत नाहीं. तुमची बाजू इतकी खबीर आहे आणि तुम्ही घेत असलेली मेहनत इतकी वाखाणण्यासारखी आहे, कीं मी तुमच्या सभेला येण्याचें नाकारूं शकत नाही. रा. टिळक व रा. गोखले यांना तुम्ही भेटलां हें ठीक केलें. त्यांना सांगा कीं, दोन्ही पक्ष बोलावतील त्या सभेला मी आनंदानें येईन. आणि अध्यक्षपद स्वीकारीन. वेळाचा प्रश्न मला विचारण्याची जरूरी नाही. जो वेळ उभयपक्षांना सोयीचा वाटेल तो मी स्वतःला जुळवून घेईन. " असे म्हणून मला शाबासकी आणि आशीर्वाद यांसहित निरोप दिला.

यत्किंचित् गाजावाजा किंवा डामडौल न करतां पुण्याच्या या विद्वान् व त्यागी मंडळींनीं एका साध्या घरामध्ये सभा भरविली आणि मला परिपूर्ण प्रोत्साहन देऊन निरोप दिला.

तेथून मी मद्रासला गेलों. मद्रास तर हर्षवेडें होऊन गेलें. बालासुंदरमूच्या गोष्टीचा सभेवर खूप परिणाम झाला. माझें भाषण माझ्या नेहमींच्या मानानें लांबलचक झालें. सर्व छापलेलें होतें. तरीहि सभेनें शब्दन् शब्द लक्षपूर्वक ऐकला. सभेच्या अखेरीला त्या हिरव्या चोपड्यावर सर्वांच्या उड्या पडल्या. मद्रासमध्यें थोड्या फेरफारासह त्याची दहा हजार प्रतींची दुसरी आवृत्ति छापविली. त्यांपैकीं बऱ्याचशा प्रती उडून गेल्या, पण दहा हजारांची जरूर नव्हती एवढें मला दिसून आलें. उत्साहाच्या भरांत माझी अटकळ मर्यादेपलीकडे गेली. माझ्या भाषणाचा परिणाम इंग्रजी बोलणाऱ्या वर्गावरच झाला होता. त्या वर्गामधून एकट्या मद्रास शहरांतून दहा हजार नकलांची मागणी येण्यासारखी नव्हती.

येथें मला मोठ्यांत मोठी मदत के. जी. परमेश्वरन् पिल्ले यांची झाली. ते ' मद्रास स्टॅंडर्ड ' चे संपादक होते. त्यांनीं या प्रश्नाचा चांगला अभ्यास केला होता. आपल्या आफिसांत मला वरचेवर बोलावीत आणि सल्लामसलत देत. 'हिंदू'चे

संपादक जी. सुब्रह्मण्यम्नाहि भेटलों होतों. त्यांनीं आणि डॉ. सुब्रह्मण्यम्नीं पूर्ण सहानुभूति दर्शविली. पण जी. परमेश्वरन् पिल्लेनीं तर मला या कामासाठीं आपल्या वर्तमानपत्राचा वाटेल तेवढा उपयोग करण्याची मुभा दिली आणि मीं तिचा भरपूर फायदाहि घेतला. सभा पाच्याप्पा हॉलमध्यें झाली, आणि डॉ. सुब्रह्मण्यम् अध्यक्ष होते असें मला स्मरण आहे.

मद्रासमध्यें मला अनेकांकडून प्रेम व उत्साह इतका अनुभवावयास मिळाला, कीं जरी तेथें सर्वांबरोबर मुख्यतः इंग्रजींतच बोलावें लागे तरीहि मला घरच्यासारखें वाटलें. प्रेम कसल्याहि बंधनांना जुमानीत नाहीं.

●●●

## २९

# लगेच परत फिरा

मद्रासहून कलकत्त्याला गेलों. कलकत्त्यामध्यें माझ्या अडचणींना पारावार राहिला नाहीं. तेथें ग्रेट ईस्टर्न हॉटेलांत उतरलों. कोणाची ओळख नाहीं, देख नाहीं. हॉटेलांत ' डेली टेलिग्राफ 'चे प्रतिनिधि मि. एलरथॉर्प यांची ओळख झाली. ते बंगालक्लबमध्यें राहात असत. तेथें येण्याबद्दल त्यांनीं मला निमंत्रण दिलें, त्या वेळी त्यांना माहिती नव्हती, कीं हॉटेलाच्या दिवाणखान्यांत कोणाहि हिंदी इसमाला घेऊन जातां येत नसे. मागून त्यांना या प्रतिबंधाची माहिती मिळाली. म्हणून ते मला आपल्या खोलींत घेऊन गेले. हिंदी लोकांबद्दल स्थानिक इंग्रज लोकांना वाटणाऱ्या या तिरस्काराबद्दल त्यांना वाईट वाटलें. मला दिवाण-खान्यांत घेऊन न गेल्याबद्दल त्यांनीं माफी मागितली.

' बंगालचे देव ' सुरेंद्रनाथ बानर्जींना तर भेटायचें होतेंच, त्यांना जाऊन भेटलों. मी गेलों त्या वेळीं त्यांच्यापाशीं इतरहि मंडळी भेटण्यासाठीं आलेली होती. ते म्हणाले, " तुमच्या कामाकडे लोकांचें लक्ष वेधणार नाहीं, अशी मला धास्ती वाटते. तुम्ही पाहातांच ना, कीं येथेंहि कांहीं कमी विटंबना नाहींत. तरीहि तुम्ही होईल तेवढें करावेंच. या कामीं तुम्हांला महाराजांची मदत पाहिजे. ब्रिटिश इंडिया असोसिएशनच्या प्रतिनिधींना भेटा. राजा सर प्यारीमोहन मुकरजी व महाराजा टागोरांना भेटा. ते उदारवृत्तीचे आहेत, आणि सार्वजनिक कार्यांत भरपूर भाग घेतात, " मी या गृहस्थांना भेटलों, पण त्यांच्याकडे माझें संधान जुळलें नाहीं. दोघांनींहि सांगितलें, " कलकत्त्यामध्यें जाहीर सभा भरविणें सोपें

काम नाहीं. पण करायचीच असेल, तर पुष्कळसा आधार सुरेंद्रनाथ बानर्जींवर आहे. ”

माझ्या अडचणी येथेंच थांबल्या नाहींत. ‘ अमृतबझार पत्रिकेच्या ’च्या ऑफिसांत गेलों. तेथेंहि मला जे गृहस्थ भेटले त्यांची कल्पना मी कोणी तरी उपटसुंभ्या आहे अशी झाल्याचें दिसलें. ‘ बंगवासी ’नें तर हद्द केली. मला एक तासभर बसवून ठेवलें. संपादकमहाशय इतर लोकांबरोबर बोलत, ते लोक आपापलीं कामें आटपून जात; पण संपादकमहाशय माझ्याकडे ढुंकूनहि पाहात ना. एक तासभर वाट पाहून मीं माझा विषय काढला; तेव्हां ते म्हणाले, “ आमच्या-पुढें किती कामें पडलीं आहेत तुम्हांला दिसत नाहीं ? तुमच्यासारखे किती तरी लोक आमच्याकडे येत असतात. तुम्ही रस्ता धरावा, हेंच बरें. आम्हांला तुमची कर्मकथा ऐकायची नाही. ” मला कांही वेळ दुःख तर वाटलें, पण संपादकाची दृष्टिहि मी समजूं शकलों. ‘ बंगवासी ’ची ख्याति ऐकलीच होती. संपादकांकडे लोक एकामागून एक येत जात होते, तें मला दिसत होतें. ते सर्व त्यांच्या ओळ-खीचे. त्यांचें वर्तमानपत्र नेहमीं भरगच्च भरलेलें राहात असे. दक्षिण आफ्रिकेचें नांव पण त्या वेळीं क्वचित ऐकूं येत असे. रोज नवे लोक आपापलें दुःख पुढें मांडायला येत राहाणारच. दरएकाला स्वतःचें दुःख तेवढें मोठें वाटत असतें. पण संपादकांजवळ असल्या दुःखितांचा नेहमीं थवाच असायचा. तो बिचारा कितीकांचें म्हणून ऐकून घेईल ? शिवाय दुःखी माणसाला संपादकाचें सामर्थ्य म्हणजे केवढें अफाट असेल असें वाटत असतें. संपादक स्वतः पुरें जाणून असतो कीं, आपली सत्ता आपल्या कचेरीच्या उंबऱ्यापलीकडेहि पोंचत नसेल.

मी हताश झालों नाहीं. इतर संपादकांना भेटण्याचें चालू ठेवलें. माझ्या रिवाजानुरूप इंग्रजांनाहि भेटलों. ‘ स्टेट्समन् ’ आणि ‘ इंग्लिशमन् ’ या दोघांनाहि दक्षिण आफ्रिकेच्या प्रश्नाचें महत्त्व समजत होतें. त्यांनी लांबलचक मुलाखती छापल्या. इंग्लिशमनच्या मि. सॉंडर्सनीं मला आपलासा केला. त्यांच्या ऑफिसाचा व वर्तमानपत्राचा उपयोग करण्याची मला मुभा मिळाली. स्वतःच्या अग्रलेखांत दुरुस्त्या करण्याचीहि त्यांनीं मला मोकळीक दिली. आमच्यामध्यें स्नेह जमला म्हटलें, तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांनी होईल ती मदत मला करण्याचें वचन दिलें. मी परत दक्षिण आफ्रिकेला गेल्यानंतरहि स्वतःला पत्रें पाठविण्यास मला सांगितलें; आणि आपल्याकडून होईल तेवढें करूं असें आश्वासन दिलें. मला पुढें दिसून आलें, कीं त्यांनीं हें वचन अक्षरशः पाळलें आणि त्यांची प्रकृति बिघडली तों वेळेपर्यंत त्यांनीं माझ्याशीं पत्रव्यवहार चालू ठेविला. माझ्या आयु-ष्यांत अशा तऱ्हेचे अनपेक्षित स्नेहसंबंध अनेकदां जमून आले आहेत. मि. सॉंडर्सना माझ्या बाबतींत जें आवडलें तें अतिशयोक्तीचा अभाव आणि सत्यपरायणता.

त्यांनीं माझी करून उलट तपासणी केली होती. त्यावरून त्यांना दिसलें, कीं दक्षिण आफ्रिकेंतील गोऱ्या लोकांची बाजू निःपक्षपातपणें मांडण्याच्या कामीं आणि दोन्ही बाजूंची तुलना करण्याच्या कामीं मीं न्यून ठेवलें नव्हतें.

स्वतःच्या अनुभवावरून मी सांगूं शकतों, कीं विरुद्ध पक्षाला न्याय दिल्यानें आपल्याला न्याय लवकर मिळतो.

अशा तऱ्हेनें मला अनपेक्षित मदत मिळाल्यामुळें कलकत्त्यामध्येंहि जाहीर सभा भरविण्याची आशा वाटूं लागली होती. इतक्यांत डरबनहून तार आली, " पार्लमेंट जानेवारींत भरणार; लगेच परत फिरा. "

म्हणून मीं वर्तमानपत्रांत एक पत्र प्रसिद्ध करून त्यांत ताबडतोब निघून जाण्याच्या कारणाचा खुलासा केला आणि कलकत्ता सोडलें आणि पहिल्याच बोटीनें माझ्या जाण्याची व्यवस्था करण्याबद्दल दादा अबदुल्लांच्या मुंबईतील एजंटाला तार केली. दादा अबदुल्लांनीं स्वतः 'कूरलंड' नांवाची आगबोट विकत घेतली होती. तीवरून मला व माझ्या कुटुंबाला मोफत घेऊन जाण्याचा त्यांनीं आग्रह धरला. मी त्याचा साभार स्वीकार केला, आणि डिसेंबरच्या सुरुवातीला 'कूरलंड'मधून माझी धर्मपत्नी, दोन मुलगे आणि माझ्या स्वर्गस्थ मेव्हण्याचा एकुलता एक मुलगा यांना घेऊन दक्षिण आफ्रिकेला दुसऱ्यानें जाण्यासाटीं निघालों. या बोटीबरोबर दुसरी एक बोट 'नादरी' मुद्दां डरबनला जाण्या-साटींच सुटली. तिचे एजंट दादा अबदुल्ला होते. दोन्ही बोटींत मिळून आठशेंच्या सुमारानें पॅसेंजर असावेत. त्यांपैकी अर्धे अधिक ट्रॅन्सवालला जाणारे होते.

# तुफानाचीं पूर्वचिन्हें

कुटुंबासहित समुद्रप्रवास मी हा प्रथमच करीत होतों. मीं अनेक वेळां लिहिलें आहे, कीं हिंदु लोकांमध्यें विवाह बालवयांत होत असल्यामुळें आणि मध्यम वर्गाच्या कुटुंबांमध्यें बहुधा नवरा शिकलेला आणि बायको निरक्षर अशी स्थिति असल्यामुळें पतिपत्नींच्या जीवनामध्यें तफावत पडते, व पतीला पत्नीचा शिक्षक बनावें लागतें. मला माझ्या धर्मपत्नीच्या व मुलांच्या पोषाखाची तसेंच खाण्या-पिण्याच्या व बोलण्याचालण्याच्या पद्धतीची काळजी घ्यावी लागत होती. त्यांना रीतभात शिकवावयाला पाहिजे होती. कित्येक गोष्टी आठवल्या म्हणजे मला अजूनहि हंसूं येतें. हिंदु पत्नीच्या दृष्टीनें पतिपरायणता हाच सर्वश्रेष्ठ धर्म; हिंदु पति स्वतःला पत्नीचा ईश्वर समजतो. अर्थात् पति नाचवील तसें पत्नीनें नाचलें पाहिजे.

ज्या काळासंबंधीं मी लिहीत आहें त्या काळीं माझी अशी समजूत होती, कीं सुधारलेल्या लोकांत आपली गणना व्हायला पाहिजे असेल, तर आपला बाह्याचार शक्य तोंपर्यंत युरोपियन लोकांशीं जुळता असला पाहिजे. असें केल्यानेंच आपली छाप पडणार; आणि छाप पडल्याशिवाय देशसेवा साधायची नाहीं.

यासाठीं पत्नीचा आणि मुलांचा पोषाख मींच पसंत केला. मुलें काठेवाडी बनिये म्हणून नजरेंत भरावीं हें कसें बरें वाटेल? पारशी हे हिंदी लोकांत अधिकांत अधिक सुधारलेले. म्हणून जेथें युरोपियन पोषाखाचें अनुकरण करणें अयोग्य वाटलें, तेथें पारशी पोषाखाचें केलें. पत्नीसाठीं साड्या पारशी बाया वापरतात, तसल्या घेतल्या; मुलांसाठीं पारशी कोट-पाटलोणी घेतल्या. सर्वांना पायमोजे बूट तर पाहिजेतच. पत्नीला, त्याप्रमाणेंच मुलांना, दोन्ही वस्तू कित्येक महिने आवडत ना. बूट लागत, पायमोजांना घाण सुटे, पाय सुजत. या अडचणींवर माझ्याजवळ प्रत्युत्तरें तयार असत. उत्तराच्या समर्पकपणापेक्षांहि हुकमाचें बळ जास्त होतेंच ना? अर्थात् पत्नीनें व मुलांनीं नाइलाजास्तव पोषाखांतील फेरफारांचा स्वीकार केला. तितक्याच नाइलाजानें व अधिक कंटाळ्यानिशीं जेवतांना सुरीकांट्यांचा उपयोग सुरू केला. माझा मोह जेव्हां दूर झाला, तेव्हां परत त्यांनीं मोजे, बूट व सुरीकांटा यांचा त्याग केला. फेरफार ज्याप्रमाणें दुःखकारक झाला त्याप्रमाणें एकदां संवय पडल्यानंतर त्याचा त्यागहि दुःखकारक झाला. पण आतां मला दिसत आहे, कीं सुधारणेची कात टाकून दिल्यामुळें आम्हांला सर्वांनाच हलकें वाटूं लागलें आहे.

याच आगबोटीमध्यें इतर आप्त व ओळखीची मंडळीहि होती. त्यांच्या त्याचप्रमाणें डेकवरील इतर उतारूंच्या निकट सहवासांत मी येत असें. अशिलाची, आणि त्याहूनहि मित्राची आगबोट, त्यामुळें घरच्यासारखें वाटे; आणि मला सगळीकडे मोकळेपणें हिंडायला मिळे.

आगबोट मध्यें बंदरें केल्याखेरीज नाताळला जायची होती, त्यामुळें फक्त अठरा दिवसांचा प्रवास होता. पांचल्याबरोबर आमच्यावर कोसळणाऱ्या तुफानाची पूर्वसूचना देण्यासाठीच जसें काय, आम्हांला पोंचायला तीन-चार दिवस शिल्लक होते, इतक्यांत समुद्रामध्यें जोराचें वादळ झालें. या दक्षिणेकडील प्रदेशामध्यें डिसेंबरचे दिवसांत उन्हाळा व पाऊस असतो. त्यामुळें दक्षिण समुद्रामध्यें या दिवसांत लहान-मोठीं तुफानें होणारच. या वेळचें वादळ इतकें जोराचें होतें आणि इतका वेळपर्यंत चाललें, कीं उतारूंची पांचावर धारण बसली.

त्या वेळचें दृश्य भव्य होतें. संकटापुढें सर्व एक होऊन गेले. भेद विसरून गेले. ईश्वराचा मनःपूर्वक धांवा करूं लागले. हिंदु-मुसलमान सर्व एकत्र होऊन ईश्वराचें स्मरण करूं लागले. कोणी नवस बोलले, कप्तानहि सर्वांबरोबर मिसळले; आणि सर्वांना धीर देऊन म्हणाले, की तुफान तीव्र म्हणण्याजोगें आहे खरें. तरी पण याहूनहि भयंकर तुफानांचा आपल्याला अनुभव आलेला आहे. आगबोट मजबूत असेल तर सहसा बुडत नाहीं. उतारूंना त्यांनीं अशा तऱ्हेनें पुष्कळ सांगितलें. पण तेवढ्यानें उतारूंचें चित्त थाऱ्यावर येई ना. आगबोटींतून आवाज तर असे निघत कीं, जशी काय इतक्यांतच कुठें तरी मोडणार, इतक्यांतच भोंक पडणार. हेलकावे तर असे खाई कीं, जणुं काय इतक्यांतच उलथून पडणार असे वाटे. डेकवर कोणी राहाणार तरी कसचें ? ‘ ईश्वर ठेवील तसें राहिलें पाहिजे ’ याखेरीज दुसरे उद्गार ऐकूं येत नव्हते.

मला आठवतें ते असें कीं, अशा तऱ्हेच्या चिंतेमध्यें चोवीस तास लोटले असावेत. अखेरीला वादळ थमलें. सूर्यनारायणानें दर्शन दिलें. कप्तान म्हणाला, “ तुफान आटोपलें. ”

लोकांच्या चेहऱ्यावरील चिंता दूर झाली व त्याबरोबरच ईश्वरहि लुप्त झाला. मृत्यूचें भय दूर होतांच खाणेंपिणें, गाणेंबजावणें सुरू झालें ? मायेचें आवरण परत व्यापून राहिलें. नमाज, भजन वगैरे बंद पडलीं नव्हतीं. पण तुफानाच्या वेळीं त्यामध्यें जें गांभीर्य होतें, तें आतां राहिलें नाहीं !

पण या तुफानानें उतारूंशीं मला एकजीव करून सोडलें. मला तुफानाचें भय वाटलें नाहीं, किंवा कमींत कमी वाटलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. जवळ जवळ इतपत तुफानाचा मला पूर्वीहि अनुभव होता. मला आगबोट लागत नाहीं, भोंवळ येत नाहीं; त्यामुळें मी निर्धास्तपणें उतारूंमध्यें फिरूं शकत असें, त्यांना

धीर देऊं शकत असें आणि कप्तानाचे होरे कळवीत असें. हें स्नेहबंधन पुढें मला फार उपयोगीं पडलें.

आम्हीं १८ कीं १९ डिसेंबर रोजी डरबन बंदरीं नांगर टाकला. 'नादरी' त्याच दिवशीं पोंचली.

खऱ्या तुफानाचा अनुभव अजून पुढेंच यावयाचा होता.

●●●

## २

# तुफान

१८ डिसेंबरच्या सुमारास दोन्ही बोटींनीं नांगर टाकले. दक्षिण आफ्रिकेच्या बंदरामध्यें उतारूंच्या आरोग्याची करून तपासणी होते. रस्त्यांत कोणाला सांसर्गिक रोग लागला असेल, तर त्याला सुतकांत–क्वारंटाइनमध्यें—बसवितात. आम्ही मुंबईहून निघालों तेव्हां तेथें प्लेग चालूच होता. त्यामुळें आम्हांला थोडी-बहुत सुतक बाधण्याची भीति होतीच. बंदरांत नांगर टाकल्यावर प्रथम बोटीला पिवळा बावटा उभारावा लागतो. डॉक्टरची तपासणी आटोपल्यानंतर डॉक्टर मोकळीक देईल, तेव्हां पिवळा बावटा उतरतात. मगच उतारूंच्या आप्तेष्टांना वगैरे आगबोटीवर येण्याची परवानगी मिळते.

शिरस्त्याप्रमाणें आमच्या बोटीवरहि पिवळा बावटा फडकला. डॉक्टर आले. तपासणी करून पांच दिवसांचे सुतक घातलें; कारण कीं, प्लेगचे जंतु तेवीस दिवसपर्यंत परिणाम करूं शकतात, अशी त्यांची समजूत होती; आणि म्हणून त्यांनीं मुंबई सोडल्यापासून तेवीस दिवसपर्यंत आगबोटींना सुतकांत बसविण्याचें ठरविलें.

पण या सुतकाच्या हुकमांतील हेतु आरोग्य एवढाच नव्हता. आम्हांला माघारे घालविण्याची चळवळ डरबनमधील गोरे नागरिकांनीं चालविली होती. हेंहि या हुकमाचें एक कारण होतें.

दादा अबदुल्लांकडून शहरांत चाललेल्या या चळवळीची माहिती आम्हांस मिळत होती. गोरे लोक एकावर एक जंगी सभा करीत होते. दादा अबदुल्लांना धमक्या देत. त्यांना आमिषहि दाखविलें : दादा अबदुल्लांनी दोन्ही बोटी परत वळविल्या, तर त्यांना नुकसान भरून देण्यास गोरे लोक तयार होते. दादा अबदुल्ला कोणाच्या धमक्यांना दाद देणारे नव्हते. या पेढीवर अबदुल करीम हाजी आदम हे होते. त्यांनीं प्रतिज्ञा केली, वाटेल तें नुकसान सोसावें लागलें

तरी बोटी बंदरांत आणायच्या आणि उतारूंना उतरून घ्यायचें. मला त्यांची सविस्तर पत्रें येत. सुदैवानें याच वेळीं मरहूम मनसुखलाल हिरालाल नाझर मला भेटण्यासाठीं डरबनला येऊन दाखल झाले होते. ते हुशार आणि बहाद्दर होते. त्यांनीं लोकांना रास्त सल्ला दिली. वकील मि. लॉटन् होते. तेहि तसेच बहाद्दर होते. त्यांनीं गोऱ्या लोकांचें वर्तन गैर ठरवलें, आणि आमच्या लोकांना या वेळीं जी सल्ला दिली ती वकील या नात्यानें फी घेऊन नव्हे, तर एक सच्चे मित्र म्हणून दिली.

अशा तऱ्हेनें डरबनमध्यें द्वंद्व युद्ध जुंपून राहिलें. एका बाजूला मूठभर गरीब बापडे हिंदी लोक आणि त्यांचे हाताच्या बोटांवर मोजण्याइतके इंग्रज मित्र; दुसऱ्या बाजूला द्रव्यबळ, बाहुबळ, विद्याबळ, आणि संख्याबळ यांनीं परिपूर्ण असे इंग्रज. त्या बलवान् प्रतिपक्षाला सत्ताबलहि मिळालें; कारण कीं, नाताळच्या सरकारनें त्यांना उघडपणें मदत केली. मि. हॅरी एस्कंब प्रधानमंडळांत होते, आणि तेथील कर्तेहर्ते होते, यांनीं या मंडळींच्या सभेमध्यें उघडपणें भाग घेतला.

अर्थात् आमच्या सुतकाला फक्त आरोग्याचे नियमच कारणीभूत झालेले नव्हते. कसेंहि करून एजंटाला किंवा उतारूंना धाकदपटशा दाखवून आम्हांला काढून लावायचें होतें. एजंटाला धमकी मिळालीच होती.: आतां आम्हांला धमक्या येऊं लागल्या. " तुम्हीं माघारे गेला नाहीं, तर तुम्हांला दर्यांत बुडवून टाकण्यांत येईल. माघारे गेलां तर तुम्हांला परत जाण्याचें भाडेंहि मिळण्याचा संभव आहे." मी उतारूंमध्यें खूप फिरलों. त्यांना धीर दिला. 'नादरी' वरील उतारूंनाहि धैर्य धरण्याबद्दल निरोप पाठविले. उतारू शान्त राहिले, व त्यांनीं हिंमत दाखविली.

उतारूंच्या मनोरंजनासाठीं आगबोटीवर करमणुकीचे कार्यक्रम योजण्यांत येत असत. नाताळचे दिवस आले. कप्तानानें त्या प्रसंगीं पहिल्या वर्गाच्या उतारूंना मेजवानी दिली. उतारूंमध्यें मुख्यतः मी आणि माझें कुटुंब हींच होतों. भोजनोत्तर भाषणें व्हायचींच. मी पाश्चात्य सुधारणेसंबंधीं भाषण केलें. हा प्रसंग गंभीर भाषणाचा नव्हे हें मला कळत होतें. पण दुसऱ्या विषयावर बोलण्यासारखी माझी स्थिति नव्हती. थट्टामस्करीमध्यें मी भाग घेत होतों; परंतु माझें मन डरबनमध्यें चाललेल्या लढ्यामध्येंच गुंतून राहिलें होतें.

कारण कीं, या हुल्लडीचा मुख्य रोख माझ्यावरच होता. माझ्यावर दोन आरोप होतेः—

१. मीं हिंदुस्थानांत नाताळवासी गोऱ्या लोकांची निराधार नालस्ती केली.

२. नाताळ प्रान्त हिंदी लोकांनीं भरून टाकण्याचा माझा इरादा होता; आणि त्यासाठीं मुद्दाम नाताळमध्यें वसविण्यासाठीं मीं 'कूरलंड' व 'नादरी' बोटींतून हिंदी लोकांना भरून आणलें होतें.

मला माझ्या जबाबदारीची जाणीव होती. माझ्यामुळें दादा अबदुल्ला मोठ्या नुकसानींत आले होते. उतारूंचे जीव धोक्यांत होते आणि बरोबर स्वतःच्या कुटुंबाला आणून त्यांनाहि मीं संकटांत लोटलें होतें.

तथापि, मी पूर्ण निरपराधी होतों. नाताळांत येण्याची मी कोणालाच भर दिली नव्हती. 'नादरी'वरील उतारूंना मी ओळखत नव्हतों. 'कूरलंड'-वरील माझ्या दोन-तीन नातलगांपलीकडे शेंकडों उतारूंचीं नांवेंगांवेंहि मला माहीत नव्हतीं. मी हिंदुस्थानांत नाताळच्या इंग्रजांविषयीं एक अक्षरहि असें बोललों नाहीं, कीं जें मी अगोदरच नाताळमध्यें बोललों नव्हतों; आणि मी बोललों त्याच्या समर्थनार्थ माझ्यापाशीं भरपूर पुरावा होता.

म्हणून नाताळचे इंग्रज ज्या संस्कृतीमध्यें वाढले होते, ज्या संस्कृतीचे ते प्रतिनिधि आणि पुरस्कर्ते होते, त्या संस्कृतीबद्दल मला किळस वाटूं लागली. ते विचार माझ्या मनांत घोळत होते, त्यामुळें त्यासंबंधींचेच विचार मीं त्या लहानशा सभेपुढें मांडले आणि श्रोतृवर्गानें ते सहन केले. मीं ज्या भावनेनें मांडले त्याच भावनेनें कप्तानादिकांनीं त्यांचें ग्रहण केलें. त्या विचारांवरून त्यांच्या जीवनामध्यें कांहीं फेरफार पडला कीं नाहीं तें मला माहीत नाहीं, पण या भाषणा-नंतर माझें कप्तान व इतर अंमलदार यांजबरोबर संस्कृतीसंबंधीं बोलणें झालें, त्यांत पाश्चात्य संस्कृतीचा मीं मुख्यतः हिंसक म्हणून निर्देश केला; पूर्वेकडील संस्कृतीचा अहिंसक म्हणून. प्रश्नकारांनीं माझे सिद्धान्त मलाच लागूं केले. बहुधा कप्ताननेंच विचारलें,

"धमकी देत आहेत त्याप्रमाणेंच जर त्यांनीं तुम्हांला दुखापत केली, तर तुमच्या अहिंसेच्या सिद्धान्ताची तुम्ही कशी काय अंमलबजावणी कराल?"

मीं जबाब दिला, "मला उमेद आहे, कीं त्यांना क्षमा करण्याची आणि त्यांच्यावर काम न चालविण्याची हिंमत व बुद्धि ईश्वर मला देईल. आजहि माझा त्यांच्यावर रोष नाहीं. त्यांच्या अज्ञानाबद्दल. त्यांच्या संकुचित दृष्टीबद्दल मला खेद वाटतो. ते जें म्हणत आहेत व करीत आहेत तें रास्त आहे असें त्यांना खरोखरीच वाटत आहे. अशी माझी समजूत आहे. अर्थात् मला रोष वाटण्याचें कारणच नाहीं." प्रश्नकार हंसला. माझें म्हणणें त्याला खरेंच वाटलें नसावें.

अशा तऱ्हेनें आमचे दिवस चालले होते व एकापुढें एक लांबत होते. सुतक संपण्याची मुदत अखेरपर्यंत नक्की झाली नाहीं. त्या खात्याच्या अंमलदाराला

विचारावें तर तो म्हणे, “ ही गोष्ट माझ्या अधिकाराच्या बाहेरची आहे. सरकार मला हुकूम करील तेव्हां मी उतरूं देणार. ”

शेवटीं उतारूंवर व माझ्यावर निर्वाणीचा खलिता आला. दोघांनाहि प्राणांवरील धोक्याची धमकी देण्यांत आली होती. दोघांनींहि नाताळबंदरीं उतरण्याच्या स्वतःच्या हक्काबद्दल लिहिलें, आणि वाटेल तें संकट आलें तरी त्या हक्काला चिकटून राहण्याचा आपला निश्चय जाहीर केला.

अखेरीस तेवीस दिवसांनीं, म्हणजे १३ जानेवारी १८९७ रोजीं, आगबोटीला मोकळीक मिळाली आणि उतारूंना उतरण्याचा हुकूम बाहेर पडला.

●●●

## ३

# कसोटी*

आगबोट धक्क्याला लागली. उतारू उतरले. पण माझ्या बाबतींत मि. एस्कंबनीं कप्तानाला कळविलें होतें, कीं “ गांधींना व त्यांच्या कुटुंबाला सायंकाळी उतरवा. त्यांच्याविरुद्ध गोरे लोक फार चिडले आहेत, व त्यांच्या जीव धोक्यांत आहे. धक्क्यावरील सुपरिंटेंडंट टॅटम त्यांना संध्याकाळीं घेऊन जातील. ”

कप्तानानें त्या निरोपाची मला खबर दिली. मीं त्याप्रमाणें कबूल केलें. पण हा निरोप मिळाल्याला अर्धा तासहि झाला नसेल इतक्यांत मि. लॉटन् आले आणि कप्तानाकडे जाऊन म्हणाले, “ जर मि. गांधी माझ्याबरोबर यायला तयार असतील, तर मी त्यांना स्वतःच्या जबाबदारीवर घेऊन जाऊं इच्छितों. बोटीच्या एजंटाचा वकील या नात्यानें मी तुम्हांला सांगतों, कीं मि. गांधींसंबंधीं जो निरोप तुम्हांला मिळाला आहे, त्यांतून तुम्ही मुक्त आहां. ” कप्तानाला याप्रमाणें सांगून मि. लॉटन् माझ्याकडे आले, आणि माझेपाशीं पुढील अर्थाचे बोलले, “ जर तुम्हांला जिवाची भीति वाटत नसेल, तर माझी इच्छा आहे, कीं मिसेस् गांधी व मुलें यांनीं गाडींतून रुस्तुमजी शेटकडे जावें आणि तुम्ही व मी राजरस्त्यानें चालत जावें. तुम्ही अंधार पडल्यानंतर गुपचुप शहरांत शिरावें हें मला बिलकुल आवडत नाहीं. मला वाटतें, की तुमच्या केसालाहि धक्का लागणार नाहीं. आतां सर्वत्र शान्तता आहे. गोरे लोक सर्व आपापल्या ठिकाणीं निघून गेले आहेत; पण कांहीं असलें, तरी तुम्ही लपून प्रवेश करूंच नये असा माझा अभिप्राय आहे.”

* परिशिष्ट पहिले पाहा.

मी कबूल झालों. माझी धर्मपत्नी व मुलें गाडींतून रुस्तुमशेठकडे गेलीं आणि सुखरूप पोंचलीं. मी कप्तानाचा निरोप घेऊन मि. लॉटन्‌बरोबर उतरलों. रुस्तुमजी शेठचें घर सुमारें दोन मैल अंतरावर असावें.

आम्ही आगबोटींतून उतरलों तोंच कित्येक पोरांनीं मला ओळखून काढला, आणि 'गांधी, गांधी' असा पुकारा केला. लगेच दोन-चार इसम जमले आणि ओरडा मोठ्यानें सुरू झाला. जमाव मोठा होणार असें दिसतांच मि. लॉटन्‌नीं रिक्षा मागविली. मला तिच्यांत बसणें कधींहि आवडत नसे. हा माझा पहिलाच अनुभव होणार होता. पण पोरें कसलीं बसूं देतात? त्यांनीं रिक्षावाल्याला धमकी दिली, तेव्हां तो चालता झाला.

आम्ही पुढें चाललों. जमाव वाढत चालला. चांगली गर्दी झाली. पहिल्या प्रथम त्या जमावानें मला मि. लॉटन्‌पासून वेगळा पाडला. मग माझ्यावर धोंड्यांचा व कुजक्या अंड्यांचा वर्षाव सुरू झाला. एकानें माझी पगडी उडवून दिली. लाथा सुरू झाल्या.

मला कळवळी आली. मीं जवळच्या घराची जाळी धरून दम खाल्ला. तिथें उभें राहतां येण्याजोगें नव्हतेंच. तडाके बसूं लागले.

इतक्यांत पोलिस-सुपरिंटेंडंटची बायको मला ओळखीत असे, ती त्या रस्त्यानेंच चालली होती. मला पाहतांच ती माझ्या बाजूला येऊन उभी राहिली. ऊन नव्हतें तरीहि तिनें आपली छत्री उघडून धरली. त्यामुळें जमाव कांहींसा नरम आला. आतां मार द्यायचा तर मिसेस् अलेक्झांडरला चुकवून द्यावा लागणार.

यापूर्वींच कोणी हिंदी तरुण मला मार बसतांना पाहून पोलिस ठाण्यावर धांवून गेला होता. सुपरिंटेंडंट अलेक्झांडरनीं एक तुकडी माझ्या सभोंवार राहून माझा बचाव करण्यासाठीं पाठविली. ती वेळेवर येऊन पोंचली. माझा रस्ता पोलिस-ठाण्यावरूनच जात होता. सुपरिंटेंडंटनीं मला ठाण्यामध्येंच आश्रय घेण्याबद्दल सुचविलें. मीं तें नाकारलें आणि म्हटलें, "आपली चूक लक्षांत आली, कीं लोक शान्त होतील. माझा त्यांच्या न्यायबुद्धीवर विश्वास आहे."

त्या तुकडीबरोबर चालून मी पारशी रुस्तुमजींच्या घरीं सुखरूप पोंचलों. मला पाठीवर गुद्दे बसले होते. रक्त असें एकाच ठिकाणीं आलें होतें. बोटीवरील डॉक्टर दादी बरजोर तेथेंच होते. त्यांनीं मला उपचार चांगल्या तऱ्हेनें केले.

अशा तऱ्हेनें आंत सर्व शान्त होतें; पण बाहेर गोऱ्या लोकांनीं घराला वेढा दिला होता. सूर्यास्त होऊन गेला. अंधार पडला. हजारों लोक बाहेर ओरड करीत होते. आणि 'गांधीला आमच्या स्वाधीन करा' अशा तऱ्हेच्या आरोळ्या

उठत होत्या. एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन सुपरिंटेंडंट अलेक्झांडर तेथें येऊन पोंचले. आणि जमावाला धमक्यांनीं नव्हे पण विनोद करून आवरून धरीत होते.

तरी पण त्यांना आंतून काळजी वाटतच होती. त्यांनीं मला पुढील आशयाचा निरोप पाठविला, “ जर तुम्हांला तुमच्या मित्राचें घर व मालमत्ता आणि तुमचें कुटुंब यांचा बचाव व्हायला पाहिजे असेल, तर मी सांगेन त्या रीतीनें तुम्ही गुप्तपणें या घरांतून पळून गेलें पाहिजे. ”

एकाच दिवशीं मला परस्परविरुद्ध अशी दोन कामें करण्याचा प्रसंग आला. प्राणांवरील संकट जेव्हां काल्पनिकसें वाटत होतें, तेव्हां मि. लॉटन्नीं मला उघडपणें बाहेर पडण्याची सल्ला दिली, आणि मी ती मान्य केली. जेव्हां संकट प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांसमोर उभें राहिलें, तेव्हां दुसऱ्या मित्रानें त्याच्या उलट सल्ला दिली आणि तीहि मीं मान्य केली ! मी स्वतःच्या प्राणांवरील संकटाला भ्यालों, कीं मित्राच्या प्राणांवरील व मालमत्तेवरील संकटाला, कीं कुटुंबावरील संकटाला, कीं तिघांनाहि, तें कोण सांगू शकेल ? माझें बोटींतून हिंमतपूर्वक खालीं उतरणें आणि मागून संकट प्रत्यक्ष उभें झालें असतां गुप्तपणें पळून जाणें योग्य होतें, असें तरी कोण निश्चयपूर्वक सांगू शकेल ? पण होऊन गेलेल्या गोष्टीबद्दल अशा तऱ्हेची चर्चाच निरर्थक आहे. झाली गोष्ट समजून घ्यावी, तिच्यापासून घेतां येईल तो धडा घ्यावा, एवढ्याचाच उपयोग आहे. अमुक प्रसंगी अमुक मनुष्य काय करील हें निश्चयपूर्वक सांगतांच येत नाहीं. त्याचप्रमाणें मनुष्याच्या बाह्याचारावरून त्याच्या गुणांची आपण जी परीक्षा करतों ती अपुरी व अंदाजीच असते, ही गोष्ट आपल्या लक्षांत घेण्यासारखी आहे.

कसेंहि असो, पळण्याच्या तयारीपुढें झालेल्या जखमा मी विसरून गेलों. मीं हिंदी शिपायाचा पोषाख चढवला. डोक्यावर कदाचित मार बसेल, तर त्यापासून बचाव करण्यासाठीं पितळेचें तबक ठेवलें आणि त्याच्यावरून मद्रासी पद्धतीचा मोठा फेटा लपेटला. बरोबर दोन डिटेक्टिव्ह होते; त्यांपैकीं एकानें हिंदी व्यापाऱ्याचा पोषाक केला. स्वतःचें तोंड हिंदी माणसाच्या तोंडाप्रमाणें रंगवलें. दुसऱ्या इसमानें कसला पोषाक केला तें आतां मला स्मरत नाहीं. आम्ही बाजूच्या गल्लींतून जवळच्या एका दुकानांत शिरलों, आणि गोदामांत रचलेल्या गोणींच्या थप्पीवरून अंधारांतल्या अंधारांत चढून जाऊन दुकानाच्या दरवाजानें बाहेरच्या घोळक्यांतून पसार झालों. रस्त्याच्या नाक्यावर गाडी उभी होती, तींत मला बसवून पूर्वींच्याच टाण्यावर—ज्याचा आश्रय घेण्याबद्दल सुपरिंटेंडंट अलेक्झांडरनीं सुचविलें होतें—त्याच टाण्यावर घेऊन गेले. मीं सुपरिंटेंडंट अलेक्झांडरचे, त्याचप्रमाणें गुप्त पोलिसांच्या अंमलदारांचे, उपकार मानले.

अशा तऱ्हेनें एकीकडून मला पळवून नेत असतां दुसरीकडे सुपरिंटेंडंट

अलेक्झांडर त्या घोळक्याला गाणें सांगत होते. त्या गाण्याचें भाषांतर असें:—

‘ चला फांशी द्यायला
चिंचेच्या झाडावर गांधीला.’

जेव्हां मी सुखरूप ठाण्यावर पोंचल्याची बातमी सुपरिंटेंडंट अलेक्झांडरला मिळाली, तेव्हां ते त्या जमावाला म्हणाले, “ तुमची शिकार तर या दुकानांतून जिवानिशीं पळून गेली. ” टोळींपैकीं कित्येक संतापले, कित्येक हंसूं लागले; पुष्कळांना तें खरेंच वाटेना.

“ तर मग तुमच्यांतून ज्यांना नेमाल त्यांना मी आंत घेऊन जातों, त्यांनीं तपासून पाहावें. जर तुम्हांला गांधी सांपडला, तर त्याला तुमच्या स्वाधीन करीन, नाही सांपडला तर तुम्ही घरोघर जावें. तुम्हीं पारशी रुस्तुमजीच्या घराला आग लावणार नाहीं किंवा गांधीच्या बायकापोरांना दुखापत करणार नाहीं याबद्दल मला खात्री आहे.” सुपरिंटेंडंट अलेक्झांडर म्हणाले.

टोळीनें प्रतिनिधी नेमले. प्रतिनिधींनीं टोळीला निराशाजनक अहवाल दिला. सर्वजण सुपरिंटेंडंट अलेक्झांडरची समयसूचकता व चातुर्य वाखाणीत, तर कित्येकजण दांतओंठ खात, आपापल्या घरोघर गेले.

सरहूम मि. चेंबरलेननीं माझ्यावर हल्ला करणारांवर खटला चालविण्याबद्दल व मला न्याय मिळेलसें करण्याबद्दल तार पाठविली. मि. एस्कंबनीं मला आपल्याकडे बोलावून नेला. मला झालेल्या दुखापतीबद्दल दिलगिरी व्यक्त केली आणि म्हटलें, “ तुमच्या केसाला धक्का लागलेला मला पसंत पडणार नाहीं, हें तुम्ही खरें मानालच. मि. लॉटनची सल्ला स्वीकारून तुम्ही लगेच उतरून जाण्याचें धाडस केलें, तसें करण्याचा तुम्हांला हक्क होताच, पण माझ्या निरोपाला मान दिला असतात, तर हा दुःखद प्रसंग घडला नसता. आतां जर तुम्ही हल्ला करणारांना ओळखूं शकाल, तर त्यांना पकडून त्यांच्यावर काम चालविण्यास मी तयार आहें. मि. चेंबरलेनचीहि तशी मागणी आहे. ”

मीं जबाब दिला, “ कोणावरहि काम चालवायचें नाहीं. हल्ला करणाऱ्यांपैकीं एकादोघांना कदाचित् मी ओळखूं शकेन; पण त्यांना शिक्षा करवून मला काय मिळणार ? शिवाय हल्ला करणारांचा मी दोषहि काढीत नाही. त्यांना असें भासविण्यांत आलें, कीं मी हिंदुस्थानांत अतिशयोक्ति करून नाताळच्या गोऱ्या लोकांची नालस्ती केली. ही गोष्ट त्यांना खरी वाटली आणि ते संतापले, तर त्यांत नवल काय ? खरा दोष वरच्या लोकांचा आणि, मला म्हणूं द्याल तर, तुमचा म्हटला पाहिजे. तुम्ही लोकांना योग्य मार्गानें नेऊं शकत होतां. पण तुम्हीं सुद्धां रॉयटरची तार खरी मानली, आणि मीं अतिशयोक्ति केली असी कल्पना

करून घेतली. मला कोणावरच काम चालवायचें नाहीं. खरी गोष्ट बाहेर आली आणि लोकांना समजली म्हणजे त्यांचा त्यांनाच पश्चात्ताप होईल. ”

“ तर मग तुम्ही मला ही गोष्ट लिहून द्याल ? मला त्याप्रमाणें मि. चेंबरलेनना तार करावी लागेल. तुम्ही घाईघाईनें कांहीं लिहून द्यावें असें मी म्हणत नाही. तुम्ही मि. लॉटनना व इतर मित्रांना विचारून जें योग्य वाटेल तें करावे, अशी माझी इच्छा आहे. एवढें मात्र मी कबूल करतों, कीं जर तुम्ही हल्ला करणारांवर काम चालविलें नाहीं, तर सर्व स्थिरस्थावर करणें मला फार सोपें जाईल, आणि तुमची प्रतिष्ठा तर खात्रीनें वाढेलच. ”

मी जबाब दिला, “ या बाबतींतील माझे विचार ठरून गेलेले आहेत. मला कोणावरच काम चालवावयाचें नाहीं हा निश्चय आहे, त्या अर्थी मी येथेंच तुम्हांला लिहून द्यायला तयार आहें. ”

असें म्हणून मी योग्य मजकुराचे पत्र लिहून दिलें.

● ● ●

## ४

# शान्ति

हल्ल्यानंतर दोन एक दिवसांनीं जेव्हां मी मि. एस्कंबना भेटायला गेलों, त्या वेळीसुद्धां पोलिस ठाण्यावरच होतों. माझ्याबरोबर संरक्षणासाठी एक-दोन शिपाई असत, पण वास्तविक जेव्हां मला मि. एस्कंबकडे घेऊन गेले, तेव्हां संरक्षणाची जरूरी राहिली नव्हती.

मी उतरलों त्याच दिवशीं म्हणजे पिवळा बावटा उतरतांक्षणींच ‘ नाताळ ॲडव्हर्टायझर ’चा प्रतिनिधि माझी मुलाखत घेऊन गेला होता. त्यानें मला खूप प्रश्न विचारले, आणि त्यांची उत्तरें देतांना मी एकान् एक आरोपांचें संपूर्णपणें निराकरण करूं शकलों होतों. सर फिरोजशहांच्या पुण्याईनें हिंदुस्थानांत त्या वेळीं मीं एकहि भाषण लिहिल्याखेरीज दिलें नव्हतें. या सर्व माझ्या भाषणांचा आणि लेखांचा संग्रह माझ्यापाशीं होताच. मीं तीं त्याला दिलीं आणि शाबीत करून दिले, कीं हिंदुस्थानांत मीं अशी एकहि गोष्ट सांगितली नाहीं, कीं जी अधिक जोरदार शब्दांमध्यें दक्षिण आफ्रिकेमध्यें सांगितली नसेल. मीं असेंहि दाखवून दिलें की, ‘ कूरलंड ’ व ‘ नादरी ’ वरील उतारूंना आणण्यांत माझें मुळींच अंग नव्हतें. त्यांच्यापैकीं पुष्कळजण जुनेच होते, आणि पुष्कळसे नाताळांत राहाणार नव्हते, तर ट्रॅन्सवालला जाणार होते. त्या वेळीं नाताळांत मंदी होती.

ट्रॅन्सवालमध्यें पुष्कळ जास्त कमाई होत असे. त्यामुळें पुष्कळ हिंदी तिकडे जाणें पसंत करीत.

या खुलाशाचा, त्याचप्रमाणें हल्ला करणारांवर फिर्याद करण्याचें मीं नाकारलें त्याचा, इतका कांहीं परिणाम झाला, कीं गोऱ्या लोकांना शरम आली. वर्तमानपत्रांनीं मला निर्दोषी ठरवला आणि हल्ला करणारांना दोष दिला. अशा तऱ्हेनें मला अखेरीला लाभच झाला, आणि माझा लाभ तो कार्याचा लाभ होता. हिंदी समाजाची प्रतिष्ठा वाढली. आणि माझा मार्ग अधिक सरळ झाला.

तीन-चार दिवसांत मी आपल्या घरीं गेलों, आणि थोडक्याच दिवसांत माझी नेहमींची दिनचर्या सुरू झाली. वरील प्रसंगामुळें माझी वकिलीहि अधिक चांगली चालूं लागली.

पण अशा तऱ्हेनें हिंदी लोकांची प्रतिष्ठा वाढली, तर त्याबरोबरच त्यांच्या-बद्दलचा द्वेषहि वाढला. त्यांच्यामध्यें दृढतापूर्वक झगडण्याची शक्ति आहे, अशी गोऱ्या लोकांची खात्री झाली, व त्याबरोबरच त्यांच्याबद्दलचें भयहि वाढलें. नाताळच्या कौन्सिलमध्यें दोन कायदे दाखल झाले. त्यामुळें हिंदी लोकांची दुःस्थिति अधिक तीव्र झाली. एकामुळें हिंदी व्यापाऱ्यांच्या धंद्याला धक्का पोंचला, दुसऱ्यामुळें हिंदी लोकांच्या येण्या-जाण्यावर सक्त मर्यादा घालण्यांत आल्या. सुदैवानें मताधिकाराच्या झगड्याच्या वेळीं ठरलें होतें, कीं हिंदी लोकां-विरुद्ध हिंदी म्हणून कायदा करतां येणार नाहीं, म्हणजे कायद्यामध्यें रंगभेद किंवा जातिभेद असतां कामा नये. त्यामुळें वरील दोन्ही कायद्यांच्या भाषेवरून ते सर्वांना लागूं पडणारेसे दिसत होते; पण त्यांचा हेतु फक्त हिंदी लोकांवर दडपण घालण्याचा होता.

या कायद्यांमुळें माझें काम फार वाढलें व हिंदी लोकांमधील जागृतिहि वाढली. त्या कायद्यांतील बारीक बारीक मुद्द्यांविषयींहि कोणी हिंदी इसम गैरमाहितगार राहूं नये अशा तऱ्हेनें ते लोकांना समजावून देण्यांत आले; आणि आम्हीं त्यांचीं भाषांतरें प्रसिद्ध केलीं. तक्रार अखेरीला विलायतेपर्यंत गेली. पण कायदे नामंजूर झाले नाहींत.

माझा बहुतेक वेळ सार्वजनिक कामांतच जाऊं लागला. मनसुखलाल नाझर नाताळमध्यें असल्याचें मीं वर लिहिलेंच आहे. ते माझ्याबरोबर राहिले. त्यांनीं सार्वजनिक कामांत अधिक भाग घेण्यास सुरुवात केली, त्यामुळें माझें काम कांहींसें हलकें झालें.

माझ्या गैरहजेरींत शेठ आदमजी मियांखान यांनीं आपलें कार्यवाहाचें काम फार उत्तम बजावलें. सभासद वाढविले आणि स्थानिक काँग्रेसच्या खजिन्यांत जवळजवळ एक हजार पौंडांची भर घातली. उतारूंवरील हल्ल्यामुळें; त्याचप्रमाणें

वरील दोन कायद्यांमुळें जी जागृति झाली तिचा फायदा घेऊन मीं या भरींतहि भर घालण्याचा प्रयत्न केला, आणि खजिन्यांत जवळजवळ पांच हजार पौंड झाले. मला असा लोभ वाटत होता, कीं काँग्रेसचा कायम फंड असला, त्याची जमीन खरेदी घेतली आणि तिचें भाडें येत गेलें, तर काँग्रेस निश्चित बनेल. सार्वजनिक संस्थेचा हा माझा पहिलाच अनुभव होता. मीं माझा विचार सहकाऱ्यांपुढें मांडला. त्यांनीं तो पसंत केला. घरें विकत घेण्यांत आलीं, आणि भाड्याला लाविलीं गेलीं. त्यांच्या भाड्यांतून काँग्रेसचा मासिक खर्च सहजीं चालूं लागला. मिळकतीचा भक्कम ट्रस्ट केला. अशा तऱ्हेनें ही मिळकत आजहि शिल्लक आहे; पण ती आपापसांतील तंट्याला कारणीभूत झाली आहे, आणि मिळकतीचें भाडें आज कोर्टांत जमा होत आहे.

हा दुःखद बनाव मी दक्षिण आफ्रिका सोडून आल्यानंतर घडला. पण सार्वजनिक संस्थांसाठीं कायम फंड उभारण्याबाबतींतील माझे विचार दक्षिण आफ्रिकेंतच बदलले. अनेक सार्वजनिक संस्था सुरू करून त्यांची व्यवस्था चालविण्याच्या जबाबदारीचा अनुभव घेतल्यानंतरच मी अशा दृढ निर्णयावर आलों, कीं कोणत्याहि जाहीर संस्थेनें कायम फंडावर गुजारा करण्याचा प्रयत्न करूं नये. तसें करण्यामध्यें तिच्या नैतिक अधोगतीचें बीज सांठविलेलें आहे.

सार्वजनिक संस्था म्हणजे लोकांची मान्यता आणि लोकांचे पैसे यांवर चालणारी संस्था. अशा संस्थेला लोकांची मदत मिळेनाशी होईल तेव्हां तिला अस्तित्वांत राहाण्याचा हक्कच राहत नाहीं. कायम फंडावर चालणाऱ्या संस्था लोकमताविषयीं बेपर्वा होतांना आढळतात; कित्येक वेळा तर धडधडीत लोकमताविरुद्ध आचरण करतांना दृष्टीस पडतात. अशा तऱ्हेचे अनुभव हिंदुस्थानांत आपल्याला पावलोंपावलीं येतात. धार्मिक म्हटल्या जाणाऱ्या कित्येक संस्थांच्या हिशेबठिशेबांचा ठावठिकाणा नाहीं. त्यांचे व्यवस्थापक तेच त्यांचे मालक होऊन बसले आहेत—आणि त्यांच्यावर कोणाचा ताबा चालत नाहीं. सृष्टि ज्याप्रमाणें रोजचें अन्न रोज तयार करून रोज खातें, त्याप्रमाणें सार्वजनिक संस्थांचें असलें पाहिजे, याबद्दल मला तिळमात्र शंका नाहीं. ज्या संस्थेला लोक मदत करण्यास तयार नाहींत त्या संस्थेला सार्वजनिक संस्था म्हणून जगण्याचा अधिकारच नाहीं. प्रतिवर्षी मिळणारा फंड ही त्या त्या संस्थेच्या लोकप्रियतेची व तिच्या चालकांच्या प्रामाणिकपणाची कसोटी आहे; आणि प्रत्येक संस्थेनें या कसोटीवर चढलेंच पाहिजे असा माझा अभिप्राय आहे.

या माझ्या लिहिण्याविषयीं गैरसमज होऊं नये; ज्या संस्थांना इमल्याची वगैरे जरूर लागते, अशा संस्थांना वरील टीका लागूं पडत नाहीं. सार्वजनिक संस्थांच्या चालू खर्चाचा आधार लोकांपासून मिळणाऱ्या फंडावर असला पाहिजे.

हे विचार दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाच्या वेळीं दृढ झाले. ह्या सहा वर्षांच्या महान् झगड्यासाठीं लाखों रुपयांची जरूर पडली, पण तो कायमनिधी-शिवाय चालला. असाहि वेळ मला आठवतो, कीं जेव्हां उद्यांचा खर्च कोठून मिळेल याची मला कल्पनाहि नव्हती; पण पुढें यावयाच्या प्रसंगाचा उल्लेख मी येथें करीत नाहीं. वरील अभिप्रायाचें समर्थन वाचकाला या कथेमध्यें त्या त्या प्रसंगीं वाचावयास मिळेल.

●●●

## ९

# बालशिक्षण

सन १८९७ च्या जानेवारीमध्यें मी डरबनला उतरलों; तेव्हां माझ्याबरोबर तीन मुलगे होते. माझा भाचा सुमारें दहा वर्षांचा, माझा मोठा मुलगा नऊ वर्षांचा आणि दुसरा मुलगा पांच वर्षांचा. या सर्वांना शिकवायचें कोठें ?

गोऱ्या लोकांसाठीं ज्या शाळा होत्या, त्यांत मी आपल्या मुलांना पाठवूं शकत होतों. पण तें केवळ मेहेरबानी व अपवाद म्हणून. इतर सर्व हिंदी मुलें तेथें शिकूं शकतील अशी स्थिति नव्हती. हिंदी मुलांच्या शिक्षणासाठीं ख्रिस्ती मिशनच्या शाळा होत्या. त्यात आपल्या मुलांना पाठविण्याची माझी तयारी नव्हती. तेथें मिळणारें शिक्षण मला पसंत नव्हतें. तेथें गुजराथींतून शिक्षण कोठून मिळणार ! इंग्रजीमार्फतच मिळायचें; आणि फारच प्रयास केला, तर अशुद्ध तामीळ किंवा हिंदीमार्फत. हे व इतर न्यूनें मला खपण्यासारखीं नव्हती.

मी स्वतः मुलांना शिकविण्याचा थोडासा प्रयत्न करीत असे, पण तो अतिशय अनियमित होता. माझ्या पसंतीला येईल असा गुजराथी शिक्षक मला मिळाला नाहीं.

मी विचारांत पडलों. माझ्या पसंतीनें शिक्षण मुलांना देईल अशा इंग्रजी शिक्षकासाठीं मीं जाहिरात दिली. या तऱ्हेनें जो शिक्षक मिळेल त्याच्यामार्फत थोडें नियमित शिक्षण द्यावें आणि बाकीचें मी स्वतः जमेल तसें चालवावें असा विचार केला. एका इंग्रज बाईला सात पौंडांच्या पगारावर ठेवली आणि गाडें कसें तरी रेटलें.

मी मुलांशीं गुजराथींतच बोलत चालत असें. त्यामार्फत त्यांना थोडेसें गुजराथी मिळत असे. त्यांना हिंदुस्थानांत पाठवून देण्यास मीं तयार नव्हतों. मला त्या वेळींहि वाटत असे, कीं लहान मुलांनीं आईबापांपासून दूर राहिलेलें बरें

नाहीं. सुव्यवस्थित घरामध्यें जें शिक्षण मुलांना सहजीं मिळतें तें छात्रालयांत मिळणें शक्य नाहीं. त्यामुळें मुलें बहुतांशीं माझ्याजवळ राहिलीं. भाचा व थोरला मुलगा या दोघांनाहि थोडे महिनेपर्यंत मीं स्वदेशीं निरनिराळ्या छात्रालयांमध्यें ठेवलें खरें; पण तिकडून त्यांना लवकरच परत बोलावून घेतलें. पुढें माझा मोठा मुलगा बराच मोठा झाल्यानंतर स्वतःच्या इच्छेनें अहमदाबादच्या हायस्कुलांत शिक्षण घेण्यासाठीं दक्षिण आफ्रिका सोडून आला. माझ्या भाच्याला मी जें कांहीं देत होतों, तेवढ्यावर त्याला संतोष होता अशी माझी समजूत आहे. तो भर तारुण्यामध्यें थोडक्याच दिवसांच्या आजारानंतर परलोकवासी झाला. इतर तीन मुलगे कधीं कोणत्याहि शाळेंत गेलेलेच नाहींत. दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाच्या अनुषंगानें मीं स्थापिलेल्या शाळेमध्यें त्यांचा थोडासा नियमित अभ्यास झाला.

माझे हे प्रयोग अपूर्ण होते. माझी इच्छा होती तेवढा वेळ मी मुलांकडे देऊं शकत नसे. त्यामुळें आणि इतर अनिवार्य योगायोगामुळें माझ्या मनाजोगतें पुस्तकी शिक्षण मी त्यांना देऊं शकलों नाहीं. माझ्या सर्व मुलांची या बाबतींत माझ्याविरुद्ध तक्रार आहे. कारण जेव्हां त्यांची 'बी. ए.', एम्. ए.' किंवा 'मॅट्रिक्युलेट'शींहि गांठ पडते, तेव्हां स्वतः शाळेंत न शिकल्याचें वैगुण्य त्यांना जाणवतें.

असे असूनहि माझा स्वतःचा असा अभिप्राय आहे, कीं त्यांना जें अनुभवज्ञान प्राप्त झालें आहे, आईबापांचा जो सहवास त्यांना मिळूं शकला, स्वतंत्रतेचा जो पदार्थपाठ त्यांना शिकण्यास मिळाला, तो जर मीं त्यांना कोठूनहि शाळेंत पाठविण्याचा आग्रह धरला असता, तर मिळाला नसता; त्यांच्याबद्दल जो निश्चिन्तपणा मला आज आहे तो नसता, आणि ते जो साधेपणा आणि सेवाभाव शिकले आहेत, तो माझ्यापासून दूर राहून विलायतेंत किंवा दक्षिण आफ्रिकेंत कृत्रिम शिक्षण घेतल्यानें त्यांचेमध्यें आला नसता. उलट त्यांची कृत्रिम राहणी माझ्या देशकार्यामध्यें मला विघ्नरूप झाली असती.

त्यामुळें जरी मी त्यांना माझी इच्छा होती तेवढें पुस्तकी शिक्षण देऊं शकलों नाहीं तरीहि, माझ्या पुढच्या वर्षांचा विचार करतां, त्यांच्यासंबंधींचें माझें कर्तव्य मीं यथाशक्ति बजावलें नाहीं अशी माझी समजूत होत नाहीं, किंवा मला पश्चात्तापहि होत नाहीं. याच्या उलट, माझ्या वडील मुलाच्या बाबतींत मला जो खेदजनक परिणाम दिसतो, तो माझ्या अर्धकच्च्या पूर्वकाळाचा प्रतिध्वनि आहे असें मला नेहमीं वाटत आलें आहे. ज्याला मी माझा मोहकाल (वैभवकाल) असें समजतों त्याचें त्याला पूर्ण स्मरण राहील एवढें त्याचें त्या वेळीं वय होतें. पण तो माझा मोहकालच होता, असें त्याला कां वाटावें? त्यानें असें कां नये समजूं, कीं तो काळ माझा ज्ञानकाल होता; आणि त्यानंतर

झालेलीं परिवर्तनें अयोग्य आणि मोहजन्य आहेत? त्याला असें कां वाटूं नये कीं, त्या वेळीं मीं जगाच्या मळलेल्या रस्त्यानें चाललों होतों, व त्यामुळें सुरक्षित होतों; आणि त्यानंतर केलेले फेरफार हेच माझ्या सूक्ष्म अभिमानाचे आणि अज्ञानाचे द्योतक आहेत. माझ्या मुलांना बॅरिस्टरसारख्या पदव्या मिळाल्या असत्या तर काय बिघडलें असतें? मला त्यांचे पंख कापून टाकण्याचा काय अधिकार होता? मी त्यांना पदव्या वगैरे घेऊं देऊन स्वतःच्या आवडीनुरूप आयुष्याचा मार्ग ठरविण्याच्या स्थितीला कां आणून पोंचविलें नाहीं? अशा तऱ्हेचा युक्तिवाद माझ्या कित्येक मित्रांनींहि माझ्यापाशीं केला आहे.

मला या म्हणण्यांत कांहीं अर्थ वाटलेला नाही. माझा अनेक विद्यार्थ्यांशीं संबंध आला आहे. इतर मुलांवर मीं अन्य तऱ्हेचे प्रयोगहि केले आहेत, किंवा करण्याचे कामी मदत केली आहे. त्यांचे परिणामहि मीं पाहिले आहेत. हे तरुण व माझे मुलगे आज सारख्याच वयाचे आहेत. माणुसकीच्या बाबतींत ते माझ्या मुलांना मागें टाकतील, किंवा माझ्या मुलांनी त्यांच्यापासून विशेषसें शिकण्यासारखें असेल असें मला वाटत नाही.

तरी पण माझ्या प्रयोगांचा नक्की परिणाम पुढेंच कळणार. या विषयाची येथें चर्चा करण्यांतील तात्पर्य एवढेंच, कीं मनुष्यजातीच्या उत्क्रान्तीचा अभ्यास करणाराला गृहशिक्षण व शाळेंतील शिक्षण यांमध्यें कसा फरक पडतो, आणि आईबापांनीं स्वतःच्या जीवनामध्यें केलेल्या फेरफारांचा त्यांच्या बालकांवर काय परिणाम होतो, याचा थोडाबहुत अंदाज करतां यावा.

शिवाय आणखी या प्रयोगांवरून सत्याच्या पुजाऱ्याला सत्याची आराधना आपल्याला कोठवर घेऊन जाऊं शकते तें पाहतां येईल, आणि स्वतंत्रतादेवीच्या उपासकाला ती देवी कशा तऱ्हेच्या आहुति मागत असते तेंहि समजूं शकेल, हेंहि एक या प्रकरणाचें तात्पर्य आहे. मुलांना आपल्याजवळच ठेवूनहि जर मीं स्वाभिमानावर पाणी सोडलें असतें, इतर हिंदी बालकांना मिळत नाहीं, तें माझ्या मुलांसाठीहि मी इच्छितां कामा नये हा विचार जर मी कायम केला नसता, तर मी आपल्या मुलांना पुस्तकी शिक्षण देऊं शकलों असतों खरा; पण मग ते जो स्वतंत्रतेचा आणि स्वाभिमानाचा पदार्थपाठ शिकले तो शिकूं शकले नसते. आणि जेथें स्वतंत्रता आणि अक्षरज्ञान यांच्यामध्येंच पसंती करायची असते, तेथें स्वतंत्रता अक्षरज्ञानापेक्षां हजारपटींनी बरी असें कोण म्हणणार नाहीं?

ज्या नवयुवकांना मीं १९२० सालीं स्वातंत्र्यविघातक शाळा-कॉलेजें सोडून बाहेर पडण्याचें निमंत्रण दिलें, आणि ज्यांना निरक्षर राहून उघड्या रस्त्यावर खडी फोडणें हें गुलामीमध्यें राहून अक्षरज्ञान मिळविण्यापेक्षां चांगलें आहे असें सांगितलें, तें आतां माझ्या म्हणण्याचें मूळ कदाचित् समजूं शकतील.

●●●

# ६

# सेवावृत्ति

माझा धंदा ठीक चालला होता, पण तेवढ्यानें संतोष वाटत नव्हता. जीवन अधिक साधें झालें पाहिजे, कांहीं तरी शारीरिक सेवाकार्य हातून घडलें पाहिजे, अशा तऱ्हेची खळबळ मनांत चालूच होती.

इतक्यांत एके दिवशीं एक अपंग रक्तपित्तानें पीडलेला मनुष्य दाराशी आला. त्याला खायला देऊन काढून लावण्याची हिंमत चालेना. त्याला एका खोलीत ठेवला. त्याच्या जखमा साफ केल्या आणि त्याची शुश्रूषा केली.

पण फार काळपर्यंत असें चालणें शक्य नव्हतें. त्याला घरीं कायमचा ठेवण्याची माझ्यापाशीं सोय नव्हती; माझी छातीहि नव्हती. मीं त्याला गिरमिटयांसाठीं चाललेल्या सरकारी इस्पितळांत पाठविला.

पण तेवढ्यानें माझें समाधान झालें नाहीं. अशा तऱ्हेच्या शुश्रूषेचें काम नेहमीं करायला मिळेल तर किती चांगलें होईल? डॉ. बूथ हे सेन्ट ॲडम्स् मिशनचे वरिष्ठ होते. ते नेहमी येईल त्याला मोफत औषध देत. फार सज्जन आणि प्रेमळ होते. पारशी रुस्तुमजींच्या दातृत्वामुळें डॉ. बूथच्या देखरेखीखाली एक छोटें इस्पितळ उघडण्यांत आलें होतें. या इस्पितळांत नर्स म्हणून काम करण्याची मला प्रबळ इच्छा झाली. तेथें औषधें देण्याचें काम एक-दोन तासांचें असे. औषधें तयार करून देणाऱ्या कोणा तरी पगारदार माणसाची किंवा स्वयं-सेवकाची जरूर होती. हें काम अंगावर घेऊन त्याच्यापुरता वेळ काढण्याचा मीं निश्चय केला. माझें वकिलीचें पुष्कळसें काम ऑफिसांत बसल्या बसल्या सल्ला देणें, दस्तऐवज लिहिणें, किंवा कज्जे मिटविणें अशाच स्वरूपाचें असे. थोडेसे दावे मॅजिस्ट्रेटच्या कोर्टात असत. त्यांपैकीं पुष्कळसे बिनतक्रार असत. मि. खान हे माझ्या मागून आले होते आणि त्या वेळीं माझ्याबरोबरच राहात असत. अशा तऱ्हेचे कोर्टांत दावे असतील, तेव्हां ते चालविण्याचें मि. खान यांनीं अंगावर घेतलें आणि मी या छोट्या इस्पितळांत काम करूं लागलों.

रोज सकाळीं तेथें जायचें असे. यायला जायला आणि इस्पितळांत काम करायला मिळून सुमारें दोन तास लागत. या कामामुळें मला कांहींसें समाधान वाटलें. माझें काम रोग्याचें दुखणें समजून घेऊन तें डॉक्टरला समजावून सांग-ण्याचें; आणि डॉक्टर सांगतील तें औषध तयार करून रोग्याला देण्याचें होतें. या कामामुळें माझा दुःखी हिंदी लोकांशीं गाढ संबंध आला. त्यांच्यापैकीं बरेचसे तामीळ किंवा तेलगू अथवा उत्तर हिंदुस्थानी गिरमिटये होते.

हा अनुभव मला पुढें फार उपयोगी पडला. बोअर युद्धाच्या वेळीं जखमी लोकांची आणि इतर रोग्यांची शुश्रूषा करण्याच्या कामीं त्याचा मला खूप उपयोग झाला.

बालकांच्या संगोपनाचा प्रश्न माझ्यापुढें होताच. दक्षिण आफ्रिकेमध्यें मला आणखी दोन पुत्र झाले. त्यांचें संगोपन करून लहानाचें मोठें कसें करावें हा प्रश्न सोडविण्याच्या कामीं मला या अनुभवाची फार मदत झाली. माझा स्वतंत्र स्वभाव मला फार बेजार करीत असे आणि अजूनहि करतो. बाळंतपण वगैरे शास्त्रीय पद्धतीनें करावें असा आम्हीं उभयतांनीं निश्चय केला होता. त्यामुळें, जरी डॉक्टरची त्याचप्रमाणें सुइणीची सोय असली तरी, आयत्या वेळीं डॉक्टर मिळाला नाहीं किंवा दाई निघून गेली, तर माझी काय गत होणार? दाई हिंदीच ठेवावयाची होती. शिकलेली हिंदी दाई हिंदुस्थानांत मिळतांना पंचाईत पडते, मग दक्षिण आफ्रिकेची गोष्ट बोलायलाच नको. यासाठीं मींच बालसंगोपनाचा अभ्यास करून घेतला. डॉ त्रिभुवनदासचें 'आईला शिकवण' हें पुस्तक वाचलें. त्यांत थोडेफार फेरफार करून शेवटल्या दोन मुलांची जोगवण मी स्वतः केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. दाईची मदत दर वेळीं थोडी मुदतपर्यंतच—दोन महिन्यांपेक्षां जास्त नाहीं—घेतली; घेतली तीहि मुख्यतः पत्नीच्या शुश्रूषेसाठीं. मुलांना न्हाऊं घालण्याचें वगैरे काम सुरुवातीला माझ्या हातूनच होत असे.

शेवटल्या मुलाच्या जन्मप्रसंगीं माझी पुरेपूर कसोटी झाली. प्रसूतिवेदना एकाएकीं सुरू झाली. डॉक्टर घरी नव्हता. दाईला बोलावणें पाठवायचें होतें. ती जवळ असती तरी तिच्याकडून प्रसूति करविण्याचें काम झालें नसतें. प्रसूतीच्या वेळचें सर्व काम मला आपल्या हातानेंच करावें लागलें. सुदैवानें मीं हा विषय 'आईला शिकवणीं'तून लक्षपूर्वक वाचून ठेविला होता त्यामुळें मी गोंधळलों नाहीं.

मीं असें पाहिलें कीं, स्वतःच्या मुलांची योग्य तऱ्हेने जोगवण करायची असेल, तर आईबापांनीं तत्संबंधीचें सामान्यज्ञान मिळवून ठेविलें पाहिजे. मीं या बाबतीत जी दक्षता घेतली होती, तिचा फायदा मला पावलोंपावलीं आढळून आला आहे. माझे मुलगे आज जें सामान्य आरोग्य उपभोगीत आहेत तें, जर मीं आरोग्यासंबंधींचें सामान्यज्ञान संपादून त्याचा अंमल केला नसता तर, ते उपभोगूं शकले नसते. आपल्यामध्ये असा एक चुकीचा समज असतो, कीं पहिल्या पांच वर्षांमध्यें मुलांना शिक्षणाची वगैरे जरूरी नसते. वस्तुस्थिति अशी आहे, की पहिल्या पांच वर्षांत मूल जेवढें सिळवतें तेवढें मागून सबंध आयुष्यांत मिळवूं शकत नाहीं. मुलाचें शिक्षण आईच्या उदरांतूनच सुरू होतें, असें मी अनुभवानें

सांगू शकतों. गर्भधारणाच्या वेळच्या आईबापांच्या शारीरिक व मानसिक स्थितीचा ठसा मुलावर उमटत असतो. गर्भकाळची मातेची प्रकृति, मातेच्या आहार-विहारांचीं बरीवाईट फळें, यांचा वारसा घेऊनच बालक जन्मास येतें. जन्मल्या-नंतर तें आईबापांचें अनुकरण करूं लागतें, आणि स्वतः अपंग असल्यामुळें त्याच्या विकासाचा आधार आईबापांवर राहातो.

हे विचार जी समजूतदार दंपत्यें करतील तीं कधींहि दंपतीसंगाला विषय-वासनेच्या तृप्तीचें साधन बनविणार नाहींत, तर जेव्हां त्यांना संततीची इच्छा होईल तेव्हांच संग करतील. रतिसुख ही एक स्वतंत्र वस्तु आहे असें मानण्यामध्यें घोर अज्ञान आहे अशी माझी समजूत आहे. जननक्रियेवर जगताचें अस्तित्व अवलंबून आहे. विश्व हें ईश्वराच्या लीलेचें स्थान आहे. त्याच्या महिम्याचें प्रति-बिंब आहे. त्याच्या सुव्यवस्थित वृद्धीसाठींच जननक्रिया निर्मिलेली आहे. हें ज्याच्या लक्षांत आलें तो विषयवासनेचें आटोकाट प्रयत्न करून नियंत्रण करील, आणि रतिभोगाच्या परिणामीं जी संतति होईल, तिचें शारीरिक, मानसिक व आध्यात्मिक संगोपन करण्यासाठीं जरूर लागणारें ज्ञान संपादन करील व त्या ज्ञानाचा फायदा आपल्या संततीला देईल.

● ● ●

७

# ब्रह्मचर्य—१

आतां ब्रह्मचर्यासंबंधीं विचार करण्याची वेळ आली आहे. विवाह झाला तेव्हांपासूनच एकपत्नीव्रताला माझ्या हृदयामध्यें स्थान होतें. पत्नीबद्दलची एकनिष्ठा हें माझ्या सत्यव्रताचेंच एक अंग होतें. पण स्वस्त्रीशीं सुद्धां ब्रह्मचर्याचें पालन करावें हें मला दक्षिण आफ्रिकेंतच उमजलें. कोणत्या प्रसंगावरून किंवा कोणत्या पुस्तकाच्या प्रभावामुळें हा विचार उद्भवला तें आज मला स्पष्ट आठवत नाहीं. एवढें स्मरतें कीं, त्या बाबतींत रायचंदभाईनीं घडवून आणलेला परिणाम विशेष महत्त्वाचा होता.

त्यांच्याबरोबर झालेला एक संवाद मला आठवतो. एके वेळीं मीं मिसेस् ग्लॅडस्टनच्या ग्लॅडस्टनवरील प्रेमाची स्तुति करीत होतों. कॉमन्सच्या सभेमध्येंहि मिसेस् ग्लॅडस्टन ग्लॅडस्टनला चहा बनवून देत. ही गोष्ट या नियमबद्ध दंपत्याच्या आयुष्यामधील एक नियमच बनून राहिली असल्याचें मीं कोठें तरी वाचलें, तें मीं कवींना सांगितलें. आणि त्या निमित्तानें मीं दंपतीप्रेमाची स्तुति केली. रायचंदभाई

म्हणाले, "यांत तुम्हांला विशेष काय वाटतें? मिसेस् ग्लॅडस्टनचा पत्नीपणा कीं सेवाभाव? ती बाई ग्लॅडस्टनची बहीण असती तर? किंवा त्यांची स्वामिनिष्ठ नोकर असून तेवढ्याच प्रेमानें चहा देती तर? अशा बहिणींचे, अशा नोकरांचे दृष्टान्त आपल्याला आजहि पाहावयाला मिळत नाहींत का? आणि स्त्रीजातीचे ऐवजीं पुरुषवर्गामध्यें तुम्हांला असलें प्रेम आढळलें, तर सानन्दाश्चर्य वाटणार नाही का? मी म्हणतों त्यासंबंधीं विचार करून पहा."

रायचंदभाई स्वतः विवाहित होते. त्या वेळीं त्यांचें म्हणणें मला निष्ठुरपणाचें वाटलें असें मला स्मरतें. पण त्या वचनानें मला लोहचुंबकाप्रमाणें वेधून घेतला. पुरुष नोकराच्या ठिकाणीं अशा तऱ्हेची स्वामिनिष्ठा असेल तर तिची किंमत पत्नीच्या पतिनिष्ठेपेक्षां सहस्रपट समजली पाहिजे. पतिपत्नीमध्यें ऐक्य असतें, त्यामुळें त्यांच्यामध्यें प्रेम असलें तर आश्चर्य नाही. नोकर व धनी यांच्यामध्यें तशा तऱ्हेचें प्रेम अभ्यासानें संपादन करावें लागेल. दिवसेंदिवस कवींच्या म्हणण्याची सत्यता माझ्या मनाला अधिकाधिक पटूं लागली.

मी पत्नीशीं कोणत्या स्वरूपाचा संबंध ठेवावा? पत्नीला विषयभोगाचें वाहन बनविणें यांत पत्नीबद्दलची निष्ठा कोठें आली? मी जोंपर्यंत विषयवासनेच्या आधीन आहे तोंपर्यंत माझ्या एकनिष्ठतेची किंमत स्वाभाविक वासनेपलीकडे करतां येत नाहीं. येथें मला कबूल केलें पाहिजे कीं, आमच्यामधील संबंधामध्यें पत्नी-कडून आक्रमण कधींच झालेलें नाहीं. त्या दृष्टीनें मी मनांत आणीन तेव्हां ब्रह्मचर्याचें पालन करणें मला शक्य होतें. माझी स्वतःची दुर्बलता किंवा आसक्तीच माझ्या आड येत होती.

मी जागृत झाल्यानंतरहि दोन वेळां हरलों. प्रयत्न करी, पण फसे. प्रयत्नां-तील मुख्य हेतु फारसा उच्च नव्हता. प्रजोत्पत्ति थांबविण्याचा होता. त्याच्या बाह्योपचारासबंधीं मीं विलायतेंत थोडेंबहुत वाचलें होतें. डॉ. ॲलिन्सन् या उपायांचा प्रचार करीत, या गोष्टीचा उल्लेख मीं अन्नाहारासंबंधींच्या प्रकरणामध्यें केलाच आहे. त्याचा किंचित् परिणाम क्षणमात्र माझ्यावर झाला. पण मि. हिल्सनीं केलेल्या त्यांच्या विरोधाचा व आंतरसाधनाच्या—संयमाच्या समर्थनाचा ठसा अधिक जोरदार ठरला, व अनुभवान्तीं चिरस्थायी झाला. त्यामुळें प्रजोत्पत्तीची अनावश्यकता लक्षांत येतांच मी संयमपालनाचा प्रयत्न सुरू केला.

संयमपालन कल्पनेपलीकडे बिकट आढळलें. स्वतंत्र खाटा ठेवल्या. रात्रीं थकून गेल्यानंतरच झोंपण्याचा प्रयत्न केला. या सर्व प्रयत्नांचा लागोलाग मला विशेष उपयोग जाणवला नाहीं. पण आज भूतकालावरून दृष्टि फिरवितां मला दिसतें कीं या सर्व प्रयत्नांनींच मला शेवटचें बळ दिलें.

अंतिम निश्चय थेट १९०६ सालींच करूं शकलों. त्या वेळीं सत्याग्रहाची

सुरुवात झाली नव्हती. सत्याग्रह माझ्या स्वप्नींहि नव्हता. बोअर युद्धानंतर नाताळांत झुलू लोकांचें 'बंड' झालें. त्या वेळी मी जोहानिसबर्गमध्यें वकिली करीत होतो. पण मला वाटलें कीं, त्या बंडाचे प्रसंगींहि मी आपली सेवा नाताळ सरकारला दिली पाहिजे. मी ती देऊं केली. तिचा स्वीकार झाला. त्यासंबंधींचें वर्णन पुढें येईल. पण या कामगिरीच्या प्रसंगानें माझ्या मनांत तीव्र विचार उत्पन्न झाले. माझ्या स्वभावानुसार मी माझ्या जोडीदारांबरोबर त्यासंबंधीं चर्चा केली. मला वाटलें, कीं प्रजोत्पत्ति आणि बालसंगोपन हीं समाजसेवेशीं विसंगत आहेत. या बंडांत काम पत्करल्यामुळें मला माझें जोहानिसबर्गमधील घर सोडावें लागलें. टापटिपीनें थाटलेल्या घराचा आणि सामानसुमानाचा थाटल्यापासून एक महिन्याच्या आंतच मी त्याग केला. पत्नीला व मुलांना फिनिक्समध्यें ठेवलें आणि मीं भोयांची तुकडी घेऊन बाहेर पडलों, कठिण मजला मारीत असतांना मला कळून आलें, की जर मला लोकसेवेमध्यें तन्मय व्हायचें असेल तर संततिलोभ व धनलोभ यांचा त्याग केला पाहिजे, व वानप्रस्थधर्माचें पालन केलें पाहिजे.

'बंडा'मध्यें मला दीड महिन्यापलीकडे राहावें लागलें नाहीं; पण हे सहा आठवडे म्हणजे माझ्या आयुष्यांतील अतिशय मौल्यवान काळ होता. व्रताचें महत्त्व या वेळीं मला अधिकांत अधिक पटलें. व्रत म्हणजे बंधन नव्हे, तर स्वतंत्रतेचें द्वार आहे हें माझ्या लक्षांत आलें. हा वेळपर्यंत माझ्या प्रयत्नांत मला पुरेशी सफलता मिळाली नाहीं, याचें कारण मीं निश्चय केला नव्हता. मला स्वतःच्या शक्तीबद्दल अविश्वास वाटत होता; ईश्वरी कृपेबद्दल मला अविश्वास होता; आणि त्यामुळें माझें मन अनेक तरंग व अनेक विचार यांच्या तडाक्यांत सांपडत होतें. मी पाहिलें कीं, व्रतानें स्वतःला बांधून न घेण्यामध्यें मनुष्य मोहाला बळी पडतो. व्रतानें स्वतःला बांधून घेणें म्हणजे व्यभिचारांतून निघून एकाच्या पत्नीशीं संबंध राखण्याप्रमाणें आहे 'प्रयत्न करणें मला मान्य आहे, व्रतानें बांधला जाण्यास मी तयार नाहीं,' हे शब्द निर्बलता दर्शवितात; आणि त्यामध्यें सूक्ष्म रूपानें भोगलालसा आहे. जी वस्तु त्याज्य आहे तिचा सर्वथैव त्याग करण्यामध्यें हानि कसली? जो साप मला चावणार, त्याचा मी निश्चयपूर्वक त्याग करतों, त्याग करण्याचा फक्त प्रयत्न करून थांबत नाहीं. माझी खात्री आहे, कीं फक्त प्रयत्नांवर थांबण्यामध्यें मरण आहे. फक्त प्रयत्नांवर विसंबून राहणें म्हणजे सर्पाच्या विकाळपणाच्या स्पष्ट ज्ञानाचा अभाव असा अर्थ होतो. त्याचप्रमाणें ज्या वस्तूचा त्याग करण्याचा आपण फक्त प्रयत्न करीत राहातों त्या वस्तूच्या त्यागाची इष्टता आपल्याला पूर्णपणें पटलेली नाहीं असेंच सिद्ध होतें. 'माझे विचार मागून बदलले तर?' अशी शंका घेऊन पुष्कळदां आपण व्रत घ्यायला कचरतो. त्या विचारामध्यें पूर्ण प्रचीतीचा अभाव आहे, म्हणूनच निष्कुलानंदानें म्हटलें आहे,

त्याग न टके रे वैराग विना ।

अमुक वस्तूबद्दल संपूर्ण वैराग्य बाणलें म्हणजे मग तिच्याबाबतींत व्रत घेणें ही अनिवार्य गोष्ट आहे.

०००

८

# ब्रह्मचर्य—२

भरपूर चर्चा केल्यानंतर आणि पूर्ण विचार केल्यानंतर मग १९०६ सालीं व्रत घेतलें. व्रत घेण्याच्या वेळेपर्यंत मीं पत्नीचा विचार घेतला नव्हता, तो व्रताचे वेळीं घेतला. तिच्याकडून मला यत्किंचितहि विरोध झाला नाहीं.

हें व्रत घेणें मला फार बिकट गेलें. माझी शक्ति अल्प होती. विकारांना दाबांत ठेवण्याचें कसें जुळेल? स्वपत्नीशीं विकारी संबंधाचा त्याग ही गोष्ट चमत्कारिकशी वाटत होती. तरी पण माझें कर्तव्य हेंच आहे, एवढें मला स्पष्ट दिसत होतें. माझी दानत शुद्ध होती. ईश्वर शक्ति देईल असें म्हणून मीं उडी ठोकली.

आज वीस वर्षांनंतर त्या व्रताचें स्मरण झालें म्हणजे मला सानंदाश्चर्य वाटतें. संयम पाळण्याची वृत्ति १९०१ पासूनच बळावत होती, व मी संयम पाळीतच होतों; पण जी स्वतंत्रता व जो आनंद मी आतां उपभोगूं लागलों तो १९०६ सालापूर्वी उपभोगिल्याचें मला स्मरत नाहीं. कारण त्या वेळीं मी वासनाबद्ध होतों; वाटेल तेव्हां तिच्या तावडींत सांपडत असें. आतां वासना माझ्यावर स्वार होण्यास असमर्थ झाली.

शिवाय आतां ब्रह्मचर्याचा महिमा अधिकाधिक समजूं लागला. व्रत मी फिनिक्समध्यें घेतलें. घायाळ लोकांना मदत करण्याच्या कामांतून मोकळा होतांच मी फिनिक्सला गेलों होतों. तेथून मला लगेच जोहानिसबर्गला जायचें होतें. मी तिकडे गेलों आणि एका महिन्याच्या आंतच सत्याग्रहाच्या लढ्याचा पाया घातला गेला. जसें काय हें ब्रह्मचर्यव्रत माझी त्याच्यासाठीं तयारी करायलाच आलें. सत्याग्रहाची कल्पना मीं योजून ठेवली नव्हती. उत्पत्ति अनायासानें—इच्छा नसतांना—झाली. पण मला दिसून आलें कीं, त्या पूर्वीचीं माझी सर्व कृत्यें—फिनिक्सला जाणें, जोहानिसबर्गचा मोठा घरखर्च आटोपता घेणें आणि अखेरीस ब्रह्मचर्यव्रत घेणें हीं जणुं काय त्याची पूर्वतयारीच होती.

ब्रह्मचर्याचें संपूर्ण पालन म्हणजे ब्रह्मदर्शन. हें ज्ञान मला ग्रंथांतून मिळालें नाहीं. हा अर्थ माझ्यापुढें क्रमाक्रमानें अनुभवसिद्ध होत गेला. त्यासंबंधींचीं शास्त्रवाक्यें मीं मागून वाचलीं. ब्रह्मचर्यामध्यें शरीररक्षण, बुद्धिरक्षण आणि आत्म्याचें रक्षण आहे, याचा मला व्रतस्वीकारानंतर दिवसेंदिवस अधिकाधिक प्रत्यय येऊं लागला. कारण कीं आतां ब्रह्मचर्याला घोर तपश्चर्या म्हणून राहूं देण्याऐवजीं त्याला रसमय बनवायचें होतें; त्याच्याच आधारावर चालायचें होतें. त्यामुळें त्यांतील मर्मांचा नित्य नवा साक्षात्कार होऊं लागला.

पण मी अशा तऱ्हेनें ब्रह्मचर्यांतून रस लुटीत होतों म्हणून त्याचा कठिणपणाहि माझ्या अनुभवाला येत नव्हता असें कोणी समजूं नये. आज छप्पन् वर्षें पुरीं झालीं आहेत तरीसुद्धां त्याच्या बिकटपणाचा अनुभव येतच आहे. तें असिधाराव्रत आहे हें मला अधिकाधिक समजून येत आहे. अखंड जागरूकतेची आवश्यकता दिसून येत आहे.

ब्रह्मचर्याचें पालन करावयाचें तर स्वादेन्द्रियावर ताबा मिळविलाच पाहिजे. स्वाद जिंकला तर ब्रह्मचर्य अतिशय सुलभ आहे, याचा मीं स्वतः अनुभव घेतला आहे. त्यामुळें यापुढील माझे आहाराचे प्रयोग केवळ अन्नाहाराच्या दृष्टीनें नव्हे, तर ब्रह्मचर्याच्या दृष्टीनें होऊं लागले. आहार थोडा, साधा मसाल्याशिवायचा आणि नैसर्गिक स्वरूपांतील खाल्ला पाहिजे, याचा मीं प्रयोग करून अनुभव घेतला. मीं स्वतःच्या सहा वर्षांच्या प्रयोगांनीं ठरविलें, कीं ब्रह्मचाऱ्याचा आहार वरपीक फळें हाच होय. मी सुक्या किंवा वरपीक फळांवर राहात होतों, त्या वेळीं जी निर्विकारता अनुभवीत असें ती आहारांत फेरफार केल्यानंतर अनुभवावयास मिळालेली नाहीं. फलाहाराच्या अवधींत ब्रह्मचर्य सहज होतें, दुग्धाहारामुळें तें कष्टसाध्य बनलें आहे. फलाहारावरून दुग्धाहारावर कां जावें लागलें याचा विचार योग्य स्थलीं होईल. येथें एवढें सांगितलें म्हणजे पुरें आहे, कीं ब्रह्मचाऱ्याला दुधाचा आहार विघ्नकर्ता आहे याबद्दल मला शंका वाटत नाहीं. यावरून कोणी असा अर्थ काढूं नये, कीं दरएक ब्रह्मचाऱ्यानें दुधाचा त्याग केलाच पाहिजे. आहाराचा ब्रह्मचर्यावर किती, कसा परिणाम होतो या बाबतींत पुष्कळ प्रयोगांची आवश्यकता आहे. दुधाइतकाच स्नायु पुष्ट करणारा आणि पचायला हलका असा फलाहार मला अद्याप आढळलेला नाहीं; किंवा कोणी वैद्य, हकीम किंवा डॉक्टर तशा तऱ्हेचीं फळें किंवा धान्यें मला दाखवून देऊं शकलेला नाहीं. त्यामुळें दूध ही विकार उत्पन्न करणारी वस्तु आहे, याची जाणीव असतांहि मी त्याचा त्याग करण्याची शिफारस सध्यां कोणालाहि करूं शकत नाहीं.

बाह्य उपचारामध्यें ज्याप्रमाणें अन्नाचे प्रकार व प्रमाण यांची मर्यादा संभाळणें आवश्यक आहे, त्याप्रमाणें उपासाचें समजावें. इंद्रियें इतकीं बलवान्

आहेत कीं, त्यांना चोहोंकडून, वरून आणि खालून, दाही दिशांनीं घेरून टाकावें तेव्हांच तीं ताब्यांत राहतात. अन्नाखेरीज तीं कामें करूं शकत नाहींत, हें प्रत्येकाला माहीतच आहे. त्यामुळें इंद्रियदमनाच्या हेतूनें स्वेच्छापूर्वक केलेल्या उपासांची इंद्रियदमनाला फार मदत मिळते, याबद्दल मला शंका वाटत नाहीं. कित्येक लोक उपोषण करतात, पण तें व्यर्थ जातें याचें कारण असें आहे, कीं उपासानेंच सर्व कांहीं होईल अशा समजुतीनें ते फक्त स्थूल उपवास करतात, व मनानें तऱ्हेतऱ्हेचीं पक्वानें चाखीत असतात; उपवास चालू असतांना उपवास आटोपल्यावर काय काय खावें त्याच्या विचारांचा स्वाद घेत असतात; आणि मग तक्रार करतात, कीं उपासानें स्वादेंद्रियाचें संयमन झालें नाहीं आणि जननें-द्रियाचेंहि झालें नाहीं! मनुष्याचें मनहि देहदमनाला दुजोरा देत असेल तेथेंच उपवासाचा उपयोग होणार. म्हणजे मनाला विषयोपभोगाबद्दल विरक्ति उत्पन्न झाली असली पाहिजे. विषयाचीं पाळेंमुळें मनांत पसरलेली असतात. उपवासादिक साधनांची मदत पुष्कळ होत असली तरी त्या मानानें कमीच असें म्हणण्यास रकत नाहीं, कीं उपास चालू असतांहि मनुष्य विषयासक्त राहू शकतो. पण उपवासाशिवाय विषयासक्तीचा पाळांमुळांमुद्धां नायनाट करणें शक्य नाहीं. म्हणून ब्रह्मचर्यपालनाचें उपास हें एक अनिवार्य अंग आहे.

पुष्कळांचा ब्रह्मचर्यपालनाचा प्रयत्न निष्फळ होतो. कारण कीं, खाणेंपिणें, दृष्टि इत्यादि बाबतींत ते अब्रह्मचाऱ्याप्रमाणेंच वागूं पाहतात, आणि तरीमुद्धां ब्रह्मचर्याचें पालन व्हावें अशी इच्छा धरतात. असला प्रयत्न म्हणजे ग्रीष्म ऋतू-मध्यें शीतकालाचा अनुभव मिळवूं पाहण्याप्रमाणें आहे. संयमी व स्वच्छंदी, भोगी व त्यागी यांच्या एकंदर राहाणीमध्यें भेद असलाच पाहिजे. साम्य असलें तरी तें फक्त वरवर दिसणारें, दोहोंतील फरक हा स्पष्टपणें दिसून आलाच पाहिजे. डोळ्यांचा उपयोग दोघेहि करणार; पण ब्रह्मचारी देवदर्शन करील, भोगी नाटक-तमाशांत दंग राहील. दोघेहि कानांचा उपयोग करणार; पण एक ईश्वरभजन ऐकेल, तर दुसऱ्याला शृंगारिक पदें गाण्यांत मौज वाटेल. दोघेहि जागरण करतील; पण एकजण जागेपणीं हृदयमंदिरामध्यें विराजमान असणाऱ्या रामाला आळवील, तर दुसऱ्याला नाच—तमाशाच्या दंगलींत झोंपेचा विसर पडेल. दोघेहि जेवतील; पण एकजण शरीररूपी तीर्थक्षेत्राच्या रक्षणापुरतें देहाला भाडें देईल, तर दुसरा जिभेचें कोड पुरविण्यासाठीं शरीरांत अनेक पदार्थ कोंबून त्याला घाणेरडें करून सोडील. अशा तऱ्हेनें दोघांच्याहि आचारविचारामध्यें हरएक बाबतींत फरक पडणार, व तो फरक दिवसेंदिवस वाढत जाणार, कमी होणार नाहीं.

ब्रह्मचर्य म्हणजे कायावाचामनेंकरून सर्व इंद्रियांचा संयम. या संयमासाठीं

वर दर्शविल्याप्रमाणें त्यागाची आवश्यकता आहे हें मला दिवसेंदिवस स्पष्ट दिसूं लागलें. आजहि दिसत आहे. त्यागाच्या क्षेत्राला सीमा नाहीं; जशी ब्रह्मचर्याच्या महिम्याला नाहीं. अशा तऱ्हेचें ब्रह्मचर्य अल्प प्रयत्नानें साध्य होण्यासारखें नाहीं. कोट्यवधि लोकांच्या बाबतींत हें फक्त दूरचा आदर्श म्हणूनच राहाणार. कारण कीं, प्रयत्नशील ब्रह्मचारी स्वतःतील न्यूनें नेहमीं डोळ्यांपुढें राखील. स्वतःमध्यें कानाकोपऱ्यांत राहिलेले विकार हुडकील आणि ते काढून टाकण्याचा सतत प्रयत्न करील. जोंपर्यंत विचारांवर एवढा ताबा आला नाहीं, कीं इच्छेशिवाय एकहि विचार येणार नाहीं, तोंपर्यंत ब्रह्मचर्य पूर्ण झालें नाहीं. प्रत्येक विचार हा विकारच आहे. त्याला ताब्यांत आणणें म्हणजे मनाला ताब्यांत आणणें. आणि मनाला वश करणें हें वायूला पकडण्यापेक्षांहि कठिण आहे. तरी पण जर आत्म्याला अस्तित्व असेल, तर ही गोष्टहि साध्य असलीच पाहिजे. आपल्याला अडचणी येतात एवढ्यावरून ती असाध्य आहे असें कोणीहि मानण्याचें कारण नाहीं. तो परम अर्थ आहे; आणि परम अर्थासाठीं परम प्रयत्नांची जरूर पडावी यांत आश्चर्य तें कोणतें ?

पण हिंदुस्थानांत आल्यानंतर मला कळून आलें, कीं अशा तऱ्हेचें ब्रह्मचर्य केवळ प्रयत्नसाध्य नाहीं. तोंपर्यंत मी धुंदींत होतों असें म्हणावयास हरकत नाहीं. फलाहारानें विकार समूळ नष्ट व्हावे अशी माझी समजूत होती, आणि मी अभिमानपूर्वक मानीत होतों, कीं आतां मला या बाबतींत कांहीं करायचें उरलेलें नाहीं.

पण या विचारासंबंधींचें प्रकरण यायला अवकाश आहे. तूर्त एवढें सांगून ठेवणें आवश्यक आहे कीं, जे कोणी ईश्वरसाक्षात्कारासाठीं मी वर दिलेल्या व्याख्येनुरूप ब्रह्मचर्यपालन करूं इच्छीत असतील, त्यांची जर स्वतःच्या प्रयत्नाबरोबरच ईश्वरावरहि श्रद्धा असेल, तर त्यांना निराश होण्याचें मुळींच कारण नाहीं.

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ *

म्हणून रामनाम व रामकृपा हेंच आत्मार्थी जीवाचें अखेरचें साधन आहे. या गोष्टींची प्रचीति मला हिंदुस्थानांतच आली.

---

* निराहारी माणसाच्या विषयाचा लोप होतो, पण वासनेचा लोप होत नाहीं. ईश्वरदर्शनानें वासनाहि खुंटते. गीता अ. २ श्लोक ५९

९

# सा धी रा हा णी

भोग भोगण्यास सुरुवात तर केली, पण तें फार दिवस टिकलें नाहीं. सामानसुमान थाटतांनाहि मला त्याच्याबद्दल मोह असा वाटलाच नव्हता. त्यामुळें घर थाटल्यानंतर लगेच मीं खर्च कमी करण्यास सुरुवात केली. धोब्याचा खर्चहि फाजील वाटला. आणि शिवाय धोबी कपडे वेळेवर आणून देत नसे, त्यामुळें दोन-तीन डझन शर्ट आणि तितक्याच कॉलरी एवढ्यानेंहि माझे कॉलरी रोज बदलायच्या; शर्ट रोज नाहीं तर एक दिवसाआड बदलायचे. याप्रमाणें दोहींकडून खर्च होई. हें मला अनावश्यक वाटलें. म्हणून धुण्याचें सामान आणून मांडलें. धुण्याच्या कलेचें पुस्तक वाचून धुवायला शिकलों; पत्नीलाहि शिकविलें. कामाचा बोजा कांहींसा वाढला, पण काम नवीन त्यामुळें मजा वाटे.

माझी स्वतः धुतलेली पहिली कॉलर विसरणें शक्य नाहीं. तिला खळ जास्त लागली आणि इस्त्री पुरेशी गरम नव्हती. त्यांतच आणखी कॉलरला आंच लागेल या भीतीनें इस्त्री बरोबर दाबली नाहीं; त्यामुळें कॉलर कडक तर बनली, पण तिच्यावरून खळ गळून पडत होती.

अशा थाटांत मी कोर्टांत गेलों, आणि बॅरिस्टरांच्या थट्टेचा विषय होऊन बसलों. पण माझ्यामध्यें अशा तऱ्हेची थट्टा सहन करण्याची शक्ति त्या वेळींहि भरपूर होती.

"कॉलर हातानें धुण्याचा हा पहिलाच प्रयोग आहे, त्यामुळें तिच्यावरून खळ गळून पडते आहे मला त्यापासून कांहींच अडचण पडणार नाहीं; आणि शिवाय तुम्हां सर्वांची इतकी करमणूक होत आहे हा वर फायदा." मीं खुलासा केला.

"पण धोबी तर मिळतनासे झाले नाहींत?" एका मित्रानें विचारलें.

"येथील धुलाईखर्च मला तरी असह्य वाटतो. कॉलरच्या किंमतीइतकीच धुलाई होते आणि एवढें करूनहि धोब्याच्या हातांत मुसक्या. त्यापेक्षां स्वतः धुणें मला बरें वाटतें."

या स्वावलंबनांतील मर्म मी मित्रांना दाखवून देऊं शकलों नाहीं.

मला सांगितलें पाहिजे कीं, शेवटीं मीं धोब्याच्या धंद्यामध्यें आपल्या कामापुरती कुशलता मिळविली. धोब्याच्या धुलाईपेक्षां घरची धुलाई यत्किंचितहि कमी दर्जाची नसे. कॉलरीचा कडकपणा आणि चकचकीतपणा धोब्यानें धुतलेल्या कॉलरीपेक्षां कमी नसे. गोखल्यांपाशीं कै० महादेव गोविंद रानड्यांचं प्रसादरूप

एक उपरणें होतें. हें उपरणें गोखले फार काळजीपूर्वक ठेवीत असत व विशेष प्रसंगींच वापरीत. जोहानिसबर्गमध्यें त्यांच्या सन्मानार्थ जी मेजवानी देण्यांत आली, त्या वेळच्या संमेलनाचा प्रसंग महत्त्वाचा होता. दक्षिण आफ्रिकेंतील त्यांचें त्या वेळचें भाषण सर्वांत मोठें होणार होतें. म्हणून त्या प्रसंगीं त्यांना तें उपरणें वापरायचें होतें. तें चोळवटलें होतें व त्याला इस्त्री करण्याची जरूरी होती. धोब्याला गांठून त्याच्याकडून लगेच इस्त्री करून घेणें अशक्य होतें. मला माझ्या कौशल्याचा उपयोग करूं देण्याची मीं मागणी केली.

" तुझ्या वकिलीवर मी विश्वास ठेवीन, पण या उपरण्यावर तुझी धोबी-कला चालवूं देणार नाहीं. उपरण्याला तूं डाग पाडलेस तर ? त्याची किंमत तुला माहीत आहे ? " असें म्हणून अति उत्साहपूर्वक प्रसादासंबंधीची हकीकत त्यांनीं मला सांगितली.

मीं डाग पडूं न देण्याची विनयपूर्वक जबाबदारी घेतली. मला इस्त्री करण्याची परवानगी मिळाली. माझ्या कुशलतेबद्दल मला प्रमाणपत्र मिळून चुकलें ! याउपर मला जगानें प्रमाणपत्र दिलें नाहीं म्हणून काय बिघडलें

धोब्याच्या गुलामगिरींतून सुटलों त्याप्रमाणेंच हजामाच्या गुलामगिरींतून सुटण्याचा प्रसंग आला. विलायतेला जाणारे सर्वच लोक स्वतःची दाढी करायला शिकतात, पण केंस कापायलासुद्धां कोणी शिकत असतीलशी माझी कल्पना नाहीं. प्रिटोरियामध्यें एकदां मी एका इंग्रज हजामाच्या दुकानीं गेलों. त्यानें माझी हजामत करण्याचें साफ नाकारलें; आणि नाकारतांना जो तिरस्कार व्यक्त केला, तो निराळाच. मला वाईट वाटलें. लगेच बाजारांत जाऊन केंस कापण्याचा संच विकत आणला, आणि आरशासमोर उभें राहून केंस कापले. केंस कसेबसे कापले तर गेले; पण मागचे कापतांना फार पंचाईत पडली; सरळ तर कापतां आलेच नाहीत. कोर्टांत हंशा पिकला.

" तुझ्या डोक्यावर उंदरांनीं प्रयोग केलेला दिसतो ! "

मी म्हटलें, " नाही. माझ्या काळ्या डोक्याला गोरा हजाम स्पर्श कसा करणार ? म्हणून वाईट-बरे पण स्वतः कापलेले केंस मला अधिक प्रिय वाटतात. "

या उत्तरानें मित्रांना आश्चर्य वाटलें नाहीं. खरें पाहतां त्या हजामाचा कांही दोष नव्हता. तो श्यामवर्ण लोकांचे केंस कापूं लागला, तर त्याचा धंदा बसणार. आम्ही तरी उच्चवर्णीय हिंदूंच्या हजामांकडून आमच्या अस्पृश्यांचे केंस कोठें कापूं देतों ? याचें प्रायश्चित्त मला दक्षिण आफ्रिकेंत एकदां नव्हे पण अनेक वेळां मिळालें आहे. आणि आमच्या स्वतःच्याच कर्माचें हें फळ आहे, अशी माझी समजूत असल्यामुळें मला या गोष्टीबद्दल कधीं राग आलेला नाहीं.

स्वावलंबन व साधेपणा याबद्दलच्या माझ्या आवडीला पुढें जें तीव्र स्वरूप प्राप्त झालें, त्याचें वर्णन पुढें योग्य स्थळीं येईल. त्या वस्तूचें मूळ पहिल्यापासूनच होतें. त्याला पालवी फुटण्यासाठीं फक्त सिंचनाची आवश्यकता होती. तें सिंचन अनायासानेंच प्राप्त झालें.

• • •

१०

# बोअर युद्ध

सन १८९७ ते ९९ पर्यंतचे इतर अनेक अनुभव सोडून देऊन आतां बोअर युद्धावर येतों. हें युद्ध जेव्हां झालें, तेव्हां माझी स्वतःची सहानुभूति बोअरांच्या बाजूला होती. पण असल्या गोष्टींत स्वतःच्या वैयक्तिक विचाराप्रमाणें काम करण्याचा अधिकार मला अजून आलेला नाहीं असें मी समजत होतों. या बाबतीतील विचारांच्या ओढाताणीचें सूक्ष्म निरीक्षण मीं 'दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाचा इतिहास' या पुस्तकांत केलें आहे, म्हणून तें येथें करीत नाहीं. * जिज्ञासू वाचकांनीं तो इतिहास वाचावा अशी माझी सूचना आहे. येथें एवढें सांगितलें म्हणजे पुरें कीं, ब्रिटिश राज्याबद्दलच्या माझ्या राजनिष्ठेनें मला बलात्कारानें या युद्धांत भाग घ्यायला लावलें. मला असें वाटलें, कीं जर मी ब्रिटिश प्रजाजन या नात्यानें हक्क मागत आहे, तर त्याच नात्यानें ब्रिटिश राज्याच्या रक्षणामध्यें भाग घेणें हेंहि माझें कर्तव्य आहे. हिंदुस्थानची संपूर्ण उन्नति ब्रिटिश साम्राज्यांत होणें शक्य आहे. अशी त्या वेळीं माझी समजूत होती.

म्हणून मिळतील तेवढे जोडीदार मिळवून आणि अनेक अडचणी सहन करून आम्हीं घायाळ सैनिकांची शुश्रूषा करणारी एक तुकडी उभी केली. अजूनपर्यंत इकडच्या इंग्रज लोकांमध्यें सामान्यतः अशीच समजूत होती, कीं हिंदी लोक धाडसाचीं कामें करणार नाहीत, किंवा स्वार्थापलीकडे त्यांना कांहीं सुचत नाहीं. त्यामुळें अनेक इंग्रज मित्रांनीं मला निराशाजनक उत्तरें दिलीं; फक्त डॉ. बूथनीं खूप उत्तेजन दिलें. त्यांनीं आम्हांला घायाळ सैनिकांची शुश्रूषा करण्याचें शिक्षण दिलें. आमच्या लायकीबद्दल डॉक्टरांचीं प्रमाणपत्रें मिळवून दिलीं. मि. लॉटन् व मरहूम मि. एस्कंब यांनीहि हें काम पसंत केलें. शेवटीं लढाईमध्यें आम्हांला काम करूं देण्याबद्दल आम्हीं सरकारकडे अर्ज केला. उत्तरीं सरकारनें

* शेवटा परिशिष्ट २ पाहा.

आभार मानले, पण या वेळीं तुमच्या मदतीची आवश्यकता नाहीं असें आम्हांला कळविण्यांत आलें.

पण मला एवढया नकारावर संतोष मानून गप्प बसावयाचें नव्हतें. डॉ. बूथची मदत घेऊन त्यांच्याबरोबर मी नाताळच्या बिशपना जाऊन भेटलों; आमच्या तुकडीमध्यें पुष्कळ ख्रिस्ती होते. बिशपना माझी मागणी फार आवडली त्यांनीं मदत करण्याचें कबूल केलें.

मध्यंतरीं विधिघटना आपलें काम करीतच होत्या. बोअर लोकांची तयारी, दृढता, शौर्य इत्यादि अपेक्षेपलीकडे तेजस्वीं ठरलीं. सरकारला पुष्कळ रंगरूटांची जरूर पडली आणि अखेरीला आमच्या मागणीचा स्वीकार झाला.

या तुकडीमध्यें सुमारें ११०० लोक होते. त्यांत सुमारें ४० नायक होते. आणखी सुमारें तीनशें स्वतंत्र हिंदी भरतीमध्यें दाखल होते. बाकीचे गिरमिट्ये होते. डॉ. बूथहि आमच्याबरोबर होते. तुकडीला गोळीच्या टप्प्याबाहेर काम करायचें होतें. आणि तिला रेडक्रॉसचें * रक्षणहि होतें; तरी पण तिनें उत्तम काम केलें. अडचणीच्या प्रसंगीं गोळीच्या हद्दींतहि काम करण्याची संधि आम्हांला मिळाली. सरकारनें स्वेच्छेनेंच अशा तऱ्हेच्या धोक्यांत न पडण्याचा करार आमच्याशीं केला होता, पण स्पीआंकोपच्या पराजयानतर स्थिति पालटली. यामुळें जनरल बुलरनीं निरोप धाडला, कीं जरी तुम्ही धोक्यांत पडायला बांधलेले नाहीं तरीहि जर तुम्ही तशा तऱ्हेचा धोका पत्करून घायाळ सैनिकांना व अंमलदारांना रणक्षेत्रांतून उचलून डोल्यांतून घेऊन जाण्यास तयार व्हाल, तर सरकार तुमचे उपकार मानील. आम्ही धोका सहन करण्यास तत्परच होतों. त्यामुळें स्पीआंकोपच्या युद्धानंतर आम्ही गोळीबाराच्या हद्दीमध्यें काम करूं लागलों.

या दिवसांमध्यें सर्वांना पुष्कळदां रोजीं वीसपंचवीस मैलांची मजल मारावी लागे; आणि एकदां तर घायाळ सैनिकांना डोल्यांतून उचलून तेवढे मैल चालावें लागलें. अशा तऱ्हेनें ज्या घायाळ योद्ध्यांना उचलून आम्हांला न्यावें लागलें, त्यांमध्यें जनरल वूडगेट वगैरेहि होते.

सहा आठवड्यांनीं आमच्या तुकडीला रजा देण्यांत आली. स्पीआंकोप व वालक्रान्झच्या पराजयानतर लेडी स्मिथ वगैरे स्थळें बोअर लोकांच्या वेढ्यांतून जलदी सोडवून घेण्याचा विचार ब्रिटिश सेनापतींनीं सोडून दिला, आणि इंग्लंड व हिंदुस्थान येथून यावयाच्या सैन्याची वाट पाहाण्याचा व आस्ते काम करण्याचा बेत केला.

---

* म्हणजे लाल स्वस्तिक. युद्धामध्यें या चिन्हाचे पट्टे शुश्रूषेचें काम करणाराच्या डाव्या हाताला बांधीत असतात. शत्रूनेहि त्यांना इजा करायची नाहीं असा नियम असतो. जास्त माहितीसाठीं दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रह खंड १ प्रकरण ८ पहा.

आमच्या अल्प कामगिरीची त्या वेळीं तरी फार वाहवा झाली. त्यामुळें हिंदी लोकांची प्रतिष्ठा वाढली. ' कांहीं झालें तरी हिंदी लोक साम्राज्याचे वारस तर खरेच.' अशा अर्थाचीं गीतें गायिलीं गेलीं. जनरल बुलरनीं आपल्या खलित्या-मध्यें आमच्या तुकडीच्या कार्याची तारीफ केली; नायकांना लढाईचे बिल्लेहि मिळाले.

हिंदी समाज अधिक संघटित झाला. मी गिरमिटया हिंदी लोकांच्या संबंधांत फारच अधिक येऊं शकलों. त्यांच्यामध्यें अधिक जागृति झाली; आणि हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, मद्रासी, गुजराथी हे सर्व आपण हिंदी आहों ही भावना अधिक दृढ झाली. सर्वांना वाटूं लागलें, कीं आतां हिंदी लोकांचीं दुःखें दूर झालींच पाहिजेत. गोऱ्या लोकांच्या वागणुकीमध्येंहि त्या वेळेपुरता स्पष्ट फरक दिसून आला.

लढाईमध्यें गोऱ्या लोकांशीं जे संबंध आले ते गोडीगुलाबीचे होते. हजारों ' टॉमी 'शीं आमचा सहवास घडला. ते आमच्याशीं प्रेमानें वागत व आम्ही त्यांच्या सेवेसाठीं असल्याचें समजतांच उपकार मानीत.

मनुष्यस्वभाव दुःखाच्या प्रसंगीं कसा नरम येतो याचें एक मधुर स्मरण येथें दिल्याशिवाय राहवत नाहीं. आम्हीं चीवली छावणीकडे जात होतों. लॉर्ड रॉबर्टचा मुलगा लेफ्टनंट रॉबर्टस् याला याच रणक्षेत्रावर प्राणांतिक जखम झाली होती. लेफ्टनंट रॉबर्टसचें शव घेऊन जाण्याचा मान आमच्या तुकडीलाच मिळाला होता. परत वळलों त्या दिवशीं ऊन कडक होतें. आम्हीं कूच चालविली होती. सर्वांना तहान लागली होती. रस्त्यामध्यें एक लहानसा झरा पाणी पिण्याजोगा होता. प्रथम पाणी कोणी प्यावें ? ' टॉमीं 'नें पिऊन झाल्यानंतर आपण प्यावें असा आम्हीं विचार केला होता. परंतु ' टॉमीं 'नीं आम्हांला पाहातांच आम्हांला अगोदर पाणी पिण्याबद्दल आग्रह सुरू केला, व अशा तऱ्हेनें बराच वेळपर्यंत आमच्यामध्यें " आधीं तुम्ही, मग आम्ही " अशा तऱ्हेची मधुर स्पर्धा चालली.

● ● ●

११

# नगर-सुधारणा—दुष्काळनिधि

समाजाच्या एकाहि अंगाची हयगय झाली तरी तें मला नेहमींच बोंचत राहातें. लोकांच्या दोषांवर झांकण घालून त्यांची तरफदारी करणें किंवा दोष दूर केल्याशिवायच हक्क मिळविणें हें मला नेहमींच नापसंत असतें. त्यामुळें दक्षिण आफ्रिकेंत राहणाऱ्या हिंदी लोकांवरील एका आरोपाचा, कीं ज्यामध्यें कांहींसा तथ्यांश होता, निवारण करण्याचें काम माझ्या तेथील वास्तव्याच्या सुरुवातीलाच मीं योजिलें होतें. हिंदी लोक स्वतःचीं घरेंदारें साफ ठेवीत नाहीत, आणि फार अस्वच्छ राहातात अशा तऱ्हेचा आरोप वेळोवेळी करण्यांत येई. या आरोपांचें निराकरण करण्यासाठीं सुरुवातीला समाजांतील मुख्य मुख्य समजल्या जाणाऱ्या गृहस्थांच्या घरांमध्यें सुधारणांची सुरुवात होऊन चुकलीच होती. परंतु डरबनमध्यें जेव्हां प्लेगच्या प्रादुर्भावाची भीति वाटूं लागली तेव्हां घरोघर फिरण्याला सुरुवात झाली. यामध्यें म्युनिसिपालिटीच्या अमलदारांचीहि सहकारिता व संमति होती. आमची मदत मिळाल्यामुळें त्यांचें काम सोपें झालें आणि हिंदी लोकांनाहि कमी त्रास सहन करावा लागला. कारण कीं, सामान्यपणें प्लेग वगैरेचा उपद्रव सुरू झाला म्हणजे अंमलदारांची धांदल उडते, ते प्रमाणाबाहेर तीव्र इलाज योजूं लागतात; आणि त्यांच्या दृष्टीनें जे अनिष्टसे दिसतात त्यांच्यावर त्यांची दडपशाही इतकी येऊन पडते कीं, ती असह्य होते. हिंदी समाजानें आपण होऊनच सक्त उपाय योजल्यामुळें तो असल्या जुलमापासून बचावला.

मला कांहीं कडवे अनुभवहि आले. मला दिसून आलें, कीं स्थानिक सरकारापाशीं हक्कांची मागणी करण्याच्या कामीं लोकांची मदत मिळविणें जितकें सोपें जात असें, तितकें लोकांपासून त्यांच्या स्वतःच्या कर्तव्याचें पालन करवून घेण्याच्या कामीं मदत मिळविणें सोपें नव्हतें. कित्येक ठिकाणीं अपमान होई तर कित्येक ठिकाणीं विनयपूर्वक पण बेपर्वाई दाखविण्यांत येई. घाण साफ करण्याची तसदी घेण्याचें लोकांना वैषम्य वाटे. पैसे खर्च करण्याचें तर नांवच काढायला नको. लोकांपासून कसलेंहि काम घ्यावयाचें असेल तर सोशिकपणा धारण केला पाहिजे. हें मी अधिक चांगल्या तऱ्हेनें शिकलों. सुधारणेची गरज असते सुधारकाला स्वतःला. ज्या लोकांपासून तो सुधारणेची अपेक्षा करतो त्यांच्याकडून त्यानें विरोधाची, तिरस्काराची किंबहुना जीवावरील संकटाचीहि अपेक्षा ठेवली पाहिजे. सुधारक जिला सुधारणा म्हणतो ती कुधारणाच आहे असें समाजानें कां मानूं नये? किंवा कदाचित् कुधारणा मानली नाहीं तरी त्या बाबतींत उदासीन तरी कां राहूं नये?

या चळवळीचा एवढा परिणाम झाला, कीं घरेंदारें स्वच्छ राखण्याची आवश्यकता हिंदी समाजाला कमीजास्त प्रमाणांत पटली. अंमलदारवर्गापाशीं माझी वग वाढली. तक्रारी करणें किंवा हक्कांची मागणी करणें एवढाच माझा धंदा नाहीं, तर तक्रारी किंवा हक्कांची मागणी करण्यांत मी जितकी तत्परता बाळगीत होतों तितकीच तत्परता व उत्साह आन्तरिक सुधारणेबद्दलहि मला वाटत होता, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली.

तरी अजून समाजाच्या वृत्तीचा दुसऱ्या एका दिशेनें विकास करण्याचें राहून जात होतें. या परदेशी राहणाऱ्या लोकांनीं प्रसंग पडल्यास भारतवर्षाबद्दलचें आपलें कर्तव्य मानणें व बजावणें जरूरीचें होतें. भारतवर्ष दरिद्री आहे. लोक द्रव्यार्जनासाठीं परदेश पत्करतात. त्यांच्या कमाईचा कांहीं अंश भारतवर्षाला अडचणीच्या प्रसंगीं मिळाला पाहिजे. सन १८९७ सालीं दुष्काळ पडला होता, आणि १८९९ सालीं पुनः तीव्र दुष्काळ पडला. या दोन्ही दुष्काळांच्या प्रसंगीं दक्षिण आफ्रिकेंतून चांगली मदत गेली. पहिल्या दुष्काळाच्या वेळीं जमूं शकली त्यापेक्षां दुसऱ्या दुष्काळाच्या वेळीं पुष्कळच जास्त रक्कम जमा झाली. या पट्टी-मध्यें इंग्रजांपासून आम्हीं हातभार मागितला, आणि त्यांच्याकडून प्रत्युत्तरहि चांगलें मिळालें. गिरमिट्या हिंदी लोकांनींहि आपल्यापरी हातभार लावला.

अशा तऱ्हेनें या दोन दुष्काळांच्या वेळी पडलेला रिवाज अजूनहि कायम आहे. आपण पाहतोंच, कीं भारतवर्षावर येणाऱ्या सार्वजनिक संकटाच्या प्रसंगीं दक्षिण आफ्रिकेहून तेथील हिंदी लोक मोठ्या रकमा पाठवीत असतात.

अशा तऱ्हेनें दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांची सेवा करीत असतांना मी स्वतः एकामागून एक बऱ्याच गोष्टी शिकून घेत होतों. सत्य हा एक विशाल वृक्ष आहे. त्याचा आश्रय करावा तसतशीं अनेक फळें त्याच्यापासून निघतांना दिसून येतात. त्यांना अंतच नसतो. सत्यामध्यें जसजसें खोलखोल उतरावें तसतशीं त्यांतून रत्नें हातीं येतात, सेवेचे प्रसंग चालून येतात.

❀ ❀ ●

# १२

# देशगमन

लढाईच्या कामांतून मोकळा झाल्यानंतर मला वाटूं लागलें, कीं यापुढें माझें काम दक्षिण आफ्रिकेंत नसून स्वदेशीं आहे. दक्षिण आफ्रिकेंत बसल्या बसल्या थोडीशी सेवा मी करूं शकेनच, पण तेथें माझा मुख्य धंदा पैसे कमावणें एवढाच होऊन राहील असें मला वाटलें.

स्वदेशाहून मित्रमंडळींचाहि स्वदेशीं येण्याबद्दल आग्रह चालू होता. मलाहि वाटत होतें, कीं स्वदेशीं गेल्यानें माझा उपयोग अधिक होऊ शकेल. नाताळमध्यें मि. खान आणि मनसुखलाल नाझर होतेच.

मी सहकारी मंडळींजवळ मला मोकळा करण्याबद्दल मागणी केली. मोठ्या मुष्किलीनें ती मागणी एका अटीवर मान्य झाली. अट अशी होती, कीं एका वर्षाच्या आंत जर हिंदी समाजाला माझी जरूर पडली, तर मी परत दक्षिण आफ्रिकेला यावें. मला ही अट कठिण वाटली, पण मी प्रेमपाशांनीं जखडलेला होतों.

काचे रे तातणे मने हरजीए बांधी *
जेम ताणे तेमे तेमनीरे
मने लागी कटारी प्रेमनी

ही मिराबाईची उपमा थोड्याबहुत अंशीं मला लागू पडत होती. पांचामुखीं परमेश्वर आहेच ना? मित्रांचें म्हणणें नाकारणें मला शक्य नव्हतें. मीं वचन दिलें व परवानगी मिळविली.

या वेळीं माझा निकट संबंध नाताळशींच होता असें म्हणतां येईल. नाताळांतील हिंदी लोकांनीं मला प्रेमामृतानें न्हाऊ घातलें. ठिकठिकाणीं मानपत्रें देण्यासाठीं सभा झाल्या आणि हरएक ठिकाणांहून मौल्यवान् भेटी आल्या.

१८९६ साली मी स्वदेशीं आलो, तेव्हांहि भेटी मिळाल्या होत्या; पण या वेळच्या भेटी आणि सभांमधील देखावोह मला असह्य झालीं. भेटींमध्यें सोन्याचांदीच्या वस्तू होत्याच, पण शिवाय हिरेमाणकांच्या वस्तूहि होत्या.

या सर्व वस्तूंचा स्वीकार करण्याचा मला काय अधिकार? त्यांचा स्वीकार केला तर मग समाजाची सेवा मी पैसे न घेतां करीत होतों अशी स्वतःच्या

---

* कच्च्या ततुन मला हरीनं बांधिलं।
ताणीत जशि त्याची इच्छा ग,
मला कट्यार प्रेमाची लागली.

मनाची समजूत कशी घालावी ? या भेटींपैकीं अशिलांकडून मिळालेल्या कांहीं भेटी वजा करतां बाकीच्या साऱ्या सार्वजनिक कामाबद्दलच मिळालेल्या होत्या. शिवाय माझ्या दृष्टीपुढें तर अशील व इतर सहकारी यांच्यामध्यें भेद नव्हता. सर्वच मुख्य मुख्य अशील सार्वजनिक कामींहि मदत करणारे होते.

शिवाय या नजराण्यांमध्यें कस्तूरबाईसाठीं पन्नास गिनींचा एक हारहि मिळाला होता. परंतु तिला मिळालेल्या वस्तूहि माझ्या सेवेबद्दलच होत्या. त्यामुळें त्या निराळ्या काढण्याचें कारण नाहीं.

यांपैकीं मुख्य नजराणे ज्या दिवशीं संध्याकाळीं मिळाले, त्या दिवसाची रात्र मीं बावरलेल्या स्थितींत जागून काढली. खोलींत येरझारा घालीत राहिलों. पण कोडें सुटेना. शेंकडों रुपयांचे नजराणे सोडून देणें कठिण वाटे, पण ते ठेवून घेणें त्याहून कठिण वाटत होतें.

मी एक असले नजराणे पचवूं शकेन; पण माझ्या मुलांचें काय ? पत्नीचें काय ? त्यांना मी सेवेचें शिक्षण देत असें; सेवेबद्दल मोबदला घेणें योग्य नाहीं असें सांगत असें. घरामध्यें मी मौल्यवान् दागिने वगैरे ठेवीत नसे. राहाणी अधिकाधिक साधी होत होती. अशा स्थितींत सोन्याचीं घड्याळें वापरणार कोण ? सोन्याचे शेडे आणि हिरेजडित आंगठ्या कोणीं वापराव्या ? त्या काळीं सुद्धां मी इतरांना दागिन्यांची हौस सोडून देण्यास सांगत असें. मग मला या दागिन्यांचा आणि जवाहिरांचा उपयोग काय ?

मीं या वस्तू ठेवून घेतां कामा नये, अशा निर्णयावर मी आलों. पारशी रुस्तुमजी इत्यादिकांना त्या दागिन्यांचे ट्रस्टी नेमून त्यांचे नांवें लिहून देण्याचा लेख लिहून काढला, आणि सकाळीं स्त्री-पुत्रादिकांचा विचार घेऊन स्वतःचा भार हलका करण्याचा निश्चय केला.

पत्नीची समजूत घालणें कठिण जाणार हें मी समजून होतों. मुलांची समजूत घालण्यांत बिलकुल अडचण येणार नाहीं याबद्दल मला खात्रीच होती. त्यांनाच माझे वकील करण्याचा बेत केला.

मुलांची लगेच समजूत पडली. " आम्हांला या दागिन्यांची जरूर नाहीं. आपण ते सर्व परत करावे. आणि त्यांतून आम्हांला असल्या वस्तु हव्या लागल्या तर आमचे आम्हींच नाहीं का घेऊं शकत ? " असें ते म्हणाले.

मला आनंद वाटला. " तर मग आईची तुम्ही समजूत घालाल ना ! " मीं विचारलें.

" जरूर जरूर. तें आमचें काम. तिला तरी हे दागिने थोडेच अंगावर घालायचे आहेत ! ती ठेवणार आमच्यासाठीं म्हणूनच. आम्हांला तर त्यांची जरूर नाहीं, मग ती कशाला हट्ट करते ? "

पण वाटलें होतें त्याहून तें काम कठिण ठरलें.

" तुम्हांला एक नसेल जरूर, तुमच्या मुलांनाहि नसेल. मुलांचें काय ? जशीं चढवावीं तशीं चढतात. मला नाहीं घालूं दिलेत तरी हरकत नाहीं; पण माझ्या सुनांचें काय ? त्यांच्या तर उपयोगी पडतील ? आणि उद्यांचा दिवस कसा येईल हें तरी कोणीं पाहिलें आहे ? इतक्या प्रेमानें दिलेल्या वस्तू परत करणें बरें नाहीं—" अशा तऱ्हेनें वाग्धारा सुरू झाली आणि त्यांतच अश्रुधारा येऊन मिसळली. मुलें भक्कम राहिलीं; मला डगमगण्याचें कारणच नव्हतें.

मीं हळूच म्हटलें, " मुलगे लग्न करतील तेव्हांची गोष्ट. आपल्याला कुठें बालवयांत लग्नें करून द्यायचीं आहेत ? मोटे झाल्यावर स्वतःला वाटेल त्याप्रमाणें करीत ना ? आणि आपल्याला तरी दागिन्यांची हौस वाटणाऱ्या सुना थोड्याच शोधायच्या आहेत ? इतक्याउपर कांहीं दागिने हवेच लागले तर मी कुठें गेलों नाहीं ना ? "

" तुमचे पराक्रम कळले ! माझे दागिनेहि काढून घेतले तेच तुम्ही कीं नाहीं ? मला घड घालूं दिलेत नाहीत ते तुम्ही सुनांसाठी काय घेणार ? मुलांना तर आजपासून बैरागी बनवतां आहां ! मला हें तें माहीत नाहीं, हे दागिने परत नाही करायचे. त्यांतून माझ्या हारावर तुमचा काय हक्क ? "

" पण तो हार तरी तुझ्या कामगिरीबद्दल मिळाला आहे, कीं माझ्या कामगिरीबद्दल ? " मी विचारलें.

" त्याचें काय मोठें ? तुमची कामगिरी ती माझी पण खरीच; मला रात्रंदिवस राबविलीत ही काय कामगिरी नव्हे ? मला रडवूनहि वाटेल त्याला घरांत ठेवलांत, आणि माझ्याकडून त्यांची चाकरी करविलीत तें कुठें गेलें ? "

हे सर्व बाण तीक्ष्ण होते. त्यांतील कित्येक मला भेदूनहि जात होते. पण दागिने तर मला परत करावयाचेच होते. पुष्कळशा गोष्टींबद्दल मीं जेमतेम कबुली मिळविली. १८९६ सालीं मिळालेल्या आणि १९०१ सालीं मिळालेल्या भेटी परत दिल्या. त्यांचा ट्रस्ट केला आणि त्यांचा सार्वजनिक कार्यासाठीं माझ्या किंवा ट्रस्टींच्या इच्छेनुरूप उपयोग व्हावा अशी अट ठरवून त्या बँकेंत ठेविल्या. हे दागिने विकून टाकण्याच्या निमित्तानें मी पुष्कळदां पैसे जमवूं शकलों आहे. आजमितीलाहि तो आपत्तिनिधि म्हणून शिल्लक आहे, व त्यांत भरहि पडत गेली आहे.

या कृत्यांबद्दल मला कधींहि पश्चात्ताप वाटलेला नाहीं. कालांतरानें कस्तूरबाईलाहि त्यांतील रास्तपणा समजून आला. आम्ही पुष्कळ मोहांपासून बचावून निघालों.

समाजसेवकाला खाजगी नजराणे घेतांच येत नाहींत, असा माझा अभिप्राय बनला आहे.

● ● ●

# १३
# स्व दे शीं

अशा तऱ्हेनें स्वदेशीं हिंदुस्थानांत जाण्यास निघालों. रस्त्यांत मॉरिशस बेट लागलें. तेथें आगबोट फार वेळ थांबली होती. म्हणून मॉरिशसमध्यें उतरलों आणि तेथील स्थितीचा भरपूर अनुभव घेतला. एक रात्र तेथील गव्हर्नर सर चार्लस ब्रूस यांजकडेहि मुक्कामाला होतो.

हिंदुस्थानला पोंचल्यानंतर थोडा काल फिरण्यांत दवडला. हें साल १९०१ होय. या वर्षीची महासभा ( काँग्रेस ) कलकत्त्याला होती. दिनशा एदलजी वाच्छा अध्यक्ष होते. मला महासभेला जायचेंच होतें. महासभेचा हा माझा पहिलाच अनुभव होता.

मुंबईहून ज्या गाडीनें सर फिरोजशहा निघाले त्याच गाडीनें मीहि गेलों. त्यांच्याशीं मला दक्षिण आफ्रिकेसंबंधीं बोलायचें होतें. मला त्यांच्या डब्यांतून एक स्टेशनपर्यंत जाण्याची आज्ञा झाली. त्यांनीं तर स्पेशल सलून केलें होतें. त्यांच्या बादशाही खर्चाची आणि दिमाखाची मला माहिती होती. ज्या स्टेशनवर त्यांच्या डब्यांत जाण्याबद्दल मला आज्ञा झाली होती, त्या स्टेशनवर मी त्यांच्याकडे गेलों. त्यांच्या डब्यांत त्या वेळीं त्या वेळचे दिनशा वाच्छा आणि त्या वेळचे चिमणलाल सेटलवाड बसले होते. त्यांच्याशीं राजकीय विषयांवर चर्चा चालली होती. मला पाहून सर फिरोजशहा म्हणाले, " गांधी, तुमचें काम होण्यासारखें नाहीं. तुम्हीं सांगाल तो ठराव आम्ही पास करूं, पण स्वतःच्या देशांतच आम्हांला कितीसे हक्क आहेत? मला तर वाटतें, कीं जोंपर्यंत आपल्या देशांतच आपल्याला सत्ता नाहीं तोंपर्यंत वसाहतींतील तुमची स्थिति सुधारणें शक्य नाहीं. "

मीं दिङ्मूढच होऊन गेलों. सर चिमणलालनीं वरील म्हणण्याला दुजोरा दिला. सर दिनशांनीं माझ्याकडे दयार्द्र दृष्टीनें पाहिलें.

मीं माझें म्हणणें समजून सांगण्याचा कांहींसा प्रयत्न केला. पण मुंबईच्या अनभिषिक्त बादशहाची माझ्यासारखा मनुष्य काय समजूत घालणार? मला महासभेंत ठराव मांडू देतील एवढ्यावरच मी संतोष मानून राहिलों.

" ठराव तयार करून मला दाखवा हो, गांधी ! " सर दिनशा मला उत्तेजन देण्याचे उद्देशानें म्हणाले.

मी आभार मानले. पुढच्या स्टेशनवर गाडी उभी राहातांच मीं पळ काढला आणि आपल्या डब्यांत जाऊन बसलों.

कलकत्त्याला पोंचलों. नागरिक लोक अध्यक्ष व इतर पुढारी यांना मोठ्या थाटानिशीं घेऊन गेले. मीं स्वयंसेवकाला विचारलें, " मीं कोठें जावें ? "

तो मला रिपन कॉलेजांत घेऊन गेला. तेथें पुष्कळ प्रतिनिधींची सोय केलेली होती. माझ्या सुदैवानें ज्या विभागामध्यें मी होतों त्याच विभागामध्यें लोकमान्यांचा तळ होता. ते एक दिवस मागून आले असें स्मरतें. लोकमान्य असतील तेथें एक लहानसा दरबार जमायचाच. मीं चित्रकार असतों, तर ते एका खाटेवर बसत त्याचें चित्र काढूं शकलों असतों, इतकें स्पष्ट स्मरण मला त्या जागेचें आणि त्यांच्या बैठकीचें अजूनहि आहे. त्यांना भेटायला येणाऱ्या असंख्य माणसांपैकीं एकाचेंच नांव मला आठवत आहे-' अमृतबझार पत्रिके ' चे मोतीबाबू त्या दोघांचें खदखदां हंसणें आणि राज्यकर्त्यांच्या अन्यायासंबंधींच्या त्यांच्या गोष्टी विसरणें शक्य नाहीं.

पण आपण अंमळ तेथील व्यवस्थेकडे वळूं या.

स्वयंसेवक एकमेकांच्या आड येत. जे काम ज्याच्यावर सोंपवावें त्याचें तें काम नव्हे; तो लगेच दुसऱ्याला बोलावी; दुसरा तिसऱ्याला. प्रतिनिधि बिचारा नाहीं धड इकडे, नाहीं तिकडे.

मीं कित्येक स्वयंसेवकांशीं गट्टी केली. त्यांना दक्षिण आफ्रिकेसंबंधीं कांहीं गोष्टी सांगितल्या. त्यामुळें ते कांहीसे ओशाळले. मी त्यांना सेवेचें मर्म समजावून देण्याचा प्रयत्न केला. त्यांची थोडीशी समजूत पटली, पण सेवेची हातोटी कांहीं कुत्र्याच्या मुताप्रमाणें एका घटकेत रुजून घेतां येत नाहीं. त्यासाठीं इच्छा पाहिजे आणि त्यानंतर संवय पाहिजे. या भल्याभोळ्या स्वयसेवकांना इच्छा तर खूप होती; पण शिक्षण आणि संवय कोठून मिळणार ? महासभा वर्षांतून तीन दिवस चालून झोंपी जात असे. प्रतिवर्षी तीन दिवस शिक्षण घेऊन कितीशी तयारी होणार ?

जसे स्वयंसेवक तसे प्रतिनिधि. त्यांनाहि तितक्याच दिवसांचें शिक्षण. स्वतः जातीनें कांहींच करायचें नाहीं. ज्या त्या बाबतींत हुकूम सुटायचे. ' स्वयंसेवक, हें घेऊन या ' आणि ' ते घेऊन या ' एकसारखें चालायचें.

अखा भगताच्या ' छुल्या अवयवा ' चाहि भरपूर अनुभव आला. पुष्कळशा लोकांना स्पर्शास्पर्शाची अडचण येत असे. द्राविडी पाकशाळा अगदींच स्वतंत्र. त्या प्रतिनिधींना ' दृष्टिदोषहि ' बाधत असे ! त्यांच्यासाठीं कॉलेजच्या कंपौंडांत

हातऱ्यांचें स्वयंपाकघर बांधलेलें होतें. माणूस घुसमटून जाईल एवढा त्यांत धूर. जेवणखाण सगळें त्यांतच. भोजनगृह म्हणजे तिजोरी; कुठच्याहि बाजूनें उघडें असून चालायचें नाहीं !

मला हा वर्णधर्म चमत्कारिक वाटला. महासभेमध्यें येणाऱ्या प्रतिनिधींना जर इतकी शिवाशिव होते, तर त्यांना पाठविणाऱ्यांना किती होत असेल, या त्रैराशिकाचें उत्तर काढूं लागलों तेव्हां मला दीर्घ निःश्वास सोडावा लागला.

घाण तर अमर्याद. जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन गेलें होतें. पायखाने थोडेच होते. त्यांच्या दुर्गंधीची आठवण झाली म्हणजे अजून अंगावर शहारे उभे राहातात. मीं ती घाण स्वयंसेवकाला दाखविली. त्यानें साफ सांगितलें कीं, "हें तर भंग्याचें काम." मीं केरसुणी मागितली. स्वयंसेवक माझ्याकडे डोळे वटारून पाहातच राहिला. मीं केरसुणी पैदा केली. पायखाना साफ केला. पण हें झालें तरी माझ्या स्वतःच्या सोयीपुरतें. गर्दी इतकी होती आणि शौचकूप इतके थोडे होते, कीं प्रत्येक वेळीं उपयोग केल्यानंतर ते लगेच साफ करणें जरूर होतें. तसें करणें माझ्या शक्तीबाहेरचें होतें. त्यामुळें मी स्वतःपुरती सोय करून घेऊन स्वस्थ बसलों. मला असें दिसलें कीं, इतरांना ती घाण जाचत नव्हती.

पण एवढयानें भागण्यासारखें नव्हतें. रात्रीच्या वेळीं कोणी कोणी खोलीलगतच्या पडवीचाच उपयोग करीत असत. सकाळीं मीं स्वयंसेवकाला दाखविलें. घाण काढून टाकायला कोणीच तयार होईना. ती साफ करण्याचा मानहि मलाच मिळाला.

आजला या बाबतींत पुष्कळ सुधारणा झाली आहे. तरी अविचारी प्रतिनिधि अजूनहि वाटेल तेथें मलविसर्जन करून महासभेची छावणी खराब करून टाकतात; आणि ती घाण काढून टाकण्याची सर्व स्वयंसेवकांची तयारी असते असें नाहीं.

मला असें दिसून आलें, कीं असल्या घाणीमध्यें महासभेची बैठक जर जास्त वेळपर्यंत चालूं राहिली, तर रोगराई खात्रीनें व्हायची.

● ● ●

# १४

# कारकून व ‘ बॅरा ’

महासभा भरण्याला एकदोन दिवसांचा अवधि होता. मीं ठरविलें होतें, कीं महासभेच्या कचेरींत जर मला काम करायला मिळालें, तर करायचें आणि अनुभव मिळवायचा.

ज्या दिवशीं आम्ही येऊन पोंचलों, त्याच दिवशीं स्नान वगैरे उरकून महासभेच्या कचेरीमध्यें गेलों. श्री. भूपेंद्रनाथ बसू व श्री. घोषळ हे चिटणीस होते. भूपेंद्रबाबूंपाशीं गेलों आणि कामाची मागणी केली. त्यांनीं माझ्याकडे पाहून म्हटलें,

“ माझ्यापाशीं कांहीं काम नाहीं. परंतु मि. घोषळ कदाचित् तुम्हांला काम देतील. त्यांच्याकडे चला. ”

मी घोषळबाबूंपाशीं गेलों; त्यांनीं मला न्याहाळून पाहिलें, किंचित् हंसले आणि विचारलें,

“ माझ्यापाशीं कारकुनाचें काम आहे; तें कराल ? ”

मीं उत्तर दिलें, “ अवश्य करीन. माझ्या अवसानाबाहेर नसेल असें कोणतेंहि काम करण्यासाठींच मी आपल्याकडे आलों आहें. ”

“ हे तरुणा, हीच योग्य भावना आहे. ”

शेजारीं स्वयंसेवक उभे होते, त्यांच्याकडे पाहून म्हणतात,

“ ह्या तरुणानें काय सांगितलें तें ऐकलें का ? ”

मग माझ्याकडे वळून म्हणाले,

“ तर मग हा पहा पत्रांचा ढीग, आणि ही माझ्यासमोरची खुर्ची. तिच्यावर बसा. माझ्यापाशीं शेंकडों लोक येत जात असतात हें तुम्ही पाहातांच. त्यांच्याशीं बोलूं, कीं हे रिकामके लोक पत्रें खरडीत बसतात त्यांना जबाब लिहीत बसूं? माझ्याशीं अशा तऱ्हेचे कारकून नाहींत कीं, ज्यांच्यापासून असलें काम घेतां येईल. या सर्व पत्रांपैकी पुष्कळशा पत्रांमध्यें कांहींच तथ्य नसणार. पण तुम्ही सर्व वाचून काढा. ज्यांना फक्त पत्रें पोहोंचल्याबद्दलच लिहायचें असेल, त्यांना तसें लिहीत चला; आणि ज्यांच्या जबाबाविषयीं मला विचारावें लागेल त्यांच्याबद्दल मला विचारा. ” माझ्यावर एवढा विश्वास टाकल्याबद्दल मला आनंदाच्या गुदगुल्या होऊं लागल्या.

* इंग्रजी बेअरर शब्दाचा अपभ्रंश. सेवाचाकरी करणारा, खिजमतगार. कलकत्त्यामध्यें घरांतील कसल्याहि नोकराला ‘ बॅरा ’ शब्दानें संबोधतात.

श्री. घोषळ मला ओळखीत नव्हते. नांव गांव समजून घेण्याचें काम त्यांनीं मागाहून केलें. पत्रांचा ढीग खलास करण्याचें काम मला सोपें वाटलें. पडलेला ढीग मीं त्वरित खलास केला. घोषळबाबू खूष झाले. त्यांचा स्वभाव गप्पाळू होता. गप्पांमध्यें पुष्कळसा वेळ घालवीत असें मला आढळून आलें. माझा पूर्वइतिहास समजल्यानंतर मला कारकुनाचें काम दिल्याबद्दल त्यांना किंचित् शरम वाटली. मीं त्यांना निश्चिन्त केलें.

" माझी गोष्ट कुठें आणि तुमची कुठें ? तुम्ही महासभेचे जुने सेवक. मला तुम्ही वडिलांसमान आहां. मी पडलों बिनअनुभवी तरुण. हें काम देण्यामध्यें तुम्ही माझ्यावर उपकारच केले आहेत. कारण कीं मला महासभेमध्यें काम करायचें आहे. तिचा कारभार जाणून घेण्याची अलभ्य संधि तुम्हीं मला दिली."

" खरें विचाराल तर हीच खरी वृत्ति आहे. पण आजकालचे तरुण असें समजत नाहीत. बाकी मला महासभेची सुरुवातीपासून माहिती आहे. तिला जन्म देण्यामध्यें मि. ह्यूमबरोबर माझाहि हिस्सा होता. " घोषळबाबू म्हणाले.

आमचा चांगला स्नेहसंबंध जुळला. दुपारच्या जेवणाला मला आपल्याबरोबरच ठेवून घेत. घोषळबाबूंचीं बटणेंहि ' बॅरा 'च लावीत असे, तें पाहून ' बॅरा 'चें काम मींच उचललें. मला तें आवडें. वडील मंडळीबद्दल मला फार आदर वाटे. माझी ही वृत्ति जेव्हां त्यांच्या लक्षांत आली तेव्हां मग मला ते स्वतःची सर्व प्रकारची सेवाचाकरी करूं देऊं लागले. बटणें लावूं देतांना हंसून म्हणत, " पहा ना, महासभेच्या कार्यकर्त्यांना बटणें लावायलाहि फुरसद मिळत नाहीं. कारण कीं, त्या वेळांतहि कामें करायचीं पडलेलीं असतात ! " मला या भोळेपणाबद्दल हंसूं येई. परंतु अशा तऱ्हेच्या सेवेबद्दल मनांत यत्किंचित्‌हि कंटाळा वाटला नाहीं. मला जो लाभ झाला त्याची तर किंमतच करतां यायची नाहीं.

थोडक्याच दिवसांत महासभेच्या कार्यपद्धतीची मला माहिती झाली. अनेक पुढाऱ्यांची भेट झाली. गोखले, सुरेंद्रनाथ वगैरे योद्धे येत जात. त्यांचे रीतरिवाज मी पाहूं शकलों. कालाचा जो अपव्यय चालला होता, त्याचेंहि मला पूर्ण ज्ञान झालें. इंग्रजी भाषेचें प्राबल्यहि लक्षांत आलें. त्याबद्दल मला त्या वेळींहि खेद वाटला. एकाकडून होण्याजोग्या कामावर अनेकजण ठेवले जात, तें माझ्या लक्षांत आलें; आणि कित्येक आवश्यक कामें करायला कोणीच मिळेना हेंहि दिसून आलें.

माझें मन या सर्व गोष्टींची टीका करीत होतें; पण चित्त उदार असल्यामुळें चाललें आहे त्यांत सुधारणा करणें अशक्य असावें अशी समजूत करून घेत होतें. त्यामुळें कोणाविषयींहि अनादर वाटत नसे.

●●●

१९

# महासभेमध्यें

महासभा सुरू झाली. मंडपाचा भव्य देखावा, स्वयंसेवकांची रांग, व्यास-पीठावर बसलेली वडील मंडळी वगैरे पाहून मी घाबरलों. असल्या सभेंत माझी काय दाद लागणार या विचारानें मी गोंधळून गेलों.

अध्यक्षांचें भाषण म्हणजे एक पुस्तकच होतें. तें सगळें वाचतां येईल अशी स्थिति नव्हती. त्यापैकीं कांहीं कांहीं भागच वाचण्यांत आले.

नंतर विषयनियामक मंडळाचे सभासदांची निवडणूक झाली. गोखले मला त्या मंडळाच्या बैठकीला घेऊन गेले.

सर फिरोजशहांनीं माझा ठराव घेण्याचें तर कबूल केलेंच होतें; पण तो ठराव विषयनियामक मंडळापुढे कोण मांडील, केव्हां मांडील असा विचार करीत मी बैठकीमध्यें बसलों होतों. एकेका ठरावावर लांबलचक भाषणें; सगळीं इंग्रजींत. प्रत्येक ठरावाचे पुरस्कर्ते थोर थोर लोक. या नगाऱ्यापुढें माझ्या टिमकीचा आवाज कोण ऐकणार? रात्र अधिक होत चालली, तसतसें माझें काळीज धड-धडूं लागलें. अखेर अखेरचे ठराव अलीकडच्या विमानांच्या गतीनें चालले होते असें मला आठवतें. सर्वजण निघून जाण्याच्या तयारींत आहेत. रात्रीचे अकरा वाजले आहेत. माझी बोलण्याची हिंमत चालत नाहीं. मीं गोखल्यांना भेटून घेतलें होतें. त्यांनीं माझा ठराव पाहिलेला होता.

त्यांच्या खुर्चीपाशीं जाऊन मी हळूच म्हटलें:—

"माझें कांहीं तरी करा."

ते म्हणाले, "तुमचा ठराव स्मरणांतून गेलेला नाहीं. येथील घाई तुम्हांला दिसतेच आहे. तरी पण या ठरावाचें मी विस्मरण होऊं देणार नाहीं."

"कसें काय आतां आटपलें ना?" सर फिरोजशहा म्हणाले.

"दक्षिण आफ्रिकेचा ठराव राहिला आहे ना? मि. गांधी केव्हांचे वाट पाहात राहिले आहेत." गोखले चटकन म्हणाले.

"तुम्ही तो ठराव पाहिला आहे का?" सर फिरोजशहांनीं विचारलें.

"अल्बत."

"तुम्हांला तो बरा वाटला?"

"योग्य आहे!"

"तर मग गांधी, वाचा!"

मीं कांपत कांपत वाचून दाखविला.

गोखल्यांनीं अनुमोदन दिलें.

" एकमतानें पास. " सर्वजण एकदम बोलले.

" गांधी, तुम्ही पांच मिनिटें घ्यावीं. " वाच्छा म्हणाले.

हें दृश्य पाहून मला बरें वाटलें नाहीं. एकानेंहि ठराव समजून घेण्याची तसदी घेतली नाहीं. सर्वांना घाई झालेली होती. गोखल्यांनीं पाहिला होता तेवढ्यावरून इतरांना पाहाण्याची किंवा ऐकून घेण्याची जरूर राहिली नाहीं.

सकाळ उजाडली.

मला माझ्या भाषणाचा घोर लागून राहिला होता. पांच मिनिटांत काय बोलायचें ? मीं तयारी तर भरपूर केली, पण पाहिजे ते शब्द सुचत ना. भाषण वाचायचें नाहीं असा निश्चय केला होता. पण दक्षिण आफ्रिकेंत भाषण करण्याची झालेली संवय या ठिकाणीं बुजून गेल्यासारखी दिसली.

माझ्या ठरावाची पाळी आली, तेव्हां वाच्छांनीं माझें नांव पुकारलें. मी उठलों. डोकें गरगरूं लागलें. कसाबसा ठराव वाचला. कोणा एका कवीनें आपलें काव्य छापून काढून प्रतिनिधींना वाटलें होतें. त्यामध्यें परदेशगमनाची आणि समुद्रपर्यटनाची स्तुति केली होती. मीं तें वाचून दाखविलें; आणि दक्षिण आफ्रिकेंतील दुःखांसंबंधीं थोडासा उल्लेख केला. इतक्यांत सर दिनशांची घंटा वाजली. मला खात्री होती, कीं मीं अद्याप पांच मिनिटें घेतलेलीं नाहींत. मला सूचना देण्यासाठीं ती घंटा दोन मिनिटें बाकी असतांनाच वाजविलेली होती, हें मला माहीत नव्हतें. मीं पुष्कळ जणांना अर्धा अर्धा पाऊण पाऊण तास भाषण करतांना ऐकलें होतें; तरी पण घंटा वाजली नव्हती. मला वाईट तर वाटलेंच. घंटा वाजतांच खालीं बसलों; पण तेवढ्या काव्यामध्येंच सर फिरोजशहांना जबाब मिळून चुकला, असें माझ्या लहानग्या बुद्धीला त्या वेळीं वाटलें.

ठराव पास होण्याबद्दल विचारायलाच नको. त्या वेळीं प्रेक्षक व प्रतिनिधी असा भेद विशेषसा नव्हताच. ठरावांना विरोध वगैरे करण्याचा प्रश्नच नव्हता. सर्वजण हात वर करायचेच. येथून तेथून सर्व ठराव एकमतानें पास होत. माझ्या ठरावाचेंहि तसेंच झालें. त्यामुळें मला ठरावाचें मोठेंसें कांहीं वाटलें नाहीं. तरी पण महासभेंत ठराव पास झाला एवढीच गोष्ट मला आनंद वाटण्यास पुरेशी होती. महासभेचा शिक्का ज्यावर पडला, त्यावर सर्व भारतवर्षाचा शिक्का पडला ह्या विचारानें कोणाचें समाधान होणार नाहीं ?

• • •

# १९
# लॉर्ड कर्झनचा दरबार

महासभा आटोपली; पण मला दक्षिण आफ्रिकेच्या कामानिमित्तानें कलकत्त्यामध्येंच राहून चेंबर ऑफ कामर्स इत्यादि मंडळींना भेटायचें होतें. त्यासाठीं मीं कलकत्त्यांत महिनाभर राहिलों. या वेळीं मीं हॉटेलांत उतरण्याऐवजीं ओळख मिळवून 'इंडिया क्लब' मध्यें उतरण्याची व्यवस्था केली. या क्लबमध्यें हिंदी पुढाऱ्यांचा मुक्काम असे; त्यामुळें त्यांच्याशीं परिचय करून घेऊन ते आफ्रिकेच्या बाबतींत लक्ष घालतीलसें करण्याची आशा वाटत होती. या क्लबमध्यें गोखले नेहमीं नाहीं तरी पुष्कळदां बिलियर्ड खेळायला येत असत. मी कलकत्त्यांत राहायचा आहे हें त्यांना समजतांच त्यांनीं मला आपल्याबरोबर राहाण्याचें निमंत्रण दिलें. मीं त्याचा आभारपूर्वक स्वीकार केला. पण मीं आपण होऊन तिकडे जावें हें मला बरें वाटेना. एकदोन दिवस वाट पाहिली, तेवढ्यांत गोखले स्वतःबरोबरच मला तिकडे घेऊन गेले. माझा भिडस्तपणा पाहून ते म्हणाले, "गांधी, तुम्हांला स्वदेशीं राहायचें आहे, तर मग असला भिडस्तपणा कामाचा नाहीं. जेवढ्या लोकांच्या संबंधांत तुम्हांला येतां येईल तेवढ्यांच्या संबंधांत आलें पाहिजे. मला तुमच्यापासून महासभेचें काम घ्यायचें आहे."

गोखल्यांच्या बिऱ्हाडीं जाण्यापूर्वीं 'इंडिया क्लब' मध्यें मिळालेल्या एका अनुभवाचा उल्लेख करतों.

याच सुमाराला लॉर्ड कर्झनचा दरबार होता. त्या दरबारला जाणारे कोणी एक राजे-महाराजे या क्लबमध्यें होते. क्लबमध्यें तर त्यांना मी नेहमीं छानदार बंगाली धोतर, सद्रा व उपरणें या पोषाखांत पाहात असें. आज पहातों तों त्यांनीं पाटलोण, पायघोळ अंगरखा, चोपदाराच्या धर्तीची पगडी आणि चकचकीत बूट घातले होते. मला वाईट वाटलें, आणि या फेरफाराचें मीं त्यांना कारण विचारलें.

"आमची दशा आम्हांला माहीत. स्वतःचें धन आणि स्वतःचे किताब संभाळण्यासाठीं आम्हांला जे अपमान सहन करावे लागतात, ते तुम्हांला काय कळणार?" जबाब मिळाला.

"तरी पण चोपदाराच्या धर्तीची ही पगडी आणि बूट यांचा अर्थ काय?"

"आमच्यांत आणि चोपदारांत तुम्हांला फरक तो काय दिसला? ते आमचे तर, आम्ही लॉर्ड कर्झनचे चोपदार. मी लेव्हीला गैरहजर राहिलों, तरीसुद्धां तें मला भोंवेल. मी आपल्या नेहमींच्या पोषाखांत गेलों, तर तो गुन्हा समजला

जाईल, आणि तेथपर्यंत जाऊन तरी मला लॉर्ड कर्झनबरोबर बोलायला का मिळणार आहे? मुळींच नाहीं."

मला या स्पष्टवक्त्या गृहस्थाची दया आली.

अशाच स्वरूपाच्या आणखी एका दरबाराची मला आठवण होते. काशी हिंदु-विद्यापीठाचा पाया लॉर्ड हार्डिंगच्या हस्तें घालण्यांत आला, त्या वेळीं त्यांचा दरबार भरला होता. त्याला राजेमहाराजे असायचेच. भारतभूषण मालवीयजींनीं मलाहि त्या प्रसंगीं हजर राहाण्याबद्दल मुद्दाम आग्रह केला होता. मी त्याप्रमाणें गेलों होतों. केवळ स्त्रियांनाच शोभतील अशा तऱ्हेचे राजेमहाराजांचे पोषाख पाहून मला खेद वाटला. रेशमी विजारी, रेशमी अंगरखे आणि गळ्यांत हिऱ्यामोत्यांच्या कंठ्या! हातांत बाजूबंद आणि पगड्यांवर हिऱ्यामोत्यांचे गोंडे! या सगळ्यांच्याबरोबरच कमरेला सोन्याच्या मुठीची तरवारहि लटकावलेली असायचीच. हीं त्यांच्या राज्याधिकाराचीं नव्हे, पण त्यांच्या गुलामीचीं चिन्हें आहेत असें कोणी तरी म्हणाला. मला वाटलें होतें, कीं असलीं नामर्दपणाचीं भूषणें ते स्वेच्छेनेंच वापरीत असतील. मला मागून समजलें, की अशा तऱ्हेच्या सभांमध्यें राजांनीं आपल्याकडील सर्व मौल्यवान् अलंकार चढविलेच पाहिजेत अशी सक्ती असते. मला समजलें की, त्यांपैकीं पुष्कळांना असले दागिने वापरण्याविषयीं तिटकारा वाटत होता; आणि असल्या दरबारच्या प्रसंगाखेरीज इतर कोणत्याहि प्रसंगीं ते असले अलंकार घालीत नसत. ही हकीकत किती अंशानें खरी होती तें मला माहीत नाही. इतर प्रसंगीं वापरोत किंवा न वापरोत, व्हाइसरायांच्या दरबारला काय किंवा दुसऱ्या कोठें काय, बायकांनाच शोभतील असले दागिने घालून जाणें भाग पडावें, ही कमी खेदाची गोष्ट नव्हे. धन, सत्ता आणि मान हीं मनुष्याकरवीं काय काय पापें आणि अनर्थ घडवीत आहेत बरें!

●●●

# १७

# गोखल्यांच्या सहवासांत एक महिना—१

अगदीं पहिल्याच दिवसापासून मी पाहुणा आहें असें गोखल्यांनीं मला भासूं दिलें नाहीं. मी त्यांचा सख्खा धाकटा भाऊ असावा अशा तऱ्हेनें त्यांनीं मला वागविलें. मला काय काय पाहिजे असतें तें समजून घेतलें आणि तसतशी सोय करण्याची तजवीज केली. सुदैवानें मला जरूरी थोडक्याच वस्तूंची होती. सर्व कामें जातीनें करण्याची संवय मीं पाडली होती; त्यामुळें मला दुसऱ्याची

सेवा क्वचितच घ्यावी लागे. माझ्या या स्वावलंबनाच्या संवयीची, माझ्या त्या वेळच्या पोषाख वगैरेच्या बाततींतील नीटसपणाची, माझ्या उद्यमशीलतेची आणि नियमशीरपणाची त्यांच्या मनावर गाढ छाप पडली; आणि मला नकोसें होण्या-इतकी ते त्यांची स्तुति करूं लागले.

माझ्यापासून त्यांना कांहीं गुप्त गोष्टी राखायच्या असतील असें मला भासलें नाहीं. जे कोणी मोठे लोक त्यांना भेटण्यास येत त्यांच्याशीं ओळख करून देत. अशा तऱ्हेनें ओळख झालेल्या मंडळींपैकीं या घटकेला सर्वांहून विशेष ठळकपणें माझ्या दृष्टीसमोर उभे राहातात ते डॉ. प्रफुल्लचंद्र राय. ते गोखल्यांच्या घराशेजारींच राहात आणि बहुतेक रोज त्यांची खेप होई असें म्हणण्यास हरकत नाहीं.

"हे प्रोफेसर राय. यांना महिना आठशें रुपये मिळतात. पण स्वतःच्या खर्चासाठीं चाळीस रुपये ठेवून घेऊन बाकीचे सर्व ते सार्वजनिक कार्याला देऊन टाकतात. लग्न केलें नाहीं, करण्याचा विचार नाहीं." अशा शब्दांनीं गोखल्यांनीं मला त्यांची ओळख करून दिली.

आजचे डॉ. राय आणि त्या वेळचे प्रो. राय यांमध्यें मला थोडाच फरक दिसतो. ज्या तऱ्हेचा पोषाख त्या वेळीं ते करीत, जवळजवळ त्याच तऱ्हेचा आजहि आहे. एवढें खरें की, आज खादी आहे. त्या वेळीं खादी मुळीं नव्हतीच. स्वदेशी गिरणींत बनलेले कपडे असतील. गोखले आणि डॉ. राय यांचे सवाद ऐकतांना मला तृप्ति कशी ती वाटेच ना; कारण कीं त्यांचे संवाद देशहितासंबंधींच असायचे, किंवा कमर्ला तरी ज्ञानचर्चा असायची. कित्येक गोष्टी खेदकारकहि असत; कारण त्यामध्यें पुढाऱ्यांवर टीका चाले. ज्यांना मी महान् योद्धे म्हणून समजत होतों ते लहान दिसूं लागले.

गोखल्यांची काम करण्याची पद्धत पाहून मला जितका आनंद झाला, तितकाच बोधहि मिळाला. ते आपला एक क्षणहि फुकट जाऊं देत नसत. त्यांचें सर्व संबंध देशकार्याला अनुलक्षूनच होते असें मला आढळून आलें. त्यांचें बोलणें-चालणेंहि देशकार्यासाटीं असे. त्यांच्या वाणीमध्यें मला कोठेंहि मलीनता, दंभ किंवा असत्य आढळलें नाहीं. हिंदुस्थानचें दारिद्र्य आणि पारतंत्र्य त्यांना प्रति-क्षणीं जाचत असे. अनेक प्रकारचे लोक अनेक प्रकारच्या गोष्टींकडे त्यांचें लक्ष वेधण्यासाटीं येत. त्यांना ते एकच जबाब देत, "हें काम तुम्ही करा; मला माझें करूं द्या. मला देशाचें स्वातंत्र्य मिळवायचें आहे. तें मिळविल्यानंतर मला इतर गोष्टी सुचतील. सध्यां तरी मला या कामापुढें एका क्षणाचीहि फुरसत राहात नाहीं."

रानड्यांबद्दलची त्यांची पूज्यबुद्धि त्यांच्या बोलण्यांत वारंवार दिसून येई.

' रानडे असें म्हणत ' हें तर त्यांच्या बोलण्यामध्यें जवळ जवळ " सूत उवाच " सारखें येत असे. मी होतों त्या अवधींत रानड्यांची जयंती ( कीं पुण्यतिथि तें मला आतां आठवत नाहीं ) येत होती. गोखले ती नेहमीं पाळीत असावे असें दिसलें. त्या प्रसंगीं माझ्याखेरीज त्यांचे मित्र प्रो. काथवटे व दुसरे एक सबजज्ज असलेले गृहस्थ होते. त्यांना त्यांनीं जयंती साजरी करण्यासाठीं बोलाविलें. आणि त्या प्रसंगीं त्यांनीं आमच्यापुढें रानड्यांसंबंधीं अनेक आठवणी सांगितल्या. रानडे, तेलंग आणि मडलीक यांची तुलना केली. तेलंगांच्या भाषेची स्तुति केली, असें मला स्मरतें. मंडलिकांची सुधारक म्हणून स्तुति केली, स्वतःच्या अशिलां-बद्दल त्यांना वाटणाऱ्या आस्थेचा दाखला म्हणून रोजची आगगाडी चुकली तेव्हां स्पेशल ट्रेन करून गेले, त्या प्रसंगाचें वर्णन केलें; आणि रानड्यांच्या सर्व-गामी शक्तीचें वर्णन करून त्या वेळच्या पुढाऱ्यांमध्यें ते सर्वश्रेष्ठ कसे होते त्याचें विवरण केलें. रानडे फक्त न्यायमूर्तीच नव्हते; ते इतिहासकार होते, अर्थशास्त्री होते, सुधारक होते. स्वतः सरकारी न्यायाधीश असतांहि महासभेला प्रेक्षक म्हणून निर्भयपणें हजर राहात. तसेंच त्यांच्या चातुर्याबद्दल सर्वांना इतका विश्वास वाटत होता कीं, सर्वजण त्यांचे निर्णय मान्य करीत. हें वर्णन करतांना गोखल्यांच्या हर्षाला पार राहात नसे.

गोखले घोडागाडी ठेवीत असत. मीं त्याबद्दल तक्रार उठविली. मला त्यांच्या अडचणी समजत नव्हत्या. " तुम्ही वाटेल तेथें ट्रॅममधून जाऊं शकत नाहीं कीं काय? त्यामुळें पुढारीवर्गाची प्रतिष्ठा कमी होईल कीं काय? "

किंचित् दिलगीर होऊन त्यांनीं जबाब दिला, " तुम्हीसुद्धां मला ओळखूं शकलां नाही का? मला वरिष्ठ विधिमंडळांतून जें मिळतें, त्याचा मी स्वतःसाठीं उपयोग करीत नाहीं. तुमच्या ट्रॅमच्या प्रवासाबद्दल मला हेवा वाटतो. पण माझ्याकडून तसें होण्यासारखें नाहीं. तुम्हांला जेव्हां माझ्याइतकेंच लोक ओळखूं लागतील, तेव्हां तुम्हांलाहि ट्रॅममधून जाणें अशक्य नाहीं तरी कठिण होऊन जाईल. पुढारी जें कांहीं करतात तें ऐषआरामासाठींच करतात, असें मानण्याचें कारण नाहीं. तुमचा साधेपणा मला पसंत आहे. मी शक्य तितक्या साधेपणानें राहातोंच. पण तुम्ही खात्री बाळगा कीं, कित्येक खर्च माझ्यासारख्याला अपरिहार्य असतात. "

अशा तऱ्हेनें माझी एक तक्रार तर कारणांनिशीं रद्द झाली. पण मला आणखी एक तक्रार करायची होती तिचा ते संतोषकारक जबाब देऊं शकले नाहींत.

" पण तुम्ही धड फिरायलाहि जात नाहीं, मग तुम्ही आजारी राहतां यांत नवल काय? देशकार्यामधून व्यायामासाठीहि फुरसत मिळणार नाहीं, कीं काय? " मीं म्हटलें.

" तुम्ही मला कधीं रिकामा पाहातां, कीं त्या वेळीं मीं फिरायला जावें ? " जबाब मिळाला.

माझ्या मनांत गोखल्यांबद्दल इतका आदर होता, कीं मी त्यांना प्रत्युत्तर देत नसे. वरील जबाबानें माझें समाधान झालें नाहीं, तरी पण मीं गप्प बसलों. मला वाटलें आणि अजूनहि वाटतें कीं, कितीहि कामें पडलीं असलीं तरीसुद्धां ज्याप्रमाणें आपण जेवणासाठीं वेळ काढतो त्याप्रमाणेंच व्यायामासाठीं काढला पाहिजे. त्यामुळें देशाची सेवा अधिकच होईल, कमी नाहीं, असा माझा नम्र अभिप्राय आहे.



१८

# गोखल्यांच्या सहवासांत एक महिना—२

गोखल्यांच्या छत्राखालीं राहून मीं सारा वेळ घरीं बसूनच घालविला नाही. मीं दक्षिण आफ्रिकेतील माझ्या ख्रिस्ती मित्रांना सांगून आलों होतों कीं, मी हिंदुस्थानांतील ख्रिस्ती लोकांना भेटेन व त्यांची स्थिति समजून घेईन. काली-चरण बानर्जींचें नांव मीं ऐकलें होतें. ते महासभेमध्यें पुढारी या नात्यानें भाग घेत. त्यामुळें त्यांच्याबद्दल आदरहि वाटत होता. सर्वसाधारण ख्रिस्ती लोक महा-सभेपासून व हिंदुमुसलमानांपासून अलग राहात; त्यामुळें त्यांच्यासंबंधीं अविश्वास वाटे; तसा कालिचरण बानर्जींविषयीं वाटत नव्हता. मीं त्यांना भेटावयास जाण्या-संबंधीं गोखल्यांपाशीं बोललों. ते म्हणाले, " त्यांच्याकडे जाऊन तुम्ही काय मिळविणार ? ते फार सज्जन गृहस्थ आहेत. पण मला वाटतें कीं, ते तुमचें समाधान करूं शकणार नाहीत. मी त्यांना चांगलें ओळखतों. तरी पण तुम्हांला जायचें तर खुशाल चला. "

मीं वेळ मागितला. त्यांनीं मला ताबडतोब वेळ दिला व मीं गेलों. त्यांच्या घरीं त्यांच्या धर्मपत्नी मृत्युशय्येवर पडलेल्या होत्या. त्यांचें घर साधें होतें. महा-सभेमध्यें त्यांना कोट पाटलोण घातलेले पाहिले होते. घरीं ते बंगाली धोतर आणि सद्रा या पोषाखांत आढळले. हा साधेपणा मला आवडला. त्या वेळीं मीं स्वतः जरी पारशी कोट पाटलोण घालीत असें, तरी पण तो पोषाख व साधेपणा मला आवडला. मीं त्यांचा वेळ न घेतां माझ्या शंका मांडल्या.

त्यांनीं मला विचारलें, " तुम्हांला वाटतें का कीं, आपण पाप घेऊनच जन्माला येतों ? "

मीं म्हटलें, " होय, वाटतें. "

" तर या मूलभूत पापाचें निवारण हिंदु धर्मांत नाहीं, व ख्रिस्ती धर्मांत आहे." असें म्हणून ते पुढें म्हणाले, " पापाचा मोबदला मृत्यु आहे. त्या मृत्यूपासून बचावून जाण्याचा उपाय येशूला शरण जाणें हा आहे असें बायबल सांगतें."

मीं भगवद्गीतेंतील भक्तिमार्ग सुचविला. परंतु माझें बोलणें निरर्थक होतें. मीं त्या भल्या मनुष्याचे त्याच्या चांगुलपणाबद्दल आभार मानले. माझें समाधान झालें नाहीं, तरी पण या भेटीपासून मला लाभच झाला.

याच महिन्यांत मी कलकत्त्याची गल्लीन् गल्ली हिंडलों म्हटलें तरी चालेल. बहुतेक काम पायीं फिरूनच करीत असें. या वेळींच न्यायमूर्ति मित्र यांना भेटलों. सर गुरुदास बानर्जींना भेटलों त्यांची मदत दक्षिण आफ्रिकेच्या कामीं पाहिजे होती. राजा सर प्यारीमोहन मुकर्जीचें दर्शनहि याच अवधीत घेतलें.

कालीचरण बानर्जींनी मला कालीच्या मंदिराबद्दल सांगितलेंच होतें. तें मंदिर पाहाण्याची मला तीव्र इच्छा वाटत होती. त्याचें वर्णन मी पुस्तकांत वाचलें होतें. म्हणून एक दिवस तिकडे मोर्चा वळविला. न्यायमूर्ति मित्र यांचें घर त्याच भागामध्यें होतें. म्हणून त्यांना ज्या दिवशीं भेटलों, त्याच दिवशी कालीमंदिरांतहि गेलों. रस्त्यानें बलिदानाच्या बकऱ्यांची रांगच्या रांग चालली होती. मंदिराच्या गल्लींत पाऊल टाकतों तोंच भिकाऱ्यांची रांगच रांग लागून राहिलेली दिसली. बावा तर असायचेच. माझी त्या वेळींहि धट्टपुष्ट भिकाऱ्याला कांहींहि न देण्याची पद्धत होती. भीक मागणारे झटून पडतच होते.

एक बावाजी ओट्यावर बसले होते. त्यांनी मला बोलावलें, " कसे काय बेटा, कोणीकडे ? " मीं त्यांच्या मनाजोगा जबाब दिला. त्यांनीं मला व माझ्या सोबत्याला बसायला सांगितलें. आम्हीं बसलों.

मी विचारलें, " बकऱ्यांना बळी देणें हा धर्म आहे असें तुम्हांला वाटतें का ? "

ते म्हणाले, " प्राण्यांना ठार मारणें हा धर्म कोण म्हणेल ? "

" तर मग तुम्हीं येथें बसून लोकांना बोध कां करीत नाहीं ? "

" तें आमचें काम नव्हे. आम्हीं फक्त बसले राहून भगवद्भक्ति करायाची ! "

" पण तुम्हांला दुसरी जागा न सांपडतां हीच बरी सांपडली ? "

" आम्ही कोठेंहि बसलों तरी सारखेंच. लोक हे बकऱ्यांच्या कळपांप्रमाणें

आहेत; थोर लोक नेतील त्या वाटेनें जाणार. आम्हां साधूंना त्याचें काय ? ” बावाजी म्हणाले.

मीं संभाषण पुढें चालविलें नाहीं. आम्ही देवळांत जाऊन पोंचलों. समोर रक्ताची नदी वहात होती. दर्शन घेण्यासाठी उभें राहाण्याची मला इच्छा राहिली नाहीं. मी फार खिन्न झालों, काय करावेंसें मला होऊन गेलें. तो देखावा मी अद्याप विसरूं शकलेलों नाहीं. बंगाली लोकांच्या एका संमेलनाला मला त्याच सुमाराला निमंत्रण मिळालें होतें. तेथें मी एका गृहस्थापाशीं या घातकी पूजेसंबंधीं गोष्ट काढली. ते म्हणाले, “ तेथें नगारे वाजत असतात; त्यांच्या नादामध्यें बकऱ्याचा कशाहि तऱ्हेनें वध केला तरी त्याला वेदना होत नाहींत अशी आमची समजूत आहे.”

मला हें मत पटलें नाहीं. “ बकऱ्याला वाचा असती तर तो निराळेंच सांगेल.” असें मीं त्या गृहस्थाला सांगितलें. हा घातकी रिवाज बंद झाला पाहिजे असें वाटलें. बुद्धदेवांची गोष्ट आठवली. पण हें काम आपल्या शक्तीपलीकडचें आहे, हें मला समजत होतें.

मला त्या वेळीं वाटलें तेंच आजहि वाटत आहे. माझ्या मतें बकऱ्याच्या जीवाची किंमत मनुष्याच्या जीवापेक्षां कमी नाहीं. मनुष्यदेहाच्या रक्षणसाठी मी बकऱ्याचा देह हिरावून घेण्यास तयार होणार नाही. प्राणी जितका अधिक दुर्बल तितका त्याला मानवी क्रूरपणापासून बचावून जाण्यासाठी मनुष्याचा आश्रय घेण्याचा अधिक अधिकार आहे असें मला वाटतें. तितकी लायकी नसेल, तर मनुष्य तसा आश्रयहि पण देऊ शकणार नाही. बकऱ्याला या पापी बलिदानापासून वांचविण्या-साठीं माझ्या अंगीं आहे त्याहून किती तरी अधिक आत्मशुद्धीची व त्यागाची आवश्य-कता आहे. या शुद्धीची आणि त्यागाची तूर्त मार्गप्रतीक्षा करीतच मला परलोक गांठावा लागणार असें दिसतें. असा कोणी तरी तेजस्वी पुरुष किंवा तेजस्वी सती उत्पन्न होवो, कीं जो मनुष्यजातीचा या घोर पातकांतून उद्धार करील, निरपराधी प्राण्यांचें रक्षण करील आणि देवालयांची शुद्धि करील, अशी प्रार्थना तर मी सदैव करीत असतों. ज्ञानी, बुद्धिशाली, त्यागवृत्तिवान्, भावनाप्रधान बंगाल ही हत्या कशी सहन करतो बरें ?

●●●

## १९

# गोखल्यांच्या सहवासांत एक महिना—३

कालीमातेच्या नांवानें होणारा विक्राळ यज्ञ पाहून बंगाली जीवन समजून घेण्याविषयींची माझी जिज्ञासा बळावली ब्रह्मसमाजासंबंधीं बरेंच वाचलें होतें, व ऐकलेंहि होतें. प्रतापचंद्र मुजुमदारांचें जीवनचरित्र थोडेंबहुत माहीत होतें. त्यांचीं व्याख्यानें ऐकण्यास मी गेलों होतों. त्यांनीं लिहिलेलें केशवचंद्र सेनचें चरित्र मिळविलें, व तें अत्यंत आवडीनें वाचून काढलें. साधारण ब्रह्मसमाज आणि आदिब्रह्मसमाज यांमधील फरक समजून घेतला. पंडित शिवनाथशास्त्री यांचें दर्शन घेतलें. महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर यांस भेटण्यासाठीं प्रो. काथवटे व मी असें गेलों; परंतु ते त्या वेळीं कोणाला भेटत नसत, त्यामुळें त्यांचें दर्शन घडलें नाहीं. परंतु त्यांच्याकडे ब्रह्मसमाजाचा उत्सव होता, त्याचें आम्हांला निमंत्रण होतें; त्यावरून आम्ही गेलोंहि. तेथें उच्च प्रकारचें बंगाली संगीत ऐकण्यास मिळालें. तेव्हांपासूनच बंगाली संगीताबद्दल मला आवड वाटूं लागली.

ब्रह्मसमाजाचें शक्य तेवढें निरीक्षण केल्यावर स्वामी विवेकानंदांचें दर्शन घ्यायचें नाहीं असें कसें होईल? अत्यंत उत्साहपूर्वक मी बेलूर मठापर्यंत बहुतांशीं पायींच गेलों. सर्व रस्ता चालून गेलों की अर्धा तें आतां स्मरत नाहीं. मठाचें एकान्त स्थान मला आवडलें. स्वामीजी आजारी आहेत, त्यांना भेटतां येण्यासारखें नाही, व ते कलकत्त्याला स्वतःच्या घरीं आहेत असें ऐकून निराशा झाली. भगिनी निवेदितांच्या बिऱ्हाडाचा पत्ता मिळविला. चौरंघीवरील एका बंगल्यामध्यें त्यांची भेट झाली. त्यांचा दिमाख पाहून मी दिपावून गेलों. संभाषणामध्यें त्यांचें माझें विशेषसें जमलें नाहीं. मी ही गोष्ट गोखल्यांपाशीं बोललों. ते म्हणाले, "ती बाई मोठी कडक आहे; अर्थात् तुमचें जमणें शक्य नाहीं हें मी समजूं शकतों."

पुनः एकदां त्यांची भेट मला पेस्तनजी पादशहांच्या घरीं झाली. पेस्तनजींच्या वृद्ध मातुःश्रींना त्या उपदेश देत होत्या, इतक्यांत मी त्यांच्याकडे जाऊन पोंचलों. त्यामुळें मी त्या उभयतांमधील दुभाष्या झालों. भगिनीचें हिंदु धर्माबद्दलचें प्रेम उचंबळून येत होतें; एवढें मात्र, आमचें एकमेकांशीं पटलें नाहीं तरीहि, मी पाहूं शकलों. त्यांच्या पुस्तकांचा परिचय मागाहून करून घेतला.

दिवसाचे दोन भाग पाडले होते. एक भाग दक्षिण आफ्रिकेच्या कामाच्या बाबतींत कलकत्त्यामध्यें राहाणाऱ्या पुढाऱ्यांना भेटण्यांत घालवीत असें, आणि एक भाग कलकत्त्याच्या धार्मिक संस्था व इतर सार्वजनिक संस्था पाहण्यांत. एके दिवशीं मी बोअर युद्धामध्यें हिंदी शुश्रूषापथकानें केलेल्या कामगिरीसंबंधीं डॉ. मलिक

यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान दिलें. ‘ इंग्लिशमन ’-बरोबरचा माझा परिचय या वेळींहि फार उपयोगी पडला. मि. सॉडर्स या वेळीं आजारी असत, तरीहि त्यांची मदत १८९६ सालीं मिळाली होती तितकीच मिळाली. हें भाषण गोखल्यांना आवडलें; आणि डॉ. रॉयना माझ्या भाषणाची वाखाणणी करतांना ऐकून त्यांना फार आनंद झाला.

अशा तऱ्हेनें गोखल्यांच्या छायेखालीं राहिल्यामुळें बंगालमधील माझें काम फार सोपें झालें. बंगाल्यांतील अग्रगण्य कुटुंबांची माहिती मला अनायासानें झाली, व बंगालशीं माझा निकट संबंध जोडला गेला. या चिरस्मरणीय महिन्यांतील पुष्कळ आठवणी मला सोडून द्याव्या लागतील. त्या महिन्यांतच मी ब्रह्मदेशांतहि बुडी मारून आलों. तेथील फुंगी मंडळींच्या भेटी घेतल्या. त्यांचा आळस पाहून वाईट वाटलें. सोनेरी पगोडे पाहिले मंदिरांत असंख्य बारक्या बारक्या मेणबत्त्या जळत होत्या, तें मला आवडलें नाहीं. देवाल्याचे गाभाऱ्यांत उंदीर फिरत होते तें पाहून स्वामी दयानंदांचा अनुभव आठवला. ब्रह्मदेशाच्या स्त्रियांची स्वतंत्रता, त्यांचा उत्साह व तेथील पुरुषांचा बावळटपणा पाहून स्त्रियांवर खूष झालों व पुरुषांबद्दल खेद वाटला. माझ्या त्याच वेळीं लक्षांत आलें, कीं ज्याप्रमाणें मुंबई म्हणजे हिंदुस्थान नव्हे, त्याचप्रमाणें रंगून म्हणजे ब्रह्मदेश नव्हे. आणि हिंदुस्थानात ज्याप्रमाणे आम्ही इंग्रज व्यापाऱ्यांचे कमिशन एजंट बनलों आहों, त्याचप्रमाणें ब्रह्मदेशामध्यें आम्हीं इंग्रजांच्या जोडीला जाऊन ब्रह्मी लोकांना कमिशन एजंट बनविलें आहे.

ब्रह्मदेशाहून परत आल्यावर मीं गोखल्यांची रजा घेतली. त्यांचा वियोग मला दुःखकर झाला; परंतु माझें बंगाल्यांतील, किंवा खरें बोलायचें म्हणजे कलकत्त्यांतील काम आटपलें होतें.

धंदा सुरू करण्यापूर्वी हिंदुस्थानचा थोडासा प्रवास तिसऱ्या वर्गांतून करून त्या वर्गांतील उतारूंची माहिती करून घेण्याचा व त्यांचीं दुःखें समजून घेण्याचा माझा विचार होता. मीं हा विचार गोखल्यांपुढें मांडला. प्रथम तर तो त्यांनीं हंसण्यावारी नेला. पण जेव्हां मी माझ्या आशांचे वर्णन केलें, तेव्हां त्यांनीं माझ्या योजनेला आनंदानें संमति दिली. मला प्रथम काशीला जाऊन तेथें विदुषी ॲनी बेझंटचें दर्शन करावयाचें होतें. त्या वेळीं त्या आजारी होत्या.

या प्रवासासाठीं मला नवीन सामान तयार करावें लागलें. एक पितळी डबा गोखल्यांनींच दिला, आणि त्यामध्यें माझ्यासाठीं बेसनाचे लाडू आणि पुरी घालायला सांगितली. बारा आण्यांचे एक किनतानाचें पाकीट घेतलें. छायाच्या ( पोरबंदर नजीकचें एक खेडें ) लोकरीचा कोट करविला होता. पाकिटांत हा कोट, टुवाल, सद्रा आणि धोतर एवढें सामान होतें. पांघरण्यासाठीं एक कांबळी

घेतली. त्याखेरीज एक तांब्या बरोबर घेतला. एवढ्या सामानानिशीं मीं बाहेर पडलों.

गोखले आणि डॉ. रॉय मला स्टेशनवर पोंचविण्यास आले. दोघांनाहि मीं न येण्याबद्दल विनंति केली. पण उभयतांनींहि येण्याबद्दल आग्रह धरला. गोखले म्हणाले, "तुम्ही पहिल्या वर्गांतून जात असतां, तर कदाचित् मी नसतोंहि आलों, पण आतां तर मला आलेंच पाहिजे."

प्लॅटफॉर्मवर जातांना गोखल्यांना कोणी अडविलें नाहीं. त्यांनीं आपला रेशमी फेटा बांधला होता आणि धोतर व कोट असा पोषाख केला होता. डॉ. रॉयनीं बंगाली पोषाख केला होता, त्यामुळें प्रथम त्यांना तिकीट-मास्तरनें अडविलें. पण गोखल्यांनीं 'माझे मित्र आहेत' असें सांगितलें, तेव्हां डॉ. रॉयनाहि प्रवेश मिळाला. अशा तऱ्हेनें दोघांनी मला निरोप दिला.

• • •

२०

# काशींत

हा प्रवास कलकत्ता ते राजकोटपर्यंत करायचा होता. काशी, आग्रा, जयपूर, पालनपूर व राजकोट अशा रस्त्यानें जावयाचें होतें. यापलीकडे आणखी स्थळें पहायला फुरसद नव्हती. दरेक ठिकाणीं एक एक दिवस थांबलों. पालन-पूरखेरीज इतर सर्व ठिकाणीं धर्मशाळांमध्यें किंवा यात्रेकरूंप्रमाणें 'पंड्यां'च्या घरीं उतरलों. मला आठवतें, कीं सबंध प्रवासाला गाडीभाड्यासुद्धां एकतीस रुपये खर्च आला होता. तिसऱ्या वर्गाच्या प्रवासांतहि बहुतांशीं मेलगाडी सोडून देत असें, कारण कीं तीमध्यें अधिक गर्दी असते हें मला माहीत होतें. सामान्य गाडीच्या तिसऱ्या वर्गाच्या मानानें तिचें भाडेंहि अधिक असे, हीहि एक अडचण होतीच.

तिसऱ्या वर्गाच्या डब्यांमध्यें त्या काळींहि आजच्याप्रमाणेंच अस्वच्छता आणि पायखान्यांची दुर्दशा होती. हल्लींच काहीं सुधारणा झाली आहे, असें वाटल्यास म्हणावें. परंतु पहिल्या व तिसऱ्या वर्गांमध्यें त्यांच्या भाड्यांतील फर-काच्या मानानें सुखसोयींतील अंतर फारच जास्त आढळून आलें. तिसऱ्या वर्गाचे उतारू म्हणजे मेंढरें आणि त्यांची व्यवस्था म्हणजे मेंढरांचे डबे. युरोपमध्यें तर मीं तिसऱ्या वर्गांतूनच प्रवास केला होता. अनुभव घेण्यापुरता पहिल्या वर्गांतून एकदांच केला होता. तिकडे मला इकडच्याइतके पहिल्या व तिसऱ्या वर्गांमध्यें

अंतर दिसलें नाहीं. दक्षिण आफ्रिकेमध्यें तिसऱ्या वर्गाचे उतारू म्हणजे बहुतेक हबशी लोकच. तरीहि तिथच्या तिसऱ्या वर्गामध्यें अधिक सोयी असतात. तिकडे कांहीं भागांमध्यें तर तिसऱ्या वर्गाच्या डब्यांमध्यें झोंपण्याचीहि सोय असते, आणि बैठका गाद्यांनीं मढविलेल्या असतात. प्रत्येक गाळ्यामध्यें किती उतारू बसवायचे या बाबतींतील संख्येचे नियम पाळण्यांत येतात. इकडे तर तिसऱ्या वर्गाच्या बाबतींत संख्येचा नियम पाळलेला मला कोठेंच आढळला नाहीं.

रेल्वेखात्यांतील या गैरसोयीखेरीज खुद्द उतारूंच्याहि वाईट संवयींमुळें चांगल्या उतारूला तिसऱ्या वर्गाचा प्रवास म्हणजे शिक्षाच होते. वाटेल तेथें थुंकणें, वाटेल तेथें कचरा टाकणें, वाटेल तेव्हां आणि वाटेल तशा विड्या ओढणें, पानतंबाकू खाणें आणि बसल्या जागींच त्याच्या पिचकाऱ्या मारणें, खरकटें जमिनीवर सांडणें, मोठमोठ्यानें गोष्टी बोलणें, शेजारीं बसलेल्या उतारूंबद्दल बेपर्वा राहणें आणि भाषेचा गलिच्छपणा—हा तर सर्वत्रच अनुभवाला येतो.

तिसऱ्या वर्गाच्या प्रवासाच्या माझ्या १९०२ च्या अनुभवामध्यें आणि पुनः १९१५ ते १९१९ पर्यंत पुन्हां सतत मिळालेल्या अनुभवामध्यें मला विशेषसा फरक दिसून आलेला नाहीं. या महाव्याधीवर मला एकच उपाय माहीत आहे. तो म्हणजे शिक्षित वर्गानें तिसऱ्या वर्गांतूनच प्रवास करणें, व लोकांच्या संवयी सुधारण्याचा प्रयत्न करणें. त्याखेरीज रेल्वे-अधिकाऱ्यांना तक्रारी करून भंडावून सोडणें, स्वतःपुरती सोय करून घेण्यासाठीं किंवा झालेली सोय टिकवून धरण्यासाठीं लांचलुचपत न देणें व कायद्याविरुद्ध चालणाऱ्या क्षुल्लक बाबतींचाहि पाठपुरावा करणें.

असें केल्यानें पुष्कळ सुधारणा होऊं शकते असा माझा अनुभव आहे. क्षीण प्रकृतीमुळें मला १९२० सालापासून तिसऱ्या वर्गाचा प्रवास बहुतांशीं बंद करावा लागला आहे, या गोष्टीबद्दल मला नेहमीं दुःख व शरम वाटत असते. आणि तिसऱ्या वर्गाचा प्रवास बंद करावा लागला तोहि अशा वेळीं, कीं जेव्हां त्यांतील अडचणी दूर करण्याच्या कामाचा कांहींसा ठिकाणा लागत होता. रेल्वे-मध्यें, त्याचप्रमाणें आगबोटीमध्यें, गरीब लोकांना होणारा त्रास, त्यांच्या स्वतः-च्याच वाईट संवयींमुळें त्यांत पडणारी भर, व्यापाराच्या दृष्टीनें परकीय व्यापाऱ्यांना सरकारकडून मिळणाऱ्या अयोग्य सवलती वगैरे प्रश्न हे आजला आमच्या सार्वजनिक जीवनाचें एक स्वतंत्रच व महत्त्वाचें अंग बनलें आहे व तें सोडविण्या-साठीं एकदोन हुषार व कळकळीच्या गृहस्थांनीं आपला सर्व वेळ खर्च केला तरी वावगें नाहीं.

पण हा तिसऱ्या वर्गाच्या प्रवासाचा विषय एवढ्यावरच सोडून देऊन आतां काशींतील अनुभवांकडे वळतों. काशींत उजाडतांना उतरलों. मला कोणा

तरी पंड्याकडेच उतरावयाचें होतें. पुष्कळशा ब्राह्मणांनीं मला घेरून टाकला. मला जो त्यांतल्या त्यांत नीटनेटका व बरासा वाटला त्याचें घर पसंत केलें. माझी निवड योग्य ठरली. ब्राह्मणाच्या अंगणांत गाय बांधलेली होती. वर माडी होती. तेथें मला उतरण्यास जागा दिली. मला विधिपूर्वक गंगास्नान करावयाचें होतें. तोंपर्यंत उपास करायचा होता. पंड्यानें सर्व सिद्धता केली. मीं त्याला सांगून टाकलें होतें, कीं आपल्याला सव्वा रुपयापेक्षां जास्त दक्षिणा देतां येणार नाहीं, अर्थात् त्या मानानें तयारी करावी. पंड्यानें माझी विनंति बिनतक्रार मान्य केली.

"श्रीमंत, गरीब सर्वांना आम्ही पूजा सारखीच सांगतों; यजमानाची जशी इच्छा आणि शक्ति तशी दक्षिणा." पंड्याजीनें पूजाविधीमध्यें कांहीं दडपादडपींत नेल्याचें भासलें नाहीं. बाराएक वाजतां स्नानादिक आटपून मी काशीविश्वनाथाच्या दर्शनाला गेलों. तेथील स्थिति पाहून वाईट वाटलें.

मुंबईंत १८९१ सालीं जेव्हां मी वकिली करीत होतों, तेव्हां एकदां प्रार्थनासमाजाच्या मंदिरामध्यें 'काशीची यात्रा' या विषयावर व्याख्यान ऐकलें होतें. त्यामुळें निराशेसाठीं थोडीशी तयारी झालेलीच होती. पण निराशा झाली ती अपेक्षेपलीकडे.

अरुंद घसरड्या गल्ल्यांतून जायचें! शांततेचें नांव नाहीं. माश्यांचा बुजबुजाट, वाटसरूंचा व दुकानदारांचा गोंगाट, हें सर्व असह्य झालें.

ज्या ठिकाणीं मनुष्य ध्यान व भगवच्चिंतन यांची अपेक्षा ठेवतो, तेथें त्यांपैकीं कांहींच मिळत नाहीं! ध्यान पाहिजे असेल, तर तें अंतरींच्या भावनेंतून मिळविलें पाहिजे. अशा भाविक स्त्रियाहि मला दिसल्या, कीं ज्यांना सभोंवार काय चाललें आहे याची गंधवार्ता नव्हती, व ज्या केवळ स्वतःच्या ध्यानामध्यें मग्न होत्या. पण हें कांहीं व्यवस्थापकांच्या प्रभावामुळें नव्हे. काशीविश्वनाथाच्या सभोंवार शान्त, निर्मळ, सुगंधित, स्वच्छ वातावरण, बाह्य त्याप्रमाणेंच आन्तरिक, निर्माण करणें व टिकविणें हें व्यवस्थापकांचें कर्तव्य आहे. त्याऐवजीं ज्यामध्यें लुच्चेगिरीची परमावधि झालेली आहे, अशा तऱ्हेचीं मिठाईचीं व खेळण्यांचीं दुकानें मला दिसलीं.

मंदिराशीं जातों तों दरवाजासमोर कुजलेल्या फुलांची घाण सुटलेली. आंत सुंदर संगमरवरी दगडाची फरसबंदी होती, ती कोणी अंधश्रद्धाळू इसमानें रुपये जडवून विच्छिन्न करून टाकली होती आणि त्या रुपयांमध्यें मळ सांचून राहिला होता.

ज्ञानवापीपाशीं गेलों. तेथें मी ईश्वराला हुडकून काढण्याचा प्रयत्न केला; परंतु तो आढळेच ना. त्यामुळें मनांत खळबळ चालली होती. ज्ञानवापीपाशींहि

घाण आढळली. दक्षिणा ठेवण्याला मन घेतच नव्हतें. म्हणून मीं खरीखुरीच एक दुगाणी ठेवली. तें पाहून पुजारी पंडाजी तापले. त्यांनीं दुगाणी फेकून दिली, चारदोन शिव्या हांसडल्या आणि म्हणाले, " तूं अशा तऱ्हेनें अपमान करशील तर नरकांत पडशील. "

मला कांहींच वाटलें नाहीं. मीं म्हटलें, " महाराज, माझें व्हावयाचें असेल तें होईल बापडें. पण तुमच्या तोंडीं अपशब्द शोभत नाहीत. ही दुगाणी घ्यायची असेल तर घ्या, नाहीं तर तीहि जाईल." " जा तेरी दुगाणी मुझे न चाहीए, " असें म्हणून आणखी खरडपट्टी काढली. मी दुगाणी घेऊन चालूं लागलों. मनांत म्हटलें, " महाराज दुगाणी घालवून बसले, आणि माझी तेवढीच वांचली ! " पण महाराज दुगाणी हातची थोडीच जाऊं देणार ? त्यांनीं मला माघारा बोलावला, " अच्छा, इधर दे. मैं तेरे जैसा नहिं होना चाहता. मैं न लूं तो तेरा बूरा होगा."

मीं मुकाट्यानें दुगाणी दिली, आणि निःश्वास टाकून चालता झालो. नंतर दोनदां काशीविश्वनाथाला गेलों आहें, पण तो ' महात्मा ' झाल्यानंतर. अर्थात् मग १९०२ चे अनुभव कोठून मिळणार? माझेंच ' दर्शन ' करणारे मला कुठून दर्शन घेऊं द्यायला ? ' महात्मा 'चीं दुःखें माझ्यासारख्या " महात्म्याला "च ठाऊक. बाकी दुर्गंधी आणि गोंगाट मीं थेट तशींच अनुभवलीं.

भगवंताच्या दयेबद्दल कोणाला शंका वाटत असेल तर त्यानें असलीं तीर्थक्षेत्रें पहावीं. तो महायोगी आपल्या नांवावर चाललेलीं किती ढोंगें, अधर्म आणि पाखंड इत्यादि सहन करतो बरें ! त्यानें सांगून टाकलेंच आहे,

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ॥

अर्थात् ' करावें तसें भरावें ' कर्माला नाहींसें करण्याची कोणाची शक्ति आहे ? मग भगवंताला मध्यें पडण्याचें प्रयोजनच कोठें उरलें ? तो सृष्टीचे आपले कायदे घालून देऊन स्वतः अलिप्त राहिला आहे.

हे अनुभव घेऊन मीं मिसेस् बेझंटना भेटण्यास गेलों. त्या नुकत्याच दुखण्यांतून उठल्या होत्या हें मला माहीत होतें. मी माझें नांव आंत धाडलें. त्या लगेच बाहेर आल्या. मला फक्त दर्शनच घ्यावयाचें होतें; म्हणून मीं म्हटलें, " आपली तब्येत नाजूक असल्याचें मला माहीत आहे. मला फक्त आपलें दर्शन घ्यायचें होतें. तब्येत नाजूक असतांहि आपण मला भेटूं दिलें एवढ्यानेंच माझें समाधान होत आहे. मी आपला अधिक वेळ घेत नाहीं. "

असें म्हणून मीं रजा घेतली.

● ● ●

२१

# मुंबईंत स्थिर झालों

गोखल्यांची फार इच्छा होती, कीं मी मुंबईमध्यें कायम राहावें, तेथें बॅरिस्टरीचा धंदा करावा आणि आपल्याबरोबरच सार्वजनिक कामामध्यें भाग घ्यावा. त्या वेळीं सार्वजनिक कार्य म्हणजे महासभेचें कार्य होतें. त्यांनीं सुरू केलेल्या संस्थेचें मुख्य काम महासभेचें कार्य चालविणें हेंच होतें.

माझी इच्छाहि तशीच होती. पण धंद्याचा जम बसण्यासंबंधीं मला आत्म-विश्वास वाटत नव्हता. पूर्वींच्या अनुभवाचें स्मरण बुजून गेलें नव्हतें. खुशामत करणें मला विषासमान वाटत होतें.

त्यामुळें प्रथम तर मी राजकोटलाच राहिलों. तेथें माझे जुने हितचिंतक व मला विलायतला पाठविणारे केवळराम मावजी दवे होते. त्यांनीं माझ्या हातीं तीन खटले दिले; काठेवाडच्या ज्युडिशल असिस्टंटपुढें दोन अपिलें होतीं, आणि एक मुळाचा खटला जामनगरमध्यें होता. तो खटला महत्त्वाचा होता. मी ह्या खटल्याची जबाबदारी घेण्याबद्दल कांकूं करीत होतों. ते पाहून केवळराम आवेशानें म्हणाले, “ हरलों तर आम्हीच हरूं कीं नाहीं ? तुमच्याकडून होईल तेवढें तुम्ही करा. मीहि तुमच्याबरोबर असणारच ना ? ”

या खटल्यामध्यें माझे प्रतिपक्षी के. समर्थ होते. मीं तयारी ठीक केली होती. इकडच्या कायद्याची मला फारशी माहिती नव्हती. पण केवळराम दवेनीं मला या बाबतींत तयार केला होता. दक्षिण आफ्रिकेला गेलों, त्यापूर्वी ‘ पुराव्याचा कायदा फिरोजशहांच्या जिह्वाग्रीं आहे, आणि हीच त्यांच्या यशस्वितेची गुरुकिल्ली आहे, ’ असें स्नेही मंडळी म्हणत असत तें मीं लक्षांत ठेवलें होतें व दक्षिण आफ्रिकेला जातांना मीं इकडचा पुराव्याचा कायदा टीकेसहित वाचून काढला होता. त्याखेरीज दक्षिण आफ्रिकेंत अनुभव मिळालाच होता.

खटला जिंकला. त्यामुळें मला कांहींसा आत्मविश्वास उत्पन्न झाला. त्या दोन अपिलांसंबंधीं मला मुळापासूनच धास्ती वाटत नव्हती. त्यामुळें मुंबईस गेलों तरीहि हरकत पडणार नाहीं असें वाटूं लागलें.

या विषयाकडे वळण्यापूर्वी इंग्रज अंमलदाराचा अविचार व अज्ञान यासंबंधीं आलेला थोडासा अनुभव सांगून टाकतों. ज्युडिशल असिस्टंट कांहीं एकाच ठिकाणीं बसत नसत. त्यांची स्वारी फिरतीवर असे. ते जेथें जातील तेथें वकिला-अशिलांनीं गेलें पाहिजे. वकिलांची फी मूळ ठिकाणापेक्षां बाहेर गांवीं जास्त

असायचीच. त्यामुळें अशिलाला सहजीं दुप्पट खर्च येई. याचा विचार न्याया-धिशाला करण्याचें प्रयोजनच नाहीं.

या अपिलाची सुनावणी वेरावळमध्यें होती. वेरावळमध्यें त्या वेळीं जोराचा प्लेग सुरू होता. रोज पन्नास माणसें लागत असत असें मला स्मरतें. तेथील लोकवस्ती साडेपांच हजार होती. गांव बहुतेक रिकामा झाला होता. मी तिथच्या निर्जन धर्मशाळेमध्यें उतरलों होतों. ती गांवापासून कांहींशा अंतरावर होती. पण अशिलांची वाट काय? ते गरीब असले तर त्यांचा भार ईश्वरावर.

वकील मित्रांनीं मला तार केली, की प्लेगसाठीं छावणी दुसरीकडे नेण्या-बद्दल मी साहेबांना विनंति करावी. साहेबांना विनंति करता ते म्हणाले, "तुम्हांला कांहीं भय वाटतें की काय?"

मी म्हटलें, "माझ्या भयाचा हा प्रश्न नाहीं. मला स्वतःची काळजी घेतां येते, अशी माझी समजूत आहे. पण अशिलांचें काय?"

साहेब म्हणाले, "प्लेगनें तर हिंदुस्थानांत घर केलें आहे. त्याला भ्यायचें कसलें! वेरावळची हवा किती फक्कड आहे? (साहेब गांवापासून दूर दर्या किनाऱ्यावर महालवजा तंबूमध्यें राहात होते.) लोकांनीं अशा तऱ्हेनें बाहेर राहायला शिकलें पाहिजे."

या तत्त्वज्ञानापुढें माझें काय चालणार! साहेबांनीं शिरस्तेदाराला सांगितलें, "मि. गांधी सांगतात तें लक्षांत ठेवा, आणि जर वकिलांना किंवा अशिलांना विशेष अडचण पडत असेल, तर मला सांगा."

यांत साहेबानें सरळ आपल्या समजुतीप्रमाणें योग्य तेंच केलें; पण कंगाल हिंदुस्थानच्या अडचणींची कल्पना त्याला कोठून येणार! त्या बिचाऱ्याला हिंदु-स्थानच्या गरजा, बऱ्यावाईट संवयी, रीतिभाती काय समजणार? पंधरा रुपयांच्या मोहोरांच्या हिशेब करणाराला पैचें माप दिलें तर तो हिशेब चटकन् कसा करूं शकणार! इच्छा उत्तमांत उत्तम असूनहि, हत्ती ज्याप्रमाणें मुंगीसाठीं विचार करण्याला असमर्थ असतो, त्याचप्रमाणें, हत्तीएवढ्या पोटाचा इंग्रज मुंगीएवढ्या पोटाच्या हिंदी माणसासाठीं विचार करण्यास किंवा नियम ठरविण्यास असमर्थच असणार.

आतां मूळ विषयाकडे वळतों.

वर लिहिल्याप्रमाणें फत्ते झाली तरीहि मी कांहीं काळपर्यंत राजकोटलाच राहाण्याच्या विचारांत होतों. इतक्यांत एके दिवशीं केवळराम माझ्याकडे आले आणि म्हणाले, "गांधी, तुम्हांला येथें राहूं द्यायचें नाहीं. तुम्हांला मुंबईसच गेलें पाहिजे."

" परंतु तेथें मला काळा कुत्रासुद्धां विचारणार नाहीं. माझा खर्च तुम्ही चालवाल का ? " मीं म्हटलें.

" हो हो, मी तुमचा खर्च चालवीन. तुम्हांला बडे बॅरिस्टर म्हणून कधीं इकडे आणवूं आणि लिहिण्यासवरण्याचें काम तुमच्याकडे पाठवून देत जाऊं. बॅरिस्टरांना लहानथोर बनविणें आम्हां वकिलांचेंच काम आहे ना ? तुमच्या शक्तीची कल्पना तुम्ही जामनगर व वेरावळ येथें दिलेलीच आहे. त्यामुळें मला फिकीर वाटतच नाही. ज्या राष्ट्रकार्यासाठीं ईश्वरानें तुम्हांला जन्मास घातलें आहे त्या कार्याला आम्ही काठेवाडांत गाडलें जाऊं देणार नाही. बोला, कधीं जातां ? "

" नाताळहून माझे थोडे पैसे यायचे बाकी आहेत; ते येतांच जातों. "

पैसे पंधरा-एक दिवसांत आले, आणि मी मुंबईला गेलों. 'पेन गिल्बर्ट आणि सयानी 'च्या ऑफिसमध्यें 'चेंबर्स ' भाड्यानें घेतल्या आणि कायम बसलोंसें वाटलें.

●●●

## २२

# धर्मसंकट

मीं ऑफिस घेतलें, त्याचप्रमाणें गिरगांवांत बिऱ्हाड घेतलें. पण ईश्वरानें मला स्थिर होऊं दिलें नाहीं. बिऱ्हाड करून फारसे दिवस झाले नाहींत, तोंच माझ्या दुसऱ्या मुलाला जोराचें दुखणें आलें. त्याला विषमज्वर झाला. ताप उतरेना. त्याबरोबर भ्रम झाला आणि रात्रीं सन्निपाताचीं चिन्हेंहि दिसूं लागलीं.

डॉक्टरची सल्ला घेतली. डॉक्टरनें सांगितलें, " त्याला औषधानें थोडीच मदत होणार. त्याला अंडीं आणि कोंबडीचा काढा द्यावा लागेल. "

मणिलालचें वय दहा वर्षांचें होतें. त्याला मी काय विचारणार ? मी त्याचा पालक पडलों. अर्थात् मलाच निर्णय केला पाहिजे. डॉक्टर एक फारच सज्जन पारशी गृहस्थ होते. " डॉक्टर, आम्ही तर सर्वजण अन्नाहारी आहों. या दोहोंपैकीं एकहि वस्तु मुलाला देण्याला माझें मन घेत नाहीं. दुसरें कांहीं नाहीं सांगतां येणार ? "

डॉक्टर म्हणाले, " तुमच्या मुलाचा जीव धोक्यांत आहे. दूध आणि पाणि मिश्रण करून देतां येईल; पण तेवढ्यानें त्याला पुरेसें पोषण मिळणार नाहीं. तुम्हांला माहीतच आहे, कीं मी पुष्कळ हिंदु कुटुंबांकडे जात असतों. पण

औषध म्हणून आम्ही कोणतीहि वस्तु दिली तरी ती ते घेतात. मला तर वाटतें कीं, तुम्ही आपल्या मुलावर अशा तऱ्हेची सक्ती न कराल तर बरें."

"तुम्ही म्हणतां तें खरेंच. तुम्हीं असेंच सांगितलें पाहिजे. माझी जबाबदारी फार मोठी आहे. मुलगा मोठा झालेला असतां तर मी अवश्य त्याची मर्जी जाणून घेण्याचा प्रयत्न केला असता, आणि त्याच्या इच्छेप्रमाणें करूं दिलें असतें. या प्रसंगीं मींच या मुलासाठीं विचार केला पाहिजे, मला तर वाटतें, की मनुष्याच्या धर्माची कसोटी अशाच वेळीं होत असते. खरा असो खोटा असो, पण मीं हाच धर्म मानला आहे, की मनुष्यानें मांसादिक खाऊं नये. जगण्याच्या साधनांनाहि कांहीं मर्यादा पाहिजेच, अमुक गोष्टी आपण जीव जगण्यासाठीं म्हणूनहि करतांच कामा नयेत. माझ्या धर्मानें घालून दिलेल्या मर्यादांमुळें माझ्या स्वतःसाटीं व माझ्या मुलांमाणसांसाटी अशा प्रसंगीं मांस इत्यादींचा उपयोग करण्याची मनाई आहे. अर्थात् मला तुम्ही म्हणतां तो धोका पत्करलाच पाहिजे. पण तुमच्यापाशी एक मागणी करतों. तुमचे उपाय मी करणार नाहीं; पण मला मुलाची छाती, नाडी इत्यादि तपासायचें कळणार नाहीं. मला पाण्याच्या उपचारांची थोडी माहिती आहे. ते उपचार करण्याचा विचार आहे; पण तुम्ही मधून मधून येऊन मणिलालची तब्येत पाहात राहाल, आणि शरीरांत होणाऱ्या फेरफारांची मला माहिती देत जाल तर मी तुमचे आभार मानीन."

भले डॉक्टर माझी अडचण समजले, आणि माझ्या विनंतीला अनुसरून मणिलालला पाहायला येण्याचें त्यांनीं कबूल केलें.

मणिलाल स्वतःची निवड करूं शकेल अशी स्थिति नव्हती, तरी पण डॉक्टरशीं झालेलें बोलणें मीं त्याला सांगितलें, आणि त्याचें स्वतःचें मत विचारलें.

"तुम्ही पाण्याचे उपाय खुशाल करा. मला कोंबड्यांचा काढाहि प्यायचा नाहीं, किंवा अंडींहि खायचीं नाहींत."

जर का मीं त्याला या दोन वस्तु खाऊं घातल्या असत्या, तर त्यानें खाल्ल्याहि असत्या, हें मला समजत होतें; तरीहि त्याचें हें म्हणणें ऐकून मला आनंद वाटला.

मला क्यूनीचे उपचार माहीत होते. त्यासंबंधीं प्रयोगहि केले होते. आजारामध्यें उपासाला फार महत्त्व आहे हेंहि माहीत होतें. मीं मणिलालला क्यूनीच्या पद्धतीनें कटिस्नान घालण्यास सुरुवात केली. त्याला तीन मिनिटांपेक्षां जास्त वेळ पिपांत बसवीत नसे. तीन दिवसपर्यंत नारंगीच्या रसांत पाणी घालून त्यावरच त्याला ठेवला.

ताप हटेना. रात्रीं कांहींच्या कांहीं बरळे. ताप १०४ अंशांपर्यंत चढे. मी घाबरलों. मुलगा जर हातीं लागला नाहीं, तर जग मला काय म्हणेल. वडील बंधु

काय म्हणतील ? दुसऱ्या डॉक्टरला कां बोलावूं नये ? वैद्यांना कां बोलावूं नये ? स्वतःची ज्ञानहीन अक्कल चालविण्याचा आईबापांना काय अधिकार ?

अशा तऱ्हेचे विचार मनांत येत. उलट असेंहि वाटे—

' हे प्राण्या ! तूं स्वतःच्या बाबतींत करणार तेंच मुलाच्या बाबतींत केलेंस तर परमेश्वर संतोष मानील. तुझी पाण्याच्या उपचारांवर श्रद्धा आहे, औषधावर नाहीं. डॉक्टर जीवदान देऊं शकत नाहींत. तेहि प्रयोगच करतात. प्राणसूत्र एका ईश्वराच्या हातीं आहे. ईश्वराचें नांव घेऊन त्याच्यावर श्रद्धा ठेव, आणि आपला मार्ग सोडूं नकोस. '

अशी कालवाकालव मनांत चालली होती. रात्र पडली, मी मणिलालला कुशींत घेऊन झोंपलों होतों. मीं त्याला भिजवून पिळलेल्या चादरींत लपेटण्याचा निश्चय केला. उठलों, चादर घेतली थंड पाण्यानें भिजविली, पिळून काढली. तींत त्याला पायापासून डोक्यापर्यंत लपेटून ठेवला. वर दोन घाबळ्या पांघरायला घातल्या. डोक्यावर ओला टुवाल ठेवला. गरम तवा असावा तसा ताप फणफणत होता. शरीर अगदीं सुकें होतें. घामाचें नांव नव्हतें.

मी खूप दमलों होतों. मणिलालला त्याच्या आईकडे सोंपवून मी अर्ध्या तासापुरता हवा खाऊन ताजातवाना होण्यासाठीं व मनालाहि शांति आणण्यासाठीं चौपाटीवर गेलों. रात्रीच्या दहाच्या सुमार होता. माणसांची ये जा कमी झाली होती. माझें तिकडे लक्ष थोडेंच होतें; मीं विचारसागरांत बुडालों होतों. हे ईश्वरा या धर्मसंकटांत माझी लाज राख. ' राम, राम 'चा जप तोंडानें चालूच होता. थोडासा फेरफटका करून धडधडत्या छातीनिशीं परत आलों. घरांत पाऊल टाकतों तोंच मणिलालनें हांक मारली, " बाबा, तुम्ही आलांत ! "

" हो बाळ ! "

" मला आतां यातून काढा ना. अंगाचा भडका चालला आहे. "

" कां ? घाम सुटतो आहे कीं काय ? "

" मी तर घामानें ओलाचिंब झालों आहें; आतां मला मोकळा करा ना भाईसाहेब ! "

मीं मणिलालच्या कपाळाला हात लावून पाहिला. मस्तकावर घामाचे बिंदु जमले होते. ताप उतरत चालला होता. मीं ईश्वराचे उपकार मानले.

" मणिलाल, आतां तुझा ताप जाणार. अजून थोडा घाम नाहीं येऊं देत ? "

" नाहीं, भाईसाहेब, आतां मला सोडवा. पुनः पाहिजे तर असलें करा. "

मला आतां धीर आला होता; म्हणून मीं गप्पागोष्टी बोलून आणखी

थोडा वेळ काढला. कपाळावरून घामाचे ओहोळ चालले. मीं चादर काढली, अंग पुसून काढलें आणि बापलेक एकत्र झोंपलों. दोघांनींहि खूप झोंप काढली.

सकाळला मणिलालचा ताप कमी झालेला दिसला. जलमिश्रित दूध आणि फळें यांवर तो चाळीस दिवस राहिला. मी निश्चिन्त झालो होतों. ताप निघेना, पण आटोक्यांत आला होता. आज माझ्या सर्व मुलांमध्यें मणिलाल अंगानें सुदृढ आहे.

हा रामाचा प्रभाव कीं, पाण्याच्या उपचाराचा, हलक्या आहाराचा कीं शुश्रूषेचा, त्याचा निर्णय कोण करूं शकणार? प्रत्येकाला आपापल्या श्रद्धेनुरूप ठरवूं द्या. मीं तरी असें समजलों, कीं ईश्वरानें माझी लाज राखली, व आजहि माझी तशीच समजूत आहे.

• • •

## २३
# परत दक्षिण आफ्रिकेला

मणिलाल बरा झाला खरा; पण मीं ठरविलें, कीं गिरगांवांतील घर राहाण्यालायक नाहीं. त्यांत ओल येई. प्रकाश पुरेसा नाहीं. रेवाशंकरभाईंच्या सल्ल्यानें आम्हीं उभयतांनीं मुंबईच्या कोणत्या तरी उपनगरामध्ये उघडया जागेंत बंगला घेण्याचा निश्चय केला. मीं सांताक्रुझ वगैरे भागांत भटकलों. वांद्र्यामध्यें कत्तलखाना होता, त्यामुळें वांद्र्यामध्यें राहण्याची आमच्यापैकीं कोणालाच इच्छा झाली नाही. घाटकूपर वगैरे समुद्रापासून दूर वाटलीं. सांताक्रूझमध्यें एक सुंदर बंगला आढळला, त्यामध्यें राहाण्यास गेलों, आणि आरोग्याच्या दृष्टीनें आम्हांला काळजी करायला नको, असें वाटलें. मी चर्चगेटचा पहिल्या वर्गाचा पास काढला. पहिल्या वर्गांत पुष्कळदां मीं एकटाच असे, त्याबद्दल कांहींसा अभिमानहि वाटे असें आठवतें. पुष्कळदां वांद्र्याहून चर्चगेटला जाणारी जलद गाडी पकडण्यासाटीं मीं सांताक्रुझहून वांद्र्यापर्यंत चालत जात असें.

माझा धंदा द्रव्याच्या दृष्टीनें वाटलें होतें त्याहून चांगला चालतोसें दिसलें. दक्षिण आफ्रिकेंतील अशील मला कांहींना कांहीं काम देतच असत; त्यांतून माझा खर्च सहजीं भागेल असें मला वाटलें.

हायकोर्टाचें काम मला अजून कांहीं मिळत नव्हतें. परंतु त्या वेळीं 'मूट' (चर्चा) चाले, तिला मी जात असें. तींत भाग घेण्याची हिंमत चालेना. मला

स्मरतें, कीं तिच्यामध्यें जमियतराम नानाभाई भरपूर भाग घेत. इतर नव्या बॅरिस्टरांप्रमाणें मीहि हायकोर्टांत खटले ऐकण्यास जात असें. तेथें शिकण्यासारखें मिळे त्यापेक्षां समुद्राचा वारा झुळझुळ येई त्या वाऱ्यावर डुलक्या घेण्याची गंमतच भरपूर मिळत असे. इतर डुलक्या घेणारे जोडीदारहि मी पाहात असें त्यामुळें मला लाज वाटत नसे. मला दिसून आलें, कीं डुलक्या खाणें ही एक फॅशनच गणली जात असे.

हायकोर्टाच्या पुस्तकालयाचा उपयोग करण्यास सुरुवात केली. तेथें कांहीं ओळखीहि करूं लागलों. मला वाटूं लागलें, कीं थोडक्याच अवधींत मीहि हायकोर्टांत काम करूं लागेन.

अशा तऱ्हेनें एका बाजूनें माझ्या धंद्याबद्दल कांहींशीं निश्चिन्तता येऊं लागली.

दुसऱ्या बाजूनें गोखल्यांची दृष्टि तर माझ्यावर खिळून राहिलेलीच होती. आठवड्यांतून दोनतीन वेळां माझ्या चेंबरमध्यें येऊन माझी खबर काढून जात; आणि आपल्या निकटच्या मित्रांनाहि कधीं कधीं घेऊन येत. स्वतःच्या कार्य करण्याच्या पद्धतीची मला माहिती करून देत.

परंतु ईश्वरानें माझे भविष्यकालासंबंधींचे कोणतेच बेत चालूं दिलेले नाहींत असें म्हटलें तरी चालेल.

मी स्वस्थ होण्याचा निश्चय करतों आणि स्वस्थतेचा अनुभव घेऊं लागतों, तों एकाएकीं दक्षिण आफ्रिकेहून तार आली–"चेंबरलेन इकडे येत आहेत. तुम्हांला लगेच आलें पाहिजे." माझें वचन मला स्मरतच होतें. मी तार दिली, "मला खर्चाला पाठवा, मी यायला तयार आहें." त्यांनीं लगेच पैसे पाठविले आणि ऑफिस मिटवून मी चालूं झालों.

मला वाटलें, कीं मला एक वर्ष सहज बस्स होईल. बंगला चालू ठेवला आणि बायकामुलांनीं येथेंच राहावें हें इष्ट वाटलें.

मला त्या वेळेला वाटत होतें, की ज्या तरुणांना स्वदेशीं द्रव्यार्जनाचें साधन नसेल व जे धाडशी असतील अशांनीं परदेशीं जावें हें चांगलें. म्हणून मी आपल्याबरोबर चारपांच जणांना घेऊन गेलों. त्यांमध्यें मगनलाल गांधीहि होते.

गांधीकुटुंब मोठें होतें, आजहि आहे. माझें धोरण असें होतें, कीं त्यांपैकीं ज्यांची स्वतंत्र होण्याची इच्छा असेल त्यांनीं स्वतंत्र व्हावें. माझे वडील पुष्कळांची सोय लावीत, पण ती राजवाड्याच्या नोकरीमध्यें. या नोकरीमधून बाहेर पडतां येईल तर चांगलें असें मला वाटलें. माझ्याकडून त्यांना नोकरी मिळवून देण्याच्या कामीं मदत होण्यासारखी नव्हती. ते व त्याप्रमाणेंच इतरहि स्वाश्रयी बनतील तर चांगलें अशी समजूत होती.

पण शेवटीं तर जसजशी माझ्या आदर्शामध्यें उत्क्रान्ति झाली ( असें मला वाटतें ) तसतसा या तरुणांच्या आदर्शांनाहि वळण लावण्याचा मीं प्रयत्न केला. त्यापैकीं मगनलाल गांधींना वळविण्यामध्यें मला फार सफलता मिळाली. पण हा विषय पुढें हातीं घ्यावा लागणार आहे.

बायकांमुलांचा वियोग, बांधलेला घरटा मोडणें, निश्चित गोष्टींमधून अनिश्चित गोष्टींमध्यें प्रवेश, या सर्वांचें क्षणमात्र दुःख वाटलें. पण मला अनिश्चित जीवनाची संवय पडली होती. या जगामध्यें जेथें ईश्वर म्हणा किंवा सत्य म्हणा याखेरीज दुसरें कांहीच निश्चित नाहीं, तेथें निश्चितपणाची अपेक्षा करणें हेंच अयोग्य दिसते. हें जें सर्व आपल्या सभोंवती दिसतें व घडत असतें तें अनिश्चित आहे, क्षणिक आहे; त्यामध्यें जें एक परम तत्त्व निश्चितरूपानें लपून राहिलेलें आहे, त्याचा अणुमात्र साक्षात्कार झाला, त्याच्यावर श्रद्धा बसली तरच जगून सार्थक. त्याचा शोध हाच परम पुरुषार्थ आहे.

मी डरबनला जरूर त्यापेक्षां एक दिवसहि अगोदर पोंचलों असें म्हणतां आलें नसतें. माझ्यासाटीं काम तयारच होतें. मि. चेंबरलेनपाशीं डेप्युटेशन नेण्याची तारीख नक्की होऊन गेली होती. मला त्यांच्यापुढें वाचावयाचा अर्ज तयार करावयाचा होता, आणि डेप्युटेशनबरोबर जायचें होतें.

• • •

१

# आजवरची मेहनत फुकट गेली !

मि. चेंबरलेन दक्षिण आफ्रिकेंत आले ते आफ्रिकेंतून साडेतीन कोट पौंड घेऊन जायला; इंग्रजांचें आणि शक्य तर बोअर लोकांचें मन हरण करायला. त्यामुळें हिंदी प्रतिनिधींना वाटाण्याच्याच अक्षता मिळाल्या.

"तुम्हांला माहीतच आहे, कीं स्वायत्त वसाहतींवर साम्राज्यसरकारची सत्ता नांवाचीच असते. तुमचीं गाऱ्हाणी तर न्याय्य दिसतात. माझ्याकडून होईल तें मी करीनच; पण तुम्ही होईल तेवढें करून स्थानिक गोऱ्या लोकांनाच राजी राखून राहिलें पाहिजे."

हें उत्तर ऐकून प्रतिनिधी थंडगार पडले ! मी पण हात चोळीत बसलों. निजून उठल्यापासूनच नवा दिवस सुरू झाला असें म्हणून पुनश्च 'हरिः ॐ' पासून सुरुवात करायची ठरविली. जोडीदारांची समजूत घातली.

मि. चेंबरलेनचें प्रत्युत्तर तरी चुकीचें कसें म्हणावें ? मुळमुळीत जबाब देण्याऐवजी त्यांनीं सरळ सांगून टाकलें. 'मारील त्याची तरवार' हाच न्याय त्यांनीं कांहीशा गोड शब्दांत सांगितला.

परंतु आमच्यापाशीं, तरवार दूरच राहिली, पण तरवारीचे घाव झेलण्यासारखीं शरीरेंहि नव्हतीं.

मि. चेंबरलेन कांहीं आठवडेच राहावयाचे होते. दक्षिण आफ्रिका म्हणजे कांहीं छोटासा प्रांत नव्हे; तो एक देश आहे, खंड आहे. सबंध आफ्रिका हें एक खंड असलें, तरी त्याच्या पोटांत अनेक उपखंडांचा समावेश झालेला आहे. कन्याकुमारीपासून श्रीनगर १९०० मैल आहे, तर डरबनहून केपटाऊनसुद्धां ११०० मैलांत कमी नाही. या खंडभर मि. चेंबरलेनना वायुवेगानें हिंडायचें होतें. ते ट्रान्सवालला जायला निघाले. तेथील हिंदी लोकांची बाजू तयार करून मांडण्याचें कामहि माझेंच होतें पण प्रिटोरिया गांठायची कशी ? तेथें मी वेळेवर पोंचायचें, तर त्यासाठीं परवाना पाहिजे; तो मिळविण्याचें काम आमच्या लोकांकडून होण्यासारखें नव्हतें.

लढाईनंतर ट्रान्सवालचा मुलूख उजाड होऊन गेला होता. खायला प्यायला अन्न नव्हतें. अंथरापांघरायला कपडे नव्हते. रिकाम्या होऊन बंद पडलेल्या दुकानांत माल भरून ती उघडायचीं होतीं. हें काम आस्तेआस्तेच होणार. माल भरत जाईल तसतसेंच घरदार टाकून पळून गेलेल्या, लोकांना परत

येऊं देतां येणार. यासाठीं ट्रान्सवालच्या प्रत्येक रहिवाश्याला पास काढावा लागे. गोऱ्या लोकांना पास मागतांक्षणीं मिळे; हिंदी लोकांना मात्र अडचण पडे.

लढाईच्या मुदतींत हिंदुस्थानांतून व लंके ( सिलोन )-हून अनेक अंमलदार व शिपाई दक्षिण आफ्रिकेमध्यें जाऊन दाखल झाले होते. त्यांपैकीं ज्यांची तेथेंच वसण्याची इच्छा असेल त्यांची सोय करून देणें हें ब्रिटिश अधिकाऱ्यांचें कर्तव्य समजलें जात होतें त्यांना तरी नवीन अधिकारी नेमावे लागणारच होते. त्या कामीं या अनुभवी अंमलदारांचा सहजीच उपयोग झाला. अंमलदारांच्या तीक्ष्ण बुद्धींतून एका नवीनच खात्याची क्लृप्ति निघाली. तें खातें चालविण्याची लायकीसुद्धां त्यांच्यामध्यें विशेष होती हें कबूल केलेंच पाहिजे! हबशी लोकांचें म्हणून एक निराळें खातें होतेंच. मग एशियावासी लोकांचेंहि कां नसावें? हा युक्तिवाद मान्य झाला. मी पोंचलों त्यापूर्वीच हें खातें उघडलें होतें. तें हळूहळू आपलें जाळें पसरीत होतें. पळून गेलेल्या लोकांना परवाने देणाऱ्या अधिकाऱ्यानें सर्वांनाच परवाने दिले तरी हरकत नाही. परंतु एशियावासीयांची त्याला माहिती कोठून असणार? म्हणून या नव्या खात्याच्या शिफारशीनेंच जर त्यांना परवाने दिले, तर त्या अधिकाऱ्याची जबाबदारीहि कमी होईल व त्याच्यावरील कामाचा बोजा काहीसा हलका होईल असें मांगण्यांत आलें. अंदरकी बात अशी होती, कीं या नव्या खात्याला कांही तरी कामच पाहिजे होतें, आणि दामहि पाहिजे होता. काम नसेल तर खात्याची आवश्यकता सिद्ध होणार नाहीं व तें बंद करण्यांत येईल. त्यासाठीं हें काम त्याला सोयीचें सांपडलें.

हिंदी माणसानें या खात्याकडे अर्ज करायचा. त्यानंतर पुष्कळशा दिवसांनीं जबाब येणार. ट्रान्सवालच्या पासासाठीं अर्जदार पुष्कळ; त्यामुळें त्यांची दाद लावणारे दलाल उत्पन्न झाले. या दलालांनीं आणि अंमलदारांनीं मिळून गरीब हिंदी लोकांचे हजारों रुपये गिळंकृत केले. मला अशी माहिती मिळाली, कीं वशिल्याशिवाय परवाना मिळतच नाहीं; आणि वशिला असूनसुद्धां कधीं कधीं एकेका माणसामागें शंभर शंभर पौंडांइतका खर्च येतो. अशा स्थितींत माझी दाद कशी लागावी?

मी माझे जुने मित्र डरबनचे पोलिस सुपरिंटेंडंट यांजकडे गेलों. आणि त्यांना सांगितलें, "तुम्ही माझी ओळख परवान्याच्या अधिकाऱ्याला देऊन मला परवाना मिळवून द्या. मी ट्रान्सवालांत राहिलेला आहें, हें तुम्हांला माहीतच आहे." ते लगेच टोपी चढवून माझ्याबरोबर आले; आणि त्यांनीं मला परवाना मिळवून दिला. आगगाडीला एक तासाचा अवकाश असेल नसेल. मीं सामान बांधून तयार ठेवलेलेंच होतें. सुपरिंटेंडंट अलेक्झांडरचे आभार मानले आणि प्रिटोरियाचा रस्ता धरला.

मार्गांतील अडचणींची कल्पना मला पुरेपूर येऊन चुकली होती. प्रिटोरियाला पोंचलों. अर्ज लिहून काढला. डरबनमध्यें हिंदी प्रतिनिधींपैकीं कोणाचींहि नांवें अगोदर विचारल्याचें मला स्मरत नाहीं. पण येथें नवें खातें चालू झालें होतें त्यामुळें प्रतिनिधींचीं नांवें अगोदर विचारण्यांत आलीं. त्यांतील हेतु मला दूर ठेवणें हाच होता अशी प्रिटोरियांतील हिंदी लोकांना माहिती मिळाली होती. या दुःखदायक परंतु मजेदार प्रसंगाचें वर्णन पुढें करूं.

●●●

## २

# एशियाटिक खात्याची सुलतानगिरी

मी ट्रान्सवालांत दाखल झालों तरी कसा, याचा नव्या खात्याच्या अंमलदारांना उलगडाच होईना. त्यांनीं त्यांच्याकडे येणाऱ्या जाणाऱ्या हिंदी लोकांपाशीं चौकशी केली, पण त्या बिचाऱ्यांना माहिती कोठून! अंमलदारांनीं अनुमान केलें, कीं पूर्वीच्या ओळखीच्या जोरावर मी परवान्याशिवाय दाखल झालों असेन; आणि तसें असल्यास मला कैद करतां येईल.

मोटमोठ्या लढायांनंतर कांहीं काळपर्यंत सरकारी अधिकाऱ्यांना जादा अधिकार देण्यांत येत असतात. तीच स्थिति दक्षिण आफ्रिकेंतहि होती. येथें शांतता राखण्यासंबंधींचा कायदा करण्यांत आला होता. त्यांतील एक कलम असें होतें, कीं जो कोणी परवान्याखेरीज ट्रान्सवालांत शिरेल त्याला पकडून कैदेची शिक्षा देण्यांत यावी. या कलमाच्या आधारें मला पकडलें पाहिजे अशाबद्दल खलबतें चाललीं होतीं; पण माझ्यापाशीं परवाना मागायला कोणाची हिंमत चालेना.

अंमलदारांनीं डरबनला तार तर केलीच होती, आणि जेव्हां त्यांना समजलें, कीं मी परवाना काढूनच दाखल झालों आहे, तेव्हां त्यांची निराशा झाली. परंतु एवढ्या निराशेनें हार जाणारें हें खातें नव्हतें. मी आलों असलों तरी मि. चेंबरलेनपाशीं मला जाऊं द्यायचा नाहीं एवढी गोष्ट त्यांना सहज करतां येण्यासारखी होती.

प्रतिनिधींचीं नांवें विचारण्यांत आलीं म्हणून मागें लिहिलें तीं एवढ्यासाठींच विचारण्यांत आलीं होतीं. दक्षिण आफ्रिकेमध्यें वर्णद्वेष पावलोंपावलीं प्रत्ययास येतच होता; पण येथें तर हिंदुस्थानांतल्यासारखीच कुजकेपणा आणि छक्केपंजे यांची दुर्गंधि येत होती. दक्षिण आफ्रिकेमध्यें सरकारच्या सामान्य खात्यांचा व्यवहार प्रजेच्या हितार्थच चालविला जात असे. त्यामुळें अधिकाऱ्यांमध्यें एक

प्रकारचा सरळपणा व नम्रपणा दिसून येत असे. त्याचा फायदा सहजींच काळ्या-पिंवळ्या चामडीच्या लोकांनाहि कांहीं अंशीं मिळत असे. आतां जेव्हां नवें एशियाटिक वातावरण दाखल झालें, तेव्हां तेथल्याप्रमाणें अरेरावी, लटपट वगैरे दुर्गंधिहि दाखल झाली. दक्षिण आफ्रिकेंत एक प्रकारें प्रजासत्ता होती; तर एशियामधून अव्वल मुलतानशाही आली. कारण तेथें प्रजेची सत्ता नव्हती, तर प्रजेवर सत्ता चालत होती. दक्षिण आफ्रिकेमध्यें गोरे लोक घरें करून राहिले होते. त्यामुळे त्यांची गणना तेथील प्रजापक्षामध्यें होत असे. त्यामुळें त्यांचा अंमलदारां-वर दाब असे. त्यांत एशियांतून आलेल्या निरंकुश अंमलदारांनीं शिरून हिंदी लोकांची स्थिति आडकित्त्यांतील सुपारीसारखी करून टाकली.

मलाहि या सत्तेचा चांगलाच अनुभव मिळाला. प्रथम मला त्या खात्याच्या वरिष्ठापाशीं बोलाविण्यांत आलें. हे वरिष्ठ लंकेहून आले होते. 'बोलाविण्यांत आलें' हा शब्दप्रयोग थोडासा वस्तुस्थितीला सोडूनच आहे, म्हणून किंचित् अधिक स्पष्ट खुलासा करतों. मला येण्याबद्दल पत्र वगैरे कांहींएक आलेलें नव्हतें. परंतु प्रमुख हिंदी माणसांना त्यांचेकडे वरचेवर जावें लागत असे. अशा प्रमुख मंडळींपैकीं मरहूम शेठ तैय्यब हाजी खानमहंमद हेहि एक होते. त्यांना साहेबानें विचारलें, "गांधी हा कोण? कशासाठीं आला आहे?"

तैय्यब शेठजींनीं जबाब दिला, "ते आमचे सल्लागार आहेत. त्यांना आम्हीं बोलाविलें."

"तर मग आम्ही सगळे इथें आहों तें कशासाठीं? आमची नेमणूक तुमच्या रक्षणासाठींच केलेली नाहीं का? गांधीला इथलें काय कळणार?" साहेब म्हणाले.

तैय्यब शेठनीं कसाबसा हा टोला परतवला. "तुम्ही तर आहांच; पण हे आमच्यांतलेच ना? त्यांना आमची भाषा समजते; ते आम्हांला पूर्णपणें ओळख-तात. तुम्ही किती झालां तरी अंमलदारच ना?"

साहेबानें फर्माविलें, "गांधीला माझ्याकडे घेऊन या."

तैय्यब शेठ इत्यादींबरोबर मी गेलों. खुर्ची मला कुठून मिळणार? आम्ही सर्वजण उभे राहिलों.

"कसें काय, तुम्ही इथें काय समजून आला आहां?" साहेबांनीं माझ्या-कडे पाहून विचारलें.

"माझ्या मित्रमंडळींच्या निमंत्रणावरून त्यांना सल्ला देण्यासाठीं आलों आहें." मीं जबाब दिला.

"पण तुम्हांला माहीत नाहीं का, कीं तुम्हांला इथें येण्याचा हक्कच नाहीं! तुम्हांला परवाना मिळाला आहे तो नजरचुकीनें दिला गेला आहे. तुम्हांला इथचे रहिवासी म्हणतांच येत नाहीं. तुम्हांला परत जावें लागणार. मि. चेंबरलेनकडे तर

तुम्हांला जायला मिळणारच नाही. येथील हिंदी लोकांचें रक्षण करण्यासाठींच तर आमचें खातें मुद्दाम नेमलेलें आहे. बरें, जा आतां. ”

एवढें बोलून साहेबानें मला रजा दिली. मला उत्तर द्यायला वेळच दिला नाहीं.

माझ्या सोबत्यांना थांबवून घेतलें. त्यांना दम देऊन हिताची सल्ला म्हणून दिली, कीं त्यांनीं मला ट्रान्सवालमधून धाडून द्यावा.

सोबती आंबट तोंड करून आले. अशा तऱ्हेनें एकाएकीं एक नवीनच कोडें आमच्यापुढें येऊन उभें राहिलें.

●●●

३

# कडू घोट प्यालों !

या अपमानाचें मला फार दुःख झालें. पण यापूर्वींहि असले अपमान मीं सहन केलेले असल्यामुळें मी निर्ढावला जात होतों. त्यामुळें अपमानाकडे लक्ष न देतां तटस्थ वृत्तीनें मला जें कर्तव्य सुचेल तें करावें असा मीं निश्चय केला.

साहेबमजकुरांच्या सहीचें पत्र आलें. त्यांत लिहिलें होतें, कीं मि. चेंबर-लेनर्ना डरबनमध्यें मि. गांधींची भेट घेतलेली आहे; सबब आतां त्यांचें नांव प्रतिनिधींच्या यादींतून काढून टाकणें अवश्य आहे.

मित्रमंडळींना हें पत्र असह्य वाटलें. त्यांनीं डेप्युटेशन घेऊन जाण्याचा बेत रद्द करण्याचा विचार दर्शविला. मीं त्यांना हिंदी समाजाची असहाय स्थिति दाखवून दिली. “ जर तुम्ही मि. चेंबरलेनकडे गेला नाहीं, तर येथें तुम्हांला कसलेच कष्ट पडत नाहींत, असा अर्थ केला जाईल. किती झाले तरी जें कांहीं सांगायचें तें लिहूनच न्यायचें आहे. तें तयार आहे. मीं वाचलें काय किंवा दुसऱ्या कोणी वाचलें काय त्याची चिंता नाहीं. मि. चेंबरलेन चर्चा तरी थोडीच करणार आहेत ? माझा अपमान झाला, परंतु तो आपण गिळून टाकला पाहिजे. ”

मी असें बोलत आहें तोंच तैय्यब शेठ उसळून म्हणाले, “ तुमचा अपमान तो सगळ्या समाजाचा अपमान नव्हे का ? तुम्ही आमचे प्रतिनिधि आहां, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. ”

मीं म्हटलें, “ हें खरें; पण असले अपमान समाजानेंसुद्धां गिळून टाकले पाहिजेत. आपल्यापाशीं दुसरा कोणता इलाज आहे ? ”

" काय व्हायचें असेल तें होईल, पण आपल्याच हातानें आणखी नवा अपमान कां म्हणून ओढून घ्यावा ? विटंबना ही नाहीं तरी चाललीच आहे. जाळायला आम्हांला हक्क तरी कसले आहेत ? " तैय्यब शेठ प्रत्युत्तरादाखल बोलले.

हा उत्साह मला मनांतून तर आवडला, परंतु त्याचा उपयोग करून चालणार नाहीं हेंहि मला दिसत होतें. समाजाची शक्ति किती मर्यादित आहे याचा मला अनुभव होता. म्हणून मीं सोबत्यांना शान्त केलें आणि माझ्याऐवजीं मरहूम जॉर्ज गॉडफ्रे ( हे एक हिंदी बॅरिस्टर होते ) यांस घेऊन जाण्याची सल्ला दिली.

अशा तऱ्हेनें मि. गॉडफ्रे हे डेप्युटेशनचे प्रमुख झाले. माझ्याबद्दल मि. चेंबरलेननीं थोडी चर्चाहि केली. " एकाच माणसाचें म्हणणें पुन्हां ऐकण्यापेक्षां नव्या नव्या मंडळींकडून ऐकणें अधिक बरें. " वगैरे बोलून केलेली जखम भरून काढण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

पण त्यामुळें समाजाचें व माझें काम वाटलें, संपलें तर नाहींच. एकीएक-पासून सुरुवात करण्याचा प्रसंग आला. " तुमच्या सांगण्यावरून हिंदी समाजानें लढाईत भाग घेतला, त्याचा हाच परिणाम ना ? " असे टोमणे मारणारेहि भेटले. या टोमण्यांचा माझ्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं. मीं म्हटलें, " दिलेल्या सल्ल्याबद्दल मला पश्चात्ताप होत नाही. आपण भाग घेतला तें योग्यच केलें, असें अजून मला वाटतें. आपण तसें करून आपलें कर्तव्य बजावलें. त्याचें फळ आपल्या दृष्टीला पडलें नाहीं, तरी फिकीर नाहीं. पण शुभ कार्याचें फळ शुभच येणार असा मला दृढ विश्वास वाटतो. होऊन गेलेल्या गोष्टीचा काथ्याकूट करण्यापेक्षां यापुढें आपलें कर्तव्य काय, याचा विचार करणें अधिक श्रेयस्कर. तरी आपण त्याचाच विचार करूं या. "

इतरांनींहि या म्हणण्याला दुजोरा दिला.

मीं म्हटलें, " खरें पाहतां ज्या कामासाठीं मला बोलाविलें होतें, तें आतां पुरें झालें असें म्हणतां येईल. मला वाटतें कीं, तुम्हीं मला रजा दिलीत तरीसुद्धां होतां होई तों मी ट्रान्सवाल सोडून जाऊं नये; यापुढें माझें काम नाताळमधून न चालतां येथूनच चाललें पाहिजे; आणि मला आतां येथेंच वकिलीची सनद मिळविली पाहिजे; या नव्या खात्याला पुरून उरण्याची मला हिंमत वाटते. या खात्याचा बंदोबस्त केला नाहीं, तर आपला समाज लुटला जाईल आणि कदाचित् येथून आपल्याला पायहि काढावा लागेल. समाजाची हीनावस्था प्रतिदिन वाढतच जाणार. मि. चेंबरलेनना मला भेटूं दिलें नाहीं; तो अंमलदार माझ्याशीं तुसडे-पणानें वागला; पण सबंध समाजाचा पाणउतारा होण्यापुढें या गोष्टीचें कांहींच नाहीं. येथें आपण कुत्र्याप्रमाणें राहावें ही गोष्ट असह्य आहे."

अशा तऱ्हेचें मी बोलत असें. प्रिटोरिया व जोहानिसबर्गमध्यें राहाणाऱ्या प्रमुख हिंदी लोकांच्या सल्ल्यानें अखेरीस जोहानिसबर्गमध्यें ऑफिस ठेवण्याचें नक्की झालें. ट्रान्सवालमध्यें मला वकिलीची सनद मिळण्यासंबंधींहि शंका तर होतीच; पण वकीलमंडळाकडून माझ्या अर्जाला हरकत घेण्यांत आली नाहीं, व वरिष्ठ कोर्टानें माझा अर्ज मंजूर केला.

हिंदी माणसाला योग्य जागीं ऑफिस मिळणेंहि मुष्किलीचें होतें. मि. रीचशीं माझा चांगला परिचय झाला होता. त्या वेळीं ते व्यापारीवर्गामध्यें होते. त्यांच्या ओळखीच्या हाऊस-एजंटामार्फत मीं चांगल्याशा ठिकाणीं ऑफिससाटीं घर मिळविलें आणि वकिली सुरू केली.

● ● ●

## ४

# वाढती त्यागवृत्ति

ट्रान्सवालमध्यें राष्ट्रीय हक्कांसाटीं कसकसें झगडावें लागलें व एशियाटिक खात्याच्या लोकांशीं कसें वागावें लागलें त्याचें वर्णन पुढें चालविण्यापूर्वी माझ्या जीवनाच्या इतर बाजूंवर नजर टाकणें आवश्यक आहे.

अजूनपर्यंत थोडेंबहुत द्रव्य सांठविण्याची इच्छा असे. परमार्थाबरोबर स्वार्थाचें मिश्रण होतें.

मुंबईस ऑफिस उघडलें, त्या वेळीं एक अमेरिकन विमाकंपनीचा एजंट आला होता. त्याचा चेहरा मोहक होता, बोलणें मधुर होतें. आम्ही जसें काय जुने दोस्त असावे अशा तऱ्हेनें त्यानें माझ्याशीं माझ्या भावी कल्याणासंबंधीं गोष्टी काढल्या. " अमेरिकेंत तर तुमच्या स्थितींतील सर्व लोक आपल्या आयुष्याचा विमा उतरतात. तुम्हींसुद्धां तसेंच करून भविष्यकाळाबद्दल निश्चिंत झालें पाहिजे. आयुष्याचा भरंवसा नाहीं. अमेरिकेंत तर आम्ही विमा उतरणें हा धर्म मानतों. माझी तर इच्छा आहे, कीं तुम्हींसुद्धां एक लहानशी पॉलिसी काढावी. याउपर तुमची मर्जी. "

तेथपर्यंत दक्षिण आफ्रिकेंत काय किंवा हिंदुस्थानांत काय अनेक एजंटांना मीं दाद दिली नव्हती. मला वाटे, कीं विमा उतरण्यामध्यें कांहींसा भ्याडपणा आणि ईश्वराबद्दल अविश्वास आहे, परंतु या वेळीं मी मोहाला बळी पडलों. तो बोलत जाई तसतशी माझ्या डोळ्यांपुढें बायकामुलांची मूर्ति उभी राही. " गड्या,

तूं पत्नीचे दागिने तर बहुतेक सर्व विकून टाकले आहेस. तुझें कमीजास्त झालें, तर तुझ्या बायकामुलांचा भार बिचाऱ्या वडील भावावरच–ज्यानें आजवर वडिलांची जागा घेऊन ती शोभविली त्याच्यावरच–पडणार ना? तें योग्य होणार नाहीं." अशा तऱ्हेचा युक्तिवाद स्वतःच्या मनाशीं करून मीं रु. १०,००० ची पॉलिसी काढली.

पण दक्षिण आफ्रिकेमध्यें परिस्थिति पालटली, तसे माझे विचारहि पालटले. दक्षिण आफ्रिकेंतील या नव्या संकटाच्या प्रसंगीं मीं जें जें कांहीं केलें तें ईश्वराला साक्षी ठेवूनच केलें. दक्षिण आफ्रिकेंत किती काळ लोटेल त्याची मला कांहींच कल्पना नव्हती. परत हिंदुस्थानला पाय लागणार नाहींत असेंच समजून मी चालत होतों. बायकामुलें माझ्याबरोबरच राहिलीं पाहिजेत. यापुढें तीं व मी वेगळें राहाणें बरें नाहीं, त्यांचा निर्वाहहि दक्षिण आफ्रिकेंतूनच चालला पाहिजे. हा विचार येतांच ती पॉलिसी मला दुःखदायक झाली. विमा-एजंटाच्या जाळ्यांत फशीं पडल्याची मला शरम वाटूं लागली. "वडील बंधु जर पित्यासमान आहेत, तर त्यांना धाकट्या भावाच्या विधवेचा भार वाटेल, असें तुला वाटावेंच कां? तूंच अगोदर मरशील असें तरी कशावरून? पालनकर्ता ईश्वर आहे; तूंहि नाहींस किंवा भाऊहि नाहीं. विमा उतरून तूं आपल्या बालबच्चांनाहि पराधीनच बनविलेंस. त्यांनीं स्वावलंबी कां होऊं नये? असंख्य गोरगरिबांच्या मुलांबाळांचें कसें चालतें? त्यांची गत तीच तुझी असें तूं कां समजूं नयेस?"

अशा तऱ्हेनें विचारांचा प्रवाह सुरू झाला. त्यांचा अंमल लागोलाग झाला असें नाहीं. एक हप्ता दक्षिण आफ्रिकेंतूनहि पाठविल्याचें स्मरतें.

परंतु या विचारसरणीला बाहेरचेंहि उत्तेजन मिळालें. दक्षिण आफ्रिकेच्या पहिल्या खेपेला मी ख्रिस्ती वातावरणांत येऊन माझ्यामध्यें धर्माविषयीं जागृति झाली. या वेळीं थिऑसॉफीच्या वातावरणांत मिळालों. मि. रीच थिऑसॉफिस्ट होते. त्यांनीं माझा जोहानिसबर्गच्या सोसायटीशीं संबंध जोडून दिला. मी तिचा सभासद झालों नाहींच. माझे कांहीं मतभेद होते; तरी पण जवळजवळ प्रत्येक थिऑसॉफिस्टाशीं निकट परिचय घडला. त्यांच्याबरोबर रोज धर्मचर्चा होई. मी त्यांचीं पुस्तकें वाचीत असें. त्यांच्या सभेमध्यें भाषण करण्याचाहि प्रसंग येई. बंधुभावना उत्पन्न करणें व व्यापक करणें ही थिऑसॉफींतील मुख्य गोष्ट आहे. यासंबंधीं आम्ही खूप चर्चा करीत असूं; आणि हा सिद्धान्त व सभासदांचें प्रत्यक्ष आचरण यांमध्यें मला जिथें फरक दिसे, तेथें मी टीकाहि करीत असें. या टीकेचा परिणाम स्वतः माझ्यावर चांगला झाला. मी आत्मनिरीक्षण करायला शिकलों.

●●●

# ५

# आत्मनिरीक्षणाचा परिणाम

१८९३ सालीं ख्रिस्ती मित्रांचा निकट परिचय घडला, त्या वेळीं माझी अवस्था निव्वळ जिज्ञासूची होती. बायबलचा संदेश मला ऐकविणें, समजावून व पटवून देणें अशाबद्दल ख्रिस्ती मित्रांचा प्रयत्न चालू होता. मी नम्रपणें तटस्थ वृत्तीनें त्यांची शिकवण ऐकून घेई, समजून घेई त्यावरून मीं हिंदु धर्माचा यथाशक्ति अभ्यास केला, आणि इतर धर्म समजून घेण्याचा प्रयत्न केला. आतां १९०३ मध्यें स्थिति कांहींशी बदलली होती. थिऑसॉफिस्ट मित्र मला आपल्या मंडळांत ओढण्याचा प्रयत्न तर करीतच असत; परंतु तें, मी हिंदु, तेव्हां माझ्या-कडून कांहीं तरी शिकावें, याच हेतूनें थिऑसॉफीच्या पुस्तकांमध्यें हिंदु धर्माचें प्रतिबिंब व हिंदु धर्माची छाप ही भरपूर आहेत. त्यावरून या मंडळीला वाटलें, कीं मी त्यांना मदत करूं शकेन. मी त्यांना समजावून सांगितलें, कीं माझा संस्कृतचा अभ्यास नाहीसारखाच. प्राचीन धर्मग्रंथ मी संस्कृतांतून तर वाचलेले नाहींतच; भाषान्तरामार्फत वाचनहि माझें बेताचेंच. परंतु ते पडले पुनर्जन्म आणि पूर्वजन्मींचे संस्कार यांवर विश्वास ठेवणारे. त्यामुळें माझ्याकडून कांहीं तरी मदत होईलच असें ते समजत होते. 'वासरांत लंगडी गाय शहाणी' तशी माझी स्थिति झाली. कोणाबरोबर विवेकानंदाचा तर कोणाबरोबर मणिलाल नभुभाईचा 'राजयोग' वाचूं लागलों. एका मित्राबरोबर 'पातंजल योगदर्शन' वाचावें लागलें. पुष्कळांबरोबर गीतेचा अभ्यास सुरू झाला. एक छोटेसें 'जिज्ञासु मंडळ' नांवाचें मंडळ स्थापिलें, आणि नियमित अभ्यास सुरू केला. गीतेवर माझें प्रेम आणि श्रद्धा तर होतीच. आतां तिच्यामध्यें खोल उतरण्याची आवश्यकता भासूं लागली. माझ्यापाशीं एकदोन भाषांतरें होतीं; त्यांच्या साहाय्यानें मूळ संस्कृत समजून घेण्याचा प्रयत्न केला, आणि नेहमीं एकदोन श्लोक पाठ करण्याचें ठरविलें.

सकाळच्या दातण-स्नानाच्या वेळेचा मी पाठ करण्याकडे उपयोग करीत असें. दातणांत पंधरा मिनिटें आणि स्नानांत वीस मिनिटें जात. दातण इंग्रजी पद्धतीनें उभ्यानें करीत असें. समोरच्या भिंतीवर गीतेचे श्लोक लिहून काढून चिकटवीत असें, आणि जरूर पडेल तसतसे पाहून घोकीत असें. हे घोकलेले श्लोक परत स्नान आटोपेपर्यंत पक्के होत. तेवढ्या वेळांत मागच्या श्लोकांची एकदां आवृत्तिहि करतां येई. अशा तऱ्हेनें तेरा अध्यायांपर्यंत पाठ केल्याचें मला स्मरतें. त्यानंतर कामें वाढलीं. सत्याग्रहाचा जन्म झाल्यानंतर त्या बालकाचें संगोपन करीत असतां विचारासाठीं मला मिळणारा वेळहि त्याच्याच संगोपनांत जाई; आणि अद्यापहि जात आहे असें म्हणतां येईल.

या गीतावाचनाचा परिणाम माझ्या सहाध्यायांवर काय झाला असेल तो त्यांचा त्यांनाच माहीत; पण माझ्या बाबतींत तरी तो ग्रंथ आचरणाचा एक श्रेष्ठ मार्गदर्शक झाला. तो माझा धार्मिक कोश झाला. अपरिचित इंग्रजी शब्दांच्या वर्णरचनेसाठी ( स्पेलिंग ) किंवा अर्थासाठीं ज्याप्रमाणें मी इंग्रजी शब्दकोश उघडीत असें, त्याचप्रमाणें आचरणांतील अडचणी, त्यांतील भानगडीचीं कोडीं वगैरे गीतेकडून सोडवून घेत असें. अपरिग्रह, समभाव इत्यादि शब्दांनीं मला पकडून धरलें. समभाव कसा अभ्यासावा ? कसा टिकवावा ? अपमान करणारे अंमलदार, लांचखाऊ अंमलदार, कालपर्यंत जोडीनें काम करून आतां मात्र निष्कारण विरोध करणारे वगैरे, आणि ज्यांनी अत्यंत उपकार केले आहेत असे सज्जन यांच्यामध्यें भेद करावयाचा नाहीं म्हणजे काय ? अपरिग्रह कसा बरें पाळावयाचा ? देह हा तरी काय कमी परिग्रह आहे ! स्त्रीपुत्रादि म्हणजे तरी परिग्रह नाहीं तर काय ? पुस्तकांच्या रद्दीची कपाटें काय जाळूनच टाकायचीं ? घर जाळून तीर्थ करायचें ? लगेच जबाब मिळाला, की घर जाळल्याखेरीज तीर्थ होणारच नाहीं. इंग्रजी कायद्याचा पाठिंबा मिळाला. स्नेलनें केलेलें कायद्याच्या सिद्धान्तांचें विवेचन आठवलें. ' ट्रस्टी ' – वहिवाटदार – शब्दाचा अर्थ गीतेच्या अभ्यासाअंतीं विशेष समजला. कायद्याच्या शास्त्राबद्दलचा आदर वाढला. कायद्याच्या मुळाशीहि मला धर्म दिसूं लागला. ट्रस्टीपाशी कोट्यवधि रुपये असले, तरी त्यांतील एक पैमुद्धां त्याची नव्हे. त्याचप्रमाणें मुमुक्षूनें वागलें पाहिजे, हें मला गीतेवरून स्पष्ट दिसून आलें. अपरिग्रह व्हायचें, समभावी व्हायचें तर हृदयपरिवर्तन आवश्यक आहे हें मला दिव्याप्रमाणें स्पष्ट दिसून आलें. रेवाशंकरभाईंना लिहून कळविलें, की विम्याची पॉलिसी बंद करा, कांहीं परत मिळण्यासारखें असेल तर घ्या, नसेल तर भरलेले पैसे बुडाले म्हणा. बायकामुलांचें रक्षण त्यांचा आमचा जन्मदाता करील, अशा अर्थाचें पत्र लिहिलें पितृतुल्य वडील बंधूंना लिहिलें :—

" आजपर्यंत तर माझा खर्च भागून उरे, तें तुम्हांला अर्पण करीत गेलों. यापुढें माझी आशा सोडा. आतां शिल्लक राहील ती येथेंच समाजासाठीं वापरली जाईल. "

ही गोष्ट मी बंधूंना चटकन् पटवून देऊं शकलों नाहीं. प्रथम तर त्यांनीं कडक शब्दांमध्यें माझें त्यांच्यासंबंधीचें कर्तव्य दाखवून दिलें. वडिलांपेक्षां मी स्वतःला अधिक शहाणा समजूं नये. वडिलांनी नाहीं का कुटुंबाचें पोषण केलें ? तसेंच मीहि केलें पाहिजे वगैरे. मी उलट विनयपूर्वक सांगितलें, कीं वडिलांचीच परंपरा मी चालवीत आहें. कुटुंबाचा अर्थ जरा विस्तृत केला म्हणजे माझ्या कृत्याची संगति लागेल.

बंधूंनीं आशा सोडून दिली. जवळजवळ अबोला घेतल्याप्रमाणें केलें. त्यापासून मलाहि दुःख झालें; परंतु मला जो धर्म वाटत होता, तो सोडणें अधिकच असह्य वाटत होतें. मीं कमी दुःखाचा मार्ग पत्करला. इतकें असूनहि बंधूबद्दलची माझी भक्ति निर्मळ व तीव्र होती. बंधूंच्या दुःखाच्या मुळाशीं त्यांचें प्रेमच होतें. त्यांना माझ्या पैशापेक्षां माझ्या सद्वर्तनाचीच अधिक चाड होती.

आपल्या अखेरीच्या दिवसांमध्यें बंधु विरघळले. मृत्युशय्येवर असतांना त्यांच्या लक्षांत आलें, कीं माझेंच करणें योग्य आणि धर्म्य होतें. त्यांचें अत्यंत करुणाजनक पत्र आलें. बापानें मुलाची माफी मागणें शक्य असेल तर त्यांनीं माझी माफी मागितली म्हणा ना ! आपल्या मुलांना माझ्या पद्धतीनें वाढविण्याबद्दल मला शिफारस केली. स्वतः मला भेटायला अधीर झाले. मला तार केली. मी 'या' असा तारेनेंच जबाब पाठविला. परंतु आमच्या भेटीचा योगायोग नव्हता.

त्यांची आपल्या मुलांबाबतची इच्छाहि पूर्ण झाली नाहीं. बंधूंचें मुलखामध्येंच देहावसान झालें. त्यांच्या मुलांवर त्यांच्या अगोदरच्या जीवनाची छाप होती. त्यांचें परिवर्तन झालें नाही. मीं त्यांना स्वतःकडे आकर्षू शकलों नाहीं. यांत त्यांचाहि दोष नाहीं. स्वभाव कोण बदलूं शकणार ? बलवान् संस्कार कोण पुसून टाकूं शकणार ? आपणाला वाटतें, कीं आपलें परिवर्तन किंवा विकास होईल तसतसा आपल्या आश्रितांमध्यें किंवा सोबत्यांमध्येंहि फेरफार झाला पाहिजे, पण तें फुकट आहे.

आईबाप होणाराची जबाबदारी किती भयंकर आहे त्याची या दृष्टान्तावरून कांहींशी कल्पना होण्यासारखी आहे.

● ● ●

६

# शाकाहारार्थ बलिदान

राहाणीमध्यें त्याग व साधेपणा वाढलीं आणि धर्मजागृति वाढली तसतशी शाकाहाराची आणि त्याच्या प्रचाराची हौसहि वाढत चालली. प्रचाराचा एकच मार्ग माझ्या माहितींत आहे : स्वतःचें आचरण आणि त्याच्याच बरोबर जिज्ञासूंबरोबर विचारविनिमय.

जोहानिसबर्गमध्यें एक शाकाहारी भोजनगृह होतें. त्याचा चालक एक जर्मन होता. त्याचा क्यूनीच्या जलचिकित्सेवरहि विश्वास होता. मी त्या भोजनगृहांत जाऊं लागलों, आणि ज्या ज्या इंग्रज मित्रांना त्याच्याकडे नेतां येईल

तितक्यांनाहि घेऊन जात असें. पण मला दिसून आलें, कीं हें गृह फार काळ चालणें शक्य नाहीं. त्या व्यवहारांत त्याला पैशाची टंचाई नित्य जाणवतच असे. मला योग्य वाटली तेवढी मदत मीं त्याला केली. त्यांत कांहीं पैसे बुडालेहि. अखेरीला तें बंद पडलें. थिऑसॉफिस्ट बहुधा शाकाहारीच असतात; कोणी पुरे, कोणी अर्धवट. त्या मंडळींपैकीं एक बाई साहसी होती; तिनें मोठ्या पायावर एक शाकाहारी भोजनगृह उघडलें. या बाईला कलेचा शोक होता. खर्च सढळ हातानें करी, पण जमाखर्चाचें तितकेसें भान नव्हतें. तिचें मित्रमंडळहि विस्तृत होतें. सुरुवातीला तिचें काम लहान प्रमाणावर चालू झालें; परंतु तिनें त्यांत वाढ करण्याचा आणि मोठी जागा घेण्याचा विचार ठरविला. त्या कामीं माझी मदत मागितली. त्या वेळी तिच्या हिशेबांची वगैरे मला कांहीं एक कल्पना नव्हती. तिचा अंदाज बरोबर असेल असें मी धरून चाललों. मला सवड करतां येण्यासारखी होती. पुष्कळ अशिलांचे पैसे माझ्यापाशीं असत. त्यांच्यापैकीं एकाची अनुमति घेऊन सुमारें एक हजार पौंड त्याच्या पैशांतून दिले. हा अशील थोर मनाचा व श्रद्धाळू होता. तो प्रथम गिरमिटांत आला होता. त्यानें सांगितलें, " भाई, आपका दिल चाहे तो पैसे देदो. मैं कुछ ना जानूं. मैं तो आपही को जानता हूं. " त्याचें नांव बद्री. त्यानें सत्याग्रहामध्यें फार मोठा भाग घेतला होता. तुरुंगवासहि भोगला होता. एवढ्या संमतीवरून मी त्याचे पैसे कर्जाऊ दिले. दोनतीन महिन्यांतच कळून चुकलें, कीं हे पैसे परत येण्याची आशा नको. एवढ्या मोठ्या रकमेचें नुकसान सोसण्याची माझी ताकद नव्हती त्याच पैशांत मला इतर कामें करतां येण्यासारखीं होतीं. पैसे परत मिळाले नाहीतच, पण माझ्या विश्वासावर राहाणाऱ्या बद्रीचे पैसे बुडून कसें चालेल? तो फक्त मलाच ओळखीत होता. त्याचे पैसे मी भरले.

एका अशीलमित्राशीं मी या रकमेच्या व्यवहाराची गोष्ट बोललों, त्यानें मला गोड शब्दांत दोष देऊन सावध केलें :

" भाई, ( दक्षिण आफ्रिकेंत मी महात्मा बनलों नव्हतों, ' बापू 'हि झालों नव्हतों. अशीलमित्र मला ' भाई ' या नांवानें संबोधीत. ) हें काम तुमच्यासारख्याचें नव्हे, बरें का? आम्ही तुमच्या विश्वासावर चालणार. हे पैसे परत तुमच्या हातीं लागायचे नाहींच आहेत. बद्रीचे पैसे तुम्ही भरून द्याल आणि स्वतःचे घालवाल; पण असल्या सुधारणांच्या कामीं सगळ्या अशिलांचे पैसे गुंतवूं लागलेत, तर अशीलहि मरतील आणि तुम्ही भिकारी होऊन घरीं बसाल. त्यांत तुमच्या सार्वजनिक कामाचीहि हानि होईल."

सुदैवानें हा मित्र अद्याप हयात आहे. दक्षिण आफ्रिकेंत काय किंवा येथें काय, त्याच्याहून अधिक निर्मळ अंतःकरणाचा मनुष्य मला आढळलेला नाहीं.

कोणाहि माणसाविषयीं मनांत शंका उद्भवली असेल, तर ती खोटी असल्याचें लक्षांत येतांच लगेच त्या माणसाची माफी मागून स्वतःचा अंतरात्मा साफ करून टाकीत असें. मला या अशिलाची सूचना पटली. बद्रीचे पैसे मला भरतां आले; पण त्याच वेळीं आणखी एक हजार पौंडांचें नुकसान आलें असतें, तर तें भरण्याची माझी बिलकुल ताकद नव्हती. मला कर्जांत सांपडावें लागलें असतें. तेवढें काम मीं माझ्या संबंध आयुष्यांत कधीं केलें नाहीं; आणि त्याबद्दल माझ्या मनांत नेहमीच नापसंती राहिलेली आहे. माझ्या लक्षांत आलें, कीं सुधारणेच्या लोभानेंहि स्वतःच्या शक्तीपलीकडे जाणें बरें नाहीं. ही गोष्टहि माझ्या लक्षांत आली, कीं हा व्यवहार करण्यामध्यें मीं गीतेच्या तटस्थ निष्काम कर्माच्या मुख्य शिकवणीचा भंग केला होता. ही चूक मला धोक्याच्या बत्तीप्रमाणें उपयोगी पडली.

शाकाहारासाठीं असलें बलिदान करण्याचें माझ्या कल्पनेमध्यें नव्हतें. माझ्या हातून हें अनिच्छया पुण्याचरण घडलें.

●●●

७

# मातीचे व पाण्याचे प्रयोग

माझ्या राहाणीमध्यें साधेपणा वाढत चालला तसतशी आजारासाठीं औषधें घेण्याबद्दलची नाखुषी, जी मुळापासूनचीच होती, तीहि वाढत गेली. मी डरबनमध्यें वकिली करीत असतांना डॉक्टर प्राणजीवनदास मेहता मला न्यायला आले होते; त्या वेळी मला अशक्तता वाटत असे, आणि कधीं कधीं सूजहि येई. त्यावर त्यांनी उपचार केले व मला गुण वाटला. त्यानंतर हिंदुस्थानांत परत येईपर्यंत मला म्हणण्यासारखें दुखणें आल्याचें स्मरत नाही.

पण जोहानिसबर्गमध्यें मला बद्धकोष्ठ होई; आणि वेळोवेळीं डोकें दुखूं लागे. शौचाचें कांहीं तरी औषध घेऊन तब्येत जेमतेम सांभाळून ठेवीत असें. खाण्यांत पथ्य नेहमीं पाळीतच असें; परंतु तेवढयानें मी पूर्ण व्याधिमुक्त झालों नाही. रेचकाच्या त्रासांतून सुटका होईल, तर बरें असें मनांत वारंवार येई.

मँचेस्टरमध्यें "नो ब्रेकफास्ट असोसिएशन्" (न्याहारीनिषेध संस्था) स्थापन झाल्याचें वाचलें; त्यांचें म्हणणें असें होतें, कीं इंग्रज लोक फार वेळां आणि फार खातात; रात्रीं बारा वाजेपर्यंत खात राहातात, आणि मग डॉक्टरांची घरें धुंडाळीत बसतात. या उपाधींतून सुटायचें असेल तर सकाळचें खाणें

‘ब्रेकफास्ट’ सोडून द्या. हा युक्तिवाद मला जरी पूर्णपणें लागूं पडत नव्हता तरी अंशतः लागूं पडतो असें मला दिसलें. मी तीनदां पोटभर जेवीत असें. आणि शिवाय दुपारचा चहाहि घेई. अल्पाहारी असा मी कधीं नव्हतोंच. शाकाहारी आणि मसाल्यांचा त्याग हीं साधून जेवणांत जेवढा मिष्टपणा आणतां येईल तेवढा आणीतच असें. सहासात वाजण्यापूर्वी क्वचित्‌च उठत असें. त्यावरून माझ्या मनानें घेतलें, कीं मीहि जर सकाळचें खाणें सोडून दिलें तर डोकेंदुखींतून अवश्य मुक्त होईन. मी सकाळचें खाणें सोडलें. कांही दिवस कठिण वाटलें. परंतु डोकें दुखणें कायमचें बंद झालें. त्यावरून मीं अनुमान काढलें, कीं माझा आहार जरूरीपेक्षां जास्त असे.

पण बद्धकोष्ठाची तक्रार या फेरफारानें दूर झाली नाहीं. क्यूनीचे कटिस्नानाचे उपचार केले; त्यानें थोडा आराम वाटला, पण पुरा फरक पडला नाहींच. इतक्यांत वर उल्लेख केलेल्या जर्मन खाणावळ्यानें का दुसऱ्या कोणी तरी माझ्या हातांत जुस्टकृत ‘रिटर्न टु नेचर’ (परत निसर्गाकडे चला) नांवाचें पुस्तक दिलें. त्यांत मीं मातीच्या उपचारांसंबंधीं वाचलें. सुकीं व ताजीं फळें हाच माणसाचा नैसर्गिक आहार आहे, या गोष्टीचेंहि सदर लेखकानें जोरानें समर्थन केलें आहे. केवळ फलाहार करण्याचा प्रयोग मीं त्या वेळीं सुरू केला नाहीं, पण मातीचे उपचार लगेच सुरू केले. त्याचा माझ्यावर आश्चर्यकारक परिणाम झाला. उपचाराची पद्धति पुढीलप्रमाणें : शेतांतील स्वच्छ तांबडी किंवा काळी माती घ्यावी, तिच्यांत पाणी घालावें, ती स्वच्छ पातळ ओल्या फडक्यांत गुंडाळून पोटावर ठेवावी व वर पट्टी बांधावी. ही घडी रात्रीं निजते वेळीं मी बांधीत असें आणि सकाळीं किंवा रात्रीं जागा झालों, तर त्या वेळीं काढून टाकीत असें. त्यामुळें माझें बद्धकोष्ठ पार नाहींसें झालें. हे मातीचे उपचार त्यानंतर मी स्वतःवर आणि माझ्या अनेक सोबत्यांवर केले; आणि ते फार करून कोणाचे बाबतींत निष्फळ ठरल्याचें मला स्मरत नाहीं.

देशीं आल्यानंतर मी असल्या उपचारांसंबंधींचा आत्मविश्वास गमावून बसलों आहें. प्रयोग करण्याला, एके ठिकाणीं स्थिर होऊन बसायला, मला सवडहि मिळालेली नाहीं. तरीहि मातीच्या व पाण्याच्या उपचारांवरील माझी श्रद्धा बहुतांशीं आरंभीं होती तशीच आजमितीला आहे. आजमुद्धां मर्यादा सांभाळून मातीचे प्रयोग स्वतःवर तर मी करतोंच, आणि प्रसंगी सोबत्यांनाहि करण्याची सल्ला देतों. माझ्या आयुष्यांत मी दोनदां जिवावरचें दुखणें भोगून पार पडलों आहें; तरीहि माझी समजूत आहे, कीं माणसाला औषधें घेण्याची विशेष जरूरी नाहींच; पथ्य आणि पाणी व माती इत्यादींच्या घरगुती उपायांनीं हजारांतले नऊशेंनव्याण्णव रोगी बरे होऊं शकतील.

उठल्यासुटल्या वैद्य, हकीम आणि डॉक्टरांकडे धांव मारल्यानें आणि शरीरांत नाहीं नाहीं ते अर्क, रसायनें कोंबल्यानें मनुष्य स्वतःचें आयुष्य संपुष्टांत आणतो. एवढेंच नव्हे, तर स्वतःच्या मनावरील ताबा गमावून बसतो; आणि पुढें मनुष्यत्वालाहि पारखा होऊन शरीराचा स्वामी राहाण्याऐवजीं त्याचा गुलाम बनून जातो.

दुखणाईत बिछान्यांत पडल्या पडल्या मी हें लिहीत आहें, एवढ्यावरून कोणी माझ्या या विचारांची अवगणना करूं नये. माझ्या आजाराचीं कारणें मला माहीत आहेत. माझ्याच दोषांमुळें मी आजारी पडलों, याचें मला पूर्ण ज्ञान व भान आहे; आणि ती जाणीव असल्यामुळेंच मी धीर सोडीत नाहीं. या आजारांना मी ईश्वराचा अनुग्रह मानतों, आणि हरतऱ्हेचीं औषधें करण्याच्या मोहापासून दूर राहातों. माझ्या हट्टामुळें डॉक्टरमित्रांना मी कंटाळा आणतों हेंहि मला समजतें; पण ते उदार मनानें माझा हट्ट सहन करतात व माझा त्याग करीत नाहींत.

पण माझ्या सध्यांच्या स्थितीचें वर्णन लांबविणें योग्य नाहीं. सबब आपण सन १९०४–५ कडे वळूं या.

परंतु तत्संबंधी अधिक विचार करण्यापूर्वी वाचकाला थोडा इशारा देणें आवश्यक आहे. हें वाचून कोणी जुस्टचें पुस्तक विकत घेतील, तर त्यांनीं त्यांतलें सर्व कांहीं वेदवाक्य मानून चालूं नये. सर्व लेखामध्यें लेखकाची एकांगी दृष्टि बहुधा असतेच. पण प्रत्येक वस्तूकडे कमींत कमी सात दृष्टीनें पाहातां येतें; आणि त्या त्या दृष्टीनें ती ती वस्तू खरी असते. पण सर्वच भिन्न दृष्टि एकाच वेळीं आणि एकाच प्रसंगीं खऱ्या असणें शक्यच नाही. शिवाय पुष्कळ पुस्तकांमध्यें गिऱ्हाइकी व नांवलौकिक यांच्या हव्यासाचा दोषहि असतो. म्हणून जे कोणी सदरहू पुस्तक वाचतील त्यांनीं ते विवेकपूर्वक वाचावें, आणि कांहीं प्रयोग करणें असल्यास कोणा अनुभवी इसमाचा सल्ला मिळवावा; किंवा घाई न करतां असल्या गोष्टींचा थोडा अभ्यास करून नंतर प्रयोग हातीं घ्यावे.

●●●

# ८

# एक इशारा

प्रवाहपतित कथाभाग अजून पुढच्या प्रकरणांत तहकूब ठेवावा लागत आहे.

गेल्या प्रकरणांत मातीच्या प्रयोगांसंबंधीं मी जें लिहिलें, त्या धर्तीचाच माझा आहाराचाहि प्रयोग होता. म्हणून त्यासंबंधी या वेळीं थोडें लिहून टाकणें उचित वाटतें. आणखी कांही गोष्टी प्रसंगोपात पुढें येतील.

आहारासंबंधींचे माझे प्रयोग आणि त्यासंबंधींचे माझे विचार यांचा विस्तार या प्रकरणामध्यें करतां येणार नाहीं. दक्षिण आफ्रिकेंत असतांना 'इंडियन ओपिनियन्' साठीं लिहिलेल्या 'आरोग्याविषयीं सामान्य माहिती'* नांवाच्या पुस्तकामध्यें यासंबंधीं विस्तृत विवेचन केलें आहे. माझ्या छोट्या पुस्तकांपैकीं हें पुस्तकच पाश्चात्य देशांत तसेच येथेंहि सर्वांत अधिक प्रसिद्धि पावलें आहे. त्याचें कारण अद्यापपर्यंत माझ्या ध्यानांत येत नाहीं. हें पुस्तक केवळ 'इंडियन् ओपिनियन्'-च्या वाचकांसाठीं लिहिण्यांत आलें होतें; पण त्याच्या आधारावर पुष्कळ बंधू-भगिनींनीं आपल्या जीवनामध्यें फेरफार केले आहेत, आणि माझ्याबरोबर पत्र-व्यवहार चालविला आहे. त्यामुळें त्यासंबंधीं येथें थोडें लिहिण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. कारण कीं, जरी त्यांत नमूद केलेल्या माझ्या विचारांमध्यें फेरफार करण्याची आवश्यकता मला जाणवलेली नसली, तरी माझ्या आचरणामध्यें मीं महत्त्वाचा फेरफार केलेला आहे, याची त्या पुस्तकाच्या वाचकांना खबर नसते. त्यांना ही गोष्ट माहीत होणें अगत्याचें आहे.

हें पुस्तक लिहिण्यांतील हेतु—इतर पुस्तकांचाहि तसाच—सर्वस्वीं धार्मिक होता, आणि माझ्या हरेक कृत्यामध्यें आजहि तोच हेतु असतो. त्यामुळें त्यांतील कांहीं विचारांचा मी सध्यां अंमल करूं शकत नाहीं, याचा मला खेद वाटतो,—शरम वाटते.

मला असा दृढ विश्वास वाटतो, कीं मनुष्य बाल्पणीं आईचें दूध पितो, त्या व्यतिरिक्त इतर दुधाची त्याला आवश्यकता नाहीं. मनुष्याचा आहार सुकीं व ताजीं पक्क फळें हाच होय. बदामासारख्या बीजांपासून आणि द्राक्षासारख्या फळांमधून त्याच्या शरीराला व बुद्धीला भरपूर पोषण मिळूं शकतें. अशा तऱ्हेच्या आहारावर जो कोणी राहील त्याला ब्रह्मचर्यादि आत्मसंयमन फारच सोपें जातें.

---

* या पुस्तकाचें श्री. भाई कोतवाल यांनीं 'स्वास्थ्यसंरक्षण' या नांवाखालीं केलेलें मराठी भाषांतर मनोरंजक ग्रंथप्रकाशक मंडळीनें प्रसिद्ध केलें आहे.

' आहार तसा ढेकर ', ' मनुष्य खातो तसा बनतो ' या म्हणींमध्यें पुष्कळ तथ्य आहे, असा माझा आणि माझ्या सोबत्यांचा अनुभव आहे.

याच विचारांचें विस्तृत समर्थन आरोग्यासंबंधींच्या सदर पुस्तकामध्यें केलेलें आहे.

परंतु हिंदुस्थानांत माझा प्रयोग संपूर्णतेला नेण्याचें माझ्या नशिबीं नव्हतें. खेडा जिल्ह्यांत सैनिकभरतीचें काम करीत असतां स्वतःच्याच चुकीमुळें मी मृत्यु-शय्येवर पडलों. दुधावांचून जगण्याची मीं खूप धडपड केली. ओळखीच्या सर्व वैद्य, डॉक्टर, रसायनशास्त्र्यांची मदत मागितली; कोणी मुगाचें पाणी, कोणी मोहाचें तेल, कोणी बदामाचें दूध वगैरे सुचविलीं. या सर्व वस्तूंच्या प्रयोगांखालीं मीं शरीराची बाकी ठेविली नाहीं: तरीसुद्धां धरलेलें अंथरूण सुटेना.

वैद्यांनीं मला चरक इत्यादि ग्रंथांतून श्लोक काढून दाखविले, कीं व्याधि दूर करण्यासाठीं खाद्याखाद्यांचा विधिनिषेध सोडून देण्यास हरकत नाही; मांसहि खुशाल खावें. असले वैद्य मला दुधाचा त्याग कायम टिकविण्याच्या कामीं मदत कोठून करूं शकणार? जेथें ' बीफ टी ' ( गोमांसाचा काढा ) आणि ब्रँडीलाहि मुभा आहे, त्या ठिकाणाहून दूध वर्ज्य करण्याच्या कामीं मदत कशी मिळावी? मला गाईम्हशींचें दूध तर वर्ज्यच होतें. मी तसें व्रतच घेतलें होतें. व्रताचा हेतु सर्व प्रकारचें दूध वर्ज्य करण्याचा होता. पण व्रत घेते वेळीं माझ्या दृष्टीपुढें गोमाता आणि महिषीमाताच होत्या. म्हणून, आणि जगण्याचा लोभ म्हणून, मीं मनाची कशीबशी समजूत केली; व्रताचें अक्षर तेवढें पाळलें, आणि बकरीचें दूध प्यायला सुरवात केली. माझ्या व्रताचा आत्मा ठार झाला, ही गोष्ट बकरीमातेचें दूध सुरू करते वेळींहि माझ्या लक्षांत आली होती.

परंतु मला ' रौलेट ॲक्ट ' विरुद्ध झुंजायचें होतें. तो मोह मला सोडीत नव्हता. त्यामुळें जगण्याचीहि इच्छा होती. अशा तऱ्हेनें ज्याला मी माझ्या आयुष्यांतील महान् प्रयोग मानतों तो खडकून पडला.

खाण्यापिण्याशीं आत्म्याचा संबंध नाहीं. आत्मा खातहि नाहीं व पीतहि नाहीं. आत्म्याचा हानि-लाभ पोटांत काय गेलें न गेलें त्यापासून होत नाहीं, तर जें वाणींतून बाहेर पडतें, त्यापासून होतो, इत्यादि युक्तिवाद मला माहीत आहेत. त्यांच्यामध्यें तथ्यांशहि आहे. पण त्या युक्तिवादांत न शिरतां मी येथें मनाचा दृढ निश्चयच नमूद करतों, कीं जो मनुष्य ईश्वराला भिऊन चालूं इच्छितो, जो ईश्वराचें प्रत्यक्ष दर्शन करूं इच्छितो अशा साधकाच्या किंवा मुमुक्षूच्या बाबतींत स्वतःच्या आहाराची निवडानिवड—त्याग व स्वीकार—तितकीच आवश्यक आहे, कीं जितकी विचार व वाणीची निवडानिवड त्याग आणि स्वीकार—आवश्यक आहे.

पण ज्या बाबतींत मीं स्वतःच हार खाल्ली आहे, त्या बाबतींत इतरांना माझ्या आधारानें चालण्याची सल्ला मी देणारच नाहीं; उलट त्यांना परावृत्त करीन. म्हणून आरोग्याच्या पुस्तकाच्या आधारें प्रयोग करणाऱ्या सर्व बंधूभगिनींना मी सावधान करूं इच्छितों. दुधाचा त्याग सर्वांशीं हितकारक वाटला किंवा अनुभवी वैद्य, डॉक्टरांनीं त्याचा त्याग करण्याची सल्ला दिली असली, तर ठीकच आहे; नाहींपेक्षां माझ्या पुस्तकाच्या आधारें कोणीं दूधदुभतें वर्ज्य करूं नये. माझ्या येथील अनुभवावरून अजूनपर्यंत तरी मला असेंच दिसत आहे, कीं ज्याची पचनशक्ति मंद झाली आहे किंवा जो अंथरुणाला खिळलेला आहे, त्याला दुधासारखा हलका व पौष्टिक आहार दुसरा नाहींच. म्हणून पुस्तकामध्ये दुधाच्या गुणांसंबंधीं मर्यादा दर्शविलेली आहे, तीच घेऊन न बसण्याबद्दल त्या पुस्तकाच्या वाचकांना माझी विनंति व शिफारस आहे.

हें प्रकरण ज्यांच्या वाचनांत येईल अशा वैद्य, डॉक्टर, हकीम किंवा इतर अनुभवी गृहस्थांनीं, त्यांना दुधाच्या जागीं चालूं शकेल अशी तितकीच पोषक व तरीसुद्धां पचायला हलकी अशी वनस्पति, ग्रंथवचनांवरून नव्हे, तर स्वतःच्या अनुभवाच्या आधारें, माहीत असेल तर मला कळविल्यास उपकार होतील.

## ९

# बलवानाशीं दोन हात

आतां एशियाटिक अंमलदारांकडे नजर वळवूं या. एशियाटिक अंमलदारांचें सर्वांत मोठें ठाणें जोहानिसबर्गमध्यें होतें. या ठाण्यामध्यें हिंदी, चिनी वगैरेंचें रक्षण नव्हे पण भक्षण चाललेलें मला दिसत होतें. माझ्यापाशीं रोज फिर्यादी येत. "हक्कदारांना येतां येत नाही, आणि बिनहक्कदार शंभर शंभर पौंड भरून बिनधोक येत असतात. याचा इलाज तुम्ही नाही तर कोण करणार?" मलाहि तसेंच वाटत होतें. ही घाण निघाली नाही, तर माझ्या ट्रान्सवालांत राहाण्याचा उपयोग काय?

मी पुरावा जमवूं लागलों. माझ्यापाशी भरपूरसा पुरावा जमला, तेव्हां मी पोलीसकमिशनरपाशीं गेलों. त्याच्या अंगीं मला दया व न्याय दिसून आली. माझें बोलणें मुळांतच न झिडकारतां त्यानें शान्तपणें ऐकून घेतलें, व पुरावा रुजू करायला सांगितलें. साक्षीदारांची स्वतःच तपासणी केली. त्याची खात्री पटली. परंतु माझ्याप्रमाणें त्यालाहि माहीत होतें, कीं दक्षिण आफ्रिकेमध्यें गोऱ्या

गुन्हेगाराला शिक्षा देवविणें कठिण होतें. " तरी पण आपण प्रयत्न तर करूं या. असले गुन्हेगार ज्यूरीच्या हातून सुटून जातील या भयानें त्यांना पकडावयाचेंच नाहीं हेंहि बरोबर नाहीं. सबब मी त्यांना पकडणार. माझ्याकडून प्रयत्नांत मागें घेणार नाहीं, एवढ्याबद्दल तुम्हांला खात्री देतों, " असें तो म्हणाला.

मला खात्री होतीच. इतर अंमलदारांनासुद्धां शंका तर होतीच, पण त्यांच्याविरुद्ध मला मिळालेला पुरावा कच्चा होता. दोघांबद्दल शंकेला मुळींच जागा नव्हती; म्हणून दोघांवर वॉरंटें निघालीं.

माझ्या हालचाली गुप्त राहाण्यासारख्या नव्हत्याच. मी बहुधा रोज पोलीसकमिशनरकडे जात असें, हें पुष्कळांना दिसत होतें. या दोन अंमलदारांचे लहानमोठें हेरहि होतेच. ते माझ्या ऑफिसवर पाळत ठेवून माझ्या येण्याजाण्याची बातमी त्या अंमलदारांना देत. येथें मला हेंहि सांगितलें पाहिजे, कीं सदरहू अंमलदारांचा त्रास इतका बेसुमार होता, कीं त्यांना हेरहि विशेष मिळण्यासारखे नव्हते. हिंदी लोकांप्रमाणेंच चिनी लोकांची मला मदत नसती, तर हे अंमलदार हातीं लागलेच नसते.

त्या दोघां अंमलदारांपैकीं एकजण पळाला. पोलीसकमिशनरनें बाहेरचें वॉरंट काढून त्याला पकडून आणविला. खटला चालला. पुरावाहि भक्कम पडला. तरीसुद्धां, आणि एकजण पळून गेला असल्याबद्दल ज्यूरीपाशीं पुरावा असूनहि दोघेहि सुटले !

माझी फार निराशा झाली. पोलीसकमिशनरलाहि वाईट वाटलें. वकिलीच्या धंद्याबद्दल माझ्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला. बुद्धीचा उपयोग गुन्हा छपविण्याच्या कामीं होत असलेला पाहून मला बुद्धिच अप्रिय वाटूं लागली.

दोघांहि अंमलदारांच्या गुन्ह्याचा इतका बभ्रा झाला होता, कीं ते सुटले तरीसुद्धां सरकारला त्यांना नोकरींत ठेवणें अशक्य झालें. दोघेहि बडतर्फ झाले आणि एशियाटिक खातें कांहींसें चोख झालें, त्यापासून आमच्या समाजाला धीर आला आणि हिंमतहि वाटूं लागली.

माझी प्रतिष्ठा वाढली. धंद्याची वाढ झाली. जमातीचे शेंकडों पौंड दरमहिन्याला लांचामध्येंच जात, त्यांपैकीं पुष्कळसे वांचले; सर्वच वांचले असें म्हणतां येणार नाहींच. अप्रामाणिक होते ते अजूनसुद्धां चरतच होते, पण प्रामाणिक लोक स्वतःचा प्रामाणिकपणा टिकवून धरूं शकले एवढें तरी म्हणतां येईल.

मी सांगूं शकतों, कीं हे अंमलदार जरी इतके अधम असले, तरी त्यांच्याशीं माझा खासगी द्वेष तिळमात्र नव्हता. हा माझा स्वभाव ते जाणत होते. आणि त्यांना त्यांच्या कंगालपणाच्या कालीं मदत करण्याचा प्रसंग जेव्हां माझ्यावर आला, तेव्हां मीं तीहि केली. मीं हरकत घेतली नाहीं, तर जोहानिसबर्ग म्युनिसि-

पालिटीमध्यें त्यांना नोकरी मिळण्यासारखी होती. त्यांचा एक मित्र मला येऊन भेटला, आणि मीं त्यांना नोकरी मिळवून देण्याच्या कामीं मदत करण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें त्यांना नोकरी मिळालीहि.

या कृत्याचा परिणाम असा झाला, कीं ज्या गोऱ्या लोकांशी माझा संबंध येई ते माझ्याविषयीं निर्भय बनूं लागले; आणि जरी मला त्यांच्या खात्याविरुद्ध पुष्कळदां झगडावें लागलें, कडक भाषा वापरावी लागली, तरी ते माझ्याशीं मित्रत्वाचा संबंध ठेवीत असत. अशा तऱ्हेची वर्तणूक माझ्या हाडांतच होती. याची मला त्या वेळीं जाणीव नव्हती. असल्या वर्तनामध्येंच सत्याग्रहाचें बीज आहे, तें अहिंसेचें एक महत्त्वाचें अंग आहे, हें मला मागाहून समजूं लागलें.

मनुष्य व त्याची कृत्यें या दोन स्वतंत्र वस्तू आहेत. चांगल्या कृत्यांबद्दल आदर आणि वाईटाबद्दल तिरस्कार अवश्य वाटला पाहिजे. बरीवाईट कृत्यें करणाऱ्या माणसांबद्दल मात्र अनुक्रमें आदर किंवा दया वाटली पाहिजे. ही गोष्ट समजण्यास सोपी आहे. असें असून तिचा अंमल कमींत कमी होत असतो. त्यामुळेंच या जगांत जहर पसरत असतें.

अशा तऱ्हेची अहिंसा हें सत्याच्या शोधाचें मूळच आहे. तें हातीं आलें नाहीं तोंपर्यंत सत्य सांपडणें अशक्य आहे. या गोष्टीचा मला क्षणोक्षणीं अनुभव येत आहे. तंत्राविरुद्ध झगडा केलेला शोभेल, तंत्रीविरुद्ध झगडा करणें म्हणजे स्वतःशींच झगडण्याप्रमाणें आहे. कारण आपण सर्व एकाच ब्रशानें रंगविलेलीं चित्रें आहों. एकाच ब्रह्मदेवाची प्रजा आहों. तंत्रीच्या ठिकाणीं अनंत शक्ती सांठविलेल्या आहेत. तंत्रीचा अनादर–तिरस्कार–करायचा म्हणजे त्या शक्तीचा अनादार होतो, आणि तसें करण्यानें तंत्री व जग दोघांनाहि नुकसान पोचतें.

●●●

## १०

# एक पुण्यस्मरण आणि प्रायश्चित्त

माझ्या जीवनयात्रेमध्यें अशा तऱ्हेचे प्रसंग वारंवार घडून आले आहेत, कीं ज्यामुळें मी भिन्न धर्मांच्या व जातींच्या लोकांच्या निकट सहवासामध्यें येऊं शकलों. या सर्वांच्या अनुभवावरून एवढें सांगतां येईल, कीं आप्त आणि परके, देशी आणि परदेशी, गोरे आणि काळे, हिंदु आणि मुसलमान किंवा खिस्ती, पारशी किंवा यहुदी यांच्यामध्यें भेद कसा तो माझ्या मनाला कधीं शिवलेलाहि नाहीं. माझें हृदय असले भेद ओळखूंच शकत नाहीं, असें मीं सांगूं शकतों.

हा मी माझा सद्गुणहि समजत नाहीं. कारण कीं, ज्याप्रमाणें अहिंसा, ब्रह्मचर्य, अपरिग्रह इत्यादि यम अभ्यासिण्याचा प्रयत्न केल्याची व तो प्रयत्न अजूनहि चालू असल्याची मला पूर्ण जाणीव आहे, त्याप्रमाणें या प्रकारचा अभेद शिकण्याचा कधीं मीं मुद्दाम म्हणून प्रयत्न केला असेल असं मला स्मरत नाहीं.

डरबनमध्यें मी वकिली करीत होतों, त्या वेळीं माझे कारकून पुष्कळदां माझ्याबरोबरच राहात असत. त्यांत हिंदूहि असत आणि ख्रिस्तीहि असत; आणि प्रांतवार बोलायचें तर, गुजराथी आणि मद्रासी असत. त्यांच्याबद्दल माझ्या मनांत कधीं भेदभाव उत्पन्न झाल्याचें मला स्मरत नाहीं. त्यांना मी कुटुंबांतलेच मानीत असें; आणि पत्नीकडून त्या बाबतीत कांहीं विघ्न आल्यास तिच्याबरोबर झगडतहि असें. एक कारकून ख्रिस्ती होता. त्याचे आईबाप पंचम जातीचे होते. आमच्या घराची बांधणी पाश्चात्य पद्धतीची होती. त्यांत खोल्यांमध्यें मोरी असत नाहीं—असणें योग्यहि नाहीं असें मला वाटतें—त्यामुळें दरेक खोलींत मोरी-ऐवजी लघवीसाठीं एक भांडें असतें. तें उचलण्याचें काम नोकराचें नव्हतें, आमचेंच यजमान–यजमानिणीचें होतें. जे कारकून स्वतःला घरच्याप्रमाणें समजूं लागत ते स्वतः आपापलें भांडें उचलीतहि. हे पंचम कुळांत जन्मलेले कारकून नवे होते. त्यांचें भांडें आम्हांलाच उचललें पाहिजे. इतर भांडीं कस्तुरबाई उचलीत असे, परंतु हा तिच्या मतें कडेलोट झाला. आमच्यामध्यें धुसफूस झाली. मी उचलावें तर तेंहि तिला कबूल नाहीं, आणि स्वतः उचलणेंहि तिला जड वाटलें. डोळ्यांतून अश्रुबिंदूंचीं मोत्यें ढाळणाऱ्या, हातांत भांडें धरलेल्या, स्वतःच्या तांबड्या लाल डोळ्यांनीं मला ठपका देत असलेल्या, जिन्यावरून उतरणाऱ्या कस्तुरबाईचें चित्र मी या घटकेलाहि रेखाटूं शकतों.

पण मी जसा प्रेमळ तसाच घातकी पति होतों. मी स्वतःला तिचा शिक्षकहि समजत असें; आणि त्यावरून आपल्या आंधळ्या प्रेमाला वश होऊन तिला नकोसेंहि करीत असें.

अशा तऱ्हेनें तिनें फक्त भांडें उचलल्यानें माझें समाधान झालें नाहीं. ती हंसतमुखानें नेईल तेव्हां माझें समाधान होणार, म्हणून मीं दोन शब्द खड्या सुरांतच सुनावले, " असली धुसफूस माझ्या घरांत नाहीं चालणार " मी बडबडलों.

शब्द तीराप्रमाणें झोंबले.

पत्नीचा क्रोधाग्नि पेटला. " तर मग तुमचं घर आपल्यापाशींच ठेवा ! ही मी चाललें. "

ईश्वराचें स्मरण मला राहिलें नव्हतें, दयेचा बिंदुहि राहिला नव्हता. मीं हात धरला. जिन्याच्या समोरच बाहेर जाण्याचा दरवाजा होता. मी त्या असाहाय्य अबलेचा हात धरून दरवाजापर्यंत ओढीत नेली. दरवाजा अर्धा उघडला.

डोळ्यांतून गंगायमुना वाहत आहेत अशी कस्तुरबाई बोलली, " तुम्हांला एक लाज नाहीं, मला आहे. कांहीं तरी लाज धरा. मी बाहेर पडून जाणार कुठें ? इथें आईबापें तरी थोडींच आहेत, कीं त्यांच्याकडे तरी जाऊं. मी बायको पडलें. तेव्हां तुम्ही द्याल त्या लाथा मला खाल्ल्या पाहिजेत. आतां लाज धरा आणि दार बंद करा. कोणी पाहिलें तर दोघांपैकीं एकाचीहि शोभा राहाणार नाहीं."

मीं तोंड तर लालच्या लाल ठेवलें, पण शरमलों मात्र खरा. दरवाजा बंद केला. पत्नी जर मला सोडून जाऊं शकत नव्हती, तर मी तरी तिला टाकून कुठें जाणार होतों ? आमच्यामध्यें भांडणें पुष्कळ झालीं आहेत; पण नेहमीं परिणाम कल्याणप्रदच झाला आहे; पत्नीच्या स्वतःच्या अद्भुत सहनशक्तीच्या जोरावर जय मिळविला आहे.

हें वर्णन आज मी तटस्थ वृत्तीनें करूं शकतों; कारण हा प्रसंग आमच्या जुन्या युगींचा आहे. आज मी मोहान्ध पति नाहीं, शिक्षकहि नाहीं, मनांत आणल्यास कस्तुरबाईच आज मला धमकी देऊं शकेल. आज आम्ही कसलेले मित्र आहों. एकमेकांविषयीं निर्विकार होऊन वागत आहों. कोणत्याहि तऱ्हेच्या उपकारफेडीची अपेक्षा न करतां माझ्या दुखण्यामध्यें माझी शुश्रूषा करणारी ती सेविका आहे.

वरील बनाव १८९८ सालीं घडला. त्या वेळीं ब्रह्मचर्याच्या पालनासंबंधीं मला कांहीं कळत नव्हतें. तो काळ असा होता, कीं ज्या वेळीं पत्नी ही केवळ सहधर्मिणी, सहचारिणी आणि सुखदुःखांतील सोबतीण आहे, हें मला स्पष्टपणें कळत नव्हतें. मला आठवतें, कीं मी असेंच समजून चालत असें, कीं ती विषय-भोगाचें साधन आहे. पतीनें केलेली कसलीहि आज्ञा मानण्यासाठींच ती जन्माला आलेली आहे.

सन १९०० सालापासून माझ्या विचारांत गंभीर परिवर्तन झालें. तें १९०६ सालीं पूर्ण झालें. परंतु या परिवर्तनाची आपण योग्य स्थळीं चर्चा करूं.

येथें एवढें सांगितलें म्हणजे पुरे, कीं मी जसजसा निर्विकार होत गेलों, तसतसा माझा घरसंसार शान्त, निर्मळ आणि सुखाचा होत गेला आणि अद्यापहि होत आहे.

या पुण्यस्मरणावरून कोणी असें मानण्याचें मात्र कारण नाहीं, कीं आम्ही आदर्श दंपती आहों, किंवा माझ्या धर्मपत्नीमध्यें कसलाच दोष नाहीं, किंवा आमचे जीवनाचे आदर्श आतां तरी एकच आहेत. कस्तुरबाईचे कांहीं स्वतंत्र आदर्श आहेत, कीं नाहीं याची त्या बिचारीला स्वतःलाहि खबर नसेल. संभव आहे, कीं आजहि माझ्या आचरणांतील पुष्कळ गोष्टी तिला आवडत नसतील.

त्यासंबंधीं आम्ही कधीं चर्चा करीत नाहीं, करण्यांत अर्थ नाहीं. तिला तिच्या आईबापांनीं शिक्षण दिलें नाहीं किंवा वेळ होता तेव्हां मीहि देऊं शकलों नाहीं. पण तिच्यामध्यें एक गुण फार मोठ्या प्रमाणांत आहे, जो इतर पुष्कळ हिंदु स्त्रियांमध्यें कमीजास्त प्रमाणांत असतोच. रुचो न रुचो, कळो न कळो, माझ्या मागून येण्यामध्येंच तिनें स्वतःच्या जीवनाचें सार्थक मानलें आहे; आणि निर्मळ जीवन चालविण्याच्या माझ्या प्रयत्नामध्यें तिनें कधीं आडकाठी आणलेली नाहीं. त्यामुळें जरी आमच्या बुद्धिशक्तीमध्यें पुष्कळ अंतर असलें, तरीहि आमचें जीवन समाधानाचें, सुखाचें आणि ऊर्ध्वगामी आहे असें मला वाटतें.

● ● ●

११

# इंग्रजांचा निकट परिचय

हें प्रकरण लिहायला घेतांना असा प्रसंग आला आहे, कीं सत्याच्या प्रयोगांची ही कथा कशा तऱ्हेनें लिहिली जात आहे, त्याची मीं वाचकांना माहिती करून दिली पाहिजे.

कथा लिहिण्यास आरंभ केला त्या वेळीं माझ्यापाशीं कसलीच योजना तयार नव्हती. स्वतःपाशीं कसलीं पुस्तकें, रोजनिशीं किंवा इतर कागदपत्र घेऊन मी हीं प्रकरणें लिहीत नसतों. लिहिण्याच्या दिवशीं अंतर्यामीं मला वळवतो तसा लिहीत जातों, असें म्हणतां येईल. माझ्यामध्यें जी क्रिया चालते, ती अंतर्यामी-चीच म्हणावी कीं नाहीं तें मी निश्चयपूर्वक सांगूं शकत नाहीं. पण गेल्या कित्येक वर्षांपासून माझीं जीं कृत्यें मोठ्यांत मोठीं मानलीं गेलीं आहेत तीं आणि क्षुल्लकांत क्षुल्लक म्हणतां येतील तींहि मी ज्या पद्धतीनें करीत आलों आहें, ती पद्धति तपासतां तीं कृत्यें अंतर्यामीच्या प्रेरणेनेंच झालीं आहेत, असें म्हणणें मला अनुचित वाटत नाहीं.

अंतर्यामीला मीं पाहिलेला नाहीं, ओळखीतहि नाहीं. जगाला ईश्वरा-विषयीं वाटणारी श्रद्धा मी माझीशी केली आहे. ही श्रद्धा कोणत्याहि कारणानें पुसून जाणें शक्य नाहीं. म्हणून मी तिला श्रद्धेच्या रूपानें न ओळखतां अनुभव-रूपानेंच ओळखतों. तरीहि तिला अशा तऱ्हेनें अनुभवाची पदवी देणें म्हणजेहि एक प्रकारें सत्याचा भंग होय; म्हणून तिचें यथार्थपणें वर्णन करणारा शब्द माझे-पाशीं नाहीं असें म्हणणें हेंच कदाचित् अधिक योग्य ठरेल.

या अदृश्य अंतर्यामीच्या आज्ञेनुरूप मी ही कथा लिहीत आहें, अशी माझी समजूत आहे.

गेलें प्रकरण सुरू केलें तेव्हां त्याचा मथळा ‘ इंग्रजांच्या ओळखी ’ असा केला होता. पण प्रकरण लिहितां लिहितां माझ्या लक्षांत आलें, कीं त्या ओळखी-पर्यंत येण्यापूर्वीं मीं लिहिलें तें पुण्यस्मरण लिहिणें आवश्यक होतें. अर्थात् प्रकरण तशा तऱ्हेनें लिहिलें गेलें आणि लिहून झाल्यानंतर मूळ मथळा बदलावा लागला.

आतां हें प्रकरण लिहायला घेतों, तर पुन्हां नवीनच धर्मसंकट उपस्थित झालें आहे. इंग्रजांच्या परिचयाचें वर्णन करतांना काय सांगावें आणि काय सांगू नये हा एक महत्त्वाचा प्रश्न झाला आहे. मुद्द्याची गोष्ट राहून गेली, तर सत्याला बाध येणार. परंतु ही कथा लिहायला घेणें हेंच कदाचित् गैरमुद्द्याचें असण्याचा संभव आहे. त्यामुळे कोणती बाब मुद्द्याची आणि कोणती गैरमुद्द्याची याचा निकाल चटकन् करणेंहि मुष्किलीचें झालें आहे.

कसलीहि आत्मकथा असली तरी तिच्यातील अडचणी आणि इतिहास या नात्यानें तिची अपूर्णता यासंबधीं मी पूर्वी वाचलें होतें त्याचा अर्थ आतां जास्त स्पष्टपणें कळत आहे. सत्याच्या प्रयोगाच्या आत्मकथेमध्यें मला आठवणाऱ्या सर्वच गोष्टी मी देत नसतों हें उघडच आहे. सत्य उघड करण्यासाठीं मी काय काय सांगितलें पाहिजे कोणाला ठाऊक ! किंवा न्यायमंदिरामध्यें अपुऱ्या व एक-तर्फी पुराव्याची किंमत काय होणार ? कोणी रिकामा मनुष्य लिहिलेल्या प्रकरणां-वर माझी उलट तपासणी करूं लागला, तर याच प्रकरणावर आणखी किती बरें प्रकाश पाडील ? त्यांतूनहि तो टीका करण्याच्या दृष्टीनें तपासणी करूं लागला तर किती तरी ‘ ढोंगें ’ उघडकीला आणून जगाची करमणूक करूं शकेल आणि स्वतःहि फुलून जाईल.

या दृष्टीनें विचार करूं लागलें म्हणजे क्षणभर असेंच वाटूं लागतें, कीं हीं प्रकरणें लिहायचीं बंद करावीं हेंच बरें नाहीं का ? परंतु आरंभिलेलें काम, तें अनीतिमय आहे, असें स्पष्ट दिसत नाहीं तोंपर्यंत सोडूं नये,· या नियमास अनु-सरून अंतर्यामी मनाई करीपर्यंत हीं प्रकरणें लिहीत जावें अशा निर्णयावर मी आलों आहें.

ही कथा टीकाकाराचें समाधान करण्यासाठीं लिहिलेली नाहीं. हाहि सत्याच्या प्रयोगांपैकीं एक प्रयोगच आहे. शिवाय सोबत्यांनाहि त्यापासून थोडें-बहुत आश्वासन मिळेल ही दृष्टीहि आहेच. तिचा आरंभच त्यांच्या समाधानां-खातर केलेला आहे. स्वामी आनद आणि जयरामदास माझ्या मागें लागले नसते तर कदाचित् हें काम हातींच घेतलें नसतें. अर्थातच ही कथा लिहिण्यांत कांहीं दोष असल्यास तेहि त्यात भागीदार आहेत.

आतां मथळ्याला अनुसरून चालूं या. कारकून व इतर हिंदी सोबत्यांना ज्याप्रमाणें मी घरींच राहावून घेत असें, त्याचप्रमाणें इंग्रजांनाहि ठेवूं लागलों. हें माझें करणें माझ्याबरोबर राहाणाऱ्या सर्वांनाच पसंत होतें असें नाहीं; पण मीं आग्रहपूर्वक त्यांना ठेवून घेतलें. सर्वांना ठेवून घेण्यामध्यें नेहमीं शहाणपणाच होत होता असें म्हणतां येत नाहीं. कित्येक संबंधांपासून कटु अनुभवहि आले; पण तसले अनुभव देशी, परदेशी दोघांच्याहि बाबतींत आलेले आहेत. कटु अनुभवां-बद्दल मला पश्चात्ताप झालेला नाहीं. कडवे अनुभव आले असूनहि आणि मित्रांची गैरसोय होते, त्यांना तापत्रय होतो, हें कळत असतांहि मीं माझी संवय बदललेली नाहीं, व मित्रांनींहि ती उदार मनानें सहन केली आहे. नव्या नव्या माणसांशीं जोडलेले संबंध मित्रांना त्रासदायक झाले, तेव्हां मीं त्यांचाच दोष काढायलाहि कमी केलें नाहीं. माझी अशी समजूत आहे, कीं जो मनुष्य आस्तिक आहे, ज्याला स्वतःच्या अंतर्यामीं संचरणाऱ्या ईश्वराचा साक्षात्कार सर्वत्र करायचा आहे, त्यानें सर्वांबरोबर अलिप्त वृत्तीनें राहाण्याची कला साधलीच पाहिजे. आणि ही कला न बोलावतांहि प्रसंग येतील तेव्हां तेव्हां, त्यापासून दूर न पळतां नवीन नवीन संबंध पत्करीत गेल्यानें आणि ते पत्करूनहि रागद्वेषांपासून अलिप्त राहिल्यानेंच साधूं शकेल.

म्हणून बोअर-ब्रिटिश युद्ध सुरू झालें, त्या वेळीं माझें घर भरलेलें असतांहि मीं जोहानिसबर्गहून आलेल्या दोन इंग्रजांना घरीं ठेवून घेतलें. दोघेहि थिऑसॉ-फिस्ट होते. त्यांपैकीं एकाचें नांव किचन होतें. त्यांच्याशीं आपला पुढेंहि संबंध यायचा आहे. या मित्रांच्या सहवासापायीं पत्नीला रडवावीच लागली. तिच्या नशिबीं माझ्यापायीं रडण्याचे प्रसंग अनेक आले आहेत. इंग्रजांना कांहींएक आड-पडदा न ठेवतां इतक्या निकट सहवासांत ठेवण्याचा हा माझा पहिलाच अनुभव होता. इंग्लंडात मी त्यांच्या घरांत राहिलों होतों खरा, पण त्या वेळीं मीं त्यांची राहाणी उचललेली होती; आणि तें राहाणें झालें तरी बहुतेक खाणावळींत राहाण्यासारखेंच होतें. इथें त्याच्या उलट स्थिति. ते मित्र कुटुंबीजन बनले. ते बहुतांशी हिंदी रिवाजांना अनुसरून राहात असत. घरांत बाहेरचें सामानसुमान इंग्रजी पद्धतीचें असलें, तरी आंतली राहाणी व अन्न हिंदी पद्धतीचें होतें. त्यांना घरीं ठेवल्यामुळें कांहीं अडचणी उपस्थित झालेल्या मला आठवतात; तरी पण मीं एवढें अवश्य सांगूं शकतों, कीं दोघेहिजण घरच्या इतर माणसांशीं मिळून मिसळून राहात असत. जोहानिसबर्गमध्यें हे संबंध डरबनच्याहि पुढें गेले.

●●●

## १२

# इंग्रजांचा सहवास

जोहानिसबर्गमध्यें माझ्यापाशीं एका वेळीं चार हिंदी कारकून झाले होते. त्यांना कारकून म्हणावें कीं मुलगे तें मीं सांगूं शकत नाहीं. तेवढ्यावर माझें काम भागेना. टायपिंगशिवाय तर चालेचना. टायपिंगचें ज्ञान कांहीं असलेंच, तर तें एकट्या मलाच. या चार तरुणांपैकीं दोघांना टायपिंग शिकविलें, पण इंग्रजीचें ज्ञान कच्चें असल्यामुळें त्यांच्याकडून टायपिंग नीट होऊं शकेना. शिवाय हिशेब-नीसहि मला त्यांच्यांतून तयार केले पाहिजे होते. मनांत आणलें, तरी नाताळहून कोणाला बोलावून घेणें शक्य नव्हतें. कारण, कीं परवान्याखेरीज कोणाहि हिंदी इसमाला प्रवेश मिळत नसे; आणि स्वतःच्या सोयीसाठीं अंमलदारांची मेहेरबानी मागायला मी तयार नव्हतों.

मी पेंचांत पडलों. काम इतकें वाढलें, कीं किती मेहनत केली तरी वकिलीचीं कामें व सार्वजनिक कामें माझ्यानें आटोपत ना.

इंग्रज कारकून किंवा कारकुनीणबाई मिळाल्यास माझी हरकत नव्हती. पण 'काळ्या' आदमीकडे गोरा नोकरी कशी करील? याची मला धास्ती वाटत होती. पण मीं प्रयत्न करण्याचें ठरविलें. टाइपरायटिंग एजंट माझ्या साधारणशा परिचयाचा होता. त्याच्याकडे मी गेलों, आणि 'काळ्या' माणसाच्या हाताखालीं नोकरी करण्यास हरकत न मानणारी बाई किंवा भाई मिळाल्यास शोध करायला सांगितलें. त्या एजंटानें मला तशा तऱ्हेचा मनुष्य मिळवून देण्याची खटपट करण्याचें वचन दिलें. त्याला मिस् डिक नांवाची एक स्कॉच कुमारिका मिळाली. ती बाई नुकतीच स्कॉटलंडहून आली होती. प्रामाणिक नोकरी मिळेल तिथें करण्यास तिची हरकत नव्हती. तिला लवकर कामाला लागायचें होतें. त्या एजंटानें त्या बाईला माझ्याकडे पाठविली. प्रथमदर्शनींच ती माझ्या डोळ्यांत भरली.

मीं तिला विचारलें, "तुम्हांला हिंदी माणसाच्या हाताखालीं काम करायला हरकत वाटत नाहीं?"

तिनें मला दृढतापूर्वक जाब दिला, "बिलकुल नाहीं."

"तुम्हांला पगार काय पाहिजे?"

"साडेसतरा पौंड तुम्हांला अधिक वाटतात?" तिनें उत्तर दिलें.

"तुमच्याकडून मला आशा वाटते तें काम तुम्ही कराल, तर हा पगार मला बिलकुल जास्त वाटत नाहीं. तुम्ही केव्हां कामाला लागाल?"

" तुमची मर्जी असल्यास आतांहि. "

मी खूष झालों आणि त्या बाईला त्याच वेळीं समोर बसवून पत्राचा मजकूर सांगायला सुरुवात केली.

तिनें माझ्या कारकुनाचें नव्हेच पण, मला वाटतें औरस मुलीचें किंवा सख्ख्या बहिणीचें स्थान अल्प काळांतच सहजीं पटकावलें. मला तिला कधीं कोणतीहि गोष्ट आवाज चढवून सांगावी लागली नाहीं. तिच्या कामांत चूक क्वचित्‌च कधीं निघाली असेल. हजारों पौंडांची व्यवस्था एका काळीं तिच्या हातांत होती; आणि जमाखर्चहि तीच ठेवीत असे. तिनें माझा विश्वास पूर्णपणें संपादन केला होता. परंतु तिच्या गूढतम भावना जाणून घेण्याइतका तिचा विश्वास मी संपादन करूं शकलों याचेंच मला विशेष वाटतें. स्वतःचा सोबती पसत करण्याच्या कामीं तिनें माझा सल्ला घेतला. कन्यादान करण्याचेंहि सद्भाग्य मलाच प्राप्त झालें. मिस् डिक जेव्हां मिसेस् मॅक्डोनाल्ड झाल्या तेव्हां त्यांना मला सोडून जाणें भागच होतें. तरीहि विवाहानंतरसुद्धां विशेष अडचणीच्या प्रसंगीं मी त्यांच्याकडून वाटेल तेव्हां काम घेत असें.

पण ऑफिसांत कायमच्या एका शॉर्टहँड रायटरची जरूर होतीच. तेंहि काम झालें. त्या बाईचें नांव मिस् श्लेशिन्. तिला माझ्याकडे घेऊन येणारे मि. कॅलनबॅक होते. यांची ओळख वाचकांना पुढें होणार आहे. ही बाई एका हायस्कुलांत शिक्षिका म्हणून काम करीत आहे. माझ्यापाशीं ती आली तेव्हां तिचें वय सतरा वर्षांचें असावें. तिच्या कांहीं विचित्र गोष्टींपुढें मला व मि. कॅलनबॅकला हात टेकावे लागत. ती कांहीं नोकरी करायला आली नव्हती. तिला अनुभव मिळवायचा होता; रंगद्वेष तिच्या हाडांतच मुळीं नव्हता. ती कोणाची पर्वाहि ठेवीत नसे. वाटेल त्याचा पाणउतारा करायला मागें घेत नसे; आणि मनांत दुसऱ्याबद्दल जो विचार येईल तो स्पष्ट बोलून टाकण्याचा तिला संकोचहि वाटत नसे. या स्वभावामुळें ती कित्येकदां मला अडचणींत आणीत असे; पण तिच्या निर्भीड स्वभावामुळें सर्व अडचणी दूर होत. तिचें इंग्रजीचें ज्ञान मला माझ्याहून उच्च दर्जाचें वाटे म्हणून, आणि तिच्या विश्वासूपणाबद्दल पूर्ण खात्री होती म्हणून तिनें टाईप केलेल्या पुष्कळ कागदांवर मी ते पुन्हां न तपासतांच सही करीत असें.

तिच्या त्यागवृत्तीला सीमाच नव्हती. ती माझ्याकडून बराच काळपर्यंत दरमहा फक्त सहा पौंडच घेत असे; आणि शेवटपर्यंत दहा पौंडांपेक्षां अधिक घ्यायला तिची चक्क नाकबुली असे. मीं अधिक घ्यायला सांगितलें, तर उलट माझ्यावरच उसळून म्हणे, " मीं पगारासाठीं थोडीच राहिलें आहें ? मला तुमच्या-बरोबर हें काम करणें आवडतें, आणि तुमचीं ध्येयें मला आवडतात म्हणून राहातें आहें. "

माझ्याकडून तिनें स्वतःच्या गरजेसाठीं ४० पौंड घेतले होते; परंतु ते उसने म्हणून. गेल्या वर्षी ते सर्व पैसे तिनें परत पाठवून दिले.

तिची त्यागवृत्ति जशी उत्कट होती तशीच तिची हिंमतहि होती. स्फटिक-मण्याप्रमाणें पवित्र आणि क्षत्रियालाहि दिपवितील अशा शौर्यवान् स्त्रिया पाहाण्याचें सद्भाग्य मला प्राप्त झालेलें आहे; अशा स्त्रियांपैकीं या बालेला मी एक मानतों. आज तर ती एक मोठी प्रौढ कुमारिका आहे. आजची तिची मनःस्थिति मला पूर्णपणें माहीत नाहीं; पण माझ्या अनुभवांपैकीं या बालेचा अनुभव माझ्या बाबतींत नेहमींच पुण्यस्मरण म्हणून राहील. म्हणून मला तिच्यासंबंधीं जी माहिती आहे, ती लिहिली नाहीं, तर मी सत्याचा द्रोही ठरेन.

काम करतांना तिनें रात्र कीं दिवस पाहिलेला नाहीं. रात्रीं अपरात्रीं ती एकटी पाहिजे तिथें जायला निघे; आणि मी कोणाला तिच्याबरोबर द्यायचें म्हटलें, तर माझ्यावरच डोळे वटारी. हजारों दाढीवाले हिंदीहि तिच्याकडे आदरयुक्त दृष्टीनें पाहात आणि तिच्या अर्ध्या वचनांत राहात. आम्ही सगळे तुरुंगांत होतों, जबाबदारी घेण्याजोगा पुरुष विशेष कोणी मोकळा नव्हता, अशा वेळीं ती एकटीनें सगळा लढा संभाळीत होती. लाखों रुपयांचे हिशेब तिच्या हातांत, सर्व पत्रव्यवहार तिच्या हातांत, आणि ' इंडियन ओपिनियन् 'हि तिच्या हातांत, अशी स्थिति होती. पण तिला थकवा कसा तो माहीत नव्हता.

मिस् श्लेशिनविषयीं किती लिहिलें, तरी माझें समाधान व्हायचें नाहीं. पण गोखल्यांचें प्रमाणपत्र उतरून देऊन मी हें प्रकरण पुरें करतों. गोखल्यांनीं माझ्या सर्व सोबत्यांची ओळख करून घेतली होती. ओळख झाल्यानंतर पुष्कळांबद्दल त्यांना समाधान वाटलें होतें. त्यांना प्रत्येकाच्या चारित्र्याची आकारणी करण्याचा शोक असे. माझ्या सर्व हिंदी आणि युरोपियन सोबत्यांमध्यें त्यांनीं मिस् श्लेशिनला प्रमुख पद दिलें. " एवढा स्वार्थत्याग, इतकी पवित्रता, इतकी निर्भयता आणि एवढें कर्तृत्व हीं मीं थोड्यांतच पाहिलीं. माझ्या दृष्टीनें, तर तुमच्या सहकाऱ्यांमध्यें सर्वोच्च स्थान मिस् श्लेशिनचें आहे."



# १३
# ‘ इंडियन् ओपिनियन् ’

अजून आणखी इतर युरोपियनांशीं झालेल्या. निकट परिचयाचें वर्णन द्यायचें राहिलें आहे. पण त्यापूर्वीं दोन-तीन महत्त्वाच्या गोष्टींची नोंद करणें अगत्याचें आहे.

एक परिचय मात्र येथेंच देऊन टाकतों. मिस् डिकला ठेवण्यानेंच माझें सर्व काम भागण्यासारखें नव्हतें. मि. रिचविषयीं मीं अगोदर लिहिलेलेंच आहे. त्यांचा माझा चांगला परिचय होता. ते एका व्यापारी पेढीचे मुनीम होते. तेथून निघून माझ्या हाताखालीं आर्टिकल घेण्याची मीं त्यांस सूचना केली; ती त्यांना पटली आणि ते माझ्या ऑफिसांत रुजू झाले. त्यामुळें माझ्यावरील कामाचा बोजा कांहींसा हलका झाला.

याच सुमाराला श्री. मदनजितनीं ‘ इंडियन् ओपिनियन् ’ नांवाचें वर्तमान-पत्र काढण्याचा बेत केला. माझी सल्ला व मदत मागितली. छापखाना तें चाल-वीतच होते. वर्तमानपत्र काढण्याचा योजनेंत मी सामील झालें. या पत्राची उत्पत्ति १९०४ सालीं झाली. मनमुखलाल नाझर संपादक होते, पण संपादकत्वाचा खरा बोजा माझ्यावरच पडला. माझ्या नशिबीं बहुतेक नेहमींच दुरूनच वर्तमानपत्राची व्यवस्था चालविण्याचें आलेलें आहे.

मनसुखलाल नाझर संपादकत्व चालवूं शकले नसते असें कांहीं नाहीं. हिंदुस्थानमध्यें ते पुष्कळ वर्तमानपत्रासाठीं लिहीत असत. पण दक्षिण आफ्रिकेंतील भानगडींच्या प्रश्नांवर मी असतांना स्वतंत्र लेख लिहिण्याची त्यांनीं हिंमतच केली नाहीं. माझ्या विवेकशक्तीवर त्यांचा परिपूर्ण विश्वास होता. त्यामुळें ज्या ज्या विषयांवर लिहिणें जरूरीचें असेल त्यांवर लेख लिहून पाठविण्याची जबाबदारी ते माझ्यावर टाकीत.

हें पत्र साप्ताहिक होतें. आजमितीलाहि तसेंच आहे. सुरुवातीला तर तें गुजराथी, हिंदी, तामील व इंग्रजी इतक्या भाषांत निघे, पण मीं पाहिलें, कीं तामील व हिंदी भाग केवळ नांवाचेच होते. त्यांनीं समाजाची सेवा कसलीच होत नव्हती. हे विभाग ठेवणें मला कांहींसें ढोंगीपणाचें वाटलें, म्हणून ते विभाग बंद केले. त्यानें माझ्या मनाचें समाधान झालें.

या वर्तमानपत्रामध्यें मला कांहीं पैसे गुंतवावे लागतील अशी माझी कल्पना नव्हती; पण थोडक्याच मुदतींत मीं पाहिलें, कीं मी पैसे दिल्याखेरीज पत्र चालणें शक्य नाहीं. मी पत्राचा संपादक नसलों, तरी त्यांतील लेखांची जबाबदारी माझीच होती; हें हिंदी लोकांना व गोऱ्या लोकांना दोघांनाहि माहीत झालें होतें. पत्र

काढलेंच नसतें, तरी ठीक झालें असतें; पण काढल्यानंतर बंद पडल्यास ती समाजाच्या दृष्टीनें नामुष्कीची गोष्ट आहे व त्यापासून आमच्या समाजाला नुकसान पोंचेल असें मला वाटलें.

मी त्यांत पैसे ओतीत गेलों. आणि शेवटीं शेवटीं माझी सर्व शिल्लक त्यांतच जाई म्हणायला हरकत नाहीं. असा एक वेळ मला आठवतो, कीं तेव्हां मला दर महिन्याला ७५ पौंड पाठवावे लागत.

पण इतक्या वर्षांनंतरहि मला वाटतें, कीं या पत्रानें समाजाची सेवा भरपूर बजावली आहे. त्यांतून पैसे करण्याचा हेतु कोणाचाहि मुळापासूनच नव्हता.

तें माझ्या हातांत असेपर्यंत त्यांत झालेले फेरफार माझ्या जीवनांतील फेरफारांचें द्योतक होतें. ज्याप्रमाणें सध्यां ' यंग इंडिया ' आणि ' नवजीवन ' हीं माझ्या जीवनाच्या अमुक भागाचें काढलेलें सार आहे, त्याचप्रमाणें ' इंडियन् ओपिनियन् ' होतें. त्यांत मी दर आठवड्याला स्वतःचा आत्मा ओतीत असें. ज्याला मी सत्याग्रह समजत होतों, त्याचें स्वरूप समजावून देण्याचा प्रयत्न करीत असें. तुरुगवासाच्या मुदती सोडून दिल्यास दहा वर्षांतील म्हणजे सन १९१४ पर्यंतच्या 'इंडियन् ओपिनियन्'चा एखादाच असा अंक असेल, कीं ज्यामध्यें मीं कांहीं तरी लिहिलेलें नाहीं. त्यांत मीं एकहि शब्द विचार केल्याशिवाय, तोलल्याशिवाय किंवा कोणाला निव्वळ खूष करण्यासाठीं लिहिल्याचें किंवा जाणूनबुजून अतिशयोक्ति केल्याचें मला आठवत नाहीं. मला तरी हें पत्र आत्मसंयमनाच्या अभ्यासाचें साधन झालें होतें. टीकाकारांना त्यांतून टीकेला साधन थोडेंच मिळूं शके. मला माहीत आहे, कीं त्यांतील लेख असे असत, कीं टीकाकारांनाहि आपली लेखणी संभाळून चालविणें भाग पडे. या वर्तमानपत्राखेरीज सत्याग्रहाचा लढा चालू शकला नसता. वाचकांना तें पत्र आपलेसें वाटे; आणि त्यावरून त्यांस चळवळीची आणि दक्षिण आफ्रिकेंतील लोकांच्या स्थितीची यथार्थ माहिती मिळे.

या वर्तमानपत्राच्या द्वारें विविध मनुष्यस्वभावाचें मला खूप निरीक्षण करायला मिळालें. संपादक व ग्राहक यांमध्यें निर्मळ व जिव्हाळ्याचा संबंध बांधण्याचाच प्रयत्न ठेविला असल्यामुळें माझ्यापाशीं हृदय खुलें करणाऱ्या पत्रांचा ढीग पडत असे. त्यांतून तिखट, कडवीं, मधुर अशा सर्व तऱ्हेचीं लिखाणें माझ्यापाशीं येत. तीं वाचायचीं. विचार करायचा. विचाराचे स्पष्ट मुद्दे काढून जबाब लिहायचे, यांत मला उत्तम तऱ्हेचें शिक्षण मिळालें. तद्द्वारें समाजांत चालणाऱ्या गोष्टी व विचार मी प्रत्यक्ष कानांनीं ऐकत आहें, असें मला वाटे. संपादकाची जबाबदारी मला चांगली कळून आली. आणि समाजांतील लोकांवर मला जो ताबा मिळाला त्यामुळें पुढचा लढा शक्य झाला, शोभला आणि त्याला जोर आला.

वर्तमानपत्रें सेवाभावानेंच चाललीं पाहिजेत, हें ' इंडियन् ओपिनियन् '-च्या पहिल्या महिन्याच्या कारकीर्दीवरूनच माझ्या लक्षांत आलें. वर्तमानपत्र ही महान् शक्ति आहे, पण ज्याप्रमाणें पाण्याचा निरंकुश लोट गांवच्या गांव बुडवून टाकतो, आणि पिकाचा नाश करतो त्याप्रमाणेंच लेखणीची निरंकुश गति हानिकारक होते. हा अंकुश बाहेरून लादण्यांत आल्यास तो निरंकुशतेपेक्षांहि अधिक घातक ठरतो. आंतरिक अंकुशच लाभदायी होऊं शकणार.

ही विचारसरणी खरी असेल, तर दुनियेंतील कितीशीं वर्तमानपत्रें त्यांत टिकूं शकतील ? पण निरुपयोगी वर्तमानपत्रें बंद करण्याची सत्ता कोणाला ? कोणी कोणाला निरुपयोगी ठरवायचें ? उपयोगी व कुचकामी एकाच वेळीं चालणार. ज्यानें त्यानें आपापल्यापुरती त्यांतून निवड करावी.

●●

# १४

# ' कूली लोकेशन् ' म्हणजे धेडवाडा

हिंदुस्थानांत आपली मोठ्यांत मोठी समाजसेवा करणारे धेड, भंगी इत्यादींना आपण अस्पृश्य समजून त्यांना गांवाबाहेर निराळें ठेवतों. गुजराथींत त्यांच्या वस्तीला धेडवाडा म्हणतात, आणि तें नांव उच्चारण्याचीहि आम्हांला किळस वाटते. त्याचप्रमाणें युरोपांतील ख्रिश्चन लोक एके काळीं यहुदी लोकांना अस्पृश्य मानीत. त्यांच्यासाठीं जो धेडवाडा वसलेला असे त्याला ' घेटा ' म्हणत. हें नांव अशुभ समजलें जात असे. त्याचप्रमाणें दक्षिण आफ्रिकेमध्यें आम्ही हिंदी लोक अस्पृश्य बनलों आहों. अँड्रयूझच्या स्वार्थत्यागामुळें आणि शास्त्रीजींच्या यक्षिणीच्या कांडीनें आमची शुद्धि होऊन तद्द्वारां आम्ही धेड नाहींसे होऊन सभ्य मानलें जाऊं किंवा नाहीं तें पाहायचें आहे.

हिंदूंप्रमाणें यहुदीहि स्वतःला ईश्वराचे लाडके मानीत, आणि इतरांना हलके गणीत, त्या गुन्ह्याची शिक्षा त्यांना विचित्र व अनिष्ट रीतीनें मिळाली. जवळ जवळ त्याचप्रमाणें हिंदू स्वतःला सुसंस्कृत किंवा आर्य, आणि स्वतःच्याच एका अवयवाला प्राकृत, अनार्य, किंवा धेड मानीत आले आहेत. त्या पापाचें फळ-ते विचित्र रीतीनें–अन्याय्य रीतीनें का होईना—दक्षिण आफ्रिका इत्यादि वसाहतींमध्यें भोगीत आहेत; आणि त्यांचेच शेजारी मुसलमान, पारशी वगैरे जे

त्यांच्याच रंगाचे आणि देशाचे आहेत, तेहि त्यांत सांपडले आहेत, असा त्याचा मी अर्थ लावतों.

जोहानिसबर्गच्या ज्या लोकेशन्‌साठीं हें प्रकरण अडवलें आहे त्याची कांहींशी कल्पना आतां वाचकांना येईल. आम्ही दक्षिण आफ्रिकेमध्यें 'कूली' म्हणून नांवाजलेले आहों. 'कूली' शब्दाचा अर्थ इकडे फक्त 'मजूर' असा होतो; पण दक्षिण आफ्रिकेंतील त्या शब्दाचा अर्थ धेड, पंचम इत्यादि तिरस्कार-व्यंजक शब्दांनींच दर्शवितां येईल. दक्षिण आफ्रिकेमध्यें जें ठिकाण 'कूलीं'ना राहाण्यासाठीं निराळें काढलेलें असतें, त्याला 'कूली लोकेशन्' म्हणतात. असलें एक लोकेशन् जोहानिसबर्गमध्यें होतें. इतर सर्व ठिकाणीं जीं लोकेशनें ठेविलेलीं होतीं व अजून आहेत, त्यांत हिंदी लोकांचा कसलाहि मालकी हक्क ठेविलेला नसतो; पण जोहानिसबर्गमधील या लोकेशन्‌मधील जमीन नव्याण्णव वर्षांच्या करारानें दिलेली होती. त्यांत हिंदी लोकांची वसति भरगच्च होती. वसति वाढली, तरी लोकेशन् वाढण्यासारखें नव्हतें. तेथील पायखाने कसेबसे साफ होत एवढें खरें; पण त्यापलीकडे म्युनिसिपालिटीतर्फे कसलीच देखरेख होत नसे. मग सडक किंवा दिवाबत्तीचें नांवच घ्यायला नको. अशा तऱ्हेनें लोकांच्या शौचादि संबंधींच्या राहाणीबद्दलहि जिथें पर्वा नव्हती, तेथें साफसफाई कोठून असणार? जे हिंदी लोक तेथें राहात असत ते कांहीं शहरसुधारणा, आरोग्य इत्यादीसंबंधीं माहिती असणारे सुशिक्षित आदर्श हिंदी लोक नव्हते, कीं त्यांना म्युनिसिपालिटीची देखरेख त्यांच्या राहाणीवर असण्याची जरूरच पडूं नये. जंगलांत मंगल करणारे, धुळींतून धान्य काढणारे बुद्धिवान् हिंदपुत्र तिकडे जाऊन बसले असते, तर त्यांचा एकंदर इतिहासच निराळा बनला असता. अशा तऱ्हेचे हजारों लाखों लोक जगभर पसरलेले आहेत. त्यांना कोठेंहि परदेश असा जाणवतच नाहीं. सामान्यतः लोक परदेश पत्करतात, तो धन किंवा धंदा यासाठींच. हिंदुस्थानांतून गेलेले लोक अगदीं निरक्षर, गरीब, दीन, दुःखी मजूर होते. त्यांना पावलोंपावलीं रक्षणाची जरूर होती. त्यांच्यामागून व्यापारी व इतर स्वतंत्र हिंदी लोक गेले खरे, पण ते मूटभरच होते.

अशा तऱ्हेनें स्वच्छतेची देखरेख करणाऱ्या खात्याच्या अक्षम्य गफलतीमुळें आणि हिंदी रहिवाश्यांच्या अज्ञानामुळें लोकेशन्‌ची स्थिति आरोग्याच्या दृष्टीनें अगदीं खराब असल्यास नवल नाहीं. ती सुधारण्याचा योग्य प्रयत्न म्युनिसिपालिटीनें लेशमात्र केला नाहीं. पण स्वतःच्याच हलगर्जीपणामुळें उत्पन्न झालेल्या घाणीचें निमित्त करून सदर लोकेशन्‌चा नाश करण्याचा निश्चय त्या खात्यानें केला आणि त्या जमिनीचा कबजा घेण्याची सत्ता तेथील विधिमंडळाकडून मिळविली. मी जोहानिसबर्गमध्यें राहायला गेलों, त्या वेळीं अशी स्थिति होती.

रहिवाशी आपापल्या जमिनीचे मालक होते; अर्थात् त्यांना कांहीं तरी नुकसानभरपाई दिलीच पाहिजे. नुकसानीची रक्कम ठरविण्यासाठीं खास अदालत बसली होती. म्युनिसिपालिटीनें ठरविलेली रक्कम घरधन्यानें न स्वीकारल्यास सदर अदालत ठरवील तेवढीच मिळे. म्युनिसिपालिटीनें ठरविलेल्या किंमतीपेक्षां अदालतीनें ती अधिक ठरविली, तर धन्याच्या वकिलाचा खर्च म्युनिसिपालिटीनें भरावा असा कायदा होता.

यांपैकीं प्रत्येक दाव्यांतील घरांच्या मालकांनीं मला वकील नेमलें होतें. मला त्यांतून पैसे कमवायचे नव्हते. मीं त्यांना सांगून टाकलें होतें, “ तुमचा जय झाला, तर जो कांहीं खर्च म्युनिसिपालिटीकडून मिळेल तेवढ्यावरच मी संतोष मानीन. तुमचा जय होवो किंवा पराजय होवो, तुम्ही मला प्रत्येक करारामागें दहा पौंड द्या म्हणजे झालें. ” त्यांतलीहि अर्धी रक्कम गरीबांसाठीं हॉस्पिटल बांधण्याच्या किंवा असल्याच कसल्या तरी सार्वजनिक कामीं वापरण्यासाठीं निराळी काढून ठेवण्याचा माझा इरादा मीं त्यांना बोलून दाखविला. साहजिकपणेंच त्यामुळें सर्व खूष झाले.

सुमारें सत्तर खटल्यांपैकीं एकांतच हार आली. अर्थात् माझी फीची रक्कमहि खूप झाली. पण त्याच वेळीं ‘ इंडियन् ओपिनियन् ’ची मागणी माझ्यापुढें दत्तच होती; त्यामुळें सुमारें १६०० पौंडांचा चेक त्यांतच गेला असें मला स्मरतें.

या दाव्यांमध्यें माझ्या समजुतीप्रमाणें मी भरपूर मेहनत घेत असें. अशिलांची माझ्यापाशीं गर्दीच असे. यांपैकीं बहुतेकजण उत्तरेकडचे बिहार वगैरे प्रांतांतून आणि दक्षिणेकडचे तामिल, तेलगू इत्यादि प्रदेशांतून प्रथम बांधीव मुदतीसाठीं आलेले आणि नंतर मोकळे होऊन स्वतंत्र धंदा करणारे होते.

या लोकांनीं स्वतःचीं विशेष दुःखें निवारण्यासाठीं स्वतंत्र हिंदी व्यापारी वर्गाच्या मंडळाहून निराळें असें एक मंडळ स्थापलें होतें. त्यांत मोकळ्या मनाचे, उदार भावनावाले आणि चारित्र्यसंपन्न हिंदपुत्र होते. त्यांच्या अध्यक्षाचें नांव श्री. जेरामसिंह होतें. आणि अध्यक्ष नसला तरी जवळ जवळ अध्यक्षासारख्याच अशा दुसऱ्या एकाचें नांव श्री. बद्री होतें. दोघेहि परलोकवासी झाले आहेत. दोघांचीहि मला फार मदत झाली होती. श्री. बद्रीशीं माझा विशेष निकट परिचय झाला होता, आणि सत्याग्रहामध्यें त्यानें आघाडीचा भाग घेतला होता. या व या तऱ्हेच्या इतर सद्गृहस्थांच्या मार्फत माझा उत्तर–दक्षिणच्या अनेक हिंदी लोकांशीं निकट संबंध जुळला; आणि मी त्यांचा वकीलच नव्हे, तर बंधु बनून गेलों, व त्यांच्या तिन्ही प्रकारच्या दुःखांचा भागीदार बनलों. शेठ अबदुल्लांना मला ‘ गांधी ’ म्हणणें बरें वाटेना. मला ‘ साहेब ’ मानील किंवा म्हणेल तरी कोण ? त्यांनीं फारच प्रेमाचें नांव शोधून काढलें. मला ते ‘ भाई ’ या नांवानें संबोधूं

लागले. तें नांव दक्षिण आफ्रिकेंत शेवटपर्यंत चालू होतें. पण हे गिरमिटमुक्त हिंदी लोक जेव्हां मला ' भाई ' म्हणून संबोधीत, तेव्हां मात्र मला त्यांत और गोडी वाटे.

●●●

## १५

# प्लेग–१

या लोकेशन्‌ची मालकी म्युनिसिपालिटीनें आपल्याकडे घेतली तरी हिंदी रहिवाश्यांना तेथून लगेच घालवून दिलें नव्हतें. त्यांना दुसरी सोयीची जागा देण्याचा प्रश्न होताच. ती जागा म्युनिसिपालिटीनें निश्चित केली नव्हती. त्यामुळें हिंदी लोक त्याच ' गलिच्छ ' लोकेशन्‌मध्यें राहिले. फेरफार दोन झाले. हिंदी लोक धनी होते ते म्युनिसिपालिटीचे भाडेकरी बनले हा एक; व दुर्गंधि वाढली हा दुसरा. अगोदर हिंदी मालक होते तेव्हां मनलज्जेस्तव नाहीं, तर जनलज्जेस्तव तरी ते थोडीशी स्वच्छता ठेवीत. आतां म्युनिसिपालिटीला विचारणारा कोणीच नाहीं. घरांतून भाडेकरी वाढले, आणि त्याबरोबर दुर्गंधि व अव्यवस्थाहि वाढली.

अशा तऱ्हेनें चाललें होतें. हिंदी लोकांच्या मनाला स्वस्थता नव्हती. इतक्यांत एकाएकी काळा प्लेग सुरू झाला. हा प्लेग प्राणांतक होता. तो फुप्फुसांचा प्लेग होता. गांठीच्या प्लेगापेक्षां हा प्लेग अधिक भयंकर समजत.

सुदैवानें प्लेगचें कारण लोकेशन् नव्हतें. त्याचें कारण जोहानिसबर्गच्या आसपास अनेक सोन्याच्या खाणी आहेत, त्यांपैकीं एक होती. तेथें मुख्यत्वें हबशी लोक काम करीत असत. तेथील स्वच्छतेची जबाबदारी त्यांच्या गोऱ्या मालकांच्या शिरावरच होती. या खाणीच्या संबंधानें कित्येक हिंदी लोकहि काम करीत होते. त्यांच्यापैकीं तेवीस जणांना एकाएकीं संसर्ग बाधला आणि ते एके दिवशीं संध्याकाळीं भयंकर प्लेगनें लागलेले लोकेशन्‌मध्यें स्वतःच्या राहत्या घरीं आले.

त्याच वेळीं भाई मदनजित ' इंडियन् ओपिनियन् 'ला ग्राहक मिळविण्या-साठीं आणि वर्गणी वसूल करण्यासाठीं आले होते; ते लोकेशन्‌मध्यें फिरत असत. त्यांच्यामध्यें निर्भयतेचा गुण वाखाणण्यासारखा होता. या दुखणाइतांना पाहून त्यांच्या हृदयाला चरका बसला. त्यांनीं शिसपेन्सिलीनें लिहून मला एक चिठोरें पाठविलें. त्याचा भावार्थ असा होता—

" येथें एकाएकीं काळा प्लेग उमटला आहे. तुम्ही लगेच येऊन कांहीं तरी केलें पाहिजे; नाहीं तर परिणाम भयंकर होईल. असाल तसे या."

मदनजितांनीं एक रिकामें घर पडलें होतें, त्याचें कुलूप बिनधास्तपणें तोडून त्याचा कबजा घेतला व त्यांत या रोग्यांना ठेवलें. मीं सायकलवर बसून लोकेशन्‌मध्यें जाऊन पोंचलों. तेथून टाऊनक्लार्कला हकीकत लिहून पाठविला. आणि आम्हीं कशा परिस्थितींत घराचा कबजा घेतला तें कळविलें.

डॉ. विल्यम गॉडफ्रे जोहानिसबर्गमध्यें डॉक्टरी करीत असत. त्यांना खबर मिळतांच ते धांवून आले, आणि रोग्यांचे डॉक्टर व नर्स दोन्ही आले. पण आम्हां तिघांना तेवीस रोगी सांभाळणें अशक्य होतें.

दानत शुद्ध असली म्हणजे संकटनिवारणासाठीं सेवक आणि साधनें कोठून तरी चालून येतात, असा माझा अनुभवसिद्ध विश्वास आहे. माझ्या ऑफिसांत कल्याणदास, माणेकलाल व आणखी दोन हिंदी होते. शेवटल्या दोघांचीं नांवें आतां मला आठवत नाहींत. कल्याणदासांना त्यांच्या बापानेंच माझ्या हवालीं केलें होतें. त्यांच्यासारखे परोपकारी आणि हुकूम उठवायचा तेवढा माहीत असे सेवक मला तेथें थोडेच भेटले असतील. सुदैवानें कल्याणदास त्या वेळीं ब्रह्मचारी होते; त्यामुळें त्यांना वाटेल तें जोखमीचेंहि काम द्यायला मी मागें पुढें पाहात नसें. दुसरे माणेकलाल हे मला जोहानिसबर्गमध्येंच लाभले होते. तेहि अविवाहित होते अशी माझी कल्पना आहे. चारी कारकून म्हणा, सोबती म्हणा किंवा पुत्र म्हणा, त्यांना लोटण्याचा मीं निश्चय केला. कल्याणदासांना विचारायचें तें काय ! इतरांना विचारण्याचीच फुरसत, ते तयार झाले. “ तुमची गत तीच आमची ” असा त्यांचा थोडक्यांतच पण मीठा जबाब होता.

मि. रिचचा परिवार मोठा होता. ते स्वतः उडी घ्यायला तयार होते; पण मीच त्यांना निवारलें. मी त्यांना ह्या जोखिमांत अडकवायला मुळींच तयार नव्हतों. मला हिंमतच होईना; पण त्यांनीं बाहेरचें सर्व काम सांभाळलें.

शुश्रूषेची ती रात्र भयानक होती. मीं पुष्कळ रोग्यांची शुश्रूषा केली होती, पण प्लेगच्या रोग्यांची शुश्रूषा करण्याचा प्रसंग मला कधीं आला नव्हता. डॉ. गॉडफ्रेची हिंमत पाहून आमचीहि भीति पळाली होती. रोग्यांची विशेषशी सेवा करतां येण्यासारखी नव्हती. त्यांना औषध पाजणें, धीर देणें, पाणी वगैरे देणें आणि त्यांचा मळ काढणें याउपरान्त विशेष कांहीं करण्यासारखें नव्हतेंच.

त्या चार तरुणांची निर्भयता आणि त्यांनीं शरीराची पर्वा न करतां चालविलेली मेहनत पाहून माझा हर्ष गगनांत मावेना.

डॉ. गॉडफ्रेची हिंमत समजतां येण्यासारखी होती; तीच गोष्ट मदनजितची; पण या तरुणांना काय म्हणावें ?

रात्र कशीबशी गेली. मला स्मरतें त्याप्रमाणें त्या रात्रीं तरी कोणी रोगी गमावला नाही.

पण हा प्रसंग जितका करुणाजनक आहे, तितकाच तो रसिक आणि माझ्या दृष्टीनें धार्मिकहि आहे. म्हणून त्याला आणखी दोन प्रकरणें तरी द्यावीं लागणार.

# १६

# प्लेग–२

अशा तऱ्हेनें घराचा आणि रोग्यांचा ताबा घेतल्याबद्दल म्युनिसिपालिटीच्या सेक्रेटरीनें माझे आभार मानले, आणि प्रांजळपणें कबूल केलें कीं, “ अशा तऱ्हेच्या प्रसंगीं लगेचच्या लगेच व आमची आम्ही व्यवस्था करण्याची साधनसामग्री आमच्यापाशीं नाहीं. तुम्हांला लागेल ती मदत मागा. शक्य असेल तेवढी टाऊन कौन्सिल देईल. ” परंतु योग्य इलाज करण्याबाबत दक्ष असलेल्या त्या म्युनिसिपालिटीनें प्रसंगोचित उपाय योजण्याच्या कामीं बिलकुल दिरंगाई केली नाहीं.

त्यांनीं दुसऱ्याच दिवशीं एक रिकामें पडलेलें गोदाम माझ्या हवालीं केलें, आणि रोग्यांना त्याच्यामध्यें घेऊन जाण्याबद्दल सुचविलें. तें साफ करण्याची जबाबदारी म्युनिसिपालिटीनें उचलली नाहीं. घर ओंगळ आणि कचऱ्यानें भरलेलें होतें. आम्ही स्वतःच तें साफ केलें. दानशील हिंदी लोकांच्या मदतीनें खाटा वगैरे जमविल्या आणि लगेच एक तात्पुरतें इस्पितळ सुरू केलें. म्युनिसिपालिटीनें एक नर्स पाठविली, व तिच्याबरोबर ब्रँडीची बाटली आणि रोग्यांना जरूर पडणाऱ्या इतर वस्तू पाठविल्या. डॉ. गॉडफ्रेकडचा चार्ज कायम राहिला.

नर्सला आम्ही विशेषेंकरून रोग्यांना शिवूं देत नसूं. नर्स स्वतः शिवायला तयार असे. स्वभावानें भली बाई होती. परंतु तिच्यावर भलताच प्रसंग येऊं नये अशाबद्दल आम्ही जपत असूं.

रोग्यांना वरचेवर ब्रँडी देण्याबद्दल आम्हांला सूचना मिळाली होती. नर्स आम्हांलाहि संसर्ग बाधूं नये अशासाठीं थोडथोडी ब्रँडी घेण्यास सुचवीत असे, आणि स्वतःहि घेई. आमच्यापैकीं तरी कोणी ब्रँडी घेण्यासारखे नव्हतेच. माझा तर रोग्यांनाहि ब्रँडी देण्यावर विश्वास नव्हता. तिघे रोगी ब्रँडीशिवाय चालविण्यास आणि मला मातीचे प्रयोग करूं देण्यास तयार होते. डॉक्टर गॉडफ्रेच्या परवानगीनें मीं त्यांच्या डोक्यावर व छातीवर जेथें दुःख होतें तेथें मातीचा लेप देण्याचा प्रयोग केला. या तिघां रोग्यांपैकीं दोघे बचावले. बाकीचे सर्व रोगी गमावले. वीस रोगी तर त्या गोदामांतच अंत पावले.

इकडे म्युनिसिपालिटी अन्य व्यवस्था करीतच होती. जोहानिसबर्गपासून सात मैलांवर एक लेझरेटो म्हणजे सांसर्गिक रोगांचें इस्पितळ होतें. तेथें तंबू उभारून त्यांत या तिघां रोग्यांना घेऊन गेले. प्लेगनें आणखी कोणी लागल्यास त्यांनाहि तेथेंच नेण्याची व्यवस्था केली होती. आमची त्या कामांतून मोकळीक झाली. थोड्याच दिवसांनंतर आम्हांला खबर मिळाली, कीं त्या भल्या नर्सला प्लेग झाला व त्यांतच तिचा देहान्त झाला. ते दोघे रोगी वांचले आणि आम्हांला संसर्ग बाधला नाहीं, याचें कारण काय तें कोण सांगूं शकणार? परंतु मातीच्या उपचारावरील माझी श्रद्धा आणि दारूचा औषधाच्या कामींहि उपयोग करण्या-बद्दलची माझी अश्रद्धा हीं दोन्ही दृढ झालीं. मला माहीत आहे, कीं ही श्रद्धा आणि अश्रद्धा दोन्ही निराधार असतील. परंतु माझा त्या वेळीं झालेला आणि अजूनपर्यंत टिकून राहिलेला ग्रह मी बदलूं शकत नाहीं, आणि म्हणूनच त्याचा या प्रसंगीं उल्लेख करणें मला आवश्यक वाटतें.

हा प्लेग उमटल्यानंतर लगेच मीं वर्तमानपत्रांमध्यें लोकेशन् स्वतःच्या ताब्यांत आल्यानंतर म्युनिसिपालिटीनें विशेषच प्रकारें दाखविलेली बेदरकारी व प्लेगचा प्रादुर्भाव यांबद्दल म्युनिसिपालिटीला ठपका देणारें कडक पत्र प्रसिद्ध केलें होतें. त्या पत्रामुळें मला मि. हेन्री पोलाक लाभले. तें पत्रक मरहूम जोसेफ डोक यांच्या मुलाखतीलाहि कांहीं अंशीं कारणीभूत झालें.

मागें गेलेल्या प्रकरणांमध्यें मीं उल्लेख केलाच आहे, कीं एका निरामिष भोजनगृहामध्यें मीं जेवायला जात असें. तेथें माझी मि. आल्बर्ट वेस्टशीं ओळख झाली. रोज संध्याकाळीं आमची त्या खाणावळींत गांठ पडे, व भोजनोत्तर आम्ही बरोबर फिरायला जात असूं. वेस्ट हे एका लहानशा छापखान्यांत भागीनें काम करीत असत. त्यांनीं वर्तमानपत्रांत माझें प्लेगसंबंधींचें पत्र पाहिलें आणि जेवते वेळीं खाणावळींत मात्र मी दिसेना त्यावरून ते घाबरले.

मीं व माझ्या जोडीच्या सेवकांनीं प्लेगच्या दिवसांत आहार कमी केला होता. फार दिवसांपासून मी पद्धत ठेविली होती, कीं सांथीचें दुखणें असेल तेव्हां पोटावर भार कमी पडेल तेवढा चांगला. म्हणून मीं संध्याकाळचें जेवण बंद केलें आणि दुपारीं इतर जेवणारांना लेशमात्र धोका राहूं नये म्हणून इतर कोणी नसतील अशा वेळीं जाऊन जेवून येत असें. भोजनगृहाच्या मालकाशीं माझा दाट परिचय होता. त्याला मीं सांगून ठेविलें होतें, कीं मी प्लेगच्या रोग्यांची शुश्रूषा करीत असल्यामुळें इतरांशीं शक्य तेवढा कमी संबंध ठेवूं इच्छितों.

अशा तऱ्हेनें मी खाणावळींत न दिसल्यामुळें दुसऱ्या किंवा तिसऱ्याच दिवशीं सकाळच्या प्रहरीं, मी बाहेर निघण्याच्या तयारींत गुंतलों आहें इतक्यांत वेस्टनीं खोलीचें दार ठोठावलें. दार उघडतांच वेस्ट म्हणाले,

" तुम्ही खाणावळींत दिसला नाहीं, त्यामुळें मला धास्ती वाटूं लागली, कीं न जाणो तुम्हांलाच तर कांहीं झालें नसेल ? म्हणून या वेळीं तरी तुम्ही नक्की भेटणार या समजुतीनें आलों. माझ्याकडून कांहीं मदत होण्यासारखी असेल, तर सांगा. मी रोग्यांच्या शुश्रूषेलाहि तयार आहें. तुम्हांला माहीतच आहे, कीं माझ्या-वर स्वतःचें पोट भरण्यापलीकडे कसलीच जबाबदारी नाहीं."

मीं वेस्टचे आभार मानले. मीं विचार करायला एक मिनिटहि घेतल्याचें मला स्मरत नाहीं. मीं म्हटलें,

" तुम्हांला मी नर्स म्हणून तर घेणार नाहींच. आणखी रोगी आले नाहींत, तर आमचें काम एक-दोन दिवसांतच खलास होईल. तरी पण एक काम आहे खरें."

" तें कोणतें ? "

" तुम्हीं डरबनला जाऊन इंडियन् ओपिनियन्‌च्या छापखान्याची व्यवस्था हातीं घ्याल का ? मदनजित तर सध्यां येथें कामांत गुंतले आहेत. तिकडे कोणी तरी जायला पाहिजेच आहे. तुम्हीं गेलां तर माझी त्या बाजूची काळजी पूर्णपणें हलकी होईल. "

वेस्टनीं उत्तर दिलें,

" माझ्या गळ्यांत छापखाना आहे हें तुम्हांला माहीतच आहे. नव्याण्णव हिश्श्यांनीं मी जायला तयार होईन. अखेरचा जबाब आज संध्याकाळपर्यंत दिला, तर चालेल ना ? तुम्हांला फिरायला यायला सवड झाली, तर त्याच वेळीं बोलूं."

मला आनंद झाला. त्याच दिवशीं संध्याकाळीं थोडें बोलणें झालें. वेस्टला दरमहा दहा पौंड पगार आणि छापखान्यांत कांहीं नफा राहिल्यास त्याचा अमुक भाग देण्याचा ठराव झाला. वेस्ट पगारासाठीं जातच नव्हते, त्यामुळें तो प्रश्न त्यांच्यापुढें नव्हताच. दुसऱ्याच दिवशीं रात्रीच्या मेलनें वेस्ट स्वतःची वसुली माझ्याकडे सोंपवून डरबनला जायला रवाना झाले. तेव्हांपासून तों मी दक्षिण आफ्रिका सोडीपर्यंत ते माझ्या सुखदुःखांचे भागीदार राहिले. विलायतेच्या एका परगण्यांतील लाउथ नामक गांवांतील एका शेतकरी कुटुंबांत जन्मले वाढलेले, शाळेंतील सामान्य शिक्षण घेतलेले; पण अनुभवाच्या शाळेंत अंगमेहनतीनें शिकून तरबेज झालेले, पवित्र, संयमी, ईश्वराला भिऊन चालणारे, परोपकारी इंग्रज गृहस्थ—मी वेस्टना ओळखीत आलों आहें, तो नेहमीं याच स्वरूपांत. त्यांचा आणि त्यांच्या कुटुंबाचा परिचय आपल्याला ह्या प्रकरणामध्यें यापुढें आणखीहि होणारच आहे.

●●●

## १७

# लोकेशनूची होळी

मी आणि माझे जोडीदार जरी रोग्यांच्या शुश्रूषेतून मोकळे झालों तरीहि प्लेगमधून उपस्थित झालेलीं इतर कामें आमच्या शिरावर होतींच.

लोकेशन्च्या स्थितीसंबंधीं म्युनिसिपालिटी खुशाल बेदरकार राहूं शकत होती; पण गोऱ्या नागरिकांच्या आरोग्याला मात्र ती चोवीसहि तास डोळ्यांत तेल घालून जपत असे. त्यांच्या आरोग्यरक्षणासाठीं पडेल तो खर्च करायला ती मागेंपुढें पाहात नसे; आणि या प्रसंगीं प्लेगचें पाऊल पुढें पडूं नये यासाठीं, तर तिनें पाण्यासारखा पैसा खर्च केला. हिंदी लोकांच्या बाबतींत म्युनिसिपालिटीचे अनेक दोष मला दिसत होते. तरीहि गोऱ्या लोकांची ती वाहत असलेली काळजी पाहून तिला धन्यवाद दिल्याखेरीज माझ्याच्यानें राहावलें नाहीं; आणि तिच्या या शुभ प्रयत्नामध्यें मला जेवढी म्हणून मदत देतां आली, तेवढी मीं दिली. माझी समजूत आहे, कीं मी ती मदत दिली नसती तर म्युनिसिपालिटीला जड गेलें असतें, आणि कदाचित् तिनें बंदुकीच्या बळाचाहि उपयोग केला असता; मागेंपुढें पाहिलें नसतें, आणि आपलें तें खरें केलें असतें.

पण तसें कांहीं होण्याचा प्रसंगच आला नाहीं. हिंदी लोकांच्या वर्तणुकीनें म्युनिसिपालिटीचे अंमलदार संतुष्ट झाले, आणि त्यानंतरचीं कांहीं कामें सुलभ झालीं. हिंदी लोकांना म्युनिसिपालिटीच्या म्हणण्याप्रमाणें वागावयास लावण्यासाठीं, माझें त्यांच्यावर होतें नव्हतें तेवढें वजन मीं वापरलें. तें सर्व करणें हिंदी लोकांना फार जड होतें, तरीहि एकानेंसुद्धां माझा शब्द उल्लंघिल्याचें मला स्मरत नाहीं.

लोकेशन्च्या सभोंवार पहारा बसविण्यांत आला. परवानगीशिवाय कोणी बाहेर पडायचें नाहीं किंवा आंतहि जायचें नाहीं. माझ्या जोडीदारांना व मला पाहिजे तेव्हां जाण्यायेण्याचे परवाने दिले होते. म्युनिसिपालिटीचा विचार लोकेशन्मधील सर्व रहिवाश्यांना तीन आठवडेपर्यंत जोहानिसबर्गपासून तेरा मैल अंतरावर खुल्या मैदानांत तंबू लावून त्यांमध्यें वसवून लोकेशन्ला आग लावून देण्याचा होता. तंबूंचेंच का होईना पण नवें गांव वसविणें, तिकडे दाणागोटा पोंचविणें इत्यादींमध्यें कांहीं दिवस जाणारच. त्या मुदतींत वरील पहारा बसविलेला होता.

.लोक खूप घाबरले, पण मी त्यांच्यापाशींच असल्यामुळें त्यांना धीर होता. त्यांच्यापैकीं पुष्कळ गरीब लोक स्वतःचे पैसे स्वतःच्या घरांत पुरून ठेवीत. आतां

ते हलवावे लागणार. त्यांना बँक भेटावी कोठून? बँकेमध्यें त्यांना कळणार तरी काय? मी त्यांची बँक बनलों. माझ्यापाशीं पैशांचे ढीग येऊन पडले. मी अशा प्रसंगीं फी आकारणें योग्य झालेंच नसतें. कसेंबसें हें काम संभाळूं शकलों. आमच्या बँकेच्या मॅनेजरशीं माझी चांगली ओळख होती. मी त्यांना कळविलें, कीं तुमच्याकडे आम्हांला खूप पैसे ठेवावे लागणार आहेत. बँका तांब्याचें किंवा रुप्याचें नाणें अमुक एका मर्यादेपलीकडे घ्यायला तयार नसतात. त्याशिवाय प्लेगच्या टापूंतून येणाऱ्या पैशांना हात लावण्यास कारकून नाखूष असतील असाहि संभव होता. परंतु मॅनेजरनें मला सर्व सोय करून दिली. पैसे जंतुनाशक पाण्यानें धुऊन बँकेकडे पाठविण्याचें ठरलें. अशा तऱ्हेनें सुमारें ६०,००० पौंड बँकेमध्यें भरले गेले असें मला स्मरतें. माझ्या अशिलांपैकी ज्यांच्यापाशी अधिक पैसे होते, त्यांना ते ठरीव मुदतीनें व्याजीं लावण्याचा मीं सल्ला दिला. अशा तऱ्हेनें कांहीं पैसे त्या त्या अशिलांच्या नांवावर ठेविले गेले. त्याचा परिणाम असा झाला, कीं त्यांच्यापैकीं कित्येकांना बँकेंत पैसे ठेवण्याची संवय लागली. क्लिपस्प्रुट फार्म नांवाचें जोहानिसबर्गशेजारीं एक ठिकाण आहे. तेथें लोकेशन्च्या रहिवाश्यांना स्पेशल ट्रेनमधून नेलें. तेथें त्यांना अन्नपाणी म्युनिसिपालिटीनें स्वतःच्या खर्चानें पुरविलें. तंबूच्या या गांवाचा देखावा लष्कराच्या छावणीसारखा होता. लोकांना अशा तऱ्हेनें राहण्याची संवय नसल्यामुळें मानसिक व्यथा झाली. नवें नवें वाटे, पण म्हणण्यासारखी गैरसोय सहन करावी लागली नाहीं. मी रोज सायकलवरून एक खेप मारून येत असें. तीन आठवडेपर्यंत अशा तऱ्हेनें खुल्या हवेंत राहिल्यानें लोकांच्या आरोग्यामध्यें सुधारणा तर अवश्य झाली, आणि मानसिक दुःखाचा, तर पहिले चोवीस तास संपण्यापूर्वींच विसर पडला. अर्थातच मग लोक आनंदानें राहूं लागले. मी जाईं तेव्हां त्यांचें भजन-कीर्तन, खेळ, करमणूक इत्यादि चालूच असे.

मला आठवतें, कीं लोकेशन् रिकामें करण्यांत आलें त्याच्या दुसऱ्याच दिवशीं त्याची होळी करण्यांत आली. त्यांतील एक देखील वस्तु सोडवून आणण्याचा लोभ म्युनिसिपालिटीनें केला नाहीं. त्याच सुमाराला व त्याच कारणानें म्युनिसिपालिटीनें स्वतःच्या मार्केटचें लांकूडकामहि सर्व जाळून टाकलें; व त्यापायीं सुमारें दहा हजार पौंडांचें नुकसान सोसलें. मार्केटांत मेलेले उंदीर सांपडले म्हणून हा कडक उपाय योजण्यांत आला होता. नुकसान खूप झालें खरें, पण परिणाम हा झाला कीं, प्लेगचा प्रसार अशक्य झाला; शहर भयमुक्त झालें.

• • •

## १८

# एका पुस्तकाचा विलक्षण परिणाम

या प्लेगमुळें गरीब हिंदी लोकांवरील माझें वजन, माझा धंदा आणि माझी जबाबदारी हीं वाढलीं. शिवाय युरोपियन लोकांशीं वाढत असलेल्या माझ्या कांहीं ओळखी इतक्या निकटच्या होत गेल्या, कीं त्यामुळेंहि माझी नैतिक जबाबदारी वाढूं लागली.

वेस्टची ओळख मीं निरामिष भोजनगृहामध्यें केली होती. पोलाकच्या बाबतींतहि तसेंच घडलें. एके दिवशीं मी ज्या टेबलाशीं बसलों होतों, तेथून दूरच्या एका टेबलाशीं एक तरुण गृहस्थ जेवीत होते. त्यांनीं मला भेटण्याच्या इराद्यानें नांवाची चिठ्ठी पाठविली. मीं त्यांना माझ्या टेबलावर बोलाविलें. ते आले आणि म्हणाले,

"मी 'क्रिटिक'चा उपसंपादक आहें. तुमचें प्लेगसंबंधींचें पत्र वाचून मला आपल्यास भेटण्याची फार इच्छा झाली. आज मला ती संधि मिळाली."

मि. पोलाकच्या मनमोकळेपणामुळें मी प्रथमदर्शनींच त्यांचेकडे आकर्षिला गेलों. त्याच रात्रीं आम्ही एकमेकांचे पुरे परिचित झालों, आणि जीवनासंबंधींच्या आमच्या विचारांमध्यें आम्हांला फारच साम्य दिसून आलें. त्यांना साधी राहाणी आवडत होती. अमुक एक गोष्ट बुद्धीला पटली म्हणजे तिचा अंमल करण्याच्या बाबतींत त्यांची शक्ति आश्चर्य वाटण्यासारखी होती. त्यांच्या आयुष्यांतील कांहीं फेरफार त्यांनीं झटदिशीं करून टाकले.

'इंडियन् ओपिनियन'चा खर्च वाढत चालला होता. वेस्टनीं कळविलेल्या हकीकतीनें मी चकित झालों. त्यांनीं लिहिलें, "तुम्हीं सांगितलें तशा तऱ्हेचा नफा या कामांत नाहीं. उलट मला नुकसानच दिसत आहे. जमाखर्चाच्या वह्या अव्यवस्थित आहेत. उधारी पुष्कळ आहे, पण तिला शेंडाबुडखा कांहीं नाहीं. पुष्कळ फेरफार करावे लागतील. पण या हकीकतीनें तुम्ही घाबरण्याचें कारण नाहीं. माझ्याकडून होईल तेवढी व्यवस्था मी करतों, नफा नाहीं म्हणून हें काम सोडीन असें मुळींच नाहीं."

नफा दिसत नसल्यामुळें वेस्ट मर्जी लागल्यास काम सोडण्यास मोकळे होते; तसें करण्याबद्दल मी त्यांना मुळींच दोष देऊं शकलों नसतों. एवढेंच नव्हे, तर तपास न करतांच 'काम फायद्यांत आहे' असें सांगितल्याबद्दल मला दोष देण्याचाहि त्यांना अधिकार होता. असें असतांहि मला झोंबेल असा एक शब्दहि ते कधीं बोलले नाहींत. पण मला वाटतें, या नवीन माहितीमुळें मी

विचार न करतां विश्वास टाकणारा आहे असें वेस्टनीं ठरविलें असेल. मदनजितच्या समजाबद्दल चौकशी न करतां केवळ त्यांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून मीं वेस्टपाशीं नफ्याची गोष्ट बोललों होतों. मला वाटतें, सार्वजनिक काम करणारानें असा विश्वास न ठेवितां ज्याचा स्वतः तपास केला असेल असलीच गोष्ट बोलली पाहिजे. सत्याच्या पुजाऱ्यानें फारच दक्षता ठेविली पाहिजे. स्वतःची पूर्ण खात्री झाली नसतांना दुसऱ्याच्या मनावर मर्यादेपलीकडे परिणाम करणें यापासून सत्याला हानि पोंचते. मला सांगण्यास दिलगिरी वाटते, कीं हें समजत असूनहि उतावळेपणानें विश्वास टाकून काम चालविण्याचा माझा स्वभाव मीं पूर्णपणें सुधारूं शकलेला नाहीं. त्यांत मला स्वतःला शक्तीपलीकडे काम करण्याचा लोभ हा दोष दिसतो. या लोभामुळें माझ्यापेक्षांहि माझ्या सोबत्यांची अधिक पंचाईत होत आली आहे.

वेस्टचें अशा तऱ्हेचें पत्र आल्यामुळें मी नाताळला जायला निघालों. पोलाकना आतां माझ्या सर्व कारभाराची माहिती झालीच होती. ते मला पोंचवायला स्टेशनवर आले होते. आणि "हें पुस्तक प्रवासांत वाचण्यासारखें आहे, तें वाचून काढा. तुम्हांला तें आवडेल." असें म्हणून त्यांनीं रस्किनचें 'अन्टु धिस लास्ट' हें पुस्तक माझ्या हातांत दिलें.

हें पुस्तक वाचण्यास सुरू केल्यानंतर माझ्यानें तें सोडवेंच ना. त्यानें मला पकडूनच धरलें. जोहान्सबर्ग ते नाताळ चोवीस तासांचा रस्ता आहे. ट्रेन संध्याकाळीं डरबनला पोंचली. पोंचल्यानंतर सबंध रात्रभर झोंप येईना. पुस्तकांत दर्शविलेले विचार अमलांत आणण्याचा विचार ठरला.

यापूर्वीं रस्किनचें एकहि पुस्तक मीं वाचलें नव्हतें. विद्यार्थिदशेंत अभ्यासाच्या पुस्तकांपलीकडे माझें वाचन नाहीसारखेंच म्हणतां येईल. कर्मभूमीमध्यें प्रवेश केल्यानंतर वेळ फार थोडा मिळे. त्यामुळें आजमितीलाहि असेंच म्हणतां येईल, कीं माझें पुस्तकाचें ज्ञान फारच तुटपुंजें आहे. सहजासहजीं किंवा निरुपायास्तव पाळल्या गेलेल्या या संयमामुळें माझें कांहींएक नुकसान झालेलें नाहीं अशी माझी समजूत आहे. पण जीं थोडीशीं पुस्तकें मीं वाचलीं आहेत, तीं चांगलीं पचविलीं आहेत असें म्हणतां येईल. अशा पुस्तकांपैकीं हेंच एक पुस्तक असें म्हणतां येईल, कीं ज्यानें माझ्या जीवनामध्यें तत्काळ महत्त्वाचा रचनात्मक फेरफार घडवून आणला. पुढें मी त्याचें भाषान्तरहि केलें व तें 'सर्वोदय' या नांवानें छापलेलें आहे.

माझी अशी समजूत आहे, कीं जी गोष्ट माझ्यामध्यें खोल भिनलेली होती तिचेंच स्पष्ट प्रतिबिंब मला रस्किनच्या या ग्रंथरत्नामध्यें पाहावयास मिळालें. त्यामुळें त्यानें माझ्यावर संपूर्ण ताबा मिळविला आणि त्याच्यांतील विचारांची

अंमलबजावणी माझ्याकडून करविली. आपल्यामध्यें ज्या सद्भावना सुप्त असतात, त्या जागृत करण्याची शक्ति ज्याच्यामध्यें असते तो कवि होय. सर्व कवींचा सर्वांवरच सारखा परिणाम होत नाहीं; कारण सर्वांमध्यें सर्वच चांगल्या भावना एकसारख्या प्रमाणांतच नसतात.

'सर्वोदया 'चे सिद्धान्त मी समजलों ते असे—

१. सर्वांच्या कल्याणांत आपलें कल्याण आहे.

२. वकील काय किंवा हजाम काय, दोघांच्याहि कामाची किंमत सारखीच असली पाहिजे. कारण पोटापाण्याचा हक्क दोघांनाहि सारखाच आहे.

३. साधें, अंगमेहनतीचें, शेतकऱ्याचें जीवन हेंच खरें जीवन होय.

पहिली गोष्ट मला माहीत होती; दुसरी मला अंधुक दिसत होती; तिसरीचा मीं विचारच केला नव्हता. पहिलीमध्यें दुसऱ्या दोन्ही समाविष्ट आहेत हें मला 'सर्वोदया 'नें दिव्यासारखें स्पष्ट दाखविलें. प्रभात झाली आणि या विचारांच्या अंमलबजावणीच्या प्रयत्नाला मीं लागलों.

● ● ●

१९

# फिनिक्सची स्थापना

सकाळीं प्रथम मीं वेस्टपाशीं गोष्ट काढली. 'सर्वोदय' पुस्तकानें माझ्यावर केलेला परिणाम मीं त्यांना बोलून दाखविला व सुचविलें, कीं 'इंडियन् ओपिनियन्' एखाद्या शेतीच्या जमिनींत न्यावें. तेथें सर्वांनीं एकसारखा पोटापुरता पगार घ्यावा, सर्वांनीं आपापली शेती करावी आणि उरलेल्या वेळांत 'इंडियन् ओपिनियन्'चें काम करावें. वेस्टनीं या सूचनेला रुकार दिला. प्रत्येकाला पोटगी-खर्च तीन पौंड येईल असा हिशेब केला होता. त्यांत गोरे काळे असा भेद केला नव्हता.

पण छापखान्यांत तर दहा एक आसामी काम करणारे होते. सर्वांनाच जंगलांत बिऱ्हाड करणें पटेल, कीं नाहीं हा एक प्रश्न होता, आणि सगळेच सारखा पोटापुरता पगार घ्यायला तयार होतील किंवा नाहीं हा दुसरा प्रश्न होता. आम्ही दोघे तर अशा निश्चयावर आलों, कीं ज्यांना या योजनेंत दाखल होतां येत नसेल त्यांनीं स्वतःचा पगार घ्यावा; हळूहळू सर्वांनीं संस्थावासी होऊन राहावें अशी दृष्टि ठेवावी.

या दृष्टीनें मीं कामगारांशीं बोलणें सुरू केलें. मदनजितांना तर ती गोष्ट पटेच ना. त्यांना भीति वाटूं लागली, कीं त्यांनीं स्वतःचें शक्तिसर्वस्व खर्ची घालून उभी केलेली वस्तु माझ्या मूर्खपणामुळें महिनाभरांत धुळीला मिळून जाणार. ' इंडियन् ओपिनियन् ' चालणार नाहीं, छापखानाहि बंद पडेल आणि कामगार निघून जातील.

माझे पुतणे छगनलाल गांधी या छापखान्यांत काम करीत असत. वेस्ट-बरोबरच मीं त्यांचेशींहि गोष्ट काढली. त्यांच्या पाठीवर कुटुंबाचा बोजा होता. पण बालपणापासून त्यांनीं माझ्या ताब्यांत राहून काम करणें पसंत केलें होतें. माझ्यावर त्यांचा फार विश्वास होता, त्यामुळें ते वादविवाद न करतांच योजनेंत सामील झाले; व आजमितीपर्यंत माझ्याबरोबरच आहेत.

तिसरे गोविंदस्वामी नांवाचे मशीनियर होते; ते पण सामील झाले. इतर जरी संस्थावासी बनले नाहींत, तरी मी छापखाना घेऊन जाईन तिकडे येण्याचें त्यांनीं कबूल केलें.

अशा तऱ्हेनें कामगारांबरोबर बोलणें करण्यांत दोहोंपेक्षां अधिक दिवस गेले असतील असें मला स्मरत नाहीं. लगेच मीं वर्तमानपत्रांत डरबनच्या नजीक एखाद्या स्टेशनापाशीं जमीन पाहिजे म्हणून जाहिरात दिली. जबाब आला, त्यांत फिनिक्सच्या जमिनीची सांगी आली. वेस्ट व मी ती जमीन पाहायला गेलों. सात दिवसांच्या आंतच वीस एकर जमीन खरेदी केली. तींत पाण्याचा एक लहानसा झरा होता. नारंगीचीं व आंब्यांचीं कांहीं झाडें होतीं. त्याला लागूनच ८० एकरांचा दुसरा एक भाग होता. त्यांत बरींच फळझाडें होतीं, व एक झोंपडें होतें. तो भागहि आणखी काहीं दिवसांनीं खरेदी केला. दोहोंचे मिळून १००० पौंड दिले.

शेट पारसी रुस्तुमजी हे असल्या सर्व साहसामध्यें माझे सोबती असायचेच. त्यांना माझी ही योजना आवडली. एका मोठ्या गोडाऊनचे पत्रे वगैरे त्यांचेकडे पडलेले होते ते त्यांनीं मोफत दिले. त्यानिशीं बांधकाम सुरू केलें. कांहीं सुतार व गवंडी माझ्याबरोबर लढाईवर आलेले होते. त्यांपैकीं कांहींजण कामाला मिळाले. त्यांच्या मदतीनें कारखाना बांधण्यास सुरुवात केली. एका महिन्यांत घर तयार झालें. तें ७५ फूट लांब व ५० फूट रुंद होतें. वेस्ट वगैरे शरीराची पर्वा न करतां गवंडी-सुतारांबरोबर राहूं लागले.

फिनिक्समध्यें रान फार माजलेलें होतें, वसति बिलकुल नव्हती. त्यामुळें सर्पांचा उपद्रव होता. हें एक जोखीमच होतें. प्रथम तर सर्वजण तंबू ठोकून त्यांतच राहात असत.

मुख्य घर तयार झालें, तेव्हां आठ एक दिवसांत बहुतेक सामान खटा-

त्यांनीं फिनिक्सला नेलें. डरबन ते फिनिक्स तेरा मैलांचें अंतर होतें. फिनिक्स स्टेशनापासून अडीच मैल दूर होतें.

फक्त एकाच आठवड्याला 'इंडियन् ओपिनियन्' मर्क्युरी प्रेसमध्यें छापून घ्यावें लागलें.

माझ्याबरोबर हिंदुस्थानांतून जे जे नातेवाईक वगैरे आलेले होते, आणि व्यापारांत गुंतले होते, त्यांना माझ्या मताकडे ओढून फिनिक्समध्यें दाखल करून घेण्याचा मीं प्रयत्न चालविला. ते तर सर्व पैसे कमाविण्याच्या हेतूनें दक्षिण आफ्रिकेला आलेले होते. त्यांची समजूत घालणें महामुष्किलीचें काम होतें. पण कांहींची समजूत पटली. त्या सर्वांपैकीं मगनलाल गांधींचें नांव या वेळीं माझ्या नजरेसमोर विशेषेंकरून येत आहे. कारण, कीं इतर जे कबूल झाले होते, ते थोडाबहुत वेळ फिनिक्समध्यें राहून परत द्रव्यसंचयांत पडले. मगनलाल गांधी स्वतःचा व्यवहार आटोपून मला येऊन मिळाले ते तेव्हांपासून कायम राहिले आहेत. आणि स्वतःचें बुद्धिबल, त्यागशक्ति आणि अनन्यभक्ति यांचे बळावर माझ्या आन्तरिक प्रयोगांतील माझ्या मूळपासूनच्या सोबत्यांमध्यें आज प्रमुख स्थानीं आहेत; व स्वयंशिक्षित कारागीर या दृष्टीनें तर माझ्या मतें त्यांनीं त्यांच्यामध्यें अद्वितीय स्थान प्राप्त केलें आहे.

अशा तऱ्हेनें १९०४ सालीं फिनिक्सची स्थापना झाली आणि अनेक विटंबनांतून जावें लागलें असलें, तरी फिनिक्स संस्था व 'इंडियन् ओपिनियन्' दोन्ही अद्याप टिकून राहिलीं आहेत. पण या संस्थेला सुरुवातीला आलेल्या अडचणी व त्यांत झालेल्या आशा-निराशा ह्या परीक्षण्याजोग्या आहेत. तें पुढील प्रकरणांत पाहूं.

●●●

## २०

# पहिली रात्र

फिनिक्समध्यें पहिला अंक काढणें बरेंच जड गेलें. दोन बाबतींत अगोदरपासूनच काळजी घेण्याचें मला वेळींच सुचलें म्हणून बरें; नाहींपेक्षां अंक एक आठवडा बंद राहिला असता किंवा उशिरा निघाला असता. या संस्थेमध्यें एंजीनवर चालणारीं यंत्रें आणून उभीं करण्याची माझी वृत्ति नव्हतीच. जेथें शेतीसुद्धां जातीनें करावयाची होती तेथें वर्तमानपत्रहि हातांनीं चालवितां येण्यासारख्या यंत्रांनींच चालेल तर बरें असा विचार होता. पण तें जमण्यासारखें

नाहीं, असें त्या वेळीं वाटल्यावरून फिनिक्समध्यें ऑइल-एंजिन नेलेलें होतें; पण हें तेलयंत्र खडकलें तर तेवढ्या वेळेपुरती दुसऱ्या कसल्या तरी साधनांची तरतूद करून ठेवलेली बरी, असें मी वेस्टना सुचविलें, त्यावरून त्यांनीं हातानें चालवायचें एक चक्र ठेविलें होतें आणि त्या चाकानें मुद्रणयंत्राला गति देण्याची व्यवस्था केली होती. त्याचप्रमाणें वर्तमानपत्राचा आकार दैनिक पत्राएवढा असे. थोरलें यंत्र खडकलें तर तें लगेच दुरुस्त करण्याची सोय त्या ठिकाणीं नव्हती. त्यामुळेंहि वर्तमानपत्र खोळंबून राहण्याचा संभव होता. ही अडचण टाळण्यासाठीं वर्तमानपत्राचा आकार बदलून सामान्य साप्ताहिकाएवढा केला; हेतु असा कीं, अडचणीच्या वेळीं धाकट्या यंत्रावरहि पायानें थोडीं पानें तरी काढतां यावींत.

पहिल्या पहिल्यानें ' इंडियन् ओपिनियन् ' प्रसिद्ध होण्याच्या आदल्या रात्रीं सर्वांना थोडेंबहुत जागरण हें व्हायचेंच. पानांच्या घड्या करण्याच्या कामाला लहानमोठे सगळे लागत; आणि काम रात्रीं दहा बारा वाजतां पुरें होई. पण पहिल्या रात्रीचा कधींच विसर पडणार नाहीं. छापण्याची चौकट बांधून तयार झाली; पण एंजीन चालायला कबूल नाहीं ! एंजिन जोडून सुरू करून देण्यासाठीं एका एंजिनियरला बोलाविला होता. त्यानें आणि वेस्टनीं खूप मेहनत घेतली, पण एंजीन चालू म्हणून होईना. सगळे चिंताग्रस्त होऊन बसले. अखेरीला वेस्ट निराश होऊन डोळे भरून आलेले असे माझ्यापाशीं आले, आणि म्हणतात, " एंजीन आतां आज सुरू होण्याचें लक्षण दिसत नाहीं; अर्थात् या आठवड्याचा अंक वेळेवर निघत नाहीं. "

" तसेंच असेल तर आपला इलाज नाहीं. परंतु अश्रू ढाळण्याचें कारणच नाहीं. अजून कांहीं यत्न चालण्यासारखा असल्यास करून पाहूं या. हो, पण तो घोडा तर आहे ना ? " असें म्हणून मीं धीर दिला.

वेस्ट म्हणाले, " घोडा चालवायला माणसें पाहिजेत; तीं आपल्यापाशीं कोठें आहेत ? आपण आहों तेवढ्यांनीं तो घोडा चालणार नाहीं. तो चालवायला आळीपाळीनें चार चार माणसें पाहिजेत. आपण तर सर्व थकलेभागलेले आहों."

सुतारी काम सर्व आटोपलेलें नव्हतें, त्यामुळें सुतार अद्याप निघून गेले नव्हते. ते छापखान्यांत झोंपत असत. त्यांचेकडे बोट करून मीं म्हटलें, " पण हे सगळे मेस्त्री आहेत ते कशाला ? भरीला आपणहि सर्वजण आजची सर्व रात्र अखंड जागरण करूं. एवढें एक कर्तव्य शिल्लक राहिलें आहे असें मला वाटतें. "

" मेस्त्र्यांना उठवून त्यांची मदत मागायला आपली हिंमत चालत नाहीं; आणि आमच्या थकलेल्या माणसांना तरी कसें सांगावें ? "

" तें माझ्याकडे लागलें. " मीं म्हटलें.

" तर मग कदाचित् अजूनहि झेपेल."

मीं मेस्त्र्यांना जागें केलें आणि त्यांची मदत मागितली. मला त्यांच्या विनवण्या करण्याची जरूरच पडली नाहीं. ते म्हणाले, " अशा वेळीं आम्ही तुमच्या उपयोगी पडलों नाहीं तर आम्ही माणूस कसले ? तुम्ही खुशाल निजा. आम्ही घोडा चालवूं. आम्हांला हें काम जड वाटण्यासारखें नाहीं. "

छापखान्याचे लोक तर तयारच होते.

वेस्टचा हर्ष गगनांत मावेना. त्यांनीं काम करतांना भजन करण्यास सुरुवात केली. घोडा चालविण्यासाठीं मेस्त्र्याच्या बरोबर मी लागलों, आणि बाकीचेहि पाळीपाळीनें लागले. काम निघूं लागलें.

सकाळचा साताचा सुमार झाला. मी पाहातों तर काम पुष्कळ व्हायचें राहिलें होतें. वेस्टना मीं म्हटलें, " आतां एंजीनियरला उठवलें तर ? दिवसा-उजेडीं पुनः प्रयत्न करून एंजीन चालविलें तर आमचें काम वेळेवर आटपूं शकेल."

वेस्टनीं एंजीनियरला जागें केलें. तो लगेच उठला आणि एंजीनच्या खोलींत शिरला. एंजिन सुरू करतांच चालूं लागलें. सबंध छापखाना हर्षनादांनीं दुमदुमून गेला. " असें कशानें होत असेल ? रात्रीं काय काय मेहनत केली तरी चालेना; आणि आतां जणूं काय कांहींच झालें नाहीं अशा तऱ्हेनें चालू करतांच चालूं लागलें. "

वेस्टनीं कीं एंजीनियरनीं उत्तर दिलें, " याचें उत्तर देणें कठिण आहे. यंत्रांनासुद्धां जशी कांहीं आमच्याप्रमाणें विश्रांतीची जरूर पडत असावी अशा तऱ्हेनें वागतांना तीं कित्येकदां आढळतात ! "

मीं तरी असेंच मानलें कीं, एंजीनचें न चालणें ही आम्हां सर्वांची कसोटी होती, आणि आणीबाणीच्या वेळीं त्यानें चालू होणें हें शुद्ध मेहनतीचें शुभ फळ होतें.

वर्तमानपत्र वेळेवर स्टेशनवर पोचतें झालें, आणि सर्वांना हायसें झालें.

अशा तऱ्हेच्या आग्रहामुळें वर्तमानपत्राची नियमितपणाविषयीं कीर्ति झाली आणि फिनिक्समध्यें मेहनतीचें वातावरण निर्माण झालें. या संस्थेमध्यें असेंहि एक युग येऊन गेलें कीं, एंजीन इरादापूर्वक बंद करण्यांत आलें आणि दृढतापूर्वक घोड्यावरच काम चालवीत. फिनिक्सचा हा उच्चांत उच्च नैतिक काल होता अशी माझी समजूत आहे.



## २१

# पोलाकनीं उडी ठोकली

फिनिक्ससारखी संस्था स्थापिल्यानंतर खुद्द मी तिच्यामध्यें फारच थोडा वेळ राहूं शकलों. ह्या गोष्टीचें मला नेहमीं दुःख वाटतें. तिची स्थापना करते वेळीं माझी कल्पना अशी होती, कीं मी तिथेंच घर करून राहीन, उपजीविका तेथील कामांतूनच चालवीन, हळूहळू वकिली सोडीन, फिनिक्समध्यें राहून जी काय सेवा होण्यासारखी असेल तेवढी करीन आणि फिनिक्सची योजना यशस्वी करणें हें स्वतःचें इतिकर्तव्य मानीन. परंतु या विचारांची मी योजली होती तशी अंमलबजावणी झालीच नाहीं. ही गोष्ट माझ्या अनेकवार अनुभवाला आली आहे कीं, आपण योजतों एक आणि घडून येतें कांही दुसरेंच. पण त्याबरोबरच माझा असाहि अनुभव आहे, कीं जेथें सत्याचीच साधना व उपासना आहे, तेथें परिणाम आपल्या योजनेप्रमाणें न का येईना, तरीहि जो अकल्पित परिणाम येतो तोहि अनिष्ट तर नसतोच, उलट कित्येक वेळां आपण इच्छिलेल्या परिणामाहून अधिक श्रेयस्कर असतो. फिनिक्सचें जें अकल्पित रूपान्तर झालें तें अनिष्ट नव्हतें, एवढें तरी मी निश्चयपूर्वक सांगू शकतों. अधिक श्रेयस्कर होतें कीं नाहीं हें मी खात्रीपूर्वक सांगू शकत नाही.

आपण सर्वांनीं अंगमेहनतीनें पोट भरावें अशा कल्पनेनें मुद्रणालयाच्या आसपास प्रत्येक रहिवाश्यासाठीं तीन तीन एकर जमिनीचे तुकडे पाडले होते. त्यांत एक तुकडा माझ्यासाठींहि मोजून निराळा काढण्यांत आला. या सर्व तुकड्यांवर आम्ही आम्हां सर्वांच्या इच्छेविरुद्धच पत्र्याचीं घरें बांधलीं. इच्छा तर शेतकऱ्याला साजेशी मातीगवताचीं किंवा विटांचीं खोपटीं बांधण्याची होती, तें घडूं शकलें नाहीं. त्याला पैसेहि अधिक खर्चावे लागणार होते, वेळहि अधिक लागणार होता. सर्वजण त्वरित घरदार थाटून कामाला लागण्यास आतुर झाले होते.

संपादक तर मनसुखलाल नाझरच गणले जात होते. ते ह्या योजनेमध्यें सामील झाले नव्हते. त्यांचें बिऱ्हाड डरबनमध्येंच होतें. डरबनमध्यें 'इंडियन् ओपिनियन्'ची एक छोटी शाखाहि होती.

टाईप जुळविण्यासाठीं पगारी नोकर तर होतेच; पण विचार असा होता कीं, वर्तमानपत्र चालविण्याच्या कामीं अधिकांत अधिक वेळ खाणारी पण तितकीच सोपी अशी जी टाईप जुळविण्याची क्रिया ती सर्व संस्थावासीयांनीं शिकून घ्यावी व करावीहि. यासाठीं ज्यांना माहिती नव्हती ते शिकून तयार झाले. मी या कामांत शेवटपर्यंत एक नंबरचा ढ राहिलों आणि मगनलाल गांधींनी

सर्वांचे पुढें आघाडी मारली. मी नेहमींच मानीत आलों आहें, कीं त्यांना स्वतःलाच स्वतःमध्यें असलेल्या शक्तीची खबर नव्हती. पूर्वी कधीं छापखान्याचें काम केलेलें नसतां ते टाईप जुळविण्यांत तरबेज झाले आणि वेगाच्या बाबतींतहि त्यांनीं खूप प्रगति केली; एवढेंच नव्हे तर, थोडक्याच वेळांत छापखान्यासंबंधींच्या सर्व कामांमध्यें चांगल्या तऱ्हेनें वाकबगार झाले व मला आश्चर्यचकित करून सोडलें.

हें काम अद्याप रांकेला लागलें नव्हतें, घरेंहि तयार झालेलीं नव्हतीं; इतक्यांतच या नवीन रचलेल्या कुटुंबाला सोडून मी जोहानिसबर्गला पळ काढला. तिकडचें काम फार काळपर्यंत बाजूला सारण्यासारखी माझी स्थिति नव्हती.

जोहानिसबर्गला येऊन पोलाकपाशीं या महत्त्वाच्या फेरफारासंबंधीं बोललों. आपण दिलेल्या पुस्तकाचा एवढा परिणाम झालेला पाहून त्यांना अपार आनंद झाला.

" तर मग मलाहि यांत कोणत्या ना कोणत्या रीतीनें भाग नाहीं घेतां येणार ? " त्यांनीं उत्साहाच्या भरांत विचारलें.

मीं म्हटलें, " तुम्हांला जरूर भाग घेतां येईल. इच्छा असेल तर तुम्हांला योजनेंत सामीलहि होतां येईल."

" मला सामील करणार तर माझी तयारीच आहे. " पोलाकनीं उत्तर दिलें.

ही दृढता पाहून मी चकितच झालों. पोलाकनीं ' क्रिटिक ' मधून आपली मोकळीक करण्याबद्दल मालकाला एक महिन्याची नोटीस दिली व मुदत भरतांच फिनिक्सला गेले. आपल्या मनमिळाऊ स्वभावानें त्यांनीं सर्वांचीं मनें हरण केलीं आणि ते कुटुंबांतलेसे होऊन राहूं लागले. साधेपणा त्यांच्या अंगींच होता, त्यामुळें फिनिक्सच्या राहाणीमध्यें त्यांना कांहीं नवखें किंवा जडसें तर वाटलें नाहींच, उलट ती राहाणी त्यांना स्वाभाविक व मौजेची वाटली.

पण मीच त्यांना तेथें फार काळपर्यंत राखूं शकलों नाहीं. मि. रिचनीं विलायतेला जाऊन कायद्याचा अभ्यास पुरा करण्याचें ठरविलें. मला एकट्याला ऑफिसचें काम झेंपण्यासारखें नव्हतें. त्यासाठीं मी पोलाकना माझ्या ऑफिसांत राहून वकिलीचा अभ्यास करण्याविषयीं सुचविलें. माझ्या मनांतील हेतु असा, कीं ते वकील झाले तरी शेवटीं आम्ही दोघेहिजण फिनिक्समध्येंच जाऊन राहूं.

हे सगळे बेत निष्फळ ठरले. पण पोलाकच्या स्वभावामध्यें असा एक सीधेपणा होता, की ज्याच्यावर त्यांचा विश्वास बसला त्याच्याबरोबर वितंडवाद न घालतां त्याच्या विचारानुसार वागण्याचा प्रयत्न करायचा. पोलाकनीं मला लिहिलें, " मला तर हीच राहाणी आवडते. येथें मी आनंदांत आहें. या संस्थेचीच आपल्याला वाढ करतां येईल. पण तुम्हांला जर असें वाटत असेल, कीं

मी तिकडे आल्यानेंच आपले हेतु लवकर सफल होतील, तर मी यायला तयार आहें. " मला हें पत्र पसंत पडलें. पोलाक फिनिक्स सोडून जोहानिसबर्गला आले व माझ्या ऑफिसांत वकिली उमेदवार या नात्यानें दाखल झाले.

याच सुमाराला एक स्कॉच थिऑसॉफिस्ट, ज्याला मी कायद्याच्या परीक्षेची तयारी करण्यांत मदत करीत असे, त्यालाहि मीं पोलाकचें अनुकरण करण्याविषयीं आग्रह केला, व तोहि येऊन मिळाला. त्याचें नांव मॅकिनटायर.

अशा तऱ्हेनें फिनिक्सचें ध्येय लवकर गांठण्याच्या शुभ इराद्यानें मी तद्विरुद्ध अशा राहाणीमध्येंच अधिकाधिक जखडला जातों, कीं काय असें वाटूं लागलें. आणि ईश्वरी संकेतच अन्य तऱ्हेचा नसता, तर साध्या राहाणीच्या नांवाखालीं पसरलेल्या मोहजालामध्यें मीं स्वतःच अडकणार होतों.

आमची कोणाचीहि कल्पना नाहीं अशा तऱ्हेनें माझें व माझ्या ध्येयाचें रक्षण कशा तऱ्हेनें झालें त्याच्या हकीकतीपर्यंत पोंचायला अजून कांहीं प्रकरणें पाहिजे आहेत.

## २२

# राम ज्याचा पाठीराखा

आतां लवकरच स्वदेशीं परत जाण्याची, निदान जाऊन तिकडेच कायम राहाण्याची आशा मीं सोडून दिली होती. पत्नीशीं तर मी एक वर्षाची बोली करून दक्षिण आफ्रिकेला आलों होतों. वर्ष होऊन गेलें व माझें परत जाण्याचें लांबलें, म्हणून मुलांना बोलावून घेण्याचा निश्चय केला.

मुलें आलीं. त्यांमध्यें माझा तिसरा मुलगा रामदासहि होता. त्याची वाटेमध्यें बोटीच्या कप्तानाबरोबर खूप दोस्ती जमली आणि त्याच्याबरोबर खेळतांना त्याचा हात मोडला. कप्ताननें त्याची खूप शुश्रूषा केली होती. डॉक्टरानें हाड सांधलें होतें, व तो जेव्हां जोहानिसबर्गला येऊन पोंचला त्या वेळीं त्याचा हात लांकडाच्या पट्ट्यांमध्यें बांधून व गळ्यांत रुमालाची झोळी अडकवून तींत लटकावून ठेविलेला होता. बोटीच्या डॉक्टरचा सल्ला होता कीं, जखमेवर कोणा तरी डॉक्टराकडून उपाय करवावे.

पण माझा तो काळ तर एकजात मातीचे उपचार करण्याचा होता. माझ्या ज्या अशिलांचा माझ्या आडमुठ्या वैद्यकीवर विश्वास होता, त्यांचेकडूनहि मी मातीचे व पाण्याचे उपचार करवीत असें. मग रामदासाच्या बाबतींत

तरी दुसरें काय करणार? रामदासाचें वय आठ वर्षांचें होतें. "मीच तुझ्या जखमेची धू-पूस केली तर तूं भिणार तर नाहींस ना?" असें मीं त्याला विचारलें. रामदासानें मला उपचार करण्यास हंसत परवानगी दिली. या वयांत त्याला सारासार विवेक आलेला नव्हता असें जरी असलें तरी, डॉक्टर आणि नाका-डोळ्यांचा वैद्य यांचेमधील भेद तरी त्याला चांगल्या तऱ्हेनें समजत होता. असें असूनहि त्याचा माझ्यावर व माझ्या प्रयोगांवर विश्वास होता, त्यामुळें त्याला भीति वाटली नाहीं.

कांपत कांपत मीं त्याची पट्टी सोडली, जखम साफ केली आणि स्वच्छ मातीची घडी ठेवून पट्टी पहिल्याप्रमाणें बांधून दिली. अशा तऱ्हेनें मीं रोज स्वतः जखम धुऊन माती लावीत असें. महिनाभरांत जखम पूर्ण बरी झाली. एकहि दिवस कसली अडचण आली नाहीं आणि दिवसेंदिवस जखम भरत गेली. डॉक्टराच्या मलमपट्टीनेंसुद्धां एवढा वेळ तरी लागणारच असें बोटीवरच्या डॉक्टरानें कळविलें होतें.

या अनुभवानें अशा तऱ्हेच्या घरगुती उपचारांविषयींचा माझा विश्वास आणि त्यांचा उपयोग करण्याबद्दलचें धैर्य हीं अधिकच वाढलीं. यानंतर मी प्रयोगांचें क्षेत्र खूप वाढविलें. जखमा, ताप, अजीर्ण, कावीळ इत्यादि रोगांसाठीं मातीचे, पाण्याचे आणि उपासाचे प्रयोग लहानमोठ्या स्त्री-पुरुषांवर केले, आणि ते बहुतेक यशस्वी झाले. असें असतांहि जी हिंमत मला दाक्षिण आफ्रिकेमध्यें वाटत होती, ती येथें राहिलेली नाहीं; आणि अनुभवानें असेंहि पाहिलें आहे, कीं या प्रयोगांमध्यें धोकाहि असतो.

या प्रयोगांचें वर्णन करण्यामध्यें माझा हेतु त्या प्रयोगांची यशस्विता सिद्ध करण्याचा नाहीं. एकहि प्रयोग सर्वस्वीं यशस्वी झाला असेंहि म्हणतां येण्यासारखें नाहीं. डॉक्टर आपल्या उपचारांसंबंधींहि तशी खात्री देऊं शकत नाहींत. पण एवढेंच सांगण्याचा हेतु आहे कीं, ज्याला नवीन व अपरिचित प्रयोग करावयाचे असतील त्यानें स्वतःपासून सुरुवात केली पाहिजे. तसें झाल्यास सत्य लवकरच प्रकट होतें, व अशा तऱ्हेचे प्रयोग करणाराला ईश्वर संभाळून नेतो.

मातीच्या प्रयोगांमध्यें जसे धोके होते, तसेच युरोपियनांच्या निकट सहवासामध्येंहि होते. भेद फक्त प्रकाराचा होता. पण या धोक्यांचा विचार माझ्या स्वतःच्या मनाला कधीं शिवलेलाहि नाहीं.

पोलाकना माझ्या घरीं राहाण्यास निमंत्रण दिलें व आम्हीं सख्ख्या भावांप्रमाणें राहूं लागलों. पोलाकनीं ज्या स्त्रीशीं लग्न केलें तिच्याशीं त्यांची मैत्री आधीं अनेक वर्षांपासूनची होती. उभयतांमध्यें, अनुकूल काल येतांच, लग्न लावण्याचें ठरूनहि राहिलें होतें. परंतु पोलाक थोड्याबहुत द्रव्यसंग्रहाची वाट

पहात राहिलेले होते असें मला स्मरतें. त्यांनीं रस्किनचा माझ्यापेक्षां पुष्कळच विस्तृत अभ्यास केला होता; पण पश्चिमेच्या वातावरणांत त्यांना रस्किनचे विचार पूर्णपणें कृतींत आणण्याचें सुचण्यासारखें नव्हतें. मीं असा युक्तिवाद केला कीं, " जिच्याशीं हृदयाची गांठ बांधली गेली तिचा वियोग केवळ द्रव्य नाहीं म्हणून सहन करावा हें योग्य नाहीं. तुमच्या हिशेबाप्रमाणें गरीबाला कोणालाच लग्न करतां येणार नाहीं. त्यांतूनहि आतां तर तुम्ही माझ्याबरोबरच राहतां; अर्थात् प्रपंच-खर्चाचा प्रश्नच नाहीं. तुम्ही लवकर लग्न करावें अशीच माझी तर इच्छा आहे."

मला पोलाकबरोबर कधीं दोनदां वाद करावा लागलेलाच नाहीं. त्यांनीं माझें म्हणणें लगेच उचलून धरलें. भावी मिसेस् पोलाक तर विलायतेमध्यें होत्या. त्यांच्याशीं पत्रद्वारें विचार केला. त्यांना आनंदच झाला, आणि थोड्याच महिन्यांत विवाह करण्यासाठीं त्या जोहानिसबर्गला येऊन पोंचल्या.

विवाहामध्यें खर्च मुळींच केला नाहीं. लग्नाचा म्हणून निराळा पोषाखहि नव्हता. त्यांना धर्मविधीची आवश्यकता वाटत नव्हती. मिसेस् पोलाक जन्मतः ख्रिस्ती होत्या व पोलाक यहुदी; दोघांच्यामध्यें सामान्य धर्म म्हणजे नीतिधर्म हाच होय.

पण या लग्नासंबंधींचा एक मजेदार प्रसंगहि सांगून टाकतों. ट्रान्सवालमध्यें गोऱ्या लोकांच्या लग्नाची नोंद करणारा अंमलदार काळ्या माणसांच्या लग्नांची नोंद करणार नाहीं. या लग्नांत नवऱ्यामुलाचा टोकणा मी होतों. एखादा गोरा मित्रहि काढतां आला असता. पण पोलाकना तें खपण्यासारखें नव्हतें. म्हणून आम्ही तिघेंजणें अंमलदारापुढें हजर झालों. मी जेथें टोकणा तेथें वधूवरें दोघेंहि गोरीं असतील याबद्दल अंमलदाराला खात्री कशी वाटावी ? त्यानें तपास करी-पर्यंत नोंद तहकूब ठेवण्याचा विचार केला. दुसऱ्या दिवशीं नाताळमधील एक सण होता. घोड्यावर बसलेल्या वधूवरांचा विवाहमुहूर्त अशा तऱ्हेनें लांबणीवर पडावा हें सर्वांना असह्य वाटलें. वडा मॅजिस्ट्रेट माझ्या ओळखीचा होता. तो या खात्याचा मुख्य होता. मी या जोडप्याला घेऊन त्याचेपुढें हजर झालों. तो हंसला आणि त्यानें मला चिठी लिहून दिली. अशा तऱ्हेनें विवाह रजिस्टर झाला.

अजूनपर्यंत थोडेबहुत तरी परिचित असेच गोरे पुरुष माझ्या घरीं राहिले होते. आतां अपरिचित अशी एक इंग्रज बाई कुटुंबांत दाखल झाली. मला स्वतःला तरी कधीं काळीं भांडणतंटा झाल्याचें स्मरत नाहीं. परंतु जेथें अनेक जातींच्या आणि निरनिराळ्या स्वभावांच्या हिंदी लोकांचें येणें जाणें असे, जेथें माझ्या पत्नीलाहि अद्याप अशा तऱ्हेचे अनुभव विशेषसे मिळालेले नव्हते, तेथें या दोघांनाहि क्वचित् उद्वेगाचे प्रसंग आलेहि असतील. पण एकाच जातीच्या कुटुंबाला तशा तऱ्हेचे जेवढे प्रसंग येतात त्यापेक्षां या मिश्रजातीय कुटुंबाला

अधिक तरी आले नाहींत एवढें खास. एवढेंच नव्हे, तर जे प्रसंग आल्याचें मला स्मरतें तेहि क्षुल्लक होते. सजातीय–विजातीय हे मनाचे तरंग. आपण सर्व मिळून एकच कुटुंब आहों.

वेस्टचा विवाहहि याच मंडपांत साजरा करून घेतों. माझ्या आयुष्यांतील या काळीं ब्रह्मचर्यासंबंधींचे माझे विचार परिपक्व झाले नव्हते, त्यामुळें अविवाहित मित्रांचीं लग्नें लावून देण्याचा माझा धंदाच होता. वेस्ट आईबापांच्या भेटी-साठीं जाण्यास निघाले, तेव्हां त्यांना मीं शक्य तर लग्न करूनच परत येण्याचा सल्ला दिला. फिनिक्स आमचें सर्वांचें घर झालें होतें, आणि आम्ही सर्व शेतकरी होऊन बसलों होतों; त्यामुळें विवाह किंवा वंशवृद्धि यांत भीति वाटण्याजोगें कांहीं राहिलें नव्हतें.

वेस्ट लेस्टर परगाण्यांतील एका सुंदर कुमारिकेशीं लग्न करून तिला घेऊन आले. त्या बाईचें कुटुंब लेस्टरमध्यें बुटांचा मोठा धंदा चालतो, त्यामध्यें काम करणारें होतें. मिसेस् वेस्टनींसुद्धां बुटांच्या कारखान्यांत कांहीं काळ घालविला होता. त्यांना मी ‘सुंदर’ म्हटलें आहे. कारण त्यांच्या अंगच्या गुणांचा मी पुजारी आहें; आणि खरें सौंदर्य तर गुणांतच आहे. वेस्ट आपल्या सासूलाहि घेऊन आले होते. ती भली बाई अजूनहि जिवंत आहे. तिची उद्योगशीलता आणि तिचा सदा हंसतमुख चेहरा पाहून आमची आम्हांलाच लाज वाटत असे.

गोऱ्या मित्रांचीं लग्नें करवलीं, त्याचप्रमाणें हिंदी मित्रांना आपापल्या कुटुंबांना बोलावून घेण्यास उत्तेजन दिलें. त्यामुळें फिनिक्स एक छोटेंसें खेडें बनून गेलें. तेथें पांचसात हिंदी कुटुंबें राहूं लागलीं, व त्यांची वाढहि होऊं लागली.

● ●

## २३

# घरांतील फेरफार व बालशिक्षण

डरबनमध्यें बिऱ्हाड केलें होतें. त्यांतहि फेरफार केलेच होते. खर्च मोठा चाले, तरीहि वळण साधेपणाकडे होतें. पण जोहानिसबर्गमध्यें ‘सर्वोदयां’तील विचारामुळें विशेषच फेरफार झाले.

बॅरिस्टरच्या घरांत जितका साधेपणा आणतां येण्यासारखा होता, तेवढा तर आणलाच; तरी पण कांहीं सामान काढून टाकण्यासारखें नव्हतें. खरा साधेपणा वाढला तो अंतःकरणाचा. प्रत्येक काम स्वतःच्या हातानें करण्याची हौस वाढली, आणि त्यांत मुलांनाहि तयार करूं लागलों.

बाजारची रोटी घेण्याऐवजीं घरच्या घरींच मोहनांशिवायची क्युनेच्या सूचनेनुरूप रोटी हातानें करूं लागलों. तिला गिरणीचें पीठ उपयोगाचें नव्हतें. गिरणींत दळून आणलेल्या पिठाऐवजीं हातानें दळलेलें पीठ वापरण्यांत साधेपणा, आरोग्य व पैशाची अधिक काटकसर हीं साधतात, असेंहि मला वाटलें. म्हणून हातानें चालविण्याचें एक जातें सात पौंड देऊन खरेदी केलें. त्याचें पेड जड होतें. तें दोघांना सुखानें चालवितां येई, एकट्याला जड पडे. हें जातें फिरविण्यास मुख्यतः पोलाक, मी व मुलें लागत असूं. कस्तुरबाई त्या वेळीं स्वयंपाकांत गुंतलेली असे, पण तीहि कधीं कधीं येई. मिसेस् पोलाक आल्या, तेव्हां त्याहि यांत सामील झाल्या. हा व्यायाम मुलांना चांगला फायदेशीर झाला. त्यांच्याकडून हें किंवा दुसरें कसलेंहि काम मीं कधीं बलात्कारानें करवून घेतलेलें नाहीं, पण ते आपण होऊनच खेळ म्हणून जातें फिरवायला येत. दमले म्हणजे सोडून जाण्याची त्यांना मोकळीक होती. परंतु कारण कांहींहि असो, पण हीं मुलें काय किंवा इतरहि काय, ज्यांची माहिती आपल्याला पुढें होणार आहे, तींहि सर्वच मला नेहमींच खूप काम करून देत असत. माझ्या नशिबानें तिढ्या मुलांशींहि प्रसंग येत असे, नाहीं असें नाहीं; पण बहुतेकजण दिलेलें काम हौसेनें करीत. ‘ दमलों ’ म्हणणारे त्या वेळच्या मुलांमध्यें तरी फारसे कोणी आठवत नाहींत.

घरच्या साफसफाईसाठीं एक नोकर होता. तो कुटुंबांतीलच एक होऊन राहात असे, आणि त्याच्या कामांत मुलेंहि भरपूर भाग घेत. पायखान्यांतील मळ काढून न्यायला म्युनिसिपालिटीचा नोकर येत असे; पण पायखान्याची खोली साफ करणें, बैठक धुणें वगैरे कामें नोकराकडे देण्यांत येत नसत. त्यानें करावी अशी अपेक्षाच ठेवलेली नव्हती, तें काम आम्ही जातीनें करीत असूं, व त्यांतहि मुलांना शिक्षण मिळे. त्याचा परिणाम असा झाला, कीं माझ्या एकाहि मुलाला पायखाने साफ करण्याची खंत वाटत नाहीं; आणि आरोग्याचे सामान्य नियमहि ते सहजासहजीं शिकले आहेत. जोहानिसबर्गमध्यें आजारी तर कोणी क्वचितच पडत असे. कोणी पडला तर शुश्रूषेला मुलें असत आणि तें काम तीं आनंदानें करीत.

त्यांच्या अक्षरज्ञानाकडे मीं दुर्लक्ष केलें असें मी म्हणत नाहीं, परंतु तें बाजूला सारून ठेवण्याचाहि मला संकोच वाटला नाहीं. या न्यूनाबद्दल माझ्या मुलांना माझ्याविरुद्ध तक्रार करायला कारण राहिलेलें आहे. त्यांनीं कित्येकदां स्वतःचा असंतोष लोकांपुढें व्यक्तहि केला आहे. या बाबतींत मला वाटतें, मीं स्वतःचा थोडासा दोष कबूल केला पाहिजे. त्यांना अक्षरज्ञान देण्याची इच्छा मला फार फार होई, प्रयत्नहि करीत असें; पण त्या कामीं नेहमींच कांहीं ना कांहीं विघ्न येऊन पडत असे. घरीं त्यांना शिकविण्याची दुसरी कांहीं सोय केलेली नव्हती. म्हणून त्यांना माझ्याबरोबर चालत ऑफिसांत घेऊन जात असें. ऑफिस

अडीच मैल दूर होतें. म्हणजे सकाळ–संध्याकाळ मिळून कमींत कमी पांच मैलांची रपेट त्यांना व मला मिळत असे. रस्त्यानें चालतांना कांहीं तरी शिकविण्याचा प्रयत्न करीत असें, पण तेंहि माझ्याबरोबर येणारे दुसरे कोणी नसतील तर. ऑफिसांत त्यांना कारकून व अशील यांचा सहवास घडे, कांहीं वाचायला दिलेलें असलें तर तें वाचीत, हिंडत फिरत, बाजारांतून किरकोळ जिन्नस आणायचे असल्यास ते आणीत. सर्वांत वडील जो हरिलाल त्याखेरीज इतर सर्व मुलगे अशा तऱ्हेनें वाढले. हरिलाल हिंदुस्थानांतच राहिला होता. मला जर त्यांना अक्षरज्ञान देण्यासाठीं नियमितपणें १ तास तरी काढतां आला असता, तर त्यांना आदर्श शिक्षण मिळालें असें मीं मनाशीं समाधान मानलें असतें. त्या बाबतींत मी दृढ राहिलों नाहीं, याबद्दलचें दुःख त्यांच्या व माझ्या दोघांच्याहि मनांत राहून गेलें आहे. वडील मुलानें स्वतःचा आर्तस्वर माझ्यापाशीं व जाहीर रीतीनेंहि अनेक वेळां काढला आहे. इतरांनीं हृदयाची उदारता वापरून हा दोष अपरिहार्य मानून तो पोटांत घातला आहे. या न्यूनाबद्दल मला पश्चात्ताप होत नाहीं, किंवा होत असेल तर एवढाच, कीं मी आदर्श पिता झालों नाहीं, पण त्यांच्या अक्षरज्ञानाचा दोषहि मी, कदाचित् अज्ञानानें असेल पण स्वतःच्या बुद्धीला प्रामाणिकपणें जें लोकसेवेचें कर्तव्य वाटत होतें त्याचेसाठींच केलेला आहे अशी माझी समजूत आहे. त्यांचें शील घडविण्याच्या कामीं जें कांहीं करणें योग्य होतें तें करण्याचे कामीं मीं कुचराई केलेली नाहीं एवढें मात्र मीं सांगूं शकतों; व प्रत्येक मातापितरांचें हें अवश्यमेव कर्तव्य आहे असें मला वाटतें. आणि माझी अशी दृढ समजूत आहे कीं, मीं मेहनत केली असतांहि माझ्या मुलांमध्यें जे कांहीं चारित्र्यदोष दिसून आले आहेत ते आम्हां नवराबायकोच्या दोषांचें प्रतिबिंब आहे.

मुलांमध्यें आईबापांच्या रूपाचा वारसा ज्याप्रमाणें उतरतो, त्याचप्रमाणें त्यांच्या गुणदोषांचा वारसाहि उतरणारच. त्यांच्यामध्यें सभोंवारच्या वातावरणामुळें कांहीं कमीअधिक झालें तरी, मूळ भांडवल बापजाद्यांकडून जें मिळालें असेल तेंच खरें. अशा तऱ्हेच्या आनुवंशिक दोषांपासून कांहीं मुलें आपली सुटका करून घेतात असेंहि मला आढळलें आहे. हा आत्म्याचा मूलस्वभाव होय. ती त्याचीच थोरवी होय.

पोलाक व माझ्यामध्यें या मुलांच्या इंग्रजी शिक्षणासंबंधीं कडाक्याचा वादविवाद होई. मीं प्रथमपासूनच मानीत आलों आहे कीं, जें हिंदी आईबाप आपल्या मुलांना बालपणापासूनच इंग्रजी बोलणारीं बनवितात ते त्या मुलांचा व देशाचा द्रोह करतात. मला असेंहि वाटतें, कीं त्यामुळें मुलें आपल्या देशाच्या धार्मिक व सामाजिक वारशापासून वंचित राहातात आणि तेवढ्या अंशानें देशाची

किंवा जगाची सेवा करण्यास कमी लायक बनतात. माझें मत अशा तऱ्हेचें असल्यामुळें मी मुलांबरोबर नेहमीं मुद्दाम गुजराथी भाषेंतच बोलत असें. पोलाकना तें आवडत नसे. त्यांचें म्हणणें, मी मुलांच्या भावी उत्कर्षाला आडकाठी आणतों. इंग्रजीसारखी विस्तृत प्रसार पावलेली भाषा जर मुलांना बालपणापासून अवगत झाली, तर जगामध्यें चालू असलेल्या जीवनाच्या शर्यतीमध्यें त्यांनीं एक मोटा टप्पा सहजीं गांठल्याप्रमाणें होईल, असें आपलें मत ते मला आग्रहपूर्वक व प्रेमपूर्वक पटवून देण्याचा प्रयत्न करीत. मला तें पटेना. माझें उत्तर त्यांना अखेरीस मनापासून पटलें, कीं माझा हट्ट पाहून ते उगी बसले तें आतां मला स्मरत नाहीं. या संवादाला आतां वीस वर्षें झालीं. तरीहि हे माझे विचार, जे त्या वेळीं होते तेच अनुभवानें अधिक दृढ झाले आहेत. आणि माझे मुलगे अक्षरज्ञानामध्यें कच्चे राहिले असले तरी स्वभाषेचें सामान्य ज्ञान त्यांना सहजीं मिळालें. त्यापासून त्यांचा व देशाचा फायदाच झालेला आहे. नाहींपेक्षां आज ते हिंदुस्थानांत परकेसे होऊन राहिले असते. दुभाष्ये तर ते आपोआपच बनले. कारण विस्तृत इंग्रज मित्रमंडळाच्या सहवासांत आल्यानें व जेथें मुख्यतः इंग्रजी भाषाच बोलली जाते, अशा देशांत राहिल्यानें त्यांना इंग्रजी बोलतां येऊं लागलें व साधारण लिहितांहि येऊं लागलें.

•••

२४

# झुलू बंड

घर थाटून बसल्यानंतर स्थिरपणें एका ठिकाणीं राहाण्याचें माझ्या कधीं नशिबींच नाहीं. जोहानिसबर्गमध्यें मी नित्यक्रमांत रुळल्यासारखा होतों न होतों इतक्यांत एक अकल्पित बनाव घडून आला. नाताळमध्यें 'झुलू बंड' झाल्याची बातमी ऐकली! माझें झुलू लोकांशीं वैर नव्हतें. त्यांनीं एकाहि हिंदी माणसाचें कांहीं वांकडें केलेलें नव्हतें. 'बंड' संज्ञेच्या युक्ततेबद्दलहि मला शंका होती. पण इंग्रजी साम्राज्य हें जगाचें हित करणारें साम्राज्य आहे, असें मला त्या वेळीं वाटत असे. माझी राजनिष्ठा हृदयापासूनची होती. त्या साम्राज्याच्या नाशाची इच्छा मी करीत नव्हतों. त्यामुळें सरकार आपली शक्ति या ठिकाणीं न्यायानें वापरीत आहे कीं अन्यायानें, हा विचार माझ्या कर्तव्यपालनाच्या आड येण्यासारखा नव्हता. नाताळवर संकट आलें, तर रक्षण करण्यासाठीं त्यांचेपाशीं स्वयंसेवकांचें

लष्कर होतें, आणि संकटकाळीं त्यांच्यामध्यें पुरेशी भरतीहि होण्यासारखी होती. स्वयंसेवकांचें लष्कर हें बंड मोडण्यासाठीं बाहेर पडलें असल्याचेंहि मीं वाचलें.

मी स्वतःला नाताळवासी समजत असें, आणि नाताळशीं माझा संबंध तर होताच. म्हणून मीं गव्हर्नरला पत्र लिहिलें, कीं जरूर असेल तर जखमी लोकांची शुश्रूषा करण्यासाठीं हिंदी लोकांची एक तुकडी घेऊन सेवा करण्यासाठीं जाण्यास मी तयार आहें. गव्हर्नरचा लगेच होकारार्थीं जबाब आला. अनुकूल जबाबाची किंवा तो इतक्या त्वरेनें येण्याची आशा मला वाटली नव्हती; तरीहि हें पत्र लिहिण्यापूर्वीं मीं माझी व्यवस्था योजून ठेविली होती. असें ठरविलें होतें कीं, गव्हर्नराकडून मागणीचा स्वीकार झाला, तर जोहानिसबर्गचें बिऱ्हाड मोडून टाकावें, मि. पोलाकनीं निराळें लहानसें घर घेऊन राहावें, आणि कस्तुरबाईनें फिनिक्सला जाऊन राहावें. या योजनेला कस्तुरबाईची पूर्ण संमति मिळाली. माझ्या अशा तऱ्हेच्या कृत्यांमध्यें मला तिच्याकडून कधींहि आडकाठी आल्याचें मला स्मरत नाहीं. गव्हर्नरचा जबाब येतांच मीं घराच्या मालकाला घर सोडण्याबद्दल एक महिन्याची नोटीस दिली. सामानसुमान कांहीं फिनिक्सला गेलें. कांहीं पोलाकपाशीं राहिलें.

डरबनला पोंचतांच मीं स्वयंसेवकांसाठीं मागणी केली. मोठ्या तुकडीची जरूर नव्हती. आम्ही चोवीसजण तयार झालों. त्यांत माझ्याखेरीज चार गुजराथी होते. बाकीचे मद्रास इलाख्यांतील गिरमिटमुक्त मजूर होते व एक पठाण होता.

मानहानि होऊं नये आणि कामालाहि सोयीचें पडावें अशासाठीं, व तशी पद्धतहि होती म्हणून, औषधखात्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें मला 'सार्जंट मेजर'-चा तात्पुरता हुद्दा दिला, आणि माझ्या पसंतीच्या आणखी तिघांना 'सार्जंट'चा व आणखी एकाला ' कॉर्पोरल 'चा असे हुद्दे दिले. पोषाखहि सरकारकडून मिळाले. या तुकडीनें सहा आठवडेपर्यंत सतत काम केलें असें म्हणतां येईल.

' बंडा 'च्या जागीं प्रत्यक्ष जाऊन पाहातों तर बंड म्हणण्यासारखें कांहींच नव्हतें. विरुद्ध पक्ष कोठें दिसतच नव्हता. बंड म्हणावयास कारण एवढेंच, कीं झुलू लोकांवर नवीन कर लादण्यांत आला होता. तो न देण्याबद्दल एका झुलू सरदारानें आपल्या लोकांना सल्ला दिला, आणि कर वसूल करण्यासाठीं गेलेल्या एका सार्जंटला त्यानें कापून काढला. तें कसेंहि असो, माझें हृदय झुलू लोकांच्या बाजूला होतें आणि ठाण्यावर पोंचल्यानंतर जेव्हां मुख्यतः झुलू जखमी लोकांची शुश्रूषा करण्याचेंच काम आमच्या वांट्याला आलें, तेव्हां मला फार समाधान वाटलें. अंमलदार डॉक्टरानें आम्ही आलों याबद्दल आनंद प्रदर्शित केला. तो म्हणाला, " गोरे लोक कोणी या जखमी लोकांची शुश्रूषा करावयाला तयार होत नाहींत, मी एकटा कितीकांकडे पाहाणार ? त्यांच्या जखमा सडून जात आहेत.

आतां तुम्ही आलांत ही या निर्दोष लोकांवर ईश्वराचीच कृपा झाली असें मी तरी समजतों.'' असें म्हणून त्यानें पट्टया, जंतुनाशक पाणी वगैरे माझ्यापाशीं दिलें आणि मला त्या रोग्यांपाशीं घेऊन गेला. जखमी लोकांनाहि आम्हांला पाहून आनंद झाला. गोरे शिपाई जाळींतून डोकावून आम्ही जखमा साफ करूं नये अशासाठीं प्रयत्न करीत. आम्हीं त्यांचें ऐकलें नाहीं म्हणजे चिडत; आणि झुलू लोकांविषयीं जे अपशब्द बोलत, तें ऐकून तर कान किटत.

हळूहळू या शिपायांशींहि माझी ओळख झाली आणि ते आम्हांला हरकत करीनासे झाले. १८९६ सालीं मला कसून विरोध केलेले कर्नल स्पार्क्स व कर्नल वायली या लष्करामध्यें होते. ते माझें हें कार्य पाहून आश्चर्यचकित झाले; त्यांनीं मला मुद्दाम बोलावून माझे आभार मानले; ते मला जनरल मॅकेंझीकडे घेऊन गेले आणि त्यांची ओळख करून दिली.

यांतील कोणी धंदेवाईक शिपाई होते असें वाचकानें समजूं नये. कर्नल वायली धंद्यानें प्रख्यात वकील होते. कर्नल स्पार्क्स कत्तलखान्याचे मालक म्हणून प्रसिद्ध होते. जनरल मॅकेंझी हे नाताळमधील एक नांवाजलेले शेतकरी होते. हे सर्व स्वयंसेवक होते. स्वयंसेवक या नात्यानें त्यांनीं लष्करी :शिक्षण घेतलें होतें व अनुभव मिळविला होता.

ज्या जखमी लोकांच्या शुश्रूषेचें काम आमच्याकडे सोंपविण्यांत आलें होतें तेहि लढाईंत घायाळ झाले होते असे कोणी समजूं नये. त्यांच्यापैकीं कांहींजणांना वहिमावरून कैद केलेलें होतें; त्यांना सेनापतींनीं फटक्यांची शिक्षा फर्माविली. चाबकाचे हे वळ औषधपाणी न झाल्यामुळें सुजून आले होते. इतर कांहींजण होते ते झुलू लोकांचे मित्र समजले जात अशांपैकीं होते. या मित्रांनीं मित्रता दर्शविणारीं चिन्हें धारण केलीं असतांहि चुकीनें शिपायांनीं त्यांना घायाळ केलें होतें.

याखेरीज खुद्द मला गोऱ्या शिपायांसाठीं औषधें आणवून ज्याचीं त्याला देण्याचें काम देण्यांत आलें होतें. डॉ. बूथच्या छोट्या इस्पितळामध्यें मीं या कामाचें वर्षभर शिक्षण घेतलें असल्यामुळें मला हें काम सोपें होतें. या कामाच्या निमित्तानें माझी पुष्कळ गोऱ्या लोकांशीं चांगली ओळख झाली.

पण लढाईमध्यें गुंतलेलें लष्कर एकाच ठिकाणीं थोडेंच बसून राहाणार? जिकडून जिकडून भयाची बातमी येईल तिकडे तिकडे तें धांवून जाणार. बरेचसे तर घोडेस्वारच होते. आमची छावणी ठाण्यावरून हालली; आम्ही तिच्या मागून खांद्यावर डोल्या घेऊन चालायचें होतें. दोन-तीनदां तर एका दिवसांत चाळीस चाळीस मैलांचें कूच करण्याचा प्रसंग आला. येथेंहि आम्हांला सर्वस्वीं देवाचें कामच मिळालें. झुलू मित्र चुकीमुळें घायाळ झाले होते त्यांना डोल्यांत घालून उचलून छावणींत न्यायचें होतें; आणि तेथें त्यांची शुश्रूषा करावयाची होती.

●●●

*

२५

# हृदय-मंथन

झुलू बंडामध्यें मला खूप अनुभव मिळाले, आणि विचारहि करायला मिळाला. युद्धाचा भयंकरपणा बोअर युद्धामध्येंहि मला जाणवला नव्हता इतका येथें जाणवला. येथें लढाई नव्हे तर माणसांची शिकार चालली होती. माझें एकट्याचेंच हें मत नव्हे, तर ज्यांच्याशीं बोलण्याचा मला प्रसंग आला त्या इंग्रज लोकांचेंहि असेंच मत होतें. सकाळच्या प्रहरीं लष्कर खेडेगांवांत जाऊन फटाके वाजवीत असावें अशा तऱ्हेचे त्यांच्या बंदुकांचे आवाज आम्हां दूर असणारांना ऐकूं येत हे आवाज ऐकणें आणि त्यांमध्यें राहाणें मला असह्य झालें. पण कडू औषधाचा घोट म्हणून मीं तो पिऊन टाकला. माझ्या वांट्याला काम आलें तेंहि केवळ झुलू लोकांच्या सेवेचेंच आलें. आम्ही गेलों नसतों, तर दुसऱ्या कोणी त्यांची शुश्रूषा केली नसती हें मला दिसतच होतें. एवढ्यावर मीं माझ्या मनाचें सान्त्वन केलें.

या भागांत वस्ती फार थोडी होती. पहाड व खोरीं यांमध्यें या भल्या, साध्या व जंगली मानल्या जाणाऱ्या झुलू लोकांच्या खोपटांपलीकडे कांहीं एक नव्हतें. त्यामुळें दृश्य भव्य दिसत असे. कित्येक मैलांपर्यंत वस्तीचें नांव नसे. अशा भागांतून आम्हीं एखाद्या घायाळ माणसाला घेऊन किंवा तसेंच जात असतांना मी विचारांत गढून जाई.

ब्रह्मचर्यासंबंधींचे माझे विचार या ठिकाणीं परिपक्व झाले. माझ्या जोडीदाराबरोबरहि मीं त्यासंबंधीं थोडीशी चर्चा केली. ईश्वरदर्शन साधायचें तर ब्रह्मचर्य अनिवार्य वस्तू आहे, ही गोष्ट त्या वेळींहि माझ्या स्पष्टपणें लक्षांत आली नव्हती. पण समाजसेवेला ब्रह्मचर्याची आवश्यकता आहे हें मला स्पष्ट दिसूं लागलें. मला वाटूं लागलें कीं, अशा तऱ्हेची सेवा माझ्या वांट्याला अधिकाधिक येणार, आणि मी जर भोगविलासांमध्यें, प्रजोत्पत्तीमध्यें, बालसंगोपनामध्यें, गढून राहिलों, तर माझ्याकडून संपूर्ण सेवा घडणार नाहीं. मला दोन दरडीवर पाय ठेवतां येणार नाहीं. याच वेळीं पत्नी गर्भार असती तर मला निश्चित मनानें या सेवाकार्यात पडतां आलें नसतें. ब्रह्मचर्याचें पालन करायचें नसेल तर कुटुंबवृद्धि ही समाजाच्या अभ्युदयासाठीं करावयाच्या प्रयत्नाला अडथळा आणणारी वस्तु होऊन बसेल. लग्न झालें असतांहि ब्रह्मचर्याचें पालन घडेल तर मात्र कुटुंबसेवा समाजसेवेला विरोधी होणार नाहीं. अशा तऱ्हेच्या विचारांच्या भोंवऱ्यांत मी सांपडलों, व ब्रह्मचर्याचें व्रतच घेऊन टाकण्याला अधीर बनलों.

या विचारामुळें मला एक तऱ्हेचा आनंद वाटूं लागला, व माझा उत्साह वाढला. कल्पनेनें सेवेला क्षेत्र विशाल करून सोडलें.

एकीकडे मनांत विचार जुळवीत होतों, आणि दुसरीकडे शरीर कसवीत होतों; इतक्यांत कोणीशी अफवा आणली कीं, बंड शान्त होण्याच्या मार्गावर आहे, व आम्हांला आतां रजा मिळेल. दुसरे दिवशीं तर आम्हांला घरीं जाण्याची परवानगी मिळालीहि, व त्यानंतर थोड्याच दिवसांत गव्हर्नरनें वरील कामगिरीबद्दल मला आभारप्रदर्शनाचें पत्र पाठविलें.

फिनिक्समध्यें पोंचल्यानंतर मी तर ब्रह्मचर्याची गोष्ट मोठ्या आवडीनें छगनलाल, मगनलाल, वेस्ट इत्यादिकांपाशीं बोललों. सर्वांना ती गोष्ट आवडली, सर्वांनीं या गोष्टीची आवश्यकता मान्य केली. पालन करणें सर्वांनाच फार कठिण वाटलें. कित्येकांनीं प्रयत्न करण्याची हिंमत केली, आणि कांहींजणांचा प्रयत्न यशस्वीहि झाला अशी माझी समजूत आहे.

मी व्रत घेऊन टाकलें कीं, यापुढें ब्रह्मचर्याचें पालन करावयाचें. या व्रताचें महत्त्व व त्याच्या पालनाचा बिकटपणा हीं त्या वेळीं माझ्या पूर्णपणें लक्षांत आलीं नव्हतीं. त्याच्या बिकटपणाचा अनुभव आजमितीपर्यंत येत आहे. त्याचें महत्त्व दिवसेंदिवस अधिकाधिक प्रत्ययाला येत आहे. त्याशिवाय जिणें मला शुष्क व पशुवत् वाटतें. पशु स्वभावतः निरंकुश आहे. मनुष्याचें मनुष्यपण स्वेच्छापूर्वक आत्मसंयमन करण्यामध्यें आहे. धर्मग्रंथांमध्यें ब्रह्मचर्याची जी स्तुति आढळते ती यथायोग्य आहे, आणि अनुभवानेंच केलेली आहे असे दिवसेंदिवस मला अधिकाधिकच स्पष्ट दिसत आहे.

ज्या ब्रह्मचर्याचे परिणाम अशा तऱ्हेनें मिळूं शकतात तें ब्रह्मचर्य सुलभ नसणार, ती केवळ शारीरिक कवाईत नसणार, हें उघड आहे. शारीरिक संयम ही ब्रह्मचर्याची सुरुवात आहे. पण शुद्ध ब्रह्मचर्यामध्यें तर विचाराची मलिनताहि असूं नये. संपूर्ण ब्रह्मचाऱ्याच्या स्वप्नामध्येंहि कलुषित विचार येणार नाहींत; आणि जोंपर्यंत विकारी स्वप्नें पडत आहेत तोंपर्यंत ब्रह्मचर्य बरेंच अपूर्ण आहे, असें समजलें पाहिजे.

मला शारीरिक ब्रह्मचर्यपालनाबाबतहि खूप कष्ट काढावे लागले आहेत. आज असें म्हणतां येईल कीं, त्या बाबतींत मला भय राहिलेलें नाहीं. पण स्वतःच्या विचारांवरहि जसा ताबा मिळायला पाहिजे तसा अद्याप मी मिळवूं शकलेला नाहीं. मीं प्रयत्नांत कसूर केली आहे असें मला वाटत नाहीं; पण आपल्याला नकोत ते विचार कोठून आणि कसे येऊन आपल्यावर चढाई करतात, तें अद्याप मी समजूं शकत नाहीं. विचारांनाहि ताब्यांत ठेवण्याची किल्ली माणसापाशीं आहे याबद्दल मला शंका वाटत नाहीं; पण ती ज्याची त्यानें

स्वतःसाठीं शोधून काढायची असते, याच निर्णयावर मी सध्यां तरी येऊन राहिलेला आहे. थोर पुरुष आपापले अनुभव आमच्यासाठीं ठेवून गेले आहेत; ते अनुभव मार्गदर्शक आहेत, संपूर्ण नाहींत. संपूर्णता ही केवळ ईश्वरी कृपाच होय; आणि त्यासाठींच साधुसंत आमचेसाठीं आपल्या तपश्चर्येनें पुनीत झालेले व आम्हांला पावन करणारे रामनामादि मंत्र ठेवून गेले आहेत. संपूर्ण ईश्वरार्पणा-खेरीज विचारांवर पूर्ण जय मिळणार नाहीं. हें वचन सर्व धर्मपुस्तकांमध्यें वाचलेलें आहे, व त्याची सत्यता या ब्रह्मचर्याच्या सूक्ष्मतम पालनाचा प्रयत्न करतांना माझ्या प्रत्ययाला येत आहे.

पण माझ्या धडपडीचा थोडाबहुत इतिहास यापुढील प्रकरणांमध्यें येणारच आहे. या प्रकरणाच्या शेवटीं एवढेंच सांगितलें म्हणजे पुरें कीं, उत्साहाच्या भरांत प्रथम तरी मला व्रताचें पालन सोपें वाटलें. एक फेरफार मात्र व्रत घेतांच लगेच मीं करून टाकला. पत्नीबरोबर सहशय्या किंवा एकान्त हीं वर्ज्य केलीं. अशा तऱ्हेनें ज्या ब्रह्मचर्याचें पालन इच्छा असो वा नसो १९०० सालापासून मी करीत आलों होतों त्याचा व्रत म्हणून आरंभ १९०६ सालच्या मध्यापासून केला.

● ● ●

# २६
# सत्याग्रहाची उत्पत्ति

अशा तऱ्हेनें आत्मशुद्धि केली ती जशी कांहीं सत्याग्रहासाठींच केली असावी, अशा तऱ्हेची एक घटना माझ्यासाठीं जोहानिसबर्गमध्यें तयार होत होती. मला आतां असें दिसून येत आहे कीं, ब्रह्मचर्याचें व्रत घेण्याच्या आधीं माझ्या आयुष्यांतील सर्व मुख्य घटना न कळत त्यासाठींच माझी तयारी करीत होत्या.

‘ सत्याग्रह ’ शब्दाची उत्पत्ति होण्यापूर्वींच मूळ वस्तूची उत्पत्ति झाली होती. उत्पत्तीच्या वेळीं हें काय आहे तें मी ओळखूंच शकलों नव्हतों. गुजरांथी-मध्येंहि त्याला ‘ पॅसिव्ह रेझिस्टन्स् ’ या इंग्रजी नांवानेंच सर्वजण ओळखूं लागले. मला जेव्हां गोऱ्या लोकांच्या एका सभेमध्यें दिसून आलें कीं ‘पॅसिव्ह रेझिस्टन्स्’-चा तर संकुचित अर्थ केला जातो, तें निर्बलांचें हत्यार आहे अशी समजूत आहे, त्यांत द्वेषाला जागा राहाते आणि त्याचें अखेरचें स्वरूप हिंसेमध्येंहि प्रकट होऊं शकतें, तेव्हां मला त्या समजुतीचा विरोध करून हिंदी लोकांच्या लढ्याचें यथार्थ स्वरूप समजावून सांगावें लागलें. तेव्हांपासून हिंदी लोकांना आपल्या लढ्याचा यथार्थ बोध करून देणाऱ्या नव्या शब्दाची जरूरी जाणवूं लागली.

पण मला तसा स्वतंत्र शब्द किती केलें तरी सुचेना. म्हणून त्याच्यासाठीं नांवाला बक्षिस ठेवून ‘ इंडियन् ओपिनियन् ’च्या वाचकांमध्यें त्याचेसाठीं स्पर्धा करविली. या स्पर्धेतून एवढें निष्पन्न झालें कीं, मगनलाल गांधींनीं सत् + आग्रह याचा संधि करून ‘ सदाग्रह ’ असा शब्द बनवून पाठविला. त्यानीं बक्षिस पटकावलें. पण ‘ सदाग्रह ’ शब्द अधिक स्पष्ट करण्यासाठीं मीं मध्यें आणखी य घालून ‘ सत्याग्रह ’ शब्द बनविला; आणि गुजराथीमध्यें लढ्याचें तेंच नांव रूढ झालें.

त्या लढ्याचा इतिहास म्हणजेच माझ्या दक्षिण आफ्रिकेंतील आयुष्यक्रमाचा व विशेषतः माझ्या सत्याच्या प्रयोगांचा इतिहास होय असें म्हणतां येईल. हा इतिहास मीं बहुतेक येरवड्याच्या तुरुंगामध्यें लिहून काढला होता. बाहेर आल्यानंतर बाकीचा पुरा केला. तो सर्व ‘ नवजीवन ’ मध्यें प्रसिद्ध झाला आणि नंतर ‘ दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाचा इतिहास ’ या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध होऊन चुकला आहे. त्याचें इंग्रजी भाषान्तर * श्री. वालजी गोविंदजी देसाई ‘ करंट थॉट ’ साठीं करीत आहेत. पण आतां मी तें इंग्रजीमध्यें पुस्तकरूपानें लवकरच प्रसिद्ध करण्याच्या तजविजींत आहें. कारण तसें झालें म्हणजे दक्षिण आफ्रिकेंतील माझे अत्यंत महत्त्वाचे प्रयोग ज्यांची इच्छा असेल त्या सर्वांना समजूत घेतां येतील. गुजराथी वाचकांपैकीं ज्यांनीं ‘दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाचा इतिहास’ वाचला नसेल, त्यांनीं तो वाचावा अशी माझी त्यांना शिफारस आहे. यापुढील थोडीं प्रकरणें त्या इतिहासांत येऊन गेलेला मुख्य कथाभाग वगळून दक्षिण आफ्रिकेंतील माझ्या बाकीच्या आयुष्यक्रमांतील जे थोडकेसे खासगी प्रसंग राहून गेले असतील तेवढेच देण्यासाठी खर्च करण्याचा माझा इरादा आहे. तें आटोपल्यानंतर लगेच हिंदुस्थानांतील प्रयोगांची माहिती वाचकांना करून देणार आहें. यासाठीं प्रयोगांच्या प्रसंगांचा क्रम अविच्छिन्न राहावा अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं दक्षिण आफ्रिकेच्या इतिहासाचीं तीं प्रकरणें येथून पुढें स्वतःचेसमोर ठेवणें आवश्यक आहे.

●●●

* ‘ दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाचा इतिहास ’ याचें इंग्रजी भाषान्तर मद्रासचे श्री. गणेशन् यांनीं आतां पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे. —भाषान्तरकर्ता.

२७

# अन्नाचे आणखी प्रयोग

कायिक, वाचिक, मानासिक ब्रह्मचर्याचें पालन कसें व्हावें ही एक चिंता आणि सत्याग्रहयुद्धासाठीं अधिकांत अधिक वेळ कसा काढतां येईल व अधिक आत्मशुद्धि कशी होईल ही दुसरी चिंता. या दोन चिन्तांनीं मला आहारामध्यें अधिक संयमन, नवीन फेरफार करण्यास लाविलें. शिवाय पूर्वी जे फेरफार मी मुख्यत्वेंकरून आरोग्याच्या दृष्टीनें करीत असें, ते आतां धार्मिक दृष्टीनें होऊं लागले.

यामध्यें उपवास व अल्पाहार यांना अधिक जागा मिळाली. ज्या माणसाला विषयवासना आहे त्याचेमध्यें जिभेची स्वादलोलुपता ही भरपूर असायचीच. माझीहि तीच स्थिति होती. जननेंद्रिय व स्वादेंद्रिय यांचेवर पुरा जय मिळविला आहे असें अद्यापहि मी म्हणूं शकत नाहीं. मी स्वतःला अत्याहारी मानीत आलों आहें. मित्रमंडळी ज्याला माझा संयम म्हणते त्याला मी कधींच संयम समजत नाहीं. थोडासा जो संयम करायला मीं शिकलों तेवढाहि करूं शकलों नसतों तर मीं पशूपेक्षांहि नीच कोटींतला ठरलों असतों. आणि माझा कधींच नाश झाला असता. माझ्यामधील दोषांची मला पूर्ण जाणीव असल्यामुळें मीं ते दूर करण्याचा भगीरथ प्रयत्न केला आहे, असें म्हणतां येईल; आणि म्हणूनच मला इतकीं वर्षे हें शरीर टिकवून धरतां आलें व त्याचेकडून थोडेंबहुत काम घेतां आलें.

ही जाणीव मला असल्यामुळें आणि अनायासें तसा प्रसंगहि मिळाल्यामुळें मीं एकादशीला उपहास किंवा फलाहार करण्यास सुरुवात केली. जन्माष्टमीसारखे इतर दिवसहि पाळूं लागलों. पण संयमाच्या दृष्टीनें मला फलाहार व धान्याहार यांमध्यें विशेष फरक दिसून आला नाहीं. ज्याला आपण धान्य म्हणतों, त्यांतून आपण ज्या चवी मिळवितों त्या सर्व चवी फलाहारामधूनहि मिळतात; आणि संवय पडल्यानंतर तर फलाहारांतून अधिक चव मिळते, असें मला दिसून आलें. म्हणून धार्मिक दिवशीं उपवास किंवा एकदां जेवणें यांनाच मी अधिक महत्त्व देऊं लागलों. शिवाय प्रायश्चित्तासारखें अंमळ कांहीं कारण मिळालें कीं, एक वेळचा उपवास करून टाकीत असें.

यांतूनहि मला असाच अनुभव आला कीं, शरीर अधिक स्वच्छ झाल्यामुळें तोंडाची चव वाढली; भूक अधिक चांगली लागूं लागली, आणि मला दिसून आलें कीं उपवास वगैरे जेवढ्या अंशीं संयमाचें साधन आहे, तेवढ्याच

अंशीं तें भोगाचेंहि साधन होऊं शकतें. हें ज्ञान झाल्यानंतर त्याचेंच समर्थन करणारे अशाच प्रकारचे अनुभव मला, त्याचप्रमाणें इतरांना, कितीदां तरी आले आहेत. शरीर अधिक चांगलें व कसलेलें बनविणें हा जरी माझा हेतु असला, तरी पण यापुढें मुख्य हेतु संयम करणें, स्वाद जिंकणें हाच झाला. त्या दृष्टीनें आहारांतील निरनिराळ्या वस्तू व त्यांचें प्रमाण यांमध्यें फेरफार करूं लागलों. पण स्वाद पाठ सोडीच ना. एक वस्तु सोडून तिच्याऐवजीं दुसरी घ्यावी तर तिच्यांतून अधिकच गोडी वाटूं लागे.

माझ्या या प्रयोगांमध्यें माझे कांहीं जोडीदारहि होते. त्यांत हरमान कॅलनबॅक हे मुख्य होते. त्यांची ओळख मीं दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाच्या इतिहासांत दिली असल्यामुळें पुन्हां या प्रकरणामध्यें देण्याचें रहित करीत आहें. ते माझ्याबरोबर उपवास करीत, एकभुक्त राहात किंवा मी इतर जे जे फेरफार करीत असें ते ते करीत. लढा ज्या वेळी ऐन रंगांत आला होता, त्याच वेळीं मी त्यांचे घरीं राहात असें. आम्ही दोघेहिजण आम्ही करीत असलेल्या फेरफारांसंबंधीं चर्चा करीत असूं, व प्रत्येक नवीन फेरफारांतून पूर्वीच्यापेक्षां अधिक गोडी मिळवीत असूं. त्या वेळीं तर त्या संवादांचीहि हौस वाटे. त्यांत कांहीं न शोभणारें आपण करीत आहों असेंहि वाटत नसे. अनुभवानें लक्षांत आलें कीं, अशा स्वादसुखामध्यें रमून राहाणें हेंहि अयोग्यच होतें. दुसऱ्या शब्दांत बोलायचें तर माणसानें स्वादासाठीं नव्हे तर शरीरधारणासाठींच खावें. प्रत्येक इंद्रियाचे व्यापार जेव्हां शरीराच्या हिताच्या दृष्टीनें व शरीरामार्फत आत्मदर्शन करण्याचे दृष्टीनें चालत असतात, तेव्हां त्यांतील इंद्रियसुख शून्यवत् होतें; आणि तेव्हांच इंद्रियें स्वाभाविकपणें वागत आहेत असें म्हणतां येईल.

अशा तऱ्हेची स्वाभाविकता साधण्यासाठीं प्रयोग करावे तेवढे थोडेच आहेत. आणि ते करीत असतांना अनेक शरीरांची आहुति द्यावी लागली तरी त्याची आपण पर्वा करूं नये. सध्यां याच्या उलट प्रवाह चालू आहे. नाशवंत शरीराच्या शृंगारासाठीं, त्याचें आयुष्य वाढविण्यासाठीं आपण अनेक प्राण्यांची आहुति देत असतों. त्यापासून उलट शरीर व आत्मा दोघांचीहि हानिच होते. एक रोग मारण्याचा व इंद्रियसुखें भोगण्याचा प्रयत्न करतांना अनेक नवे रोग उत्पन्न करीत असतों; अखेरीला भोग भोगण्याची शक्तीहि गमावून बसतों. आणि हा सर्व प्रकार आपल्या डोळ्यांसमोर चालू असतां त्याचेकडे लक्षहि देत नाहीं !

आहाराच्या प्रयोगांचें वर्णन करण्यासाठीं आणखी थोडा वेळ घेण्याचा माझा विचार आहे; म्हणून त्या प्रयोगांचा अर्थ लक्षांत येण्यासाठीं त्याचा उद्देश व त्यांच्यामागें असलेली विचारसरणी यांचा निर्देश करणें आवश्यक होतें.

• • •

## २८

# पत्नीची दृढता

कस्तुरबाईवर तीनदां जिवावरचीं दुखणीं येऊन गेलीं, आणि तिहींतूनहि ती घरगुतीं उपचारांनींच बचावून गेली. त्यांपैकीं पहिला प्रसंग घडला त्या वेळीं सत्याग्रह-युद्ध चालू होतें. तिला वारंवार रक्तस्राव (धुपणी) होत असे. एका डॉक्टर मित्रानें शस्त्रक्रिया करून घेण्याची शिफारस केली होती. थोडे आढेवेढे घेतल्यानंतर पत्नी शस्त्रक्रिया करून घेण्यास कबूल झाली. शरीर तर अतिशय क्षीण होऊन गेलें होतें. डॉक्टरानें क्लोरोफॉर्म न देतांच शस्त्रक्रिया केली. शस्त्र-क्रियेच्या वेळीं वेदना तर खूप होत होत्या; पण ज्या सोशिकपणानें कस्तुरबाईनें तें सर्व सहन केलें तें पाहून मी तर आश्चर्यचकित झालों. शस्त्रक्रिया निर्विघ्नपणें पुरी झाली. डॉक्टर व त्यांची पत्नी यांनीं कस्तुरबाईची उत्तम बरदास्त ठेवली होती.

ही गोष्ट डरबनमध्यें घडली होती. दोन-तीन दिवसांनंतर डॉक्टरांनीं मला निश्चिंतपणें जोहानिसबर्गला जाण्याची परवानगी दिली. मी गेलों. थोडक्याच दिवसांनीं बातमी आली कीं, कस्तूरबाईचें शरीर बिलकुल सुधारत नाहीं व तिला अंथरुणांतून उठतांहि येत नाहीं. एकदां तर बेशुद्धहि झाली होती. डॉक्टरांना माहीत होतें कीं, मला विचारल्याशिवाय कस्तुरबाईला दारू किंवा मांस औषधा-साठीं किंवा अन्न म्हणून देतां कामां नये. डॉक्टरांनीं मला जोहानिसबर्गला टेलिफोन केला.

"तुमच्या पत्नींना मांसाचा सुरवा किंवा गोमांसाचा काढा देणें आव-श्यक आहे, असें मला तर दिसत आहे; तुमची परवानगी पाहिजे."

मीं उत्तर दिलें, "मी तशी परवानगी देऊं शकत नाहीं. पण कस्तुरबाई स्वतंत्र आहे. विचारण्यासारखी स्थिति असेल तर विचारा व तिची इच्छा असेल तर बेलाशक द्या."

"रोग्याला असल्या गोष्टी विचारणें मला पसंत नाहीं. तुम्ही समक्ष इकडे येणें आवश्यक आहे. मी ठरवीन तें खाऊं घालण्याची मला परवानगी नसेल तर तुमच्या पत्नीच्या जिवाबद्दल मी जबाबदार नाहीं."

मीं त्याच दिवशीं डरबनची गाडी पकडली. डरबनला पोंचलों. डॉक्टरनीं समाचार सांगितला, "मीं तर सुरवा अगोदर देऊन नंतर तुम्हांला टेलिफोन केला होता!"

"डॉक्टर, मी तर ही फसवेगिरी समजतों." मीं म्हटलें.

" औषधोपचार करतांना फसवेगिरी वगैरे कांहीं मला समजत नाहीं. आम्ही डॉक्टर लोक अशा प्रसंगीं रोग्यांना किंवा त्यांच्या आप्तेष्टांना फसविण्या-मध्येंच पुण्य समजतों. वाटेल त्या मार्गानें पण रोग्याला बचावणें हा आमचा धर्म आहे. " डॉक्टरनीं दृढपणें जबाब दिला.

मला फार दुःख झालें. मी गप्प राहिलों. डॉक्टर माझे स्नेहीच होते. स्वभावाचे भले होते. त्यांचे व त्यांच्या पत्नीचे माझ्यावर उपकार होते. पण असलें वर्तन सहन करण्याची माझी तयारी नव्हती.

" डॉक्टर, अजून काय तें स्पष्ट सांगा. काय करायचें म्हणतां ? माझ्या पत्नीला मी तिच्या संमतीखेरीज मांस खाऊं घालूं देणार नाहीं. मांस न खाल्ल्या-मुळें तिचा मृत्यु होणार असेल तर तो सहन करण्याची माझी तयारी आहे. "

डॉक्टर म्हणाले, " तुमचा वेदान्त माझ्या घरीं तरी चालणार नाहीं. मी साफ सांगतों कीं, आपल्या पत्नीला माझ्या घरीं ठेवणार असाल तोंपर्यंत मी तिला जरूरीप्रमाणें मांस किंवा जें जें कांहीं खाऊं घालणें योग्य असेल तें तें खाऊं घालीन. तसें नको असेल तर तुम्ही आपल्या पत्नीला घेऊन चला. मी होऊन तिला आपल्या घरांत मरूं देणार नाहीं. "

" तर मग तुमचें असें म्हणणें कीं काय, कीं मीं आपल्या पत्नीला आतांच घेऊन जावें ? "

" मी कुठें म्हणतों आहें की घेऊन जा ? माझें एवढेंच म्हणणें कीं, माझ्यावर कसलाहि निर्बंध घालूं नका. तसें कबूल असल्यास आम्हां दोघांकडून होईल तेवढी शुश्रूषा आम्ही करूं, आणि तुम्ही खुशाल चला. एवढी सरळ गोष्ट-सुद्धां जर तुम्हांला कबूल नसेल तर मात्र मला निरुपायास्तव सांगावें लागणार कीं आपल्या पत्नीला घेऊन चला. "

मला अंधुक स्मरतें कीं, माझ्या मुलांपैकींहि एकजण त्यावेळीं माझ्या-बरोबर होता. मीं त्याचाहि विचार घेतला. त्यानें सांगितलें, " तुम्हीं म्हणतां तें मला कबूल आहे. आईला मांस खाऊं घालतां कामा नये. "

नंतर मी कस्तुरबाईपाशीं गेलों. ती फार अशक्त झाली होती. तिला कांहींहि विचारणें माझ्या जिवावर आलें. कर्तव्य म्हणून मीं तिला वरील हकीकत थोडक्यांत सांगितली. तिनें दृढतापूर्वक उत्तर दिलें, " मला मांसाचा सुरवा घ्यायचा नाहीं. मनुष्यदेह वारंवार मिळत नसतो. तुमच्या मांडीवर डोकें टेकून मी मेल्यें तरी बेहेत्तर; पण माझ्यानें हा देह बाटविला जाणार नाहीं. "

मला समजावून सांगतां आलें तेवढें मीं सांगितलें आणि म्हटलें, " तूं माझ्याच विचाराप्रमाणें वागायला बांधलेली नाहींस. " आमच्या माहितींतील

कित्येक हिंदू मांस व मद्य घेत असत, तेंहि सांगितलें. परंतु तिचा निर्धार टळेना. शेवटीं ती म्हणाली, " मला येथून घेऊन चला. "

मला फार समाधान वाटलें. घेऊन जाण्याची भीति वाटली, पण निश्चय करून टाकला. डॉक्टरला पत्नीचा निश्चय कळविला. डॉक्टर म्हणाले,

" तुम्ही तर घातकी पति दिसतां ! असल्या दुखण्यांत त्या बिचारीपाशीं असली गोष्ट काढतांना तुम्हांला शरम तरी कशी नाहीं वाटली ? मी तुम्हांला सांगतों कीं तुमची पत्नी येथून हलविण्यासारख्या स्थितींत नाहीं. यत्किंचित्‌हि हिसके सहन करण्यासारखें तिचें शरीर राहिलेलें नाहीं. रस्त्यांतच तिचा प्राण गेला तर मला आश्चर्य वाटणार नाहीं. इतक्याहि उपर तुम्ही हट्टच चालविणार तर तुमच्चें तुम्ही मुखत्यार आहां. सुरवा देण्याची मला मोकळीक नसेल तर त्यांना एक रात्रभरहि आपल्या घरांत ठेवण्याची जबाबदारी मी स्वीकारणार नाहीं. "

पाऊस झिमझिम पडत होता. स्टेशन दूर होतें. डरबन ते फिनिक्स आगगाडी व फिनिक्स स्टेशनाचे पुढें सुमारें अडीच मैल पायीं जावयाचें होतें. धोका तर भरपूर होता. पण ईश्वर साहाय्य करणारा आहे अशी मीं मनाची समजूत केली. मीं एक मनुष्य अगोदर फिनिक्सला पाठविला. फिनिक्समध्यें आमचेपाशीं हॅमक होतें. हॅमक म्हणजे जाळीदार कापडाची झोळी किंवा पाळणा. त्याचीं टोंकें बांबूला बांधलीं म्हणजे रोग्याला त्याच्यामध्यें सुखानें झुलत राहातां येतें. वेस्टना निरोप पाठविला होता कीं तें हॅमक, एक बाटली गरम दुधाची, एक बाटली गरम पाण्याची आणि सहा माणसें एवढें घेऊन त्यांनीं स्टेशनवर यावें.

दुसरी आगगाडी निघण्याची वेळ झाली तेव्हां मीं रिक्षा मागविली. आणि त्या भयंकर स्थितींतच पत्नीला तिच्यामध्यें बसवून मीं स्टेशनचा रस्ता धरला.

पत्नीला मी धीर देण्याची जरूरच नव्हती, उलट तिनेंच मला धीर देऊन म्हटलें, " मला कांहीं व्हायचें नाहीं. तुम्ही काळजी करूं नका."

हाडांच्या त्या सांपळ्याचें वजन विशेष नव्हतेंच. अन्न जात नसे. गाडीच्या डब्यापर्यंत पोंचण्यासाठीं स्टेशनच्या विशाल प्लॅटफॉर्मवरून दूरपर्यंत चालत जायचें होतें. तेथें रिक्षा जाण्यासारखी नव्हती. मी तिला धरून डब्यापर्यंत घेऊन गेलों. फिनिक्स स्टेशनवर ती झोळी आलीच होती. तींतून आम्ही दुखणाइताला त्रासाशिवाय उचलून नेलें. तेथें केवळ पाण्याच्या उपचारांनीं शरीर हळूहळू सुधारत गेलें.

फिनिक्सला पोंचल्यानंतर दोन-तीन दिवसांनीं एका स्वामींचें आगमन झालें. त्यांना आमच्या ' हट्टाची ' गोष्ट ऐकली. ऐकून त्यांना दया आली आणि ते

आम्हां दोघांची समजूत घालण्यासाठीं आले. मला स्मरतें त्याप्रमाणें स्वामी आले, त्या वेळीं मणिलाल आणि रामदासहि तेथें होते. स्वामीजींनीं मांसाहाराच्या निर्दोषतेवर प्रवचन चालविलें. मनुस्मृतींतील श्लोकांचें प्रमाण दिलें. पत्नीच्यादेखत त्यांनीं हें संभाषण चालविलेलें मला आवडलें नाहीं; पण शिष्टाचाराखातर मीं तें संभाषण चालूं दिलें. मला मांसाहाराच्या पुष्ट्यर्थ मनुस्मृतीच्या प्रमाणाची जरूर नव्हती. मला ते श्लोक माहीत होते. ते प्रक्षिप्त आहेत असें मानणारा एक पक्ष आहे हेंहि मला माहीत होतें. आणि ते प्रक्षिप्त नसले तरीहि अन्नाहारासंबंधींचे माझे विचार स्वतंत्रपणेंच बनलेले होते. कस्तुरबाईची श्रद्धा आपलें काम करीतच होती. तिला बिचारीला शास्त्रांचें प्रमाण काय कळणार? वाडवडिलांची रूढि हाच ती धर्म समजत होती. मुलांचा बापाच्या धर्मावर विश्वास होता, त्यामुळें ते स्वामींबरोबर विनोदच करीत होते. अखेरीला कस्तुरबाईनेंच पुढीलप्रमाणें बोलून तो संवाद थांबविला.

" स्वामीजी, तुम्ही कांहीं म्हणा, पण मला मांसाचा सुरवा खाऊन बरें व्हायचें नाहीं आहे. यापुढें तुम्ही माझें डोकें उठविणार नाहीं तर उपकार होतील. इतर गोष्टी तुम्हांला बोलायच्या असतील त्या मुलांच्या वडिलांबरोबर तुम्ही मागाहून बोलून घ्या. मीं माझा निश्चय तुम्हांला सांगून टाकला. "

● ● ●

## २९

# घरांत सत्याग्रह

जेलचा पहिला अनुभव मला १९०८ सालीं मिळाला. त्या मुदतींत मला दिसून आलें कीं, जेलमध्यें कैद्यांकडून पाळविले जाणारे कित्येक नियम संयमी किंवा ब्रह्मचारी इसमानें स्वखुषीनें पाळण्यासारखे आहेत.* उदाहरणार्थ, कैद्यांनीं सूर्यास्ता-पूर्वीं पांच वाजेपर्यंत जेवून घेतलें पाहिजे. त्यांना—हिंदी व त्याचप्रमाणें हबशी कैद्यांना—चहा किंवा कॉफी मिळत नसे; मीठ खायचें झाल्यास निराळें घ्यायचें. स्वादा-साठीं कांहींच खायचें नाहीं. मीं जेव्हां जेलच्या डॉक्टरपाशीं हिंदी कैद्यांसाठीं 'करी पावडर'ची मागणी केली आणि मीठ स्वयंपाक करतांनाच घालायला

* माझे जेलचे अनुभवहि पुस्तकरूपानें बाहेर पडलेले आहेत. ते मूळ गुजराथींत लिहिलेले होते आणि त्यांचेंच इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध झालें आहे. माझी समजूत आहे कीं तीं दोन्ही मिळूं शकतात.
—मो. क. गांधी

सांगितलें, तेव्हां ते म्हणाले, " येथें तुम्ही लोक स्वाद चाखण्यासाठीं आलां नाहीं. आरोग्याच्या दृष्टीनें करी पावडरची बिलकुल जरूर नाहीं. आरोग्याच्या दृष्टीनें मीठ वर घेतलें काय किंवा स्वयंपाक करतांना घातलें काय दोन्ही एकच."

पुष्कळ खटपट करून तिथल्यापुरता आम्ही अखेरीला पाहिजे तसा फेरफार करवून घेऊं शकलोंहि; पण केवळ संयमाच्या दृष्टीनें विचार करतां दोन्ही निर्बंध छानदारच होते. अशा तऱ्हेचे मारून मुटकून लादलेले निर्बंध उपयोगाचे नाहींत, परंतु स्वेच्छापूर्वक स्वीकारलेले असले निर्बंध फार हितकारक होतात. म्हणून तुरुंगांतून सुटल्यानंतर लगेच मी तसे फेरफार करून टाकले. होतां होईल तो चहा घेण्याचें बंद केलें आणि संध्याकाळीं लवकर जेवण्याची संवय पाडली, जी आजला स्वाभाविक होऊन गेली आहे.

पण असाहि एक प्रसंग घडला कीं त्यामुळें मीं मिठाचाहि त्याग केला. हा त्याग जवळ जवळ दहा वर्षेपर्यंत अखंडपणें टिकून राहिला होता. अन्नाहारासंबंधींच्या कित्येक पुस्तकांत वाचलें होतें कीं माणसाला मीठ खाणें आवश्यक नाहीं, व तें न खाणाराचा आरोग्याच्या दृष्टीनें फायदाच होतो. ब्रह्मचाऱ्याचा त्यापासून फायदा होईल हें माझ्या लक्षांत आलेंच होतें. ज्याचें शरीर दुबळें असेल त्यानें कडदण खाऊं नये, असें मीं वाचलें होतें; व माझा अनुभवहि तसाच होता. पण तें लगेच सोडूं शकलों नाहीं. दोन्ही वस्तू मला प्रिय होत्या.

मागच्या शस्त्रक्रियेनंतर कस्तुरबाईचा रक्तस्राव कांहीं काळ बंद झाला खरा, पण तो परत उलटला तो कांहीं केल्या बंद होईना. निव्वळ पाण्याच्या उपचारांनीं कांहीं होईना. पत्नीला माझ्या उपचारांबद्दल विशेष आस्था वाटत होती असें नाहीं, पण त्यांचेबद्दल तिरस्कारहि वाटत नव्हता. दुसरीं औषधें पाहिजेत असा तिचा आग्रह नव्हता. म्हणून जेव्हां माझे इतर उपचार व्यर्थ गेले तेव्हां मीं तिची मीठ व कडदण सोडण्याबद्दल विनवणी केली. पुष्कळ समजूत घालून पाहिली, माझ्या सांगण्याच्या पुष्ट्यर्थ कांहीं कांहीं मजकूर वाचून दाखविला, पण ऐकेना. शेवटीं तिनें सांगितलें, " कडदण आणि मीठ सोडायला तुम्हांला कोणीं सांगितलें तर तुम्हीसुद्धां सोडणार नाहीं." मला वाईट वाटलें आणि हर्षहि झाला. माझें प्रेम दर्शविण्याची मला संधि मिळाली. त्या हर्षाच्या भरांत मीं लगेच म्हटलें, " तुझी समजूत चुकीची आहे. मला दुखणें आलें आणि वैद्यानें हीचशी काय पण दुसरी कोणतीहि वस्तु सोडायला सांगितलें तर अवश्य सोडून देईन. पण तें राहूं द्या, मीं कडदण व मीठ एक वर्षापुरतीं सोडलीं. तूं सोड किंवा न सोड, त्याचा माझ्या निश्चयाशीं संबंध नाहीं."

पत्नीला अतिशय पश्चात्ताप झाला. ती उसळून बोलली, " मला क्षमा करा. तुमचा स्वभाव माहीत असून बोलण्याच्या भरांत बोलून गेलें; आवां मी तर

मीठ, कडदण खाणार नाहींच, पण तुम्ही आपला शब्द परत घ्या. ही तर मला बेसुमार शिक्षा केलीत असें म्हटलें पाहिजे. ''

मीं म्हटलें, '' तूं मीठ, कडदण सोडशील तर फारच चांगलें. मला खात्री आहे कीं त्यापासून तुला फायदाच होईल; पण केलेली प्रतिज्ञा मला बदलतां येणार नाहीं. माझा झाला तरी फायदाच होणार. कोणत्याहि निमित्तानें माणसानें संयम पाळला तर त्यापासून त्याला लाभच आहे. यासाठीं तूं मला आग्रह करूं नकोस. शिवाय माझी मला परीक्षा होईल, आणि त्या दोन वस्तू सोडण्याचा तूं जो निश्चय केला आहेस, त्या तुझ्या निश्चयाला चिकटून राहाण्याच्या कामीं तुलाहि मदत मिळेल. '' एवढें सांगितल्यानंतर माझी आणखी समजूत घालण्याचा प्रश्नच राहिला नाहीं. '' तुम्ही म्हणजे पक्के हट्टी. कोणी सांगितलेलें ऐकायचेंच नाहीं. '' असें म्हणून चुळकाभर अश्रू ढाळून ती शान्त राहिली.

याला मी सत्याग्रह या नांवानें संबोधूं इच्छितों; आणि माझ्या जीवनांतील मधुर स्मरणांपैकीं हें एक आहे अशी माझी समजूत आहे.

यानंतर कस्तुरबाईची तब्येत खूप सुधारली. मीठ व कडदणें यांचा त्याग त्याला कारणीभूत झाला कीं नाहीं, किंवा किती अंशीं कारणीभूत झाला, कीं त्या त्यागामुळें आहारामध्यें घडून आलेले इतर लहानमोठे फेरफार कारणीभूत झाले, कीं यानंतर इतर नियमांचें पालन करवून घेण्याबाबत मी जपत असें तें कारणीभूत झालें, कीं वरील प्रसंगामुळें झालेला मानसिक उल्हास निमित्तरूप झाला— तें मी सांगूं शकत नाहीं. परंतु कस्तुरबाईचें क्षीण होऊन गेलेलें शरीर सुधारूं लागलें, रक्तस्राव बंद झाला आणि ' वैद्यराज ' या नात्यानें माझी प्रतिष्ठा कांहींशी वाढली.

स्वतः माझ्यावर या दोन्ही वस्तूंच्या त्यागाचा परिणाम चांगलाच झाला. वर्ज्य केल्यानंतर मिठावर किंवा कडदणावर वासनाहि कधीं जाईना. वर्ष तर हां हां म्हणतां सरलें. इंद्रियांचा शम अधिकाधिक अनुभवतां येऊं लागला आणि मनाला अधिकाधिक संयमनाची उत्कंठा लागली. वर्ष संपल्यानंतरसुद्धां मीठ व कडदणें यांचा त्याग थेट स्वदेशीं येईपर्यंत कायम राहिला असें म्हणायला हरकत नाहीं. मात्र एकदांच विलायतेमध्यें १९१४ सालीं मीठ व कडदण खाल्लें होतें. पण त्या प्रसंगाचें व स्वदेशीं आल्यानंतर दोन्ही पुन्हां कशीं सुरू करावीं लागलीं याचें वर्णन पुढें येईल.

मीठ व कडदण सोडण्याचे प्रयोग मीं इतर जोडीदारांवरसुद्धां खूप केले, व दक्षिण आफ्रिकेंत तरी त्यांचे परिणाम चांगलेच दिसून येत असत. दोन्ही वस्तू सोडण्यासंबंधीं वैद्यकीय दृष्टीनें दुमत असूं शकेल; पण संयमनाचे दृष्टीनें दोन्ही वस्तूंचा त्याग हितावहच आहे याबद्दल मला बिलकुल शंका नाहीं. भोगी इसमा-

हून संयमी इसमाचा आहार भिन्न असणार, निरनिराळा असणार; त्यांचे मार्गच निरनिराळे झाले पाहिजेत. ब्रह्मचर्याचें पालन करूं इच्छिणारे लोक स्वतःची एकंदर राहाणी मात्र भोगी इसमाप्रमाणेंच ठेवितात, व त्यामुळें ब्रह्मचर्यपालन कठिण, कधीं कधीं अगदीं अशक्यच करून घेतात.

३०

# संयमाकडे

आहारांतील कित्येक फेरफार कस्तुरबाईच्या दुखण्यानिमित्तानें घडल्याचें गेल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. पण यापुढें तर दिवसेंदिवस ब्रह्मचर्याच्या दृष्टीनेंच त्याच्यामध्यें फेरफार होत गेले.

त्यांतील पहिला फेरफार म्हणजे दूध सोडण्याचा. दूध ही इंद्रियविकार उत्पन्न करणारी वस्तु आहे, ही गोष्ट प्रथम मला रायचंदभाईकडून समजली होती. अन्नाहारासंबंधींचीं इंग्रजी पुस्तकें वाचल्यानंतर तोच विचार दृढ झाला. पण ब्रह्मचर्याचा व्रत म्हणून स्वीकार केला नव्हता तोंपर्यंत दूध सोडण्याचा मुद्दाम संकल्प करूं शकलों नाहीं. शरीरधारणेसाठीं दुधाची जरूरी नाहीं हें तर मला केव्हांपासूनच कळलेलें होतें, पण दूध ही वस्तु चटकन् सुटण्यासारखी नव्हती. इंद्रियदमनासाठीं दूध सोडणें आवश्यक आहे ही गोष्ट माझ्या अधिकाधिक लक्षांत येत होती; त्याच सुमाराला गवळी लोक गाईम्हशींचा जो छळ करतात, त्या· संबंधींचें कांहीं वाङ्मय कलकत्त्याकडून माझ्याकडे आलें. या वाङ्मयाचा माझ्यावर विलक्षण परिणाम झाला. त्यासंबंधीं मीं मि. कॅलनबॅकबरोबर चर्चा केली.

मि. कॅलनबॅक यांची ओळख सत्याग्रहाच्या इतिहासांत करून दिलेली आहे; आणि गेल्या एका प्रकरणांत जातां जातां त्याचा उल्लेखहि केलेला आहे. हें खरें असलें तरी येथें आणखीहि दोन शब्द लिहिणें जरूरीचें वाटतें. त्यांची माझी भेट अनायासेंच झाली. मि. खानची व त्यांची मैत्री होती. त्यांच्यामध्यें वैराग्यवृत्ति खूप खोलपर्यंत गेलेली आहे असें मि. खान यांना दिसून आलें, आणि म्हणूनच त्यांनीं माझी त्यांच्याशीं ओळख करून दिली अशी माझी समजूत आहे. प्रथमच ओळख झाली, तेव्हां त्यांचा शोकिनपणा व खर्चाळूपणा पाहून मला कसेसेंच वाटलें. पण पहिल्याच भेटींत त्यांनीं मला धर्मासंबंधीं प्रश्न विचारले. त्यांत ओघानेंच बुद्ध भगवानांच्या त्यागाची गोष्ट निघाली. यानंतर आमची सलगी वाढत चालली, ती

येथपर्यंत कीं मी करीन तें त्यांनीं केलेंच पाहिजे, असा त्यांच्या मनाचा निर्धार झाला. ते घरचे एकटेच होते. स्वतः एकट्यामागेंच घरभाड्याउपरान्त सुमारें १२०० रुपये खर्च करीत. तेवढ्यावरून अखेरीला ते इतक्या साधेपणावर आले कीं त्यांचा मासिक खर्च एके काळीं १२० रुपयांपर्यंत जाऊन पोंचला होता. मीं घरदार फुंकून टाकल्यानंतर व एकदां तुरुंगांत जाऊन आल्यानंतर आम्ही दोघेहि एकत्र राहूं लागलों. त्या वेळीं आमची दोघांचीहि राहाणी—प्रमाणांत—फारच कडक होती.

या आमच्या एकत्र बिऱ्हाडाचे मुदतींत दुधासंबंधींची वर उल्लेख केलेली चर्चा झाली. कॅलनबॅकनीं विचार मांडला : "दुधांतील दोषांची तर आपण अनेक वेळां चर्चा करीत आलों आहों. मग आपण दूध अज्जी सोडून कां न द्यावें? त्याची आवश्यकता तर नाहींच." या त्यांच्या अभिप्रायानें मला सानंदाश्चर्य वाटलें. मीं त्या सूचनेचा सहर्ष स्वीकार केला; आणि उभयतांनीं टॉलस्टॉय फार्ममध्यें त्याचक्षणीं दूध सोडलें. ही गोष्ट १९१२ सालीं घडली.

एवढ्या त्यागानेंहि मनाचें समाधान झालें नाहीं. दूध सोडल्यानंतर थोड्याच दिवसांनीं फक्त फलाहाराचा प्रयोग करण्याचा मीं निश्चय केला. फलाहारामध्येंसुद्धां जें स्वस्तांत स्वस्त मिळेल त्यावरच चालविण्याचा विचार होता. गरिबांतील गरीब मनुष्य ज्या पद्धतीनें राहील त्याच पद्धतीनें राहाण्याची आम्हां उभयतांना हौस होती. फलाहार आम्हांला फार सोयीचाहि वाटला. फलाहारामध्यें चूल पेटविण्याची फार करून जरूरच राहात नाहीं. कच्चे भुईमुग-दाणे, केळीं खजूर, लिंबू व जितुनचें तेल—हाच आमचा सामान्य आहार होऊन बसला होता.

ब्रह्मचर्याचें पालन करूं इच्छिणारांना येथें एक सूचना देऊन ठेवणें आवश्यक वाटतें. आहार व उपवास यांचा ब्रह्मचर्याशीं निकट संबंध असल्याचें मीं दर्शविलें असलें तरीहि एवढी गोष्ट स्पष्ट आहे कीं, त्याचा मुख्य आधार मनावरच आहे. मलिन मन उपवासानें शुद्ध होत नाहीं. आहाराचा त्याचेवर कांहीं एक परिणाम होत नाहीं. मनाचा मळ हा विचारानें, ईश्वरचिंतनानें आणि अखेरीला ईश्वरप्रसादानेंच निघून जातो; पण मनाचा शरीराशीं निकट संबंध आहे. आणि विकारी मन विकारी आहारच शोधीत असतें; विकारी मन अनेक प्रकारचे स्वाद व भोग शोधीत असतें; त्या आहाराचा आणि उपभोगांचा उलट मनावर परिणाम होतो. त्यामुळें व तेवढ्या अंशानें आहाराचें नियमन करण्याची व निराहाराचीहि आवश्यकता उत्पन्न होते. विकारी मन शरीराला व इंद्रियांना कह्यांत वागविण्याच्या ऐवजीं स्वतःच इंद्रियांच्या व शरीराच्या ताब्यांत जातें. त्यामुळेंहि शरीराला शुद्ध व कमींत कमी विकारी अशा नियमित आहाराची व प्रसंगोपात्त निराहाराचीहि—उपवासाचीहि—जरूर पडते. म्हणून जे असें म्हणतात कीं,

संयमी माणसाला आहाराच्या नियमनाची किंवा उपवासाची बिलकुल जरूर नाहीं तेहि तेवढीच मोठी चूक करतात, कीं जेवढी आहार व निराहार यांनाच सर्वस्व मानणारे करतात. माझा अनुभव मला असेंच शिकवीत आहे कीं ज्याचें मन संयमाकडे वळलें आहे, त्याला आहाराचें नियमन व निराहार यांची फार मदत होते. यांच्या मदतीविना मनाची निर्विकारता साधणें मला अशक्यप्राय वाटतें.

●●●

## ३१

# उपवास

दूध व धान्य सोडून फलाहाराचा प्रयोग सुरू केला त्याच सुमाराला संयमाच्या दृष्टीनें उपवासहि सुरू केले. यांतहि मि. कॅलनबॅक सामील झाले. पूर्वी उपवास करीत असें ते फक्त आरोग्याच्या दृष्टीनें. देहदमनासाठीं उपवास करण्याची आवश्यकता आहे ही गोष्ट एका मित्राच्या प्रेरणेवरून समजून आली. माझा जन्मच वैष्णव कुटुंबांत झालेला, आणि आई तर कठिण कठिण व्रतें करीत असे; त्यामुळें हिंदुस्थानांत असतांना मीहि एकादशीचे वगैरे उपवास करीत असें. परंतु तें फक्त दुसऱ्यांचें पाहून किंवा आईबापांना संतुष्ट करण्याच्या हेतूनें. तसल्या व्रतांपासून कांहीं लाभ होतो, ही गोष्ट त्या वेळीं माझ्या लक्षांत आली नव्हती; समजूतहि तशी नव्हती. पण सदरहु मित्र उपास पाळीत असे, त्यावरून व स्वतःच्या ब्रह्मचर्यव्रताला बळकटी आणण्यासाठीं मीं त्याचें अनुकरण सुरू केलें, आणि एकादशीच्या दिवशीं उपवास करण्याचें ठरविलें. सामान्यतः लोक एकादशीच्या दिवशीं दूध आणि फळें यांवर राहिल्यानें एकादशी घडली असें समजतात. पण फलाहारी उपवास तर आतां माझा नित्याचाच होऊन बसला होता. म्हणून आतां मीं पाणी घेण्याची तेवढी सूट ठेविली व बाकी पूर्ण उपवास सुरू केले.

उपवासांचा प्रयोग सुरू केला, त्या सुमाराला श्रावण मास येत होता. त्या वर्षी रमझान व श्रावण मास एका वेळीं आले होते. गांधी घराण्यामध्यें वैष्णव व्रतांप्रमाणेंच शैव व्रतेंहि पाळीत असत. कुटुंबांतील मंडळी वैष्णवपंथाच्या देवळांत जात असे, तशीच शिवालयांतहि जात असे. श्रावण मासभर कुटुंबामध्यें दर वर्षी कोणी ना कोणी प्रदोष करीतच असे. त्यावरून मलाहि हा श्रावण मास पाळण्याची इच्छा झाली.

या महत्त्वाच्या प्रयोगाचा प्रारंभ टॉलस्टॉय आश्रमामध्यें झाला. त्या ठिकाणीं सत्याग्रही कैद्यांच्या कुटुंबांना घेऊन मि. कॅलनबॅक व मी राहात असूं. यांत मुलें व नवयुवकहि होते. त्यांचेसाठीं शाळा चालवीत असूं. या तरुणांमध्यें चार-पांच मुसलमान होते. त्यांना इस्लामचे नियम पाळण्याला मी उत्तेजन व मदत देत असें. नमाज पढण्याची वगैरे सोय करून देत असें. आश्रमामध्यें पारशी व ख्रिस्तीहि होते. या सर्वांना आपापल्या धर्माप्रमाणें वागण्याला प्रोत्साहन देण्याचा नियम होता. अर्थात् या मुसलमान युवकांना रोझे पाळण्यास मीं उत्तेजन दिलें. मला स्वतःला तर प्रदोष करायचेच होते; पण त्याखेरीज हिंदू, पारशी आणि ख्रिस्ती मंडळींनाहि मीं मुसलमान युवकांच्या बरोबर उपवास करण्याची शिफारस केली. संयमाच्या बाबतींत कोणाच्याहि सोबतीनें चाललें तरी तें स्तत्यच आहे, हें मीं त्यांना समजावून सांगितलें. पुष्कळशा आश्रमवासीयांनीं माझी सूचना उचलून धरली. हिंदू व पारशी हे मुसलमान मित्रांचें सर्वस्वीं अनुकरण करीत असें नाहीं; तेवढ्याची आवश्यकताहि नव्हती. मुसल्मान सूर्य मावळण्याची वाट पाहात तर बाकीचे त्यापूर्वी जेवून घेत; अशासाठीं कीं, मुसलमानांना वाढतां यावें किंवा त्यांचेसाठीं खास वस्तू तयार करतां याव्या. शिवाय मुसलमान पहांटे जेवत, त्यांत इतरांनीं भाग घेण्याचा प्रश्नच नव्हता. आणि मुसल्मान दिवसा पाणीहि पीत नसत, तर बाकीचे पाणी लागेल तेवढें पीत.

या प्रयोगापासून एक फायदा असा झाला कीं, उपास व एक वेळ भोजन यांचें महत्त्व सर्वांना कळूं लागलें; एकमेकांबद्दल उदार भावना व प्रेमभाव हीं वाढलीं. आश्रमांत अन्नाहाराचा नियम होता. मला या ठिकाणीं आभारपूर्वक कबूल केलें पाहिजे कीं, या नियमाचा स्वीकार माझ्या भावनांकडे दृष्टि देऊनच करण्यांत आला होता. रोझ्यांच्या दिवसांत मुसलमानांना मांसाची बंदी जड वाटली असणार; पण एकाहि नवयुवकानें मला तसें जाणवूं दिलें नाहीं. ते अन्नाहार आनंदानें व चवीनें घेत असत. हिंदू मुलेंहि त्यांचेसाठीं आश्रमाला चालण्याजोगे असे स्वादिष्ट जिन्नस करीत असत.

माझ्या उपवासांचें वर्णन करीत असतां हें विषयान्तर मीं जाणूनबुजून केलें. कारण या मधुर प्रसंगाचें वर्णन करण्याची संधि दुसऱ्या कोठें मला मिळाली नसती. आणि हें विषयान्तर करून मीं माझ्या एका संवयीचेंहि वर्णन करून टाकलें आहे. ती ही कीं, अमुक एक गोष्ट आपण करतों ती चांगली आहे असें मला वाटत असलें म्हणजे माझ्याबरोबर राहाणारांनाहि तींत सामील करविण्याचा मी प्रयत्न करतों. हे उपवासाचे व एकाहाराचे प्रयोग ही नवीन कल्पना होती, पण प्रदोषांच्या व रमझानच्या मिषानें मीं सर्वांनाच त्यांत ओढलें.

अशा तऱ्हेनें सहजासहजींच आश्रमामध्यें संयमी वातावरण वाढलें. इतर

उपवास व प्रदोष यांचेमध्येंहि आश्रमवासी मला सोबत करूं लागले, व त्याचा परिणामहि इष्टच झाला अशी माझी समजूत आहे. संयमाचा परिणाम दरेकाच्या हृदयावर किती किती झाला, दरेकाच्या विषयवासना आवरण्याच्या कामीं उपवासांनीं कितीसा भाग घेतला, हें मीं नक्की सांगूं शकत नाहीं. पण माझ्यावर तरी आरोग्याच्या व विषयलोभाच्या दृष्टींनीं चांगलाच परिणाम झाला, असा माझा अनुभव आहे. असें असतांहि मला हेंहि कळतें कीं, उपवास इत्यादींचा असाच परिणाम सर्वांवरच होईल असा अबाधित नियम नाहीं. इंद्रियनिग्रहाच्या हेतूनें केलेल्या उपोषणाचाच संयमाच्या कामीं उपयोग होईल. कित्येक मित्राचा असाहि अनुभव आहे कीं उपोषणाच्या अखेरीला विषयेच्छा व स्वाद अधिक तीव्र होतात. याचा अर्थ असा कीं, उपवासाच्या मुदतींत विकार दाबण्याची व स्वाद जिंकण्याची सतत भावना असेल तरच त्याचें शुभ फळ मिळेल. इरादापूर्वक किंवा मनःपूर्वक न केलेल्या उपवासाचा स्वतंत्र परिणाम विषयनिग्रहच होईल असें मानणें अगदीं चुकीचें होईल. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील श्लोक या बाबतींत फारच मननीय आहे;

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥

उपवासी माणसाचे विषय ( उपवासाच्या मुदतीपुरते ) शम पावतात, त्यांचेविषयींची वासना जात नाहीं. रस तर ईश्वरदर्शनानेंच—ईश्वरप्रसादानेंच शान्त होतो.

सारांश कीं, उपास वगैरे संयमी इसमाच्या मार्गामध्यें साधन या नात्यानें आवश्यक आहेत. पण तेवढयानें सर्व कांहीं भागलें असें नाहीं. आणि जर शारीरिक उपवासाबरोबर मनाचा उपवास नसेल तर तो दंभच म्हणावा लागेल, व नुकसानकारक होईल.



## ३२

# पंतोजी

'सत्याग्रहाच्या इतिहासा 'मध्यें ज्या गोष्टी आलेल्या नाहींत किंवा आल्या असल्यास संक्षेपानें आल्या आहेत तेवढ्याच गोष्टी या प्रकरणामध्यें येत आहेत एवढें वाचकानें लक्षांत ठेवलें म्हणजे त्याला या प्रकरणांचा आपापसांतील संबंध लक्षांत येईल.

टॉलस्टॉय आश्रमामध्यें मुलांमुलींसाठीं शिक्षणाची कांहीं तरी व्यवस्था करणें आवश्यक होतें. माझ्याबरोबर हिंदू, मुसलमान, पारशी व ख्रिस्ती नवयुवक होते, आणि थोड्या हिंदू मुलीहि होत्या. निराळे शिक्षक ठेवणें अशक्य होतें, व मला अनावश्यकहि वाटलें. अशक्य होतें, कारण लायक हिंदी शिक्षक दुर्मिळ होते, आणि मिळाले तरी लठ्ठ पगार मिळाल्याखेरीज डरबनपासून २१ मैल दूर कोण कशाला येईल ? माझ्यापाशीं तरी पैशांचें पेव थोडेंच भरलेलें होतें ? बाहेरून शिक्षक आणणें अनावश्यकहि वाटलें. कारण चालू शिक्षणपद्धति मला पसंत नव्हती. योग्य पद्धति कोणती याचा मीं अनुभव मिळविला नव्हता. एवढें समजत होतें कीं, आदर्श स्थितीमध्यें खरें शिक्षण आईबापांच्या हाताखालींच मिळणार. आदर्श स्थितीमध्यें बाह्य मदत कमींत कमी असली पाहिजे. टॉलस्टॉय आश्रम हें एक कुटुंब होय, व त्यांत पित्याच्या स्थानीं मी आहें. अर्थात् मलाच या नवयुवकांना घडविण्याची जबाबदारी यथाशक्ति उचलली पाहिजे असा मीं विचार केला.

या समजुतीमध्यें पुष्कळ दोषहि होतेच. हे नवयुवक माझेपाशीं जन्मापासून नव्हते. प्रत्येकजण निरनिराळ्या तऱ्हेच्या वातावरणांत वाढलेला होता. सगळे एका धर्माचेहि नव्हते. अशा स्थितींतील मुलांचा व मुलींचा मी पिता बनलों तरी त्यांचा मी यथायोग्य सांभाळ कसा करणार ?

पण मी हृदयाच्या शिक्षणाला म्हणजे चारित्र्याच्या विकासाला नेहमींच प्रथम स्थान देत आलों आहें. आणि चारित्र्याचें ज्ञान वाटेल त्या वयाच्या व वाटेल त्या वातावरणांत वाढलेल्या मुलांमुलींना, कमीजास्त प्रमाणांत का होईना पण, देतां येईलच असा विचार करून मी मुलांबरोबर पित्याच्या नात्यानें रात्रंदिवस राहात असें. चारित्र्य हाच त्यांच्या शिक्षणाचा पाया असें मानून मी चाललों. पाया पक्का झाला तर बाकीचें मुलें सवड मिळेल त्याप्रमाणें दुसऱ्याची मदत घेऊन किंवा स्वतःच्या बळावरहि, मिळवूं शकतील.

तरी पण अक्षरज्ञान थोडेंबहुत तरी दिलेंच पाहिजे हें मी समजून होतों. म्हणून वर्ग काढले आणि त्या कामीं मि. कॅलनबॅक व श्री. प्रागजी देसाई यांची मदत घेतली.

शारीरिक शिक्षणाची आवश्यकता मला कळत होती, पण तें शिक्षण त्यांना सहजीं मिळतच होतें.

आश्रमांत नोकर तर नव्हतेच. पायखान्यापासून स्वयंपाकघरापर्यंतचीं सर्व कामें आश्रमवासीयांनींच करावयाचीं होतीं. फळझाडें पुष्कळ होतीं. नवीन लागवड करावयाचीच होती. मि. कॅलनबॅकना शेतीची आवड होती. सरकारी आदर्श बगीच्यामध्यें ते स्वतः कांहीं दिवस शिकून आले होते. स्वयंपाकांत गुंतलेल्यांखेरीज इतर सर्व लहान मोठ्यांना रोज ठराविक वेळ बगीच्यामध्यें काम करावें लागतच असे. मुलांकडून त्या कामीं भरपूर मदत होई. मोठे खड्डे खणणें, झाडें तोडणें, ओझीं वाहून नेणें इत्यादि कामांमध्यें त्यांचीं शरीरें चांगलीं कसून निघत. त्यांना त्या कामाची मौजहि वाटे, आणि हीं कामें असल्यामुळें त्यांना इतर कसरत किंवा खेळ यांची आवश्यकता राहात नसे. कामाचे बाबतींत कांहीं विद्यार्थी किंवा कधींमधीं सर्वच विद्यार्थी टंगळमंगळ करीत, आळस करीत. पुष्कळ वेळां मीं तिकडे दुर्लक्ष करीत असें. कधीं सक्तीनेंहि त्यांचेकडून काम करून घेत असें. जेव्हां सक्ती करीत असें तेव्हां ते कंटाळत हेंहि माझ्या लक्षांत येई. तरी पण सक्तीचा प्रतिकार कोणी कधीं केल्याचें स्मरत नाहीं. जेव्हां जेव्हां सक्ती करीत असें तेव्हां तेव्हां त्यांची समजूतहि घालीत असें व त्यांचेकडूनच कबूल करून घेत असें कीं, कामाच्या वेळीं खेळ ही संवय बरी नाहीं. त्यांची त्या क्षणीं समजूत पडे, दुसऱ्या क्षणाला विसर पडे. अशा तऱ्हेनें गाडें रेटत असें; तरी पण त्यांचीं शरीरें मात्र कसलेलीं बनत होतीं.

आश्रमांत आजार क्वचित्च येई. त्याचें एक मुख्य कारण हवापाणी आणि योग्य व नियमित आहार हें होतें, हें येथें नमूद केलें पाहिजे. शारीरिक शिक्षणाबरोबर शारीरिक धंद्याचाहि उल्लेख करून टाकतों. सर्वांना कांहीं तरी उपयुक्त धंदा शिकवावयाचा असा बेत होता. त्यासाठीं मि. कॅलनबॅक ट्रॅपिस्ट मठामध्यें चपला बनविण्याचें काम शिकून आले. त्यांच्यापासून मी शिकलों, आणि जीं मुलें हा धंदा शिकायला तयार झालीं त्यांना मीं शिकविलें. मि. कॅलनबॅकना सुतारकामाचा थोडासा अनुभव होता, आणि आश्रमांत सुतारकाम जाणणारा आणखी एक जोडीदार होता. त्यामुळें तें कामहि थोडथोडें शिकविलें जात असे. स्वयंपाककाम तर बहुतेक सर्व मुलांनीं शिकून घेतलें.

हीं सर्व कामें मुलांना नवीन होतीं. असलीं कामें शिकावीं लागणार असें त्यांच्या स्वप्नामध्येंहि नव्हतें. दक्षिण आफ्रिकेमध्यें हिंदी मुलांना जें कांहीं शिक्षण मिळे, तें फक्त अक्षरज्ञानाचेंच असे. टॉलस्टॉय आश्रमामध्यें प्रथमपासूनच असा रिवाज पाडलेला होता कीं, जें काम आम्ही शिक्षक करणार नाहीं तें मुलांकडूनहि

करवून घ्यायचें नाहीं, अर्थात् नेहमीं त्यांच्याबरोबर तेंच काम करणारा एक शिक्षकहि राही. त्यामुळें मुलें हौसेनें शिकत.

चारित्र्य व अक्षरज्ञान यांचेसंबंधीं पुढें लिहूं.

●●●

## ३३

# पुस्तकी शिक्षण

शारीरिक शिक्षण व तदनुषंगानें कसलें तरी हस्तकौशल्य शिकविण्याचें काम टॉलस्टॉय आश्रमामध्यें कशा तऱ्हेनें चालविलें जात असे तें आपण कांहीं अंशीं पाहिलें. तें काम मी स्वतःला पूर्ण संतोष वाटेल अशा तऱ्हेनें करूं शकलों नाहीं, हें जरी खरें असलें, तरी त्या कामीं थोडेसें तरी यश मिळालें. पण अक्षरज्ञान देणें कठिण पडलें; त्या कामाला पुरे पडण्याचीं साधनें माझेपाशीं नव्हतीं. मला स्वतःला इच्छा होती तेवढी फुरसत मिळेना. माझें ज्ञानहि पुरेसें नव्हतें. सबंध दिवसभर शारीरिक काम करून मी थकून जात असें; आणि थोडासा कोठें आराम घ्यायला पाहावें त्याच वेळीं वर्ग घ्यायचे असत. त्यामुळें मी ताजातवाना असण्याऐवजीं त्या वेळीं महाप्रयत्नानें जागा राहात असें एवढेंच. सकाळचा वेळ शेती आणि गृहोद्योग यांमध्यें जात असे; त्यामुळें दुपारीं जेवणानंतर लगेच शाळा चालू होई. याखेरीज दुसरा कोणताहि वेळ सोयीस्कर नव्हता.

पुस्तकी शिक्षणासाठीं अधिकांत अधिक तीन तास ठेवलेले होते. शिवाय वर्गांत हिंदी, तामिळ, गुजराथी व उर्दू इतक्यांचें शिक्षण द्यायचें असे. प्रत्येक मुलाला त्याच्या त्याच्या मातृभाषेंतूनच शिक्षण द्यायचें असा निर्धार होता. इंग्रजीहि सर्वांना शिकविलें जात असे. त्याखेरीज गुजराथी, हिंदू मुलांना संस्कृतचें व सर्वांनाच हिंदीचें थोडथोडें ज्ञान द्यायचें. इतिहास, भूगोल व अंकगणित सर्वांनाच शिकवायचें असा क्रम होता. तामिळ व उर्दू शिकविण्याचें काम माझेकडे होतें.

माझें तामिळज्ञान म्हणजे आगबोटीवर व तुरुंगामध्यें मिळविलेलें. त्यांतहि पोपकृत उत्कृष्ट ‘ तामिळ स्वयंशिक्षिका ’ पलीकडे माझी मजल गेलेली नव्हती. उर्दू लिपीचें ज्ञान आगबोटीमध्यें मिळविलें होतें तेवढेंच. आणि खास फारशी किंवा अरबी शब्दांचें ज्ञान म्हणजे मुसलमान मित्रांच्या सहवासानें मिळवितां आलें तेवढेंच ! संस्कृत हायस्कुलांत शिकलों होतों तेंच. गुजराथी म्हणजे शाळकरी मुलांचेंच.

एवढ्या भांडवलावर मी काम चालविणार; आणि माझे मदतनीस, ते तर माझ्याहूनहि कमी शिकलेले! परंतु माझें देशी भाषांबद्दलचें प्रेम, शिकविण्याच्या स्वतःच्या हातोटीबद्दलचा माझा आत्मविश्वास, विद्यार्थ्यांचें अज्ञान व अज्ञानापेक्षांहि अधिक अंशीं त्यांच्या मनाची उदारता, यांची मला फार मदत झाली.

तामिळ विद्यार्थी दक्षिण आफ्रिकेमध्येंच जन्मलेले होते व त्यामुळें त्यांना तामिळ थोडेंच समजत असे. लिपि तर मुळींच येत नव्हती. त्यामुळें त्यांना लिपि व व्याकरणाचीं मूलतत्त्वें मलाच शिकवावीं लागत. तें काम सोपें होतें. विद्यार्थ्यांना माहीत होतें कीं, तामिळ बोलण्याच्या बाबतींत ते माझा सहज पराभव करूं शकत होते. तामिळ जाणणारे लोक मला भेटायला येत, तेव्हां विद्यार्थीच माझे दुभाष्ये होत असत. तरी पण माझें गाडें ढकलत गेलें. कारण मीं कधीं आपल्या विद्यार्थ्यांपासून स्वतःचें अज्ञान लपविण्याचा प्रयत्न केला नाहीं. हरेक बाबतींत मी जसा मुळांत होतों तसाच तेहि मला समजत होते. त्यामुळें पुस्तकी ज्ञानाच्या बाबतींत माझें गाढ अज्ञान असतांहि मी त्यांचें प्रेम व आदर हीं कधींहि हरवून बसलों नाहीं.

मुसलमान मुलांना उर्दू शिकविणें त्या मानानें सोपें होतें. त्यांना लिपि येत होती. त्यांची वाचनाची गोडी वाढविणें व त्यांचें अक्षर सुधारणें एवढेंच माझें काम होतें.

साधारणपणें हीं सर्व मुलें निरक्षर व शाळेंत न शिकलेलीं अशींच होतीं. शिकवीत असतांच मला आढळून आलें कीं, मला त्यांना शिकवायचें असें थोडेंच होतें. त्यांचा आळस निवारणें, ते आपण होऊन वाचीत बसतील असें करणें, त्यांच्या अभ्यासावर नजर ठेवणें, हींच कामें विशेष होतीं. मी एवढ्यावरच संतोष मानीत असें, म्हणूनच निरनिराळे विषय शिकणाऱ्या मुलांना एकाच खोलींत बसवून त्यांच्याकडून काम करवून घेणें शक्य होत असे.

पाठ्यपुस्तकांसाठीं अनेक वेळां ओरड करण्यांत येत असते; पण मला त्यांची उणीव कधींच जाणवली नाहीं. असलेल्या पुस्तकांचाहि विशेष उपयोग केल्याचें मला स्मरत नाहीं. माझी अशी समजूत आहे कीं, शिक्षक हाच विद्यार्थ्यांचें पाठ्यपुस्तक असावा. शिक्षकांनीं पुस्तकांतून शिकविलेलें असें फारच थोडें आज माझ्या स्मरणांत राहिलेलें आहे. त्यांनीं स्वमुखानें शिकविलें तें मात्र आजहि आठवतें. मुलें डोळ्यांनीं ग्रहण करतात, त्यापेक्षां कानांनीं ऐकलेलें कमी श्रमांत अधिक ग्रहण करूं शकतात. मुलांकडून एक तरी पुस्तक मी पुरें वाचून घेतल्याचें मला स्मरत नाहीं.

पण मीं स्वतः जें अनेक पुस्तकांच्या वाचनांतून पचविलें होतें, तें मी त्यांना स्वतःच्या भाषेंत सांगत असें; आणि तें त्यांना आजमितीलाहि स्मरत

असणार असें मला वाटतें. वाचून दाखविलेलें पाठ करण्याचा त्यांना त्रास वाटत असे; मी तोंडीं सांगत असें तें ते मला लगेच म्हणून दाखवीत. वाचायचा त्यांना कंटाळा येई. मीच श्रमामुळें किंवा अन्यकारणांनीं मंद व नीरस झालों तर गोष्ट निराळी; पण नाहींपेक्षां सांगितलेलें ऐकण्यांत त्यांना गोडी वाटे. त्यांच्या मनामध्यें प्रश्न उद्भवत त्यांचीं उत्तरें देतांना मला त्यांच्या ग्रहणशक्तीचाहि अंदाज मिळून जात असे.

●●●

## ३४

# आत्मिक शिक्षण

विद्यार्थ्यांचीं शरीरें व मनें यांचा विकास करण्यापेक्षां आत्म्याचा विकास करण्याकरितां मला फारच अधिक परिश्रम करावे लागले. आत्म्याचा विकास करविण्याच्या कामीं मीं धार्मिक पुस्तकांवर कमीच आधार ठेविला होता. प्रत्येक विद्यार्थ्याला आपल्या धर्माचीं मूलतत्त्वें माहीत असलीं पाहिजेत. आपापल्या धर्मपुस्तकांचें सामान्य ज्ञान त्याला असलें पाहिजे, असें माझें मत असल्यामुळें त्यांना तें ज्ञान मिळेल अशी मी यथाशक्ति व्यवस्था केली होती. पण हें मी बौद्धिक शिक्षणाचेंच एक अंग समजतों. आत्म्याचें शिक्षण हा एक स्वतंत्रच विषय आहे, हें मला टॉलस्टॉय आश्रमांतलि मुलांना शिकवूं लागण्यापूर्वीच कळून चुकलें होतें. आत्म्याचा विकास करणें म्हणजे शील बनविणें, ईश्वराचें ज्ञान मिळविणें, आत्मज्ञान प्राप्त करून घेणें. हें ज्ञान मिळविण्यासाठीं मुलांना मदत खूपच पाहिजे; आणि त्याखेरीजचें इतर ज्ञान व्यर्थ आहे, हानिकारकहि होण्याचा संभव आहे असें मला वाटत होतें.

आत्मज्ञान चतुर्थाश्रमामध्यें मिळवावें असा चुकीचा ग्रह माझ्या ऐकण्यांत आलेला आहे. पण या अमूल्य वस्तूला जे चतुर्थाश्रमापर्यंत थोपवून धरतात, त्यांना आत्मज्ञान तर प्राप्त होत नाहींच, पण वार्धक्य व बालपणाची दुसरी परंतु केविलवाणी पुनरावृत्ति मिळते. आणि ते पृथ्वीला भारभूत होऊन जगत असतात असाच सार्वत्रिक अनुभव दिसून येतो. हे विचार याच शब्दांमध्यें कदाचित् १९११-१२ सालीं मीं मांडले नसते; परंतु त्या वेळचे विचार अशाच तऱ्हेचे होते, असें मला स्पष्टपणें आठवतें.

आत्मिक शिक्षण द्यायचें कसें? मुलांना मी भजनें सांगत असें, नीतीचीं पुस्तकें वाचून दाखवीत असें; पण तेवढ्यावर संतोष होईना. मुलांशीं सहवास

घडूं लागला तसतसें माझ्या लक्षांत आलें कीं, हें ज्ञान पुस्तकांमार्फत देतां यायचेंच नाहीं. शारीरिक शिक्षण शरीराच्या कसरतीनें देतां येतें, बौद्धिक शिक्षण बुद्धीच्या कसरतीनें, त्याचप्रमाणें आत्मिक शिक्षणसुद्धां आत्म्याच्या कसरतीनेंच देतां येणार. आत्म्याची कसरत शिक्षकाच्या वर्तनानेंच प्राप्त होणार. म्हणून युवक पाहात असोत किंवा नसोत, सदांसर्वदां शिक्षकानें सावधान राहिलें पाहिजे. लंकेमध्यें बसूनहि शिक्षक आपल्या वर्तनानें शिष्याच्या आत्म्याला हलवूं शकेल. मी खोटें बोलत गेलों आणि स्वतःच्या शिष्यांना मात्र सच्चे बनविण्याचा प्रयत्न केला, तर तो व्यर्थच जायचा. भित्रा शिक्षक शिष्यांना शौर्य शिकवूं शकणार नाहीं. व्यभिचारी शिक्षक शिष्यांना संयम कसा शिकविणार ? मीं मनाशीं ठरविलें कीं, मीं माझ्यापाशीं असलेले तरुण व मुली यांना वस्तुपाठरूप होऊन राहिलें पाहिजे. अशा तऱ्हेनें माझे शिष्यच माझे शिक्षक बनले. स्वतःसाठीं नाहीं तर त्यांच्यासाठीं तरी मला चांगलें झालें पाहिजे, व चांगलें राहिलें पाहिजे हें माझ्या ध्यानांत आलें; व टॉलस्टॉय आश्रमांतील माझा बहुतेक संयम या मुलांमुलींच्यामुळेंच झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आश्रमामध्यें एक मुलगा खूप आडदांडपणा करी, खोटें बोले, कुणाला जुमानीत नसे, इतरांबरोबर भांडत असे. एके दिवशीं त्यानें फारच दंगा केला. मी फिकीरीत पडलों. विद्यार्थ्यांना मी कधीं शिक्षा करीत नसें. या वेळीं मला फार राग आला. मी त्याच्याकडे गेलों. त्याची समजूत घालावी तर कांहीं केल्या समजूत पटेना. त्यानें मला फसविण्याचाहि प्रयत्न केला. मीं जवळ पडलेला रूळ उचलला आणि त्याच्या दंडावर मारला. मारतांना मी कांपत होतों हें त्याच्या लक्षांत आलें असावें. अशा तऱ्हेचा अनुभव माझ्या बाबतींत कोणाहि विद्यार्थ्याला यापूर्वीं आला नव्हता. विद्यार्थी रडूं लागला. त्यानें माझ्यापाशीं माफी मागितली. त्याला काठी लागून दुःख झालें, यासाठीं तो रडला असें नव्हे. मनांत आणता तर मला भारी झाला असता, इतकी शक्ति त्याच्यामध्यें होती. त्याचें वय सतरा वर्षांचें होतें. बांध्यानें मजबूत होता. पण माझ्या रूळांत त्याला माझें दुःख दिसून आलें. या प्रसंगानंतर तो कधीं माझ्याविरुद्ध गेला नाहीं. पण मला मात्र तो रूळ मारल्याबद्दल अजूनपर्यंत पश्चात्ताप होत आहे. मला धास्ती वाटते कीं त्याला मारून मीं आत्म्याचें नव्हे तर आपल्या पशुतेचें आविष्करण केलें.

बालकांना मार देऊन त्यांना शिकविण्याची पद्धति मला कधींच पसंत नाहीं. मला एकच प्रसंग आठवतो कीं, ज्या वेळीं मीं माझ्या मुलांपैकीं एकाला मारलें. रूळ मारण्यांत मीं योग्य केलें कीं कसें याचा निर्णय मी अद्याप करूं शकलेलों नाहीं. या शिक्षेच्या सयुक्तिकतेविषयीं मला शंका आहे. कारण तिच्यामागें राग होता व शिक्षा करण्याचा हेतु होता. जर तींत फक्त माझ्या दुःखाचें प्रदर्शनच

असतें तर मीं ती शिक्षा योग्य म्हटली असती; पण या शिक्षेंतील भावना मिश्र होती. या प्रसंगानंतर मात्र विद्यार्थ्यांना सुधारण्याची अधिक चांगली रीत मी शिकलों. त्या कलेचा उपयोग मीं सदर प्रसंगीं केला असता तर काय परिणाम झाला असता तें मीं सांगूं शकत नाहीं. हा प्रसंग तो युवक तर लवकरच विसरूनहि गेला. त्या मुलामध्यें विशेष सुधारणा झाली असेंहि मी सांगूं शकत नाहीं. परंतु या प्रसंगामुळें विद्यार्थ्यांचे बाबतींत शिक्षकाचें कर्तव्य काय याबद्दल मी अधिक विचार करूं लागलों. त्यानंतर तशाच तऱ्हेचे दोष तरुणांकडून घडले, पण मीं दंडनीतीचा कधींच अवलंब केला नाहीं. अशा तऱ्हेनें दुसऱ्यास ज्ञान देण्याचा प्रयत्न करीत असतांना मला स्वतःलाच आत्म्याच्या गुणधर्मांचें अधिकाधिक ज्ञान होऊं लागलें.

●●●

## ३५
# बऱ्यावाईटांचें एकत्र राहाणें

टॉलस्टॉय आश्रमामध्यें मि. कॅलनबॅकनीं एक प्रश्न माझ्यापुढें उपस्थित केला. त्यांनीं तो प्रश्न काढण्यापूर्वी मीं त्यासंबंधीं विचार केला नव्हता. आश्रमामध्यें कांहीं मुलगे फार आडदांड व नाठाळ होते; कोणी उनाड होते. त्यांच्याच संगतींत माझे तीन मुलगेहि असत; तशाच स्थितींत वाढलेलीं इतर मुलेंहि असत. पण मि. कॅलनबॅकचें लक्ष मात्र तीं उनाड मुलें आणि माझे मुलगे यांनीं एकत्र कसें राहायचें याच गोष्टीकडे होतें. एके दिवशीं ते आवेशानें म्हणाले, " ही तुमची रीत मला बिलकुल पटत नाहीं. या मुलांबरोबर आपल्या मुलांना मिसळूं दिलेंत तर त्याचा परिणाम एकच होणार. त्यांना त्या उनाड मुलांचा संसर्ग लागणार; आणि तेहि मग बिघडल्याशिवाय राहातील का ? "

मीं कांहीं वेळ तरी विचारांत पडलों होतों कीं नाहीं तें मला आतां स्मरत नाहीं. पण माझा जबाब मात्र आठवतो. मीं म्हटलें कीं, " माझे औरस मुलगे आणि हे उनाड मुलगे यांच्यामध्यें भेद कसा करावा ? सध्यां दोघांच्याहि बाबत माझी जबाबदारी सारखीच आहे. हे युवक माझ्याच बोलाविण्यावरून येथें आलेले आहेत. मीं त्यांना पैसे पुरविले तर ते आजच्या आज जोहानिसबर्गला जाऊन पूर्वी राहात होते त्या पद्धतीनें राहूं लागतील. त्यांनीं येथें येण्यामध्यें माझ्यावर कांहींशी मेहेरबानीच केली आहे असें त्यांना व त्यांच्या आईबापांना वाटल्यास त्यांतहि आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं. येथें येण्यानें त्यांना गैरसोयी सहन

कराव्या लागत आहेत हें मला व तुम्हांला दोघांनाहि दिसतेंच आहे. पण माझें कर्तव्य स्पष्ट आहे. मला त्यांना येथेंच ठेविलें पाहिजे. अर्थात् मग माझे मुलगेहि त्यांचे बरोबरच राहाणार. शिवाय आपण इतरांहून श्रेष्ठ आहों अशा तऱ्हेचा भेदभाव मीं माझ्या मुलांना आजपासूनच कां शिकवावा? अशा तऱ्हेचा विचार त्यांच्या डोक्यांत घालणें म्हणजेच त्यांना आडमार्गाला नेणें आहे. सध्यांच्या स्थितींत राहिल्यानें ते चांगले घडून निघतील, बऱ्यावाईटाची परीक्षा आपल्या आपण करूं लागतील. आपण असेंच कां समजूं नये कीं त्यांच्यांत खरोखरच कांहीं गुण असले तर उलट त्यांचाच संसर्ग त्यांच्या सोबत्यांना लागेल? तें कसेंहि असो, पण मला त्यांना येथेंच ठेविण्याखेरीज गत्यंतर नाहीं. तसें करण्यांत कांहीं धोका असला तरी तो धोकाहि मला पत्करला पाहिजे.'' मि. कॅलनबॅकनीं डोकें हालविलें.

प्रयोगाचा परिणाम अनिष्ट झाला असें म्हणतां येणार नाहीं. माझ्या मुलांचें त्यापासून यत्किंचित्‌हि नुकसान झालें असें मला वाटत नाहीं. त्यांचा फायदा झालेला तर मला स्पष्ट दिसत होता. त्यांच्यामध्यें मोठेपणाची भावना कांहीं अंशानेंहि राहिली असल्यास ती गेली. ते सर्वांबरोबर मिसळून राहायला शिकले, तावूनसुलाखून निघाले.

या व अशाच तऱ्हेच्या इतर अनुभवांवरून मला असें वाटूं लागलें आहे कीं, आईबापांची योग्य देखरेख असेल तर आपलीं बरींवाईट मुलें एकत्र राहिलीं किंवा शिकलीं तरी त्यापासून चांगल्या मुलांची कसलीच हानि होत नाहीं. स्वतःच्या मुलांना तिजोरींत कोंडून ठेविल्यानें तीं निर्दोष राहातात आणि बाहेर काढल्यानें विटाळतात असा नियम तर नाहींच. हां, एवढें मात्र खरें कीं, जेथें अनेक तऱ्हांचीं मुलें व मुली एकत्र राहातात व शिकत असतात तेथें आईबापांची आणि शिक्षकांची मात्र कसोटी होते, त्यांना खूप लक्ष ठेवावें लागतें.



# ३६

# प्रायश्चित्तादाखल उपवास

मुलांमुलींना प्रामाणिकपणें वाढविण्याच्या व शिक्षण देण्याच्या कामीं किती व कसकशा अडचणी आहेत त्याचा दिवसेंदिवस अधिकाधिक अनुभव येत होता. शिक्षक व पालक ह्या नात्यानें त्यांच्या हृदयामध्यें प्रवेश करायचा होता. त्यांच्या सुखदुःखांचा वांटेकरी व्हायचें होतें; त्यांच्या जीवनांत त्यांना वेळोवेळीं पडणारीं कोडीं उकलायचीं होतीं; त्यांच्या उसळत्या तारुण्याच्या तरंगांना सरळ मार्ग लावायचा होता.

कित्येक कैदी सुटून गेल्यानंतर टॉलस्टॉय आश्रमामध्यें थोडींच माणसें राहिलीं. तीं बहुतेक फिनिक्सवासी होतीं. त्यामुळें आश्रम फिनिक्सला घेऊन गेलों. फिनिक्समध्यें माझी खूप कसोटी झाली. शिल्लक राहिलेल्या आश्रमवासीयांना फिनिक्सला पोंचवून मी जोहानिसबर्गला गेलों. जोहानिसबर्गला थोडे दिवस राहातों तोंच दोन व्यक्तींच्या भयंकर पतनाची बातमी मला मिळाली. सत्याग्रहाच्या महान् लढ्यामध्यें कोठेंहि अपयश आल्यासारखें दिसलें तरी त्यानें माझ्या मनाला धक्का बसत नसे. पण या हकीकतीनें माझ्यावर जणुं काय वज्राघात केला. माझ्या हृदयाला मोठी जखम झाली. मीं त्याच दिवशीं फिनिक्सची गाडी पकडली. मि. कॅलनबॅकनीं माझ्याबरोबर येण्याचा आग्रह धरला. माझी केविलवाणी स्थिति त्यांच्या लक्षांत येऊन गेली होती. मला एकट्याला जाऊं द्यायला ते कबूल होत ना. पतनाची बातमी मला त्यांचेकडूनच मिळाली होती.

रस्त्यामध्यें मीं माझा धर्म समजावून घेतला, किंवा तो मला समजला अशी स्वतःच्या मनाची समजूत करून घेतली म्हणा ना. मला असें वाटलें कीं आपल्या देखरेखीखालीं राहिलेल्यांच्या पतनाबद्दल पालक किंवा शिक्षक कांहीं अंशांनीं तरी जबाबदार आहेत. या प्रसंगाबद्दलची माझी स्वतःची जबाबदारी तर मला स्पष्ट दिसत होती. माझ्या पत्नीनें मला सूचनाहि दिली होती. पण मी स्वभावतः विश्वासावर चालणारा असल्यामुळें मीं तिची सूचना मनावर घेतली नव्हती. शिवाय माझी अशीहि कल्पना होती कीं, मीं जर या पतनाबद्दल प्रायश्चित्त घेतलें, तरच त्या पतितांना मला होणारें दुःख समजून येईल, आणि त्यामुळें त्यांना स्वतःच्या चुकीची जाणीव होईल, व तिच्या गांभीर्याचीहि थोडीबहुत कल्पना होईल; म्हणून मीं सात दिवस उपवास व साडेचार महिने एकाहार असें व्रत घेतलें. कॅलनबॅकनीं मला निवारण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला. अखेरीला प्रायश्चित्ताची सयुक्तिकता त्यांनींहि मान्य केली, आणि त्यांनीं स्वतःहि माझ्याबरोबर तें व्रत पाळण्याचा आग्रह धरला. त्यांच्या निर्मळ प्रेमापुढें माझें

कांहीं चालेना. एवढा निश्चय केल्याबरोबर मला लगेंच हलकें वाटूं लागलें, मन शान्त झालें, ज्यांचे हातून दोष घडला होता, त्यांचेबद्दलचा राग थंडावला आणि त्यांच्याबद्दल कींवच तेवढी राहिली.

अशा तऱ्हेनें आगगाडीमध्येंच मन हलकें करून मी फिनिक्सला पोंचलों. तपास करून अधिक माहिती काढायची ती काढून घेतली. माझ्या उपवासाबद्दल सर्वांना कठिण तर वाटलेंच, पण त्यामुळें वातावरण निर्मळ झालें. पापाचरणाची भयंकरता सर्वांच्या लक्षांत आली, आणि विद्यार्थी व विद्यार्थिनी यांचा आणि माझा संबंध अधिक मजबूत व सरळ झाला.

या प्रसंगांतूनच कांहीं काळानंतर मला चौदा दिवस उपवास करण्याचा प्रसंग आला. त्याचा परिणाम तर अपेक्षेपलीकडे चांगला झाला अशी माझी समजूत आहे.

या प्रसंगावरून माझा असें सिद्ध करण्याचा हेतु नाहीं कीं, शिष्याच्या प्रत्येक दोषाबद्दल नेहमीं शिक्षकानें उपवास वगैरे केलेच पाहिजेत. पण मला वाटतें कीं, कांहीं प्रसंगीं तरी असल्या प्रायश्चित्तादाखल करावयाच्या उपवासांची अवश्य जरूरी आहे. मात्र त्यासाठीं विवेक व अधिकार पाहिजेत. जेथें शिष्य–शिक्षकांमध्यें शुद्ध प्रेमबंधन नाहीं, जेथें शिक्षकाला शिष्याच्या दोषांबद्दल खराखुरा आघात वाटलेला नाहीं, जेथें शिष्याला शिक्षकाबद्दल आदर वाटत नाहीं, तेथें उपवास निरर्थक आहे आणि उलट हानिकारक होण्याचाहि संभव आहे. परंतु असल्या उपवास-अर्धउपवासांबद्दल मतभेद असले तरीहि शिक्षक हा शिष्याच्या दोषांबद्दल थोड्याबहुत अंशांनीं तरी जबाबदार आहे याबद्दल मला लेशमात्र शंका नाहीं.

सात उपवास आणि नंतरचे एकाहार आम्हांला कोणाला जड वाटले नाहींत. त्या मुदतींत माझें कोणतेंहि काम बंद किंवा मंद झालें नव्हतें. त्या काळीं मीं फलाहारीच होतों. चौदा उपवासांचा अखेरचा भाग मात्र मला चांगलाच जड गेला. त्या वेळीं रामनामाचा चमत्कार मला पुरा समजला नव्हता त्यामुळें दुःख सहन करण्याची शक्ति कमी होती. उपवास चालू असल्या मुदतींत वाटेल तें करून पण पाणी खूप प्यालें पाहिजे या बाह्य युक्तीची मला माहिती नव्हती. उपवास जड जायला हेंहि एक कारण झालें; शिवाय पहिला उपवास सुखानें झाला होता, त्यामुळें दुसऱ्या खेपेला मी बेपर्वाहि राहिलों. पहिल्या उपवासामध्यें नेहमीं क्यूनीच्या पद्धतीचें कटिस्नान करीत असें; चौदा दिवसांच्या उपवासांत दोन तीन दिवसांनंतर तें बंद केलें. पाणी तोंडाशींच नेववेना आणि घोट घेतला तर ओकारी येई. त्यामुळें पाणी फार थोडें पीत असें. त्यामुळें गळा सुकला, क्षीण झाला आणि अखेरच्या दिवसांत तर आवाज अगदीं ओढता निघत असे. तरीहि जरूर तेवढें सांगून लिहविण्याचें काम अखेरच्या दिवसापर्यंत करतां

येत होतें, आणि रामायण इत्यादि शेवटपर्यंत ऐकत असें. कांहीं प्रश्नांसंबंधीं मत देणें यासारखीं आवश्यक कामेंहि करूं शकत असें.

• • •

## ३७

# गोखल्यांच्या भेटीस

दक्षिण आफ्रिकेंतील पुष्कळ आठवणी आतां सोडून द्याव्या लागत आहेत.

१९१४ सालीं जेव्हां सत्याग्रहाचा लढा समाप्त झाला, तेव्हां गोखल्यांच्या इच्छेवरून मला इंग्लंडहून स्वदेशीं यायचें होतें, म्हणून जुलै महिन्यामध्यें कस्तुरबाई, कॅलनबॅक व मी अशीं तिघें विलायतला जायला निघालों. सत्याग्रहाच्या लढ्याच्या वेळींच मीं तिसऱ्या वर्गानें प्रवास करण्यास सुरुवात केली होती. अर्थात् समुद्रमार्गानेंसुद्धां तिसऱ्या वर्गाचेंच तिकीट काढलें. पण या तिसऱ्या वर्गात आणि आपल्याकडील तिसऱ्या वर्गात फार तफावत आहे. आपल्याकडे निजण्याबसण्याला जागा मिळण्याची पंचाईत, स्वच्छतेचें तर नांवच घ्यायला नको. पण तिकडच्या तिसऱ्या वर्गात मात्र जागा योग्य प्रमाणांत मिळत होती, आणि स्वच्छताहि चांगली ठेवीत. कंपनीनें आमच्यासाठीं विशेष सोयहि करून दिली होती. आम्हांला कोणाचा उपसर्ग पोंचूं नये म्हणून एका संडासाला मुद्दाम कुलूप घालून त्याची किल्ली आमच्या हवालीं केली होती; आणि आम्ही तिघेंहि फलाहारी असल्यामुळें आम्हांला ताजीं सुकीं फळें पुरविण्याची आज्ञाहि आगबोटीच्या कोठावळ्याला देण्यांत आली होती. एरवीं तिसऱ्या वर्गाच्या उतारूंना फळें बेताचींच मिळतात. सुका मेवा तर बिलकुल नाहीं. या सोयी झाल्यामुळें समुद्रावरील अठरा दिवस फार शान्तीनें काढले.

या प्रवासांतील कित्येक स्मरणें जाणून घेण्यासारखीं आहेत. मि. कॅलनबॅकना दुर्बिणींचा फार शोक होता. त्यांनीं एकदोन भारी किंमतीच्या दुर्बिणी बाळगल्या होत्या. त्यासंबंधीं आमच्यामध्यें रोज वादविवाद होई. आमच्या आदर्शाला, आम्हांला जो साधेपणा मिळवायचा आहे त्याला, हें शोभत नाहीं असें त्यांना पटवून देण्याचा मी प्रयत्न करीत असें. एक दिवस आमच्यामध्यें त्यासंबंधीं झणझणीत वाद झाला. आम्ही दोघेहि आमच्या केबिनच्या खिडकीपाशीं उभे होतों.

मीं म्हटलें, " आमच्यामध्यें हा तंटा होत राहावा यापेक्षां ही दुर्बीणच

दर्यांत फेंकून दिली आणि तिची वार्ताच सोडून दिली तर किती तरी बरें होईल, नाहीं ? ”

मि. कॅलनबॅकनीं लगेच जबाब दिला, “ अलबत, ही मोह पाडणारी वस्तु फेंकूनच द्या. ”

मीं म्हटलें, “ बरें फेंकतोंच तर. ”

त्यांनींहि तितक्याच जलदीनें जबाब दिला, “ मी खरोखरच म्हणतों कीं अवश्य फेंकून द्या. ”

मीं दुर्बीण फेंकून दिली. ती सात एक पौंड किंमतीची होती, पण तिचें मोल तिच्या किंमतीवरूनच करायचें नव्हतें; तर मि. कॅलनबॅकच्या तिच्यावरील मोहावरून करायचें होतें. इतकें असूनहि मि. कॅलनबॅकना तिच्याबद्दल कधींहि हळहळ वाटली नाहीं. त्यांच्या माझ्यामध्यें अशा तऱ्हेचे प्रसंग अनेक वेळां घडत. त्यांतून मीं हा एक नमुना येथें दिला आहे.

आमच्यामधील संबंधांतून आम्हांला रोज नवीन नवीन शिकायला मिळे. कारण कीं आम्ही दोघेहि सत्याला अनुसरूनच चालण्याचा प्रयत्न करीत होतों. सत्याची कांस धरल्यामुळें क्रोध, स्वार्थ, द्वेष इत्यादींचें सहजीं निवारण होत असे, निवारण न झाल्यास सत्यहि हातीं लागत नसे. रागद्वेषांनीं भरलेला मनुष्य सरळ असूं शकेल; वाणीचें सत्यहि पाळूं शकेल; पण शुद्ध सत्य त्याला लाभणार नाहींच. शुद्ध सत्याचा शोध करणें म्हणजे रागद्वेषासारख्या द्वंद्वांतून पूर्ण मुक्ति मिळविणें होय.

आम्हीं प्रवास सुरू केला त्या वेळीं मला उपवास संपवून फारसा काळ झाला नव्हता. मला पुरेशी शक्तिहि आली नव्हती. आगबोटींत मी रोज डेकवर येरझारा घालून व्यायाम करून भरपूर खाण्याचा व खाल्लेलें पचविण्याचा प्रयत्न करीत असें. पण तसतसें माझ्या पायाच्या पोटरींत अधिकाधिक दुखूं लागलें. विलायतला पोंचल्यानंतरहि माझें हें दुःख कमी झालें नाहीं, उलट वाढलेंच. विलायतेंत डॉ. जीवराज मेहतांची ओळख झाली. त्यांना उपवासाची आणि पायांतील दुःखाची हकीकत सांगितली. तेव्हां ते म्हणाले, “ तुम्हीं जर थोडे दिवस पूर्ण विश्रांति घेतली नाहीं तर पाय कायमचे लुले होऊन राहातील असा संभव आहे. ” तेव्हांच माझ्या लक्षांत आलें कीं, दीर्घ उपोषण करणारानें गेलेली शक्ति ताबडतोब परत मिळविण्याचा किंवा फार खाण्याचा लोभ करणें बरें नाहीं. उपोषण करतांना जपावें लागतें, त्याहून तें सोडतांना अधिक जपावें लागतें. संयमहि उपोषण सोडतांनाच अधिक करावा लागत असावा.

मदिरामध्यें आम्हांला बातमी मिळाली कीं, महायुद्ध भडकायला कांहीं घटकांचाच अवकाश आहे. इंग्लंडच्या खाडीला पोंचतों तों लढाई सुरू झालीहि अशी बातमी मिळाली व आम्हांला थोपवून धरण्यांत आलें. पाण्याखालीं जागोजाग गुप्त सुरुंग लावलेले होते. त्यांतून आम्हांला नेऊन साउथॅम्प्टनला पोंचवीपर्यंत एकदोन दिवस खोळंबा झाला. लढाई ४ ऑगस्ट रोजीं सुरू झाली. आम्ही ६ तारखेला विलायतला पोंचलों.

## ३८

# युद्धांत भाग घेणें

विलायतला पोंचतों तों बातमी मिळाली कीं, गोखले तर पॅरिसमध्यें अडकून पडले आहेत; पॅरिसबरोबरचा येण्याजाण्याचा व्यवहार बंद पडला आहे; अर्थात् ते केव्हां येतील तें सांगतां येण्यासारखें नाहीं. गोखले प्रकृतीसाठीं फ्रान्सला गेले होते, तिकडेच लढाईमुळें अडकून पडले. त्यांना भेटल्याखेरीज स्वदेशीं जायचें नव्हतें. ते कधीं येतील तें कोणाला सांगतां येण्यासारखें नव्हतें.

तोंपर्यंत करायचें काय? लढाईच्या बाबतींत माझें कर्तव्य काय? तुरुंगांतील माझे जोडीदार व सत्याग्रही असे सोराबजी अडाजणिया विलायतेंतच बॅरिस्टरीचा अभ्यास करीत होते. चांगल्यांत चांगले सत्याग्रही म्हणून सोराबजींना त्यांनीं इंग्लंडांत बॅरिस्टरीचें शिक्षण घ्यावें व नंतर दक्षिण आफ्रिकेला येऊन माझी जागा घ्यावी या हेतूनें पाठविण्यांत आलें होतें. त्यांचा खर्च डॉक्टर प्राणजीवनदास मेहता देत असत. त्यांच्याबरोबर चर्चा केली; तसेंच त्यांच्यामार्फतीनें डॉक्टर जीवराज मेहता इत्यादि विलायतेंत राहाणाऱ्या हिंदी लोकांची एक सभा बोलाविली व त्यांच्यापुढें मीं आपले विचार मांडले. माझें असें मत होतें कीं, विलायतेंत राहाणाऱ्या हिंदी लोकांनीं लढाईमध्यें स्वतःचा वांटा उचलला पाहिजे. इंग्रज विद्यार्थ्यांनीं लढाईमध्यें भाग घेण्याचा आपला निश्चय जाहीर केला होता. हिंदी विद्यार्थ्यांनीं मागें राहून चालावयाचें नाहीं. या युक्तिवादाविरुद्धहि त्या सभेमध्यें पुष्कळ युक्तिवाद झाले. ‘ आपल्या व इंग्रजांच्या स्थितीमध्यें हत्तीघोड्याइतकें अंतर आहे. एक गुलाम, दुसरे सरदार. अशी स्थिति असतांना गुलाम धन्याच्या अडचणीच्या प्रसंगीं स्वेच्छापूर्वक धन्याला मदत कशी करूं शकणार? गुलामगिरींतून मुक्त होऊं इच्छिणाऱ्या गुलामाचें कर्तव्य धन्याच्या अडचणींचा स्वतःची मुक्तता मिळविण्यासाठीं फायदा घेणें हेंच नव्हे काय?’ हा युक्तिवाद त्या वेळीं मला

कसा पटावा ? दोघांच्या स्थितींतील भेद मला कळत नव्हता असें नव्हे ? परंतु मला आमची स्थिति निव्वळ गुलामगिरीची आहे असें वाटत नव्हतें. माझी अशी समजूत होती कीं, इंग्रजी राज्यपद्धतींत दोष होते, त्यापेक्षां कित्येक इंग्रज अंमलदारांमध्यें अधिक दोष होते; ते दोष आपण प्रेमानें दूर करूं शकूं. जर इंग्रजांमार्फत व त्यांच्या साह्यानें आपण आपली स्थिति सुधारण्याची इच्छा करीत असूं तर, आपण त्यांच्या अडचणीच्या वेळीं त्यांना मदत करूनच स्थिति सुधारून घेतली पाहिजे. राज्यपद्धति सदोष असली तरी आज जशी ती मला असह्य वाटते तशी त्या वेळीं वाटत नव्हती. पण ज्याप्रमाणें त्या पद्धतीवरील माझा विश्वास आज उडून गेलेला आहे, व त्यामुळें मी आज इंग्रजी सत्तेला मदत करणार नाहीं, त्याचप्रमाणें ज्यांचा तेव्हांहि राज्यपद्धतीवरूनच नव्हे तर अंमलदारांवरूनहि विश्वास उडून गेला होता, ते मदत करायला कसे तयार व्हावेत ?

प्रजेची मागणी जोरानें पुढें मांडून आपल्या स्थितीमध्यें सुधारणा करवून घेण्याबद्दल आग्रह धरण्याची हीच वेळ आहे, अशी त्यांची समजूत होती. उलट माझी समजूत अशी होती कीं, इंग्रजांच्या आपत्तीची वेळ ही आपल्या मागण्या करण्याची वेळ नव्हे; लढाई चालू असल्या मुदतींत आपल्या मागण्या तहकूब करणें यांतच शिष्टाचार व दीर्घदृष्टि दोन्ही आहेत. त्यामुळें मी माझा सल्ला कायम ठेवला आणि ज्यांना नांवें नोंदविणें असेल त्यांनीं नोंदवावीं असें सुचविलें. नोंदविलेल्या नांवांची संख्या भरपूर झाली. त्यांत बहुतेक सर्व प्रान्तांच्या व सर्व धर्मांच्या माणसांचीं नांवें होतीं.

या बाबतींत मीं लॉर्ड क्रू यांना पत्र लिहिलें, आणि हिंदी लोकांची मागणी स्वीकारली जावी यासाठीं जखमी शिपायांची शुश्रूषा करण्याचें शिक्षण घेण्याची आवश्यकता असेल तर तें घेण्याची इच्छा व तयारी व्यक्त केली. थोड्या वाटाघाटीनंतर लॉर्ड क्रू यांनीं हिंदी लोकांची मागणी स्वीकारली आणि आणीबाणीच्या वेळीं साम्राज्याला मदत करण्याच्या तयारीबद्दल आभारहि मानले.

नांवें देणारांनीं प्रसिद्ध डॉक्टर कॅटली यांच्या हाताखालीं जखमी लोकांची शुश्रूषा करण्याचें प्राथमिक शिक्षण घेण्यास सुरुवात केली. सहा आठवड्यांचा छोटा अभ्यासक्रम होता, पण त्यांत जखमी लोकांना प्राथमिक मदत देण्याच्या सर्व क्रिया शिकविण्यांत येत होत्या. आम्ही सुमारें ८० जण या मुद्दाम काढलेल्या वर्गांत सामील झालों. सहा आठवड्यांनंतर परीक्षा घेण्यांत आली. तींत एकच जण नापास झाला. पास झालेल्यांना आतां सरकारकडून कवाईत वगैरे शिकविण्याची व्यवस्था झाली. कवाईत शिकविण्याचें हें काम कर्नल बेकर यांजकडे सोंपविण्यांत आलें, व त्यांना या तुकडीचे सरदार नेमलें.

या वेळचा विलायतेंतील देखावा पाहाण्यालायक होता. लोक घाबरत

नव्हते, तर प्रत्येकजण आपापल्या शक्तीनुरूप लढाईमध्यें भाग घेण्यांत गुंतलेला होता. शक्तिवान् तरुणांनीं तर लढाईचें शिक्षण घेण्यास सुरुवात केली; पण अशक्त वृद्ध, स्त्रिया इत्यादींनीं काय करावें? त्यांची इच्छा असेल तर त्यांच्यासाठींसुद्धां काम होतेंच. ते लढाईमध्यें घायाळ होणाऱ्या सैनिकांसाठीं कपडे वगैरे कापण्या-शिवण्याच्या कामांत गुंतले. तिकडे स्त्रियांचा ' लाइसियम ' नांवाचा क्लब आहे. त्याच्या सभासदांनीं युद्धखात्याला लागणाऱ्या कपड्यांपैकीं होतील तेवढे तयार करण्याची जबाबदारी उचलली. सरोजिनीदेवी त्या क्लबच्या सभासद होत्या. त्यांनीं ह्या कामीं परिपूर्ण भाग घेतला. माझी त्यांच्याशीं ओळख याच वेळीं प्रथम झाली. त्यांनीं माझ्याकडे कापलेल्या कपड्यांचा ढीग आणून टाकला आणि त्यांपैकीं जितके स्वतः किंवा इतरांकडून शिवतां शिववितां येतील तेवढे शिवून आपल्या हवालीं करण्याबद्दल सांगितलें. मीं त्यांची इच्छा आनंदपूर्वक मान्य केली आणि जखमी लोकांच्या शुश्रूषेचें शिक्षण चालू असतां होतील तेवढे कपडे स्वतः शिवले व इतरांकडून शिववून घेतले.

●●●

## ३९
# धर्माचें कोडें

लढाईत काम करण्यासाठीं आम्हीं कांहींजणांनीं एकत्र मिळून आपलीं नांवें सरकारकडे पाठविलीं, ही बातमी दक्षिण आफ्रिकेला पोंचतांच तिकडून मला दोन तारा आल्या. एक तार पोलाकची होती. तींत विचारलें होतें, " तुमचें हें कार्य तुमच्या अहिंसा तत्त्वाच्या विरुद्ध नाहीं काय? "

अशा तऱ्हेची तार येणार असें कांहींसें मला वाटलेंच होतें. कारण कीं ह्या विषयाची मीं ' हिंद-स्वराज्या 'मध्यें चर्चा केली होती; आणि दक्षिण आफ्रिकेमध्यें तर या विषयाची चर्चा निरंतर होतच असे. युद्धाची नैतिक अनिष्टता आम्हां सर्वांस मान्य होती. मला मारहाण करणारावर फिर्याद करण्यास मीं कबूल नव्हतों. तर मग दोन राज्यांमध्यें लढाई सुरू झाली असतां, त्यांच्या परस्परगुणदोषांची मला माहितीहि नसतां, मीं त्यांत भाग कसा घ्यावा? बोअर युद्धामध्यें मी भाग घेतल्याचें मित्रांना माहीत होतेंच; तरी पण त्यांची अशी कल्पना होती कीं, त्यानंतर माझ्या विचारांत फेरफार झाले असावे.

खरें पाहातां ज्या विचारसरणीला अनुसरून मीं बोअर युद्धामध्यें पडलों

होतों त्याच विचारसरणीचा उपयोग या वेळींहि केला होता. युद्धामध्यें भाग घेणें याचा अहिंसा तत्त्वाशीं मेळ बसत नाहीं हें मला पूर्णपणें कळत होतें. पण कर्तव्याचें ज्ञान हें दिव्याच्या प्रकाशाप्रमाणें नेहमींच स्पष्ट नसतें. सत्याच्या पुजाऱ्याला अनेक वेळां गोतेहि खावे लागतात.

अहिंसा ही व्यापक वस्तु आहे. आपण हिंसेच्या वणव्याच्या मध्यभागीं सांपडलेले पामर प्राणी आहों. ' जीवो जीवस्य जीवनम् ' हें खोटें वचन नाहीं. मनुष्य एक क्षणभरहि बाह्य हिंसेशिवाय जगूं शकत नाहीं. पाणी पितां, बसतां, उठतां, सर्व क्रिया करतांना, इच्छा असो वा नसो, थोडी तरी हिंसा तो करीतच असतो. त्या हिंसेमधून सुटण्याचा तो महाप्रयास करीत असेल, त्याची भावना केवळ दयेचीच असेल, तो सूक्ष्मांत सूक्ष्म जंतूंचाहि नाश इच्छीत नसेल, आणि यथाशक्ति त्याला बचविण्याचाच प्रयत्न करीत असेल, तर तो अहिंसेचा पुजारी होय. त्याच्या हरएक कार्यामध्यें नेहमीं वाढता संयम राहील; त्याची करुणावृत्ति निरंतर वाढत जाईल. पण कांहीं झालें तरी कोणीहि देहधारी बाह्य हिंसेपासून सर्वथैव मुक्त होऊं शकत नाहीं.

आणखी असें कीं अहिंसेचा पायाच अद्वैतभावना आहे. आणि जर प्राणिमात्रच अभिन्न आहेत तर एकाच्या पापाच्या परिणाम दुसऱ्यावर होणारच; त्यामुळेंहि मनुष्य हिंसेपासून सर्वथैव मुक्त राहूं शकत नाहीं. समाजांत वावरणारा मनुष्य इच्छा नसतांहि समाजाच्या हिंसेंत भागीदार बनतोच. दोन प्रजांमध्यें जेव्हां युद्ध होतें, तेव्हां अहिंसा मान्य करणाऱ्या व्यक्तीचें कर्तव्य तें युद्ध थांबविण्याचें आहे. तें कर्तव्य जो करूं शकत नसेल, ज्याच्यामध्यें विरोध करण्याची शक्ति नसेल, ज्याला विरोध करण्याचा अधिकार प्राप्त झालेला नसेल, त्यानें लढाईच्या कामांत भाग घ्यावा; आणि भाग घेत असतांहि त्या कर्मांतून स्वतःला, स्वतःच्या देशाला, त्याचप्रमाणें जगाला सोडविण्याचा त्यानें मनःपूर्वक प्रयत्न करावा.

इंग्रजी राज्यामार्फत माझी, म्हणजे माझ्या देशबांधवांची, स्थिति सुधारण्याची माझी इच्छा होती. मी इंग्लंडांत राहात असतां इंग्लंडचें आरमारच माझें रक्षण करीत होतें. त्याच्या बळाचा अशा तऱ्हेनें फायदा घेत असल्यामुळें त्याच्यामध्यें असलेल्या हिंसकतेचा मी सरळच भागीदार होत होतों. अर्थात् जर मला त्या सत्तेशीं संबंध ठेवायचा असेल, त्या सत्तेच्या निशाणाखालीं राहायचें असेल, तर एक तर मीं युद्धाचा उघड उघड विरोध करून, जोंपर्यंत त्या सत्तेची युद्धनीति बदलणार नाहीं तोंपर्यंत, सत्याग्रहाच्या शास्त्राप्रमाणें तिच्यावर बहिष्कार घातला पाहिजे, किंवा त्या सत्तेचे जे कायदे मोडण्यासारखे असतील त्यांचा सविनय भंग करून तुरुंगाचा रस्ता पकडला पाहिजे. नाहींपेक्षां मीं तिच्या युद्धकार्यामध्यें भाग घेत राहूनच त्या कार्याचा विरोध करण्याची शक्ति व अधिकार

हीं मिळविलीं पाहिजेत. तेवढी शक्ति माझ्यामध्यें नव्हती; अर्थात् मला युद्धांत भाग घेण्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं असें मीं ठरविलें.

अहिंसेच्या दृष्टीनें हातांत बंदूक धरणारा व त्याला मदत करणारा यांच्यामध्यें भेद मला तरी दिसत नाहीं. जो मनुष्य लुटारूंच्या टोळीमध्यें त्यांची पडेल ती चाकरी करण्यासाठीं, त्यांचीं ओझीं उचलण्यासाठीं, ते लूट करीत असतील तेव्हां पहारा करण्यासाठीं, ते घायाळ झाल्यास त्यांची शुश्रूषा करण्यासाठीं राहातो तो लुटीबद्दल त्या लुटारूंइतकाच जबाबदार आहे. या दृष्टीनें विचार करतां लष्करांत जखमी लोकांची शुश्रूषा करण्यास जाणारा मनुष्य युद्धाच्या जबाबदारींतून मोकळा राहूं शकत नाहीं.

हा विचार मी पोलाकची तार येण्यापूर्वीच करून ठेवलेला होता. त्यांची तार आल्यानंतर मीं त्यासंबंधीं कांहीं मित्रांशीं चर्चा केली. युद्धामध्यें भाग घेणें मला कर्तव्य वाटत होतें, व आजहि विचार करतां मला वरील विचारसरणीमध्यें दोष दिसत नाहीं. ब्रिटिश साम्राज्याबाबत त्या वेळीं माझे जे विचार होते. त्यांना अनुसरून मीं युद्धांत भाग घेतला, त्यामुळें त्याबद्दल मला पश्चात्तापहि वाटत नाहीं.

मला माहीत आहे कीं, माझ्या वरील विचारांची सयुक्तिकता मी त्या वेळींहि सर्व मित्रांना पटवून देऊं शकलों नव्हतों. प्रश्न सूक्ष्म आहे; त्यांत मतभेदाला सवड आहे. म्हणूनच अहिंसा–धर्म मान्य करणाऱ्या व त्यांचें सूक्ष्म पालन करणाऱ्या मंडळींपुढें मीं माझा अभिप्राय शक्य तेवढा स्पष्टपणें मांडला आहे. सत्याबद्दल आग्रह राखणाऱ्या इसमानें केवळ रूढीला वश होऊनच कोणतेंहि कार्य करूं नये, त्यानें स्वतःच्या विचारांनाच हट्टानें चिकटून राहूं नये, आपले विचार चुकीचे असणेंहि शक्य आहे, ही जाणीव नित्य बाळगावी, आणि चुका लक्षांत येतांच येतील त्या अडचणी पत्करूनहि त्या कबूल कराव्या, व प्रायश्चित्तहि भोगावें.

• • •

## ४०

# सत्याग्रहाची चुणूक

अशा तऱ्हेनें कर्तव्य म्हणून मी युद्धांत पडलों खरा; पण त्यांत जातीनिशीं भाग घेण्याचें माझ्या नशिबीं नव्हतें, एवढेंच नव्हे तर असल्या नाजुक वेळींहि सत्याग्रह करण्याची पाळी आली.

आमचीं नांवें मंजूर होऊन नोंदलीं गेल्यानंतर आमची कवाईत पुरी करून घेण्यासाठीं एक अंमलदार नेमण्यांत आल्याचें मीं अगोदरच लिहिलें आहे. आमची सर्वांची समजूत अशी होती कीं, तो अंमलदार लढाईचें शिक्षण देण्यापुरताच आमचा अधिकारी होता. इतर सर्व बाबतींत तुकडीचा प्रमुख मी होतों. माझ्या जोडीदारांबद्दल मी जबाबदार होतों, व माझ्याबद्दल ते जबाबदार होते; म्हणजेच अंमलदारानें सर्व काम माझ्यामार्फतच चालवायचें अशी आमची समजूत होती. पण मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात त्याप्रमाणें अंमलदाराची नजर पहिल्याच दिवसापासून आम्हांला निराळीच दिसून आली. सोराबजी फार चतुर होते. त्यांनीं मला बजावलें, " भाई, पाहा, हा मनुष्य आपली सुलतानगिरी चालवूं पाहात आहे असें दिसतें. आम्हांला त्याची हुकमत नको. आम्ही त्याला शिक्षक समजतों. पण आणखीहि ते तरुण आलेले आहेत ना, तेहि आमच्यावर हुकूम चालवायलाच आलेले असावे असें दिसतें. " हे तरुण ऑक्स्फर्डचे विद्यार्थी होते, व शिकविण्यासाठीं आले होते. वरिष्ठ अंमलदारानें त्यांना आमचे दुय्यम अधिकारी नेमिले होते. सोराबजींनीं सांगितलें तें माझ्याहि ध्यानांत आलें होतें. मीं सोराबजींचें सान्त्वन केलें, व काळजी करूं नका असें सांगितलें. पण सोराबजींची समजूत चटकन् पडण्यासारखी नव्हती.

" तुम्ही भोळे आहां. हे लोक गोडगोड बोलून तुम्हांला फसवतील, आणि मागाहून तुमचे डोळे उघडले म्हणजे तुम्ही म्हणाल, ' चला सत्याग्रह करूं या '; आणि मग आम्हांला बळी द्याल. " सोराबजी हंसत म्हणाले.

मीं उत्तर दिलें, " माझ्या संगतींत तुम्हांला आत्माहुतीखेरीज दुसरें कधीं कांहीं अनुभवायला मिळालें आहे ? आणि सत्याग्रहीचा जन्मच फसवून घेण्यासाठींच नाहीं का ? म्हणून हा साहेब मला फसवील याची फिकीर करण्याचें कारण नाहीं. मीं तुम्हांला हजारों वेळां सांगितलें आहे ना, कीं अखेरीला फसविणाराच स्वतः फसत असतो ! "

सोराबजी खदखदां हंसत म्हणाले, " ठीक, फसतच चला तर मग; एकाद्या दिवशीं सत्याग्रहांत प्राणाला मुकाल आणि आपल्याबरोबर आमच्यासारख्यांना ओढून न्याल. "

या शब्दांचें स्मरण करतांच मरहूम मिस् हॉबहाऊसनीं असहकाराच्या वेळीं मला लिहिलेल्या वाक्याचें स्मरण होत आहे.

" सत्याखातर तुम्हांला एकादे दिवशीं फांसावर चढावें लागल्यास मला आश्चर्य वाटणार नाहीं. ईश्वर तुम्हांला सरळ मार्गानें नेवो व तुमचें रक्षण करो. "

सोराबजींबरोबरचें वरील संभाषण अंमलदार तख्तनशीन झाल्यानंतरच्या

आरंभींच्या काळांतच झालें होतें. आरंभ व अंत यांमधील अंतर थोड्याच दिवसांचें होतें. पण तेवढ्या मुदतींतच माझ्या फांसळ्यांत खूप दुखूं लागलें. चौदा दिवसांच्या उपवासानंतर शरीर परत भरून आलें नव्हतेंच. पण तशाच स्थितींत मीं कवाइतींत पुरेपूर भाग घेण्यास सुरुवात केली होती, आणि पुष्कळदां घरून कवायतीच्या जागेपर्यंत पायीं जात असें. तें अंतर दोन मैलांचें तरी होतेंच. यामुळें अखेरीस मला अंथरूण धरावें लागलें.

माझी ही अशी स्थिति असतांनाच आम्हांला कँपमध्यें जाणें पडलें. बाकीचे तेथेंच राहात, मी मात्र संध्याकाळीं परत घरीं येत असें. येथेंच सत्याग्रहाचा प्रसंग प्राप्त झाला.

अंमलदारानें स्वतःचा अंमल गाजविला. त्यानें स्पष्ट सांगून टाकलें कीं, सर्व बाबतींत मीच तुमचा अधिकारी आहें. स्वतःच्या अधिकाराचे चारदोन वस्तुपाठहि त्यानें आम्हांला शिकविले. सोराबजी माझ्यापाशीं येऊन थडकले. ते ही सुलतानगिरी सहन करण्यास तयार नव्हते. त्यांनीं सांगितलें, " सर्व हुकूम तुमच्यामार्फतच मिळाले पाहिजेत. सध्यां तर आपण शिक्षणाच्या छावणींत आहों. असें असतांहि रोज भलभलते हुकूम निघत आहेत. ते तरुण व आम्ही यांच्यामध्यें अनेक बाबतींत भेदभाव करण्यांत येतो. हें सहन होण्यासारखें नाहीं. याचा निकाल त्वरित झालाच पाहिजे. नाहींपेक्षां आपलें काम मोडून पडणार आहे. सर्व विद्यार्थी व इतर जे या कामांत सामील झाले आहेत, ते एकहि भलताच हुकूम सहन करावयाचे नाहींत. स्वाभिमानाच्या रक्षणार्थ हातीं घेतलेल्या कामांत पदोपदीं अपमानच सहन करावे लागावे हें चालणार नाहीं."

मी अंमलदाराकडे गेलों. माझ्याकडे आलेल्या सर्व तक्रारी त्यांच्यापाशीं तोंडीं सांगितल्या. त्यांनीं मला पत्र लिहून सर्व तक्रारी आपल्याला लेखी कळविण्यास सांगितलें, आणि त्याबरोबरच स्वतःच्या अधिकाराचा निर्देश केला. ते म्हणाले, " फिर्याद तुमच्यामार्फत होऊं शकणार नाहीं; ती दुय्यम अधिकाऱ्यामार्फत सरळ माझ्याकडे आली पाहिजे."

मीं जबाबादाखल म्हटलें, " मला अधिकार भोगायला नको आहे. लष्करी दृष्टीनें माझी सामान्य शिपायांतच गणना होईल. पण आमच्या तुकडीचा प्रमुख या नात्यानें तुम्ही मला त्यांचा प्रतिनिधि म्हणून स्वीकारलें पाहिजे." मीं माझ्याकडे आलेल्या तक्रारीहि कळविल्या व 'दुय्यम अधिकारी आमच्या तुकडीला विचारल्याशिवाय नेमण्यांत आले आहेत, व त्याच्यासंबंधीं फार असंतोष फैलावला आहे. यास्तव त्यांना बदलण्यांत यावें, व तुकडीला स्वतःचे अधिकारी निवडण्याचा अधिकार देण्यांत यावा' असें सुचविलें.

ही गोष्ट त्यांना पटेना. त्यांनीं मला सांगितलें कीं, अधिकारी तुकडीनें

निवडणें ही गोष्टच लष्करी नियमांच्या विरुद्ध आहे; आणि त्या अधिकाऱ्यांना दूर केल्यास आज्ञापालनाची नांवनिशाणीहि राहाणार नाहीं.

आम्हीं सभा भरविली. सत्याग्रहाचे गंभीर परिणाम सांगितले. बहुतेक सर्वांनीं सत्याग्रहाच्या शपथा घेतल्या. आमच्या सभेनें असा ठराव केला कीं, सध्यांच्या अधिकाऱ्यांना दूर करण्यांत आलें नाहीं, व तुकडीला नव्या अधिकाऱ्यांची निवड करण्यास मिळाली नाहीं तर, आमच्या तुकडीनें कवाइतीला व छावणीला जाणें बंद करावें.

मीं अधिकाऱ्याला एक पत्र लिहून माझी पूर्ण नापसंती व्यक्त केली, व हेंहि कळविलें कीं, माझा हेतु अधिकार भोगण्याचा नाहीं. मला तर सेवाच करावयाची आहे, व हें काम सांगोपांग पार पाडायचें आहे. मीं त्यांना हेंहि कळविलें कीं, बोअर युद्धामध्यें माझ्याकडे कमलाहि हुद्दा नव्हता, तरीहि कर्नल गेलवे व आमची तुकडी यांच्यामध्यें कधीं कसलाहि भांडणाचा प्रसंग आला नाहीं, व ते अंमलदार माझ्या तुकडीची इच्छा माझ्यामार्फत समजून घेऊन सर्व गोष्टी करीत असत. माझ्या पत्रासोबत आमच्या तुकडीनें केलेल्या ठरावाची एक नक्कलहि पाठविली.

अंमलदारावर त्याचा कांहीं एक परिणाम झाला नाहीं. त्यांना तर असेंच वाटत होतें कीं, आमच्या तुकडीनें सभा करून ठराव केला हाच लष्करी शिस्तीचा फार मोठा भंग होय.

त्यानंतर मीं हिंदी प्रधानांना एक पत्र लिहून सर्व हकीकत कळविली, व आमच्या सभेचा ठराव पाठविला.

हिंदी प्रधानांनीं उत्तरीं मला कळविलें कीं, दक्षिण आफ्रिकेंतील स्थिति निराळी होती. येथें तर तुकडीच्या वरिष्ठ अंमलदाराला हाताखालचे अधिकारी नेमण्याचा हक्क आहे. तरी पण यापुढें तो तुमची शिफारस लक्षांत घेत जाईल.

ह्यानंतर तर आमच्यामध्यें पुष्कळ पत्रव्यवहार झाला; पण सर्वच कटु अनुभव देऊन मी हें प्रकरण लांबवीत नाहीं.

पण एवढें मात्र सांगितल्याशिवाय चालणार नाहीं कीं, हिंदुस्थानांत आपल्याला प्रत्यहीं येतात त्याच मासल्याचे हे अनुभव होते. अंमलदारानें धाकदपटशा दाखवून व युक्तिप्रयुक्तीनें आमच्यांत फूट पाडली. कित्येकजण, त्यांनीं शपथा घेतल्या होत्या तरीहि, शक्तीला किंवा युक्तीला बळी पडले. इतक्यांतच नेटली हॉस्पिटलमध्यें कल्पनेपलीकडे जखमी शिपाई येऊन पडले, व त्यांच्या शुश्रूषेसाठीं आमच्या सबंध तुकडीची जरूरी पडली. अंमलदारानें फोडले होते तेवढे नेटलीला गेले, पण बाकीचे गेले नाहींत. हें इंडिया ऑफिसला रुचलें नाहीं. मीं तर अंथरुणाला

खिळलेला होतों, पण तुकडींतील मंडळींच्या भेटी होतच होत्या. मि. रॉबर्ट्सच्या व माझा चांगला परिचय झाला होता. ते मला समक्ष भेटायला आले व बाकीच्यांनाहि नेटलीला पाठविण्याबद्दल त्यांनीं आग्रह केला. त्यांनीं निराळी तुकडी म्हणून जावें अशी त्यांची सूचना होती. "नेटली हॉस्पिटलमध्यें तर त्या तुकडीला तेथील अधिकाऱ्याच्या हुकुमांत राहावयाचें आहे, त्यामुळें त्यांची मानहानि व्हायची नाहीं, सरकारला त्यांच्या जाण्यानें संतोष होईल; आणि मोठ्या प्रमाणांत येऊन पडलेल्या जखमी लोकांची शुश्रूषाहि होईल." मला व माझ्या जोडीदारांना ही सूचना आवडली, आणि राहिलेले विद्यार्थीहि नेटलीला गेले. मीच एकटा दांत चावीत अंथरुणांत पडून राहिलों.

●●●

## ४१

# गोखल्यांची उदारता

विलायतेमध्यें मला झालेल्या फांसळ्यांच्या दुखण्याची हकीकत मीं लिहिलीच आहे. तें दुखणें उमटलें त्या वेळीं गोखले इंग्लंडांत येऊन दाखल झाले होते. मी व कॅलनबॅक नेहमीं त्यांचेकडे जात असूं. संभाषण मुख्यतः युद्धासंबंधींच चाले. कॅलनबॅकना जर्मनीचा भूगोल तोंडपाठ होता आणि त्यांनीं यूरोपचा प्रवासहि खूप केलेला होता. त्यामुळें ते नकाशे काढून लढाईची ठिकाणें गोखल्यांना दाखवीत

मला जेव्हां दुखणें आलें तेव्हां तोहि एक चर्चेचा विषय होऊन बसला. माझे आहाराचे प्रयोग चालूच होते. त्या वेळेचा माझा आहार म्हणजे भुईमूग, कच्चीं व पिकीं केळीं, लिंबें, जितुनचें तेल, टोमॅटो, द्राक्षें वगैरेंचा असे. दूध, धान्य, कडदण वगैरे मी बिलकुल घेत नसें. माझी शुश्रूषा जीवराज मेहता करीत होते, त्यांनीं दुधाचा व धान्य खाण्याचा फार आग्रह केला. गोखल्यांच्यापर्यंत फिर्याद गेली. फलाहाराच्या माझ्या तरफदारीबद्दल त्यांना विशेष मान वाटत नव्हता. प्रकृति टिकविण्यासाठीं डॉक्टर सांगतील तें घ्यावें असा त्यांचा आग्रह होता.

गोखल्यांचा आग्रहाचा शब्द मोडणें माझ्या जिवावर आलें. त्यांनीं जेव्हां फारच आग्रह केला, तेव्हां मी विचारासाठीं चोवीस तासांची मुदत मागून घेतली आणि कॅलनबॅक व मी घरीं आलों. वाटेंतच माझें कर्तव्य काय याची त्यांच्याबरोबर चर्चा केली. माझ्या प्रयोगामध्यें ते माझे जोडीदार होते. प्रयोग त्यांनाहि आवडत होता. पण माझ्या प्रकृतीसाठीं मी तो सोडून देईन तर बरें असा त्यांचाहि

कल मला दिसला. अर्थात् माझें मीच काय तें अंतर्नादाचा कानोसा घेऊन ठरवायचें होतें.

सबंध रात्र विचारांत घालविली. प्रयोग अज्जी सोडून द्यावा तर अजून-पर्यंत हृदयाशीं सांठविलेले विचार धुळीस मिळत होते. त्या विचारांत मला कोठेंहि चूक दिसेना. गोखल्यांच्या प्रेमाखातर तत्त्वहानि कितीशी पत्करावी, किंवा शरीर-रक्षणासाठींहि असले प्रयोग कितीसे बाजूला सारावे हा प्रश्न होता. म्हणून मीं असा निश्चय केला कीं, त्या प्रयोगांपैकीं जेवढा भाग धार्मिक दृष्टीनें केलेला होता, तेवढ्याला चिकटून राहायचें व इतर सर्व बाबतींत डॉक्टर सांगतील तसें करायचें. दूध वर्ज्य करण्यामध्यें धर्मभावना मुख्य होती. कलकत्त्यामध्यें गाईम्हशीं-वर चालणारे अनन्वित प्रकार माझ्या नजरेसमोर मूर्तिमंत उभे होते. मांसा-प्रमाणेंच जनावरांचें दूधहि मनुष्याचें अन्न नव्हे ही गोष्टहि मला विचारांत घेतली पाहिजे होती. त्यामुळें दुधाच्या त्यागाला चिकटून राहायचेंच असा निश्चय करूनच मी सकाळीं उठलों. एवढ्या निश्चयानें माझें मन फार हलकें झालें. गोखल्यांची भीति वाटत होती; पण ते माझ्या निश्चयाला मान देतील असा विश्वास वाटत होता.

संध्याकाळीं आम्ही त्यांना नॅशनल लिबरल क्लबमध्यें भेटायला गेलों. त्यांनीं लगेच प्रश्न केला, " कसें काय ? डॉक्टरांचें सांगणें मान्य करण्याचा निश्चय केला ना ? "

मीं हळूच जबाब दिला, " मी सर्व कांहीं करीन, पण एका गोष्टीचा मात्र आपण आग्रह करूं नये. दूधदुभतें किंवा मांसाहार मात्र मी घेणार नाहीं. तें न घेतल्यामुळें शरीर गळून पडणार असेल तर त्याला पडूं देण्यामध्येंच धर्म आहे, असें मला तरी वाटतें. "

" हा अगदीं अखेरचा निर्णय का ? " गोखल्यांनीं विचारलें.

" मला वाटतें मला दुसरा कोणताच जबाब देतां येण्यासारखा नाहीं. तुम्हांला त्यापासून वाईट वाटलें हें मी जाणतों पण मला क्षमा करा. " मीं उत्तर दिलें.

गोखल्यांनीं कांहींसें दुःखानें परंतु अत्यंत प्रेमानें म्हटलें, " तुमचा निश्चय मला रुचत नाहीं. मला त्यांत धर्म दिसत नाहीं. पण यापुढें मी आग्रह करणार नाहीं. " असें म्हणून जीवराज मेहतांकडे वळून त्यांनीं सांगितलें, " आतां गांधींना सतावूं नका. ते सांगतात त्या मर्यादेंत राहून त्यांना जें देतां येईल तेवढेंच द्या. "

डॉक्टरांनीं आपली नाखुषी दर्शविली, पण त्यांचाहि नाइलाज झाला. मला मुगाचें पाणी घेण्याचा त्यांनीं सल्ला दिला. त्याला हिंगाची फोडणी देण्याची सूचना केली. मीं तसें करण्याचें कबूल केलें. एक-दोन दिवस तें अन्न घेतलें. त्यानें

तर माझें दुःख अधिकच वाढलें. मला तें मानवलें नाहीं. त्यामुळें मी परत फलाहारावर गेलों. डॉक्टरांनीं बाह्य उपचार चालविलेच होते. त्यामुळें अंमळ उतार वाटला. पण माझ्या नियमांमुळें ते पेंचांत पडत. मध्यंतरीं गोखल्यांना लंडनचें ऑक्टोबर–नोव्हेंबरमधील धुकें सहन होण्यासारखें नव्हतें, म्हणून ते हिंदुस्थानला जायला निघाले.

●●●

# ४२

# दुखण्यावर कोणता इलाज केला ?

फांसळ्यांतील दुःख दूर होईना, त्यामुळें मी विवंचनेंत पडलों. औषधोपचारानें नाहीं तर आहारांत फेरफार केल्यानें व कांहीं तरी बाह्य उपचारांनींच दुःख बंद होणार एवढें मला समजत होतें.

अन्नाहारी व आहारांत फेरफार करून रोग बरे करणारे असे जे डॉ. ॲलिनसन् त्यांना मी सन १८९० मध्यें भेटलों होतों. त्यांना मीं बोलाविलें. ते आले. त्यांच्याकडून शरीर तपासून घेतलें, आणि दूध घेण्याबद्दलच्या माझ्या नाखुशीबद्दलहि बोललों. त्यांनीं मला लगेच आश्वासन दिलें व म्हणाले, "दुधाची मुळींच जरूरी नाहीं. आणि माझ्या मनांतून तर तुम्हांला कांहीं दिवस कसल्याहि चरबीशिवायच ठेवायचें आहे." असें म्हणून त्यांनीं प्रथम तर मला सुकी रोटी व कच्ची भाजी यांवर व फळांवर राहाण्यास सांगितलें. कच्च्या भाजींत मुळे, कांदे किंवा तसलींच मुळें व पालेभाजी, आणि फळांमध्यें मुख्यतः नारिंगें असत. भाज्या खोवून किंवा वाटून खायच्या असत. मीं असें तीनएक दिवस केलें; पण कच्च्या भाज्या विशेषशा मानवल्या नाहींत. हा प्रयोग परिपूर्णपणें चालवण्याइतकें त्राण माझ्या शरीरांत नव्हतें; मनाची तेवढी धमकहि नव्हती. त्याखेरीज त्यांनीं चोवीसहि तास खिडक्या उघड्या ठेवण्यास, रोज कोमट पाण्यानें स्नान करण्यास, दुखणाऱ्या भागावर तेल चोळण्यास व पाव ते अर्धा तास मोकळ्या हवेंत फिरण्यासहि सांगितलें होतें. हें सर्व मला बरें वाटलें. घराला तर फ्रेंच पद्धतीच्या खिडक्या होत्या. त्या सबंध उघड्या ठेवाव्या तर पावसाचें पाणी आंत येई. वरचें तावदान उघडत नसे. त्यासाठीं त्याची सबंध कांच फोडून काढून त्यांतून तरी अष्टौप्रहर हवा येण्याची सोय केली. आंत झड मारूं नये एवढ्या बेतानें फ्रेंच खिडकी उघडी ठेवीत असें.

हें सर्व केल्यामुळें तब्येत कांहींशी सुधारली, साफ सुधारली नाहींच. मधून

मधून लेडी सिसिलिया रॉबर्टस् माझ्या समाचाराला येत. त्यांचा माझा चांगला परिचय होता. मला दूध घ्यायला लावण्याची त्यांना फार इच्छा होती. तें तर मला वर्ज्य. म्हणून दुधाचे गुणधर्म असलेल्या पदार्थांचा त्यांनीं शोध चालविला. त्यांच्या एका मित्रानें त्यांना ‘ माल्टेड मिल्क ’ दाखविलें, आणि त्यांनीं अजाणता मला सांगितलें कीं, ‘ त्यांत दुधाचा स्पर्शहि नाहीं, तर रासायनिक प्रयोगांनीं बनविलेली ती दुधाच्या गुणांनीं युक्त अशी एक भुकटी आहे. ’ लेडी रॉबर्टस्ना माझ्या धार्मिक भावनांबद्दल फार आदर वाटत असे, हें मला माहीत होतें. त्यामुळें मीं ती भुकटी पाण्यांत घालून प्यालों. मला त्याची चव दुधासारखीच लागली. कन्या देऊन कुल विचारण्याप्रमाणेंच मीं केलें. बाटलीवरील कागद वाचला, तेव्हां माहीत झालें कीं, ती तर दुधाचीच बनविलेली आहे. अर्थात् एकदांच घेतल्या-नंतर तिचा त्याग करावा लागला. लेडी रॉबर्टस्ना ही गोष्ट कळविली व तुम्ही बिलकुल चिंता करूं नये असें लिहिलें. त्या घाबऱ्या घाबऱ्या बिऱ्हार्डी आल्या व स्वतःची दिलगिरी प्रदर्शित केली. त्यांच्या मित्रानें बाटलीवरील कागद वाच-लेलाच नव्हता. मीं त्या भल्या बाईला आश्वासन दिलें आणि त्यांनीं एवढी तसदी घेऊन पैदा केलेल्या वस्तूचा उपयोग माझ्याकडून होण्यासारखा नाहीं याबद्दल माफी मागितली. अजाणता माझ्याकडून भुकटी घेतली गेली याबद्दल मला पश्चात्ताप वाटण्याचें किंवा प्रायश्चित्त करण्याचें प्रयोजन नाहीं हेंहि सांगितलें.

लेडी रॉबर्टस्संबंधींचीं आणखीहि मधुर स्मरणें आहेत तीं मी सोडून देऊं इच्छितों. अशीं कितीकांचीं तरी स्मरणें आहेत कीं ज्यांचा महान् आश्रय मला अनेक विपत्तींच्या व विरोधांच्या प्रसंगीं मिळूं शकला आहे. असल्या दाखल्यां-वरून श्रद्धाळू मनुष्य एवढेंच ठरवितो कीं, ईश्वर दुःखरूपी कडवीं औषधें देतो, त्यांच्याबरोबरच मैत्रीचीं गोड अनुपानेंहि द्यायला चुकत नाहीं.

डॉक्टर ॲलिनसन्नीं दुसऱ्या भेटींत अधिक सूट दिली, आणि चरबी-साठीं सुक्या मेव्याचें म्हणजे भुईमुगासारख्याचें लोणी आणि जितुनचें तेल प्यायला सांगितलें. कच्च्या भाज्या आवडत नसल्यास त्या शिजवून भाताबरोबर घेण्यास सांगितलें. ही सुधारणा मला अधिक मानवली.

पण दुखणें साफ नाहींसें झालें नाहीं; काळजी घ्यायला पाहिजेच होती. अंथरूण सुटलें नाहींच. डॉ. मेहता वरचेवर येऊन तपासून जातच असत. ‘ मी सांगतों तसें कराल तर आतां तुम्हांला बरें करतों. ’ हें पालुपद नेहमीं त्यांच्या तोंडीं असायचेंच.

असें चालत असतां मि. रॉबर्टस् एके दिवशीं माझ्याकडे आले, व त्यांनीं मला स्वदेशीं जाण्याचा आग्रह केला. “ या स्थितींत तुमचें नेटलीला कधींच जाणें होणार नाहीं. कडाक्याची थंडी तर अजून पुढेंच पडायची आहे. माझा तर खास

आग्रह आहे कीं तुम्ही स्वदेशीं चला, आणि तेथें बरे व्हा. तोंपर्यंत लढाई चालू असली तर मदत करण्याचे अनेक प्रसंग तुम्हांला मिळतीलच, नाहीं तर तुम्ही येथें केलेंत तेंहि कांहीं कमी नव्हे, असें मला तरी वाटतें."

मीं ही सल्ला मान्य करून स्वदेशीं येण्याची तयारी केली.



# ४३
# निघालों

मि. कॅलनबॅक हिंदुस्थानला येण्याच्या निश्चयानें आमच्याबरोबर निघाले होते. विलायतेंत आम्ही एकत्रच राहात असूं. पण युद्धाच्या पायीं जर्मन लोकांवर फार करडी नजर असे. त्यामुळें कॅलनबॅक माझ्याबरोबर येऊं शकतील कीं नाहीं याबद्दल आम्हां सर्वांनाच शंका वाटत होती. त्यांच्यासाठीं खास पास मिळविण्याचा खूप प्रयत्न केला. मि. रॉबर्टस् स्वतः त्यांना पास मिळवून द्यायला राजी होते. त्यांनीं संपूर्ण हकीकतीची तार व्हाइसरॉयना केली. पण लॉर्ड हार्डिंजचा सीधा व झटकन् जबाब आला, 'आम्ही दिलगीर आहों. आजच्या स्थितींत असलें कसलेंहि जोखीम घेण्याची आमची तयारी नाहीं.' या जबाबाची सयुक्तिकता आम्हां सर्वांस दिसतच होती. कॅलनबॅकच्या वियोगाचें दुःख मला तर झालेंच, पण माझ्यापेक्षांहि त्यांना तें अधिक झालें, असें मला दिसलें. ते हिंदुस्थानला येऊं शकले असते, तर आज एक छानदार शेतकऱ्याचें व विणकराचें जीवन व्यतीत करीत असते. आतां ते दक्षिण आफ्रिकेंत आपलें मूळच्या पद्धतीचें जीवन व्यतीत करीत आहेत, व एंजीनियरचा धंदा जोरांत चालवीत आहेत.

आम्हीं तिसऱ्या वर्गाचीं तिकिटें मिळविण्याचा प्रयत्न केला, पण पी. अँण्ड ओ. च्या आगबोटींत तिसऱ्या वर्गाचें तिकीट मिळेना म्हणून दुसऱ्या वर्गाचीं काढावीं लागलीं. दक्षिण आफ्रिकेहूनच बरोबर आणलेला थोडासा फलाहार, जो बोटीवर मिळण्यासारखा नव्हता, तो बरोबर घेतला होता. इतर फराळ आगबोटी-वर मिळण्यासारखा होता.

डॉ. मेहतांनीं शरीर मीड्स् प्लास्टरच्या पट्टीनें बांधून काढलें होतें; आणि ती पट्टी तशीच्या तशीच ठेवण्यास सांगितलें होतें. मीं तें दोन दिवस तर सहन केलें, पण अधिक वेळ सहन होईना. म्हणून बरीचशी मेहनत करून ती पट्टी सोडवून काढली आणि स्नान करण्याची सवलत घेतली. आहार मुख्यतः सुक्या

व ताज्या फळांचाच करून टाकला. तब्येत दिवसेंदिवस सुधारत चालली, आणि सुएझच्या कालव्यापर्यंत पोंचेतों पुष्कळच चांगली झाली. अशक्तता राहिली होती; पण मला भीति वाटत होती ती दूर झाली, आणि मी रोज व्यायाम थोड-थोडा वाढवीत गेलों. ही जी सुधारणा झाली ती शुद्ध व समशीतोष्ण हवेमुळेंच असें मीं ठरविलें.

पूर्वीच्या अनुभवामुळें किंवा आणखी अन्यहि कारण असेल, पण इंग्रज उतारू व आम्ही यांच्यामध्यें जें अंतर मला येथें दिसून आलें तें दक्षिण आफ्रिकेहून येतांनाहि दिसलें नव्हतें. तेथेंहि अंतर तर होतेंच, पण येथें तें तिथच्याहून निराळ्याच प्रकारचें दिसलें. एकाद-दुसऱ्या इंग्रजाबरोबर बोलणें होई, पण तें ' साहेब, सलाम ' पुरतेंच. हृदयाची भेट होत नसे. दक्षिण आफ्रिकेच्या बोटींत काय किंवा दक्षिण आफ्रिकेंत काय हृदयाच्या भेटी होऊं शकल्या होत्या. असल्या भेदाचें कारण मला तरी हेंच दिसलें कीं, इंग्रजांच्या मतें मी राज्यकर्ता आहें आणि हिंदी माणसाच्या मतें मी परक्या सत्तेखालीं आहें. ह्या जाणिवेचा परिणाम मग तो लक्षांत येवो किंवा न येवो, व्हायचा तो होतच होता.

असल्या वातावरणांतून सुटून स्वदेशीं पोंचण्यास मी आतुर झालों होतों. एडनला पोंचतांच कांहींसें घरीं आल्यासारखें वाटलें. दक्षिण आफ्रिकेंत असतांनाच एडनच्या मंडळींबरोबर आमचा चांगला संबंध जुळला होता; कारण कीं, भाई कैकोबाद कावसजी दिनशा डरबनला येऊन गेले होते. त्यांच्याशीं व त्यांच्या पत्नीशीं माझा चांगला परिचय झालेला होता. थोडक्याच दिवसांत आम्ही मुंबईला पोंचलों. १९०५ सालींच परत स्वदेशीं येण्याची अपेक्षा होती, त्या ठिकाणीं दहा वर्षांनीं परत येऊं शकलों, त्यामुळें मला फार आनंद झाला. मुंबईत गोखल्यांनीं सभा संमेलनादिकांची व्यवस्था करून ठेवलीच होती. त्यांची तब्येत फार नाजुक होती. तरीहि ते मुंबईला आले होते. त्यांची भेट घेऊन, त्यांच्या जीवनामध्यें समाविष्ट होऊन, माझ्या डोक्यावरील भार खालीं उतरवून देण्याचा बेत करून मी मुंबईला आलों होतों. पण विधात्यानें निराळाच योगायोग रचून ठेवला होता.

● ● ●

# ४४

# वकिलीसंबंधींचीं कांहीं स्मरणें

हिंदुस्थानांत आल्यानंतर माझ्या जीवनाला कशीं वळणें मिळालीं त्याच्या वर्णनावर येण्यापूर्वी मीं जाणूनबुजूनच सोडून दिलेल्या कांहीं भागांपैकीं थोडासा येथें देण्याची जरूरी भासत आहे. कित्येक मित्रांनीं वकिलीच्या वेळच्या किंवा वकील या नात्यानें आलेल्या अनुभवांची मागणी केली आहे. हीं स्मरणें इतकीं कांहीं आहेत कीं, उतरीत बसल्यास त्यांचेंच एक पुस्तक होऊन जाईल. असलीं वर्णनें मीं कल्पिलेल्या मर्यादेबाहेर पडतात. पण कित्येक जीं सत्यासंबंधींच आहेत, तीं देणें कदाचित् अनुचित म्हणतां येणार नाहीं.

मला आठवतें त्याप्रमाणें मीं हें तर पूर्वी दर्शाविलेंच आहे कीं, वकिलीच्या धंद्यांत मीं कधीं असत्याचा आश्रय केलेला नाहीं; आणि वकिलीचाहि मोठा भाग केवळ सेवेसाठींच अर्पिलेला होता, व त्याच्याबद्दल मी खर्चापलीकडे कांहींहि घेत नसें. कित्येक वेळां खर्चहि स्वत: करीत असें. माझी समजूत होती कीं, या बाबतींत एवढें विधान केलें म्हणजे बस्स झालें. पण मित्रांची मागणी याहून अधिक आहे. त्यांना वाटतें कीं सत्यपालनाच्या प्रसंगांचें मीं साधारणपणें जरी वर्णन केलें, तरी वकिलांना त्यांतून कांहीं तरी जाणण्यालायक मिळेल.

वकिलीच्या धंद्यांत खोटें बोलल्याशिवाय चालायचेंच नाहीं, असें मी विद्यार्थिदशेंत असतांनाहि ऐकत असें. मला तर खोटें बोलून प्रतिष्ठाहि मिळवायची नव्हती, किंवा धनहि कमवायचें नव्हतें. त्यामुळें त्या गोष्टीचा माझ्या मनावर परिणाम होत नसे.

दक्षिण आफ्रिकेमध्यें याची कसोटी अनेकवार झाली. मला कळत असे कीं प्रतिपक्षाचे साक्षीदार पढविलेले आहेत, आणि मीं अशिलांना किंवा साक्षीदारांना खोटें बोलण्यास यत्किंचित् उत्तेजन दिलें तरी माझ्या अशिलांचा जय होईल. पण मी नेहमींच हा मोह बाजूला सारीत असें. मला फक्त एकच असा प्रसंग आठवतो कीं जेव्हां अशिलाचा खटला जिंकल्यानंतर मला शंका आली कीं, अशिलानें मला फसविलें असावें. माझ्या मनांतहि नेहमीं असेंच असे कीं, अशिलाचा पक्ष जर खरा असेल तर त्याचा जय व्हावा, आणि खोटा असेल तर पराजय व्हावा. फी घेते वेळीं फीचा दर कधींहि जयापजयानुसार नक्की केल्याचें मला स्मरत नाहीं. अशील हरो किंवा जिंको, मी तर नेहमीं मेहनतानाच घेत असें. जय झाला तरीहि तेवढ्याचीच अपेक्षा असे. अशिलाला सुरुवातीलाच सांगून टाकीत असें कीं, "तुमचा पक्ष खोटा असेल तर माझ्याकडे येऊंच नका. साक्षीदाराला

पढविण्याचें काम माझ्याकडून घडेल अशी कधींहि आशा बाळगूं नका. " शेवटीं माझा लौकिक असा पसरला कीं खोटे खटले माझ्यापाशीं येतच ना. असले अशीलहि माझ्यापाशीं होते कीं जे आपले चोख खटले माझ्यापाशीं आणीत आणि किंचितसाहि गदूळपणा असेल तर ते इतर वकिलांकडे घेऊन जात.

एक प्रसंग असा आला कीं जेव्हां माझी फार सक्त परीक्षा झाली. माझ्या उत्तमांत उत्तम अशिलांपैकीं एकाचा हा खटला होता. त्यांत जमाखर्चाच्या पुष्कळ भानगडी होत्या. खटला फार लांब काळपर्यंत चालला होता. त्याचे कांहीं कांहीं भाग अनेक निरनिराळ्या कोर्टांत गेले होते. शेवटीं कोर्टानें एक जमाखर्चांतील तज्ज्ञ पंच म्हणून नेमला व हिशेबाचा भाग त्याच्याकडे सोंपविण्यांत आला. पंचाचा ठराव परिपूर्णपणें माझ्या अशिलाच्या तर्फेचा होता. पण त्याच्या हिशेबांत एक बारीकशीच पण महत्त्वाची चूक राहून गेली होती. जमा व खर्च यांच्या बाजू पंचाच्या नजरचुकीनें उलटया मांडल्या गेल्या होत्या. विरुद्ध पक्षानें पंचाचा ठराव रद्द करण्याबद्दल कोर्टाकडे अर्ज केला. अशिलातर्फे मी दुय्यम वकील होतों. पंचाची चूक थोरल्या वकिलांच्या ध्यानांत आली होती, पण त्यांच्या मतें पंचाची चूक कबूल करायला पक्षकार बांधलेला नाहीं. आपल्याविरुद्ध असलेली हकीकत कबूल करायला कोणताच वकील बांधलेला नाहीं, असा त्याचा स्पष्ट अभिप्राय होता. मीं म्हटलें, " या खटल्यांत राहून गेलेली चूक कबूल केलीच पाहिजे. "

थोरले वकील म्हणाले, " तसें केल्यास कोर्ट सबंध ठराव रद्द करील असाहि पूर्ण संभव आहे; आणि कोणताहि शहाणा वकील आपल्या पक्षकाराला असल्या धोक्यांत घालणार नाहीं. मी तरी हा धोका घ्यायला कधींच तयार होणार नाहीं. खटला सबंध उलटला तर अशिलाला किती तरी खर्चांत पडावें लागेल आणि एवढें करूनहि अखेर निकाल काय होईल तें तरी कोणीं सांगावें ? "

या संभाषणाचे वेळीं अशील हजर होते. मीं म्हटलें, " अशिलांनीं व आपण दोघांनींहि असले धोके पत्करले पाहिजेतच. आम्हीं कबुली दिली नाहीं म्हणून तरी कोर्ट चुकीचा ठराव चूक लक्षांत आल्यानंतर कायम राखीलच याची तरी खात्री कोठें आहे ? आणि चूक सुधारीत असतां अशिलाला नुकसान झालें तर त्यांत हरकत वाटण्याजोगें काय आहे ? "

" पण आम्ही चूक कबूल करूं तर ना ? " थोरले वकील म्हणाले.

" आम्ही नाहीं कबूल केली म्हणून कोर्टाला ती सांपडणार नाहीं किंवा विरुद्ध पक्ष ती शोधून काढणार नाहीं अशी तरी खात्री कोठें आहे ? " मीं जबाब दिला.

" तर मग या खटल्यांत तुम्ही तक्रारी कराल ? चूक कबूल करण्याच्या अटीवर मी त्यांत हजर राहायला तयार नाहीं. " बडे वकील दृढतापूर्वक म्हणाले.

मीं नम्रपणें म्हटलें, " तुम्ही उभे राहाणारच नसाल तर मग, अशिलांची तशी इच्छा असल्यास, मी उभा राहाण्यास तयार आहें. चूक कबूल करायची नसेल तर माझ्याकडून या खटल्यांत काम होणें अशक्य दिसतें. "

एवढें बोलून मी अशिलांकडे पाहिलें. ते कांहींसे पेंचांत पडले. खटल्यामध्यें मी सुरुवातीपासूनच होतों. अशिलाचा माझ्यावर पूर्ण विश्वास होता. माझा स्वभाव ते पूर्णपणें जाणत होते. त्यांनीं सांगितलें, " बरे तर, तुम्हीच कोर्टांत उभे राहा. चूक कबूल करा. नशिबीं हरण्याचे असलें तर हरूं. सत्याचा वाली ईश्वर तर आहेच ना ? "

मला बरें वाटलें. याहून अन्य जबाब मिळेल अशी माझी अपेक्षाहि नव्हती. थोरल्या वकिलांनीं मला पुन्हां बजावलें, व माझ्या 'हट्टा'बद्दल माझी कींव केली आणि धन्यवादहि दिला.

कोर्टांत काय घडलें तें पुढें पाहूं.

●●●

## ४५

# ठ क बा जी ?

मीं दिलेला सल्लाच योग्य होता याबद्दल मला बिलकुल शंका नव्हती. तो खटला योग्य तऱ्हेनें चालविण्याची लायकी माझ्यामध्यें आहे कीं नाहीं, याबद्दल मात्र मला भरपूर शंका वाटत होती. असला जबाबदारीचा खटला माझ्यासारख्यानें वरिष्ठ कोर्टांत चालविणें मला फार जोखमीचें वाटलें. त्यामुळें मनांत भीतभीतच मी न्यायाधीशांपुढें उभा राहिलों. त्या चुकीचा उल्लेख होतां क्षणींच एक न्यायाधीश उसळून बोलले,

" ही ठकबाजी म्हणतां येईल, नाहीं का ? "

मी तांबडापिंवळा होऊन गेलों. जेथें फसवणुकीचा लवलेशहि नाहीं तेथें ठकबाजीची शंका घेण्यांत यावी हें मला असह्य झालें. " सुरुवातीलाच जेथें न्यायाधीशाचा ग्रह भलताच झाला आहे तेथें असला बिकट खटला कसा जिंकतां यावा ? " असा मीं मनाशीं विचार केला.

स्वतःचा क्रोध दाबला आणि शान्त होऊन मीं जबाब दिला,

" पुरी हकीकत ऐकून घेण्यापूर्वींच तुम्ही ठकबाजीचा आरोप लादतां याचें मला आश्चर्य वाटतें ! "

" मी आरोप करीत नाहीं, फक्त शंका उपस्थित केली. " न्यायाधीश म्हणाले.

" आपली शंका मला आरोपासारखी वाटते. मी आपली हकीकत समजावून देतों. त्याउपर शंकेला जागा राहील, तर आपण खुशाल शंका घ्या. " मीं उत्तर दिलें.

" तुम्हांला मध्येंच अटकावल्याबद्दल मला दिलगिरी वाटते. तुमचा खुलासा समजावून सांगा. " न्यायाधीश शान्त होऊन म्हणाले.

खुलाशासाठीं माझ्यापाशीं भरपूर सामग्री होतीच. सुरुवातीलाच शंका निघाली व न्यायाधीशांचें लक्ष मी माझ्या म्हणण्याकडे आकर्षू शकलों. त्यामुळें मलाहि हिंमत आली व मीं समग्र हकीकत समजावून दिली. न्यायाधीशांनीं ती शान्तपणें ऐकिली, व त्यांच्या लक्षांत आलें कीं, दोष नजरचुकीनेंच झालेला आहे; आणि खूप मेहनत करून तयार केलेला हिशेब रद्द करणेंहि त्यांना बरें वाटलें नाहीं.

विरुद्ध पक्षाच्या वकिलास खात्रीच वाटत होती कीं चूक कबूल केली गेल्यानंतर त्यांना विशेष बोलावयाचें राहाणार नाहीं. पण असल्या स्पष्ट व सुधारतां येण्यासारख्या बाबीवर पंचाचा ठराव रद्द करायला न्यायाधीश कबूल होत ना. विरुद्ध पक्षाच्या वकिलानें खूप डोकेफोड केली; पण ज्या न्यायाधीशानें शंका घेतली होती, तोच माझ्या बाजूचा बनला होता.

" मि. गांधींनीं चूक कबूलच केली नसती तर तुम्ही काय करणार होतां ? " न्यायाधीश म्हणाले.

" हिशेबाच्या ज्या तज्ज्ञाला आम्हीं नेमला त्याहून अधिक वाकबगार किंवा प्रामाणिक तज्ज्ञ आम्हीं कोठून आणावा ? " विरुद्ध वकील म्हणाले.

" तुमच्या खटल्याची तुम्हांला सांगोपांग माहिती आहे असें आम्हांला धरून चाललेंच पाहिजे. कोणत्याहि हिशेबनिसाच्या हातून घडण्याचा संभव आहे अशा चुकीपलीकडे इतर चुका जर तुम्ही दाखवून देऊं शकत नसाल तर कायद्यांतील बारीकशा फटीच्या जोरावर दोन्ही पक्षांना पहिल्यापासून खर्चांत ढकलायला कोर्ट तयार होणार नाहीं. आणि कोर्टानें हा खटला पुन्हां पहिल्यापासूनच ऐकावा असें तुम्ही म्हणत असाल तर तेंहि होण्याजोगें नाहीं. "

या व असल्याच युक्तिवादांनीं वकिलाला गप्प करून व पंचाला चुका सुधारून, किंवा ही एवढी चूक सुधारून, ठराव परत पाठविण्यास हुकूम करून, तो सुधारलेला ठराव न्यायाधीशांनीं मान्य करण्याचें ठरविलें.

माझ्या हर्षाला सीमा राहिली नाहीं. पक्षकार व थोरले वकील खूष झाले, आणि वकिलीच्या धंद्यांतहि सत्याला जागून काम होऊं शकतें ही माझी समजूत दृढ झाली.

मात्र वाचकानें एवढें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं धंदा म्हणून वकिली करणें हेंच मुळांत अयोग्य आहे, सत्याच्या पालनानें त्या मूलभूत दोषांचें निराकरण होऊं शकत नाहीं.



## ४६

# पक्षकार सहकारी बनले

नाताळ व ट्रान्सवाल येथील वकिलीमध्यें असा फरक होता कीं नाताळमध्यें ॲडव्होकेट व ॲटर्नी असा भेद असला तरी दोघेहि सर्व कोर्टांत समानपणें वकिली करूं शकत; तर ट्रान्सवालमध्यें मुंबईसारखा भेद होता. तेथें पक्षकाराबरोबरचा सर्व व्यवहार ॲडव्होकेटनें ॲटर्नीमार्फतच केला पाहिजे होता. बॅरिस्टर झालेल्या इसमाला ॲडव्होकेट किंवा ॲटर्नी यांपैकीं एकाचीच सनद काढतां येई व मग त्याला तेवढाच धंदा करतां येई. नाताळमध्यें मीं ॲडव्होकेटची सनद घेतली होती व ट्रान्सवालमध्यें ॲटर्नीची. ॲडव्होकेट या नात्यानें माझा हिंदी लोकांशीं प्रत्यक्ष संबंध येऊं शकला नसता, आणि गोरे ॲटर्नी मला कामें देतील अशा तऱ्हेचें वातावरण दक्षिण आफ्रिकेमध्यें नव्हतें.

ट्रान्सवालमध्यें अशा तऱ्हेची वकिली करीत असतांना मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांतहि मला पुष्कळदां जातां येत असे. असें करीत असतां एक प्रसंग असा आला कीं, खटला चालू असतांनाच माझ्या ध्यानांत आलें कीं, माझ्या अशिलानें मला फसविलें आहे. त्याचा पक्ष खोटा आहे. पिंजऱ्यांत उभा राहून उत्तरें देत असतां तो लटपटूं लागला. त्यावरून मी मॅजिस्ट्रेटला माझ्या पक्षकाराविरुद्ध निकाल देण्यास सांगून खालीं बसलों. प्रतिपक्षाचा वकील आश्चर्यचकित झाला. मॅजिस्ट्रेट खूष झाला. पक्षकाराला मीं दोष दिला. मी खोडसाळ फिर्यादी घेत नाहीं हें त्याला माहीत होतें; त्यानें ती गोष्ट कबूल केली. मी विरुद्ध निकाल मागितला याबद्दल त्याला राग आला नाहीं असें मला वाटतें. कांहीं झालें तरी या वेळच्या माझ्या वर्तनाचा माझ्या धंद्यावर कसलाच वाईट परिणाम झाला नाहीं, आणि कोर्टांत माझें काम सरळ झालें. मला असेंहि दिसून आलें कीं, माझ्या या सत्य-

निष्ठेमुळें वकीलबंधूंमध्येंहि माझी प्रतिष्ठा वाढली; आणि परिस्थिति विचित्र असतांहि त्यांपैकीं कित्येकांचें प्रेम मी संपादन करूं शकलों होतों.

वकिली करीत असतेवेळीं मीं अशीहि आणखी एक संवय पाडली होती कीं माझें अज्ञान मी अशिलापासूनहि लपवून ठेवीत नसें किंवा वकिलांपासूनहि लपवीत नसें. जेथें म्हणून माझी मति चालेनाशी होई तेथें मी अशिलांना इतर वकिलांकडे जायला सांगत असें किंवा मला ठेवायचाच असल्यास अधिक अनुभवी वकिलाचा सल्ला घेऊन काम चालवायला सांगत असें. या प्रांजलपणामुळें मी अशिलांचें अगाध प्रेम व विश्वास संपादूं शकलों. मोठ्या वकिलाकडे जाण्यासाटीं जी फी द्यावी लागे तिचे पैसेहि ते स्वखुषीनें देत असत.

या विश्वासाचा व प्रेमाचा सार्वजनिक कार्यामध्यें मला परिपूर्ण उपयोग झाला.

मागील प्रकरणांत मीं सांगितलेंच आहे कीं दक्षिण आफ्रिकेमध्यें वकिली करण्यांत हेतु केवळ लोकसेवा हाच होता. या सेवेसाठींहि मला लोकांचा विश्वास संपादन करणें आवश्यक होतें. थोर मनाच्या हिंदी बांधवांनीं मी पैसे घेऊन केलेल्या वकिलीलाहि सेवा म्हणूनच मानली; आणि मीं जेव्हां त्यांना त्यांच्या हक्कासाठीं तुरुंगवासाचीं दुःखें सहन करण्याचा सल्ला दिला, तेव्हां त्यांच्यापैकीं अनेकांनीं तो सल्ला ज्ञानपूर्वक मान्य करण्यापेक्षां माझ्यावरील त्यांच्या श्रद्धेमुळेंच व माझ्यावरील त्यांच्या प्रेमाला वश होऊनच मान्य केला.

हें लिहीत असतां वकिलीसंबंधींचीं असलींच अनेक मधुर स्मरणें माझ्या लेखणींतून उतरूं पाहात आहेत. शेंकडों लोक पक्षकार होते. त्याऐवजीं मित्र झाले, सार्वजनिक सेवेमध्यें माझे सच्चे जोडीदार बनले, आणि माझ्या खडतर जीवनाला त्यांनीं रसमय करून सोडलें.

• • •

## ४७

# अशील तुरुंगापासून कसा बचावला ?

या प्रकरणांच्या वाचकांना पारसी रुस्तमजींचें नांव तर चांगलें परिचित आहेच. पारसी रुस्तमजी हे एकाच वेळीं माझे अशील व सहकारीहि होते. किंवा त्यांच्यासंबंधीं असेंहि म्हणतां येईल कीं, ते प्रथम सहकारी बनले व नंतर अशील. त्यांचा विश्वास मीं येथपर्यंत संपादन केला होता कीं आपल्या खासगी गृहव्यवहारांतहि ते माझा सल्ला घेत व त्याप्रमाणें वागत. त्यांना दुखणें आलें तरीहि

त्यांना माझ्याच सल्ल्याची जरूरी भासे. आणि आमच्या राहाणीमध्यें फारच भिन्नता होती, तरीहि ते स्वतःवर माझे उपचारच करीत असत.

या मित्रावर एकदां मोठी आपत्ति ओढवली, ते मजजवळ स्वतःच्या व्यवहारासंबंधींहि पुष्कळ गोष्टी सांगत असत; पण एक गोष्ट त्यांनीं माझ्यापासून लपवून ठेवली होती. पारसी रुस्तमजी जकातीची चोरी करीत असत. मुंबई-कलकत्त्याहून माल मागवीत त्या बाबतींत ही चोरी होत असे. सर्व अंमलदारांशीं त्यांचें बरें असे, त्यामुळें त्यांच्याविषयीं कोणी शंका घेत ना. ते जे आंकडे हजर करीत, त्यावर जकातीची आकारणी होत असे. असेहि कांहीं अंमलदार असावे कीं जे त्यांच्या चोरीकडे डोळेझांक करीत असतील.

पण अखाचें वचन तें काय खोटें ठरेल ?— *‘ काचो पारो खावो अन्न, तेवुं छे चोरीनुं धन. ’ पारसी रुस्तमजींची चोरी पकडली गेली. ते माझ्याकडे धांवून आले. डोळ्यांतून अश्रू गळत आहेत असे पारसी म्हणतात, “ भाई, मीं तुम्हांला फसवलें आहे. माझें पाप आज उघडकीला आलें. मीं जकातीची चोरी केली आहे. आतां माझ्या नशिबीं तुरुंगच लिहिलेला आहे. आणि माझी राख-रांगोळी होणार. या संकटांतून तुम्हीच एक मला बचावूं शकाल. मी तुमच्या-पासून कांहीं एक लपवीत नसतों; पण व्यापारांतील चोरीबाबत तुम्हांला काय सांगायचें असें म्हणून एवढी चोरी लपविली होती. आतां पस्तावतों आहें ? ”

मीं धीर देऊन म्हटलें, “ माझी रीत तुम्हांला माहीतच आहे. सोडविणें न सोडविणें ईश्वराच्या हातीं आहे; गुन्हा कबूल करून सोडवितां येईल तरच मी सोडवूं शकणार. ”

त्या भल्या पारशाचें तोंड उतरलें.

“ पण मीं तुमच्यापाशीं कबूल केलें एवढ्यानें भागणार नाहीं ? ” शेठ रुस्तमजी म्हणाले.

“ गुन्हा तर तुम्ही सरकारचा केला. माझ्यापाशीं कबूल करून काय होणार ? ” मीं हलक्या आवाजांत जबाब दिला.

“ मला शेवटीं करायचें आहे तुम्ही सांगाल त्याचप्रमाणें. पण माझे जुने वकील—आहेत त्यांचा सल्ला तरी घ्याल ना ? ते माझे मित्रहि आहेत. ” पारसी रुस्तमजी म्हणाले.

तपास करतां दिसून आलें कीं, चोरी दीर्घ काळपर्यंत चालली होती. पकडलेली चोरी थोडीशीच होती. जुन्या वकिलाकडे आम्ही गेलों. त्यांनीं खटला तपासला. “ हा खटला ज्यूरीपाशीं जाणार. येथील ज्यूरर हिंदी माणसाला कसचे सोडतात ? पण मीं आशा मात्र सोडणार नाहीं. ” वकील म्हणाले.

* कच्चा पारा खावा अन्न, त्या सारं चोरीचें धन.

या वकिलाचा माझा फारसा परिचय नव्हता. पारसी रुस्तमजींनींच जबाब दिला, " मी तुमचे आभार मानतों. पण या खटल्यांत मला मि. गांधींच्या सल्ल्याप्रमाणेंच चालायचें आहे. ते मला अधिक चांगले ओळखतात. तुम्ही त्यांना योग्य तो सल्ला देत जा. "

अशा तऱ्हेनें हा प्रश्न निकालांत काढून आम्ही रुस्तमजी शेठच्या दुकानीं गेलों.

मीं फोड करून सांगितलें, " माझ्या समजुतीनें हा खटला कोर्टांत जाण्याच्या लायकीचा नाहीं. खटला करणें न करणें जकातीच्या अंमलदाराच्या हातीं आहे. त्यालाहि सरकारच्या मुख्य वकिलाच्या सल्ल्याप्रमाणें चालावें लागणार. मी दोघांनाहि भेटायला जाण्यास तयार आहें. पण मला ते ओळखीत नाहींत. चोरी कबूल तर करावीच लागणार. ते ठरवितील तो दंड आपण कबूल करावा असें मला वाटतें. बहुधा ते कबूल होतील. पण नाहींच झाले तर तुरुंगासाठींहि तयार राहिलें पाहिजे. माझी तर समजूत आहे कीं, लाज तुरुंगांत जाण्यांत नाहीं तर चोरी करण्यांत आहे. ज्याची लाज वाटायची ती गोष्ट तर होऊनच गेली आहे. तुरुंगांत जावें लागलें तर तें प्रायश्चित्त घडलें असें समजा. खरें प्रायश्चित्त तर अतःपर जकातीची चोरी न करण्याची प्रतिज्ञा हेंच होय. "

हें सर्व रुस्तमजी शेठ बरोबर समजूं शकले असें मीं सांगूं शकत नाहीं. ते धीराचे मनुष्य होते, या वेळीं त्यांचा धीर सुटला. त्यांची प्रतिष्ठा जाण्याचा प्रसंग आला होता; आणि कदाचित् त्यांनीं स्वतःच्या कष्टानें बांधलेला घरटा उध्वस्त झाला तर?

ते म्हणाले, " मी तुम्हांला सांगूनच टाकलें आहे कीं, माझें शिर तुमच्या मांडीवर ठेवलेलें आहे. तुम्हांला योग्य दिसेल तें करा! "

मीं या खटल्यांत विनवण्या करण्याची आपली सर्व शक्ति खर्च केली. मी अधिकाऱ्याला भेटलों. निर्भयपणें चोरीसंबंधींची सर्व हकीकत त्याला सांगितली. हिशेबाच्या सर्व वह्या दाखवतों म्हणून सांगितलें आणि पारसी रुस्तमजींना वाटत असलेल्या पश्चात्तापाचीहि हकीकत सांगितली.

अधिकारी म्हणाला, " मला त्या वृद्ध पारशाबद्दल आदर वाटतो. त्यानें मूर्खपणा तर केला खराच; पण माझें कर्तव्य काय तें तुम्हांला कळतच आहे. मला तर थोरले वकील सांगतील तसेंच केलें पाहिजे. त्यासाठीं मन वळविण्याची तुमची सर्व शक्ति तुम्हीं त्यांच्यापाशींच वापरली पाहिजे. "

" पारसी रुस्तमजींना कोर्टांत खेचल्याबद्दल तुमच्याकडून आग्रह धरला गेला नाहीं म्हणजे मला पुरे. " मीं म्हटलें.

त्या अंमलदारापासून अभयदान मिळवून मीं सरकारी वकिलाशीं पत्रव्यवहार चालविला. त्यांना भेटलोंहि. सत्याबद्दल मला वाटणारी चाड त्यांच्या ध्यानांत आली हें मला सांगितलें पाहिजे. मीं यत्किंचितहि आडपडदा ठेवलेला नाहीं, हें मी त्यांच्यापाशीं सिद्ध करूं शकलों.

या अगर दुसऱ्या कोणत्या तरी प्रसंगीं त्यांच्याशीं संबंध आला असतां त्यांनीं मला प्रमाणपत्र दिलें. "एकंदरींत मला दिसतें कीं, तुम्ही नकार म्हणून कधीं घेणारच नाहीं."

रुस्तमजींवर खटला झाला नाहीं. त्यांनीं कबूल केलेल्या जकातचोरीच्या दुप्पट रक्कम घेऊन खटला काढून घेण्याचा हुकूम झाला.

रुस्तमजींनीं स्वतःच्या जकात-चोरीची हकीकत लिहून काढून तसबिरींत बसविली व आपले वारस आणि बरोबरीचे व्यापारी यांनीं बोध घ्यावा यासाठीं ती आपल्या कचेरींत टांगून ठेवली.

रुस्तमजी शेठच्या व्यापारी मित्रांनीं मला बजावलें, "हें खरें वैराग्य नव्हे, स्मशानवैराग्य आहे."

यांत कितपत तथ्य होतें तें मला माहीत नाहीं. ही गोष्टहि मी रुस्तमजीशेठपाशीं बोललों. त्यांचेकडून जबाब मिळाला, "तुम्हांला फसवून मी जाणार कोठें?"



# १

# पहिला अनुभव

मी स्वदेशीं येण्याच्या पूर्वीच फिनिक्सपैकीं जी मंडळी परत हिंदुस्थानला यावयाची होती ती येऊन पोंचली होती. अंदाज असा होता कीं मी त्यांच्या आधीं येऊन पोंचेन; पण मी लढाईमुळें लंडनमध्यें थांबलों, त्यामुळें फिनिक्सवासी मंडळीला कोठें ठेवावें हा एक मला प्रश्न पडला. सर्वांना एकत्र मिळून फिनिक्स-आश्रमाच्या पद्धतीनेंच राहायला मिळेल तर चांगलें, असें मनांत होतें. येथें एकाद्या आश्रमाचे कोणी चालक माझ्या ओळखीचे नव्हते कीं ज्यांचेकडे त्यांना धाडावें. त्यामुळें मी त्यांना अँड्रयूझना भेटून ते सांगतील त्याप्रमाणें करण्यास लिहिलें होतें.

त्यांना प्रथम कांगडी गुरुकुलमध्यें ठेवण्यांत आलें. तेथें दिवंगत श्रद्धानंद-जींनीं त्यांची स्वतःच्या मुलांप्रमाणें काळजी घेतली. त्यानंतर त्यांना शान्ति-निकेतनमध्यें ठेवण्यांत आलें. तेथें कविराज व त्यांचें मंडळ यांनीं त्यांचेवर तितक्याच प्रेमाची वृष्टि केली. या दोन ठिकाणीं त्यांना मिळालेल्या अनुभवाचा त्यांना व मला फारच उपयोग झाला.

कविराज, श्रद्धानंदजी व श्री. सुशील रुद्र यांना मी अँड्रयूझची त्रैमूर्ति म्हणत असें. दक्षिण आफ्रिकेंत असतांना त्यांना या तिघांची कितीहि स्तुति केली तरी पुरेसें वाटत नसे. माझा त्यांचा दक्षिण आफ्रिकेमध्यें जो प्रेममय सहवास झाला त्या वेळच्या अनेक स्मरणांपैकीं हें एक तर आतां माझ्या डोळ्यांपुढें उभें आहे कीं या तीन महापुरुषांचीं नांवें त्यांच्या हृदयीं व तोंडीं असायचींच. अँड्रयूझनीं माझ्याजवळच्या बालकांना सुशील रुद्रांच्याहि सहवासांत ठेवलें. रुद्रां-पाशीं आश्रम नव्हता, स्वतःचें घरच होतें. पण त्या घराचा कबजा त्यांनीं या माझ्या कुटुंबाला दिला. त्यांचीं मुलें त्यांच्याशीं एकाच दिवसांत इतकी मिसळून गेलीं कीं, त्यांना फिनिक्सचा विसरच पडला.

मी मुंबई बंदरीं उतरलों तोंच मला खबर मिळाली कीं सध्यां हें कुटुंब शान्तिनिकेतनमध्यें आहे. म्हणून गोखल्यांची भेट घेऊन तिकडे लवकर जाण्याची मला उत्कंठा लागलेली होती.

मुंबईमध्यें माझा सन्मान झाला, त्याच प्रसंगीं मला एक छोटासा सत्याग्रह करावा लागला. मि. पेटिटच्या घरीं माझ्यासाठीं संमेलन भरविण्यांत आलें होतें. तेथें तर मला गुजराथीमध्यें जबाब देण्याची हिंमत झालीच नाहीं. त्या महालामध्यें व डोळे दिपविणाऱ्या भपक्यामध्यें गिरमिट्या मजुरांच्या सहवासांत राहून

आलेल्या मला खेडवळासारखें वाटूं लागलें. आजच्या माझ्या पोषाखाच्या मानानें त्या वेळीं मी घालीत असलेला अंगरखा, फेटा वगैरे पोषाख सुधारलेला म्हणतां येईल; तरी पण मी त्या अलंकृत समाजामध्यें निराळाच दिसत होतों. पण तेथें तर मीं माझें काम कसेंबसें भागविलें, आणि फिरोजशा मेहतांच्या कुशीचा आश्रय घेतला.

गुजराथ्यांचीहि निराळी सभा झालीच. ती स्वतः उत्तमलाल त्रिवेदी यांनीं भरविली होती. ती सभा कोणाकोणांची होणार यासंबंधीं थोडीशी माहिती मीं मिळविली होती. मि. जिना हेहि गुजराथीच, अर्थात् तेहि त्या सभेला हजर होते. ते अध्यक्ष होते कीं, मुख्य वक्ते तें मला आतां आठवत नाहीं. परंतु त्यांनीं आपलें थोडक्यांत पण मधुर भाषण इंग्रजीमध्यें केलें. इतर भाषणेंहि बहुतेक इंग्रजींतच झालीं असें मला पुसट स्मरतें. माझी बोलण्याची पाळी आली, तेव्हां मीं गुजराथींतच उत्तर दिलें. गुजराथी व हिंदुस्थानी याबद्दल मला वाटणारा जिव्हाळा मीं थोडक्याच शब्दांत व्यक्त केला; व गुजराथी लोकांच्या सभेंत इंग्रजीचा उपयोग करण्याबद्दलचा आपला नम्र विरोध नमूद केला. माझ्या मनाला असें करण्याबद्दल संकोच तर वाटतच होता. मला वाटे कीं, दीर्घकालीन गैरहजेरीनंतर परदेशाहून परत येणाऱ्या अननुभवी माणसानें चालू प्रवाहाविरुद्ध जावें यांत अविवेक तर होत नाहीं ? पण गुजराथींतून उत्तर देण्याचें धाडस मीं केलें त्याचा कोणी भलताच अर्थ केला नाहीं, व सर्वांनीं माझा विरोध सहन केला हें पाहून मला समाधान वाटलें; व माझे नवेसे वाटणारे इतर विचारहि समाजापुढें मांडण्यास हरकत पडणार नाहीं, असा निष्कर्ष मीं या सभेवरून काढला.

अशा तऱ्हेनें मुंबईत दोन एक दिवस राहून व प्राथमिक अनुभव मिळवून गोखल्यांच्या आज्ञेवरून मी पुण्यास गेलों.

●●●

२

# गोखल्यांबरोबर पुण्यास

मी मुंबईस पोंचल्यानंतर लगेच गोखल्यांनीं मला कळविलें कीं, ‘ गव्हर्नर तुम्हांला भेटूं इच्छितात; आणि पुण्याला येण्यापूर्वींच तुम्हीं त्यांना भेटून यावें हें बरें. ’ यावरून मी त्यांना भेटायला गेलों. सामान्य बोलणें झाल्यानंतर ते म्हणाले,

“ तुमच्यापासून मला एक वचन मागायचें आहे. सरकारशीं संबंध

पोंचेल असें कोणतेंहि कृत्य करण्यापूर्वीं तुम्हीं मला सांगावें व भेटून जावें अशी माझी इच्छा आहे. ”

“ मीं म्हटलें, तसें वचन देणें मला फार सोपें आहे; कारण सत्याग्रही या नात्यानें माझा नियमच आहे कीं, कोणाच्याहि विरुद्ध कांहींहि करायचें झाल्यास अगोदर त्याचेकडून त्याचा दृष्टिकोन समजून घ्यावा व त्याच्या म्हणण्याला देतां येईल तेवढा मान द्यावा. दक्षिण आफ्रिकेमध्यें मीं या नियमाचें पालन नेहमींच केलेलें आहे. येथेंहि तसेंच करणार. ”

लॉर्ड विलिंग्डननीं आभार मानले व ते म्हणाले, “ तुम्हांला वाटेल तेव्हां लगेच तुम्हीं मला भेटूं शकाल, व मग तुम्हांला कळून येईल कीं, सरकार जाणून-बुजून कांहीं वांकडें करूं इच्छित नसतें. ”

मीं म्हटलें, “ या विश्वासावर तर मी आहें. ”

मी पुण्यास गेलों. तेथील सर्व स्मरणें देणें मला शक्य नाहीं. गोखले व सोसायटीचे सभासद यांनीं मला प्रेमामृतानें न्हाऊं घातलें. मला आठवतें कीं, त्यांनीं सर्व सभासदांना पुण्यास बोलाविलें होतें. सर्वांबरोबर अनेक मुद्द्यांवर मीं मनमोकळेपणानें चर्चा केली. गोखल्यांची फार इच्छा होती कीं मीहि सोसायटी-मध्यें दाखल व्हावें. माझी तर इच्छा होतीच. पण सभासदांचें मत पडलें कीं सोसायटीचे आदर्श व त्यांची काम करण्याची रीत माझ्या रीतीहून भिन्न आहे, त्यामुळें मी सभासद होणें योग्य होईल कीं काय याबद्दल त्यांना शंका वाटत होती. गोखल्यांची समजूत होती कीं, माझ्यामध्यें आपल्या ध्येयांना चिकटून राहाण्याचा जसा गुण आहे तितकाच इतरांचे आदर्श संभाळून घेण्याचा व त्यांच्याशीं मिळून मिसळून काम करण्याचाहि गुण आहे. “ पण माझ्या सभा-सदांना अद्याप तुमच्यांतील या संभाळून घेण्याच्या गुणाची ओळख पटलेली नाहीं. ते स्वतःच्या ध्येयाला चिकटून राहाणारे, स्वतंत्र वृत्तीचे व ठाम विचाराचे असे आहेत. मला उमेद तर वाटतेच कीं, ते तुम्हांला मान्य करतील. परंतु कबूल केलें नाहीं तरी तुम्ही असें मात्र समजूं नका कीं, तुमच्याबद्दल त्यांना आदर किंवा प्रेम कमी वाटतात. तें प्रेम अबाधित राहावें यासाठींच त्यांना कसलेंहि साहस करण्याची भीति वाटते. तुम्ही सोसायटीचे सभासद व्हा किंवा नका होऊं, पण मी तर तुम्हांला सभासदच मानून चालणार. ” गोखले म्हणाले.

मीं स्वतःची कल्पना त्यांना कळविली होती. मी सोसायटीचा सभासद झालों किंवा न झालों तरी माझ्या मनांतून एक आश्रम काढून त्यांत फिनिक्स-मधील सहवासी मंडळीला घेऊन राहावयाचें होतें. मी गुजराथी असल्यामुळें गुजराथद्वारांच सेवा करण्यासाठीं माझ्यापाशीं जास्त भांडवल मिळणार, या

समजुतीनें गुजराथमध्येंच कोठें तरी एक ठिकाण धरून राहाण्याची माझी इच्छा होती. गोखल्यांना हा विचार पसंत पडला व ते म्हणाले,

" तुम्हीं अवश्य तसें करा. सभासदांबरोबरच्या चर्चेचा निकाल कसाहि लागो, पण तुम्हांला आश्रमासाठीं लागणारें द्रव्य तुम्हीं माझ्यापासूनच घ्यायचें आहे. मी तो माझा आश्रमच समजणार. "

माझें हृदय फुलून गेलें. पैसे गोळा करण्याच्या कामांतून बरी मोकळीक झाली असें म्हणून मीं फार आनंद मानला; आणि यापुढें मला स्वतःच्या जबाबदारीवर चालावें लागणार नाहीं, तर प्रत्येक अडचणीमध्यें मला मार्गदर्शक मिळणार या विश्वासामुळें माझ्या डोक्यावरील मोठा भार खालीं उतरला असें मला वाटलें.

गोखल्यांनीं स्व. डॉ. देवांना बोलावून सांगून टाकलें, " आमच्या हिशेबांत गांधींचें खातें उघडा, आणि त्यांना त्यांच्या आश्रमासाठीं किंवा त्यांच्या सार्वजनिक खर्चासाठीं जे पैसे लागतील ते तुम्ही त्यांना द्या. "

पुण्याहून निघून शान्तिनिकेतला जाण्याच्या तयारीला मी आतां लागलों. शेवटल्या दिवशीं रात्रीं गोखल्यांनीं मुद्दाम मला पसंत पडावी अशी खास मित्रांची एक पार्टी केली. तिच्यामध्यें मी नेहमीं घेत असें तसलाच सुक्या व ताज्या फळांचा आहार त्यांनीं मागविला होता. पार्टी त्यांच्या खोलीपासून कांहीं पावलांच्या अंतरावर होती. तेथपर्यंत येण्यासारखीहि त्यांची बिलकुल स्थिति नव्हती. पण त्यांचें प्रेम त्यांना राहूं कसें देणार? त्यांनीं येण्याचा आग्रह धरला. आले तर खरे, पण त्यांना चक्कर आली, व परत जावें लागलें. त्यांना असें पुष्कळदां होत असे; म्हणून त्यांनीं निरोप पाठविला कीं, आम्हीं पार्टी तशीच चालू ठेवावी. पार्टी म्हणजे दुसरें कांहीं नाहीं, तर सोसायटीच्या आश्रमाच्या अतिथिशालेच्या चौकांत जाजम पसरून बसणें आणि भुईमूग, खजूर वगैरे तोंडांत टाकीत प्रेमालाप करणें व एकमेकांच्या हृदयाची अधिक ओळख करणें.

पण ती चक्कर माझ्या जीवनक्रमाच्या दृष्टीनें सामान्य अनुभव व्हावयाची नव्हती.



३

# धमकी म्हणजे ?

माझ्या वडील बंधूंच्या विधवा पत्नीला व इतर कुटुंबी जनांना भेटण्यासाठीं राजकोटला व पोरबंदरला जायचें होतें, म्हणून मुंबईहून तिकडे गेलों. दक्षिण आफ्रिकेंत सत्याग्रहाच्या लढ्याच्या निमित्तानें मी माझा पोषाख गिरमिट्या मजुरांशीं शक्य तेवढा मिळता करून घेतला होता. विलायतेंतहि घरामध्यें हाच पोषाख वापरीत असें. हिंदुस्थानांत आल्यानंतर माझ्या मनांतून काठेवाडी पोषाख ठेवायचा होता. मीं तो दक्षिण आफ्रिकेंत स्वतःपाशीं बाळगला होता; त्यामुळें मुंबईला मी त्याच पोषाखांत उतरूं शकलों होतों; तो पोषाख म्हणजे सदरा, अंगरखा, धोतर आणि शुभ्र फेटा. हे सर्व देशी गिरण्यांच्या कापडाचेच बनविलेले होते. मुंबई ते काठेवाड तिसऱ्या वर्गांतून जायचें होतें. या प्रवासांत फेटा व अंगरखा म्हणजे नसता बोजा असें मला वाटलें. म्हणून फक्त सदरा, धोतर व आठदहा आण्यांची काश्मिरी टोपी एवढाच पोषाख केला होता. असला पोषाख वापरणारांची गणना गरिबांतच होणार. त्या वेळीं विरमगांव कीं वढवाण येथें प्लेगमुळें तिसऱ्या वर्गाच्या उतारूंची तपासणी होत असे; माझ्या अंगांत थोडासा ताप होता. तपासणी करणाऱ्या अंमलदारानें माझा हात पाहिला, तो त्याला गरम लागला. म्हणून मला राजकोटांत डॉक्टरला भेटण्याचा हुकूम केला आणि नांव नोंदून घेतलें.

मुंबईहून कोणी तार किंवा पत्र पाठविलें असेल, त्यावरून वढवाण स्टेशन-वर तेथील लोकसेवक म्हणून प्रसिद्ध असलेले शिंपी मोतीलाल भेटायला आले होते. त्यांनीं माझ्यापाशीं विरमगांवची जकाततपासणी व तिच्यापायीं होणारे तापत्रय यांचें वर्णन केलें. मी तापानें पीडलेलाच होतों; त्यामुळें बोलण्याची हौस विशेष नव्हतीच. मीं त्यांना थोडक्यांत जबाब दिला,

"तुम्ही तुरुंगांत जायला तयार आहां ?"

विचार न करतां उत्साहाच्या भरांत जबाब देणारे पुष्कळ तरुण असतात, त्यांपैकींच एक मोतीलाल असतील असें मला वाटलें होतें, पण त्यांनीं फारच दृढतापूर्वक जबाब दिला.

"आम्ही अवश्य तुरुंगांत जाऊं; पण तुम्हीं आमचें नेतृत्व स्वीकारलें पाहिजे. काठेवाडी या नात्यानें तुमच्यावर आमचा पहिला हक्क आहे. या वेळीं तर आम्ही तुम्हांला थांबवूं शकत नाहीं. पण परत येतांना तुम्हांला वढवाणला उतरावें लागेल. इकडच्या तरुणांचें काम व त्यांचा उत्साह हीं पाहून तुम्ही खूष व्हाल. वाटेल तेव्हां तुम्ही आम्हांला आपल्या सेनेंत दाखल करून घेऊं शकतां."

मोतीलाल माझ्या नजरेंत भरले. त्यांच्या दुसऱ्या एका जोडीदारानें त्यांची स्तुति करतांना म्हटलें,

"हे भाई आहेत तर शिंपी. आपल्या धंद्यांत कुशल आहेत. त्यामुळें रोज तासभर काम करून महिन्याकाठीं आपल्या खर्चापुरते पंधराएक रुपये कमवितात, व बाकीचा सर्व वेळ सार्वजनिक कार्याला देतात. आम्हां सुशिक्षितांचेहि पुढारी तेच. त्यांच्याकडे पाहून आमची आम्हांला लाज वाटते."

मागाहून भाई मोतीलालशीं माझा चांगला परिचय झाला. त्यावरून मला दिसून आलें कीं, त्यांच्या वरील स्तुतीमध्यें बिलकुल अतिशयोक्ति नव्हती. सत्याग्रहाश्रम स्थापन झाला, तेव्हां दर महिन्याला ते आश्रमांत थोडे दिवस तरी हजेरी देऊन जायचेच. मुलांना शिवणकाम शिकवीत आणि आश्रमाचें शिवण्याचें काम करून जात. विरमगांवची गोष्ट तर माझ्यापाशीं रोज काढीत असत. प्रवाश्यांचे होणारे हाल त्यांना असह्य होत. या मोतीलालना दुखण्यानें भर तारुण्यामध्यें उचलून नेलें, व त्यांच्याविणें वढवाण शून्यवत् झालें.

राजकोटला पोंचल्यानंतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी पूर्वी मिळाल्या हुकुमाप्रमाणें इस्पितळांत हजर झालों. तेथें मी अपरिचित नव्हतों. डॉक्टर खजिल झाले; ते त्या तपासणी करणाऱ्या अंमलदाराच्या नांवानें चरफडूं लागले. मला त्यांत रागावण्याचें कारणच दिसेना. अंमलदारानें आपलें कर्तव्यच बजावलें होतें. तो मला ओळखीत नव्हता, आणि ओळखीत असता तरीहि त्यानें केला तसला हुकूम करणें हें त्याचें कर्तव्य होतें. पण मी पडलों सुप्रसिद्ध. त्यामुळें राजकोटमध्यें मला तपासणीसाठीं जावें लागण्याऐवजीं तपासणीसाठीं माणसें घरीं येऊं लागलीं.

तिसऱ्या वर्गाच्या उतारूंची असल्या बाबतींत तपासणी आवश्यक आहे. मोठे मानले जाणारे लोक तिसऱ्या वर्गानें प्रवास करीत असतील तर त्यांनींहि स्वेच्छापूर्वक गरिबांना लागू पडणाऱ्या नियमांच्या आधीन झालें पाहिजे, व अंमलदारांनींहि पक्षपात करतां कामा नये. पण माझा अनुभव असा आहे कीं, अधिकारी तिसऱ्या वर्गाच्या उतारूंची माणसांत गणना करण्याऐवजीं पशूंतच गणना करतात. त्यांना संबोधावयाचें तें 'तूं' खेरीज नाहींच. तिसऱ्या वर्गाच्या उतारूनें उलट जबाब देतांच कामा नये, आपल्या बाजूचें समर्थनहि करतां कामा नये. तो जणुं अंमलदाराचा नोकर असावा, त्याप्रमाणेंच त्यानें वागलें पाहिजे. अंमलदारांनीं त्याला झोडावें, लुटावें, त्याची गाडी चुकवावी, तिकीट देतांना रखडवावें! ह्या सर्वांचा मीं जातीनें अनुभव घेतला आहे. ही स्थिति सुधारण्याचा मार्ग हा एकच कीं, कित्येक सुशिक्षितांनीं व धनिकांनीं गरिबासारखें बनावें आणि तिसऱ्या वर्गानें प्रवास करून गरीब प्रवाश्यांना मिळत नाहीं अशी एकहि सोय

स्वतः भोगूं नये; आणि गैरसोय, उद्धटपणा, अन्याय, बीभत्सपणा इत्यादि मुकाट्यानें सहन न करतां त्यांचा प्रतिकार करावा व दाद मिळवावी.

काठेवाडांत मी जेथें जेथें हिंडलों, तेथें तेथें विरमगांवच्या जकाततपासणीपायीं होणाऱ्या तापत्रयासंबंधीं तक्रारी कानांवर आल्या.

त्यावरून लॉर्ड विलिंग्डननीं दिलेल्या निमंत्रणाचा मीं लगेच उपयोग केला. त्याबाबत हातीं आले तेवढे कागदपत्र वाचले. तक्रारींत पुष्कळ तथ्य असल्याचें मला दिसून आलें. त्याबद्दल मीं मुंबई सरकारबरोबर पत्रव्यवहार चालविला. सेक्रेटरींना भेटलों. लॉर्ड विलिंग्डननाहि भेटलों. त्यांनीं सहानुभूति दर्शविली, पण दिल्लीच्या चेंगटपणाबद्दल तक्रार केली.

"आमच्याच हातची गोष्ट असती तर आम्ही ही जकात कधींच काढून टाकली असती. तुम्ही बड्या सरकारकडे जा." असें सेक्रेटरींनीं सांगितलें.

मीं वरिष्ठ सरकारबरोबर पत्रव्यवहार चालविला. पण 'पत्र पोंचलें' यापलीकडे कांहीं जबाब मिळाला नाहीं. जेव्हां मला लॉर्ड चेल्म्स्फर्डना भेटण्याचा प्रसंग आला, तेव्हां, म्हणजे जवळजवळ दोन वर्षांच्या पत्रव्यवहारानंतर, दाद मिळाली. लॉर्ड चेल्म्स्फर्डपाशीं गोष्ट काढली, तेव्हां त्यांनीं आश्चर्य दर्शविलें. त्यांना विरमगांवसंबंधीं कांहींच माहिती नव्हती. माझें म्हणणें त्यांनीं लक्षपूर्वक ऐकलें, व त्याच वेळीं टेलिफोन करून विरमगांवसंबंधींचे कागद मागविले. मी सांगितलेल्या हकीकतीविरुद्ध अंमलदारांना जर कांहीं सांगायचें नसेल, तर जकात रद्द करण्याचें त्यांनीं वचन दिलें. या भेटीनंतर थोडक्याच दिवसांत जकात रद्द झाल्याची नोटीस मीं वर्तमानपत्रांत वाचली.

हा विजय म्हणजे सत्याग्रहाचें मंगलाचरण असें मी तरी समजलों. कारण कीं, विरमगांवसंबंधीं संभाषणें चालू असतांना मुंबई सरकारच्या सेक्रेटरींनीं मीं त्यासंबंधीं बगसरामध्यें केलेल्या भाषणाची नक्कल आपल्यापाशीं असल्याचें मला सांगितलें होतें. त्यांत असलेल्या सत्याग्रहाच्या उल्लेखाबद्दल त्यांनीं आपली नापसंतीहि दर्शविली होती. त्यांनीं विचारलें,

"तुम्हांला ही धमकी नाहीं वाटत? आणि अशा तऱ्हेनें बलवान् सरकार धमकीला थोडीच भीक घालणार आहे?"

मीं प्रत्युत्तर दिलें,

"ही धमकी नव्हे, हें लोकशिक्षण आहे. लोकांना आपल्या दुःखाचें निराकरण करण्याचे सर्व रास्त मार्ग दाखवून देणें माझ्यासारख्याचें कर्तव्य आहे. ज्या राष्ट्राला स्वतंत्रता पाहिजे असेल, त्या राष्ट्रापाशीं स्वतःच्या संरक्षणाचा अंतिम इलाज असणें आवश्यक आहे. सामान्यपणें असले इलाज हिंसक असतात.

सत्याग्रह हें शुद्ध अहिंसक शस्त्र आहे. त्याचा उपयोग व त्याची मर्यादा दाखवून देणें मी स्वतःचा धर्म समजतों. इंग्रज सरकार शक्तिमान् आहे, याबद्दल मला शंका वाटत नाहीं. पण सत्याग्रह हें सर्वश्रेष्ठ शस्त्र आहे, याविषयीं मला शंका नाहीं."

सुज्ञ सेक्रेटरींनीं आपलें डोकें हालविलें, व ते म्हणाले, " काय तें दिसेलच."

●●●

## ४

# शान्तिनिकेतन

राजकोटहून मी शान्तिनिकेतनला गेलों. तेथें तेथील शिक्षक व विद्यार्थी यांनीं माझ्यावर प्रेमाचा वर्षाव केला. स्वागताच्या विधीमध्यें साधेपणा, कला व प्रेम यांचें सुंदर मिश्रण होतें. त्या ठिकाणीं माझी काकासाहेब कालेलकरांशीं प्रथम भेट झाली.

कालेलकरांचें 'काकासाहेब' हें नांव कसें पडलें तें त्या वेळीं मला माहीत नव्हतें. पण मागाहून कळलें, कीं केशवराव देशपांडे जे विलायतेंत माझे समकालीन होते व ज्यांच्याशीं माझा विलायतेंत चांगला परिचय झाला होता, ते बडोदें संस्थानामध्यें 'गंगनाथ विद्यालय' चालवीत असत. त्यांच्या अनेक भावनांपैकीं एक अशीहि होती, कीं विद्यालयांत कौटुंबिक भावना असली पाहिजे. त्यासाठीं सर्व अध्यापकांना नांवें दिलेलीं होतीं त्यांत कालेलकरांना 'काका' हें नांव मिळालें. फडके 'मामा' झाले. हरिहर शर्मा 'अण्णा' झाले. इतरांनाहि त्याचप्रमाणें योग्य नांवें देण्यांत आलीं. पुढें काकांचे जोडीदार म्हणून आनंदानंद (स्वामी) आणि मामांचे मित्र या नात्यानें पटवर्धन (अप्पा) या कुटुंबांत सामील झाले. या कुटुंबांतील वरील पांचीजण एकामागून एक माझे सहकारी बनले. देशपांड्यांना 'साहेब' या नांवानें ओळखीत असत. साहेबाचें विद्यालय बंद झाल्यानंतर हें कुटुंब विखुरलें. पण या मंडळीनें परस्परांतील आध्यात्मिक संबंध सोडला नाहीं. काकासाहेब निरनिराळे अनुभव घेऊं लागले, व त्या निमित्तानेंच या वेळीं शान्तिनिकेतनामध्यें राहात होते. त्याच मंडळांतील दुसरे एक चिंतामणशास्त्री तेथेंच राहात असत. हे दोघेहि संस्कृत शिकविण्याच्या कामीं भाग घेत.

शान्तिनिकेतनामध्यें माझ्या मंडळाला उतरण्यास स्वतंत्र जागा देण्यांत आली होती. येथें मगनलाल गांधी त्या मंडळाची काळजी घेत असत; व फिनिक्स आश्रमाच्या सर्व नियमांचें बारकाईनें स्वतः पालन करीत आणि इतरां-

करून करवून घेत. त्यांनीं स्वतःचें प्रेम, ज्ञान व उद्योग यांच्यामुळें आपला सुवास शान्तिनिकेतनामध्यें पसरविला असल्याचें मला आढळून आलें. त्या ठिकाणीं अँड्र्यूझ तर होतेच. पियर्सन्‌हि होते. जगदानंदबाबू, नेपाळबाबू, संतोषबाबू, खितिमोहनबाबू, नगीनबाबू, शरदबाबू आणि कालिबाबू यांच्याशीं मगनलालनीं खूप परिचय केला.

माझ्या स्वभावानुरूप मीं शिक्षक व विद्यार्थी यांच्यांत मिसळून गेलों, आणि अंगमेहनतीसंबंधीं चर्चा करूं लागलों. पगारी आचाऱ्याऐवजीं शिक्षक आणि विद्यार्थीच स्वतःचा स्वयंपाक करून घेतील तर चांगलें होईल; भोजनगृहाच्या आरोग्याच्या व नीतीच्या दृष्टीनें शिक्षक नियमन करूं शकतील व विद्यार्थ्यांनाहि स्वावलंबनाचा व स्वयंपाकाचा वस्तुपाठ मिळेल; ही गोष्ट मीं तेथील शिक्षकांपुढें मांडली. एकदोन शिक्षकांनीं डोकें हलविलें. कित्येकांना प्रयोग फार आवडला. मुलांना नवीन गोष्ट, मग ती कसलीहि असली तरी, आवडायचीच; त्या न्याया-नुरूप हीहि आवडली व प्रयोग सुरू झाला. ही गोष्ट कविश्रीं पुढें मांडली असतां शिक्षकांची अनुमति असेल तर हा प्रयोग आपल्याला तर अवश्य आवडेल असा त्यांनीं स्वतःचा अभिप्राय दिला. त्यांनीं विद्यार्थ्यांना सांगितलें, " यांत स्वराज्याची गुरुकिल्ली आहे. "

पियर्सन्‌नीं प्रयोग यशस्वी करण्याच्या कामीं स्वतःचें शरीर पिळून काढलें. त्यांना तो फार आवडला. भाजी चिरणारें एक मंडळ तयार झालें. दुसरें एक धान्य साफ करणारें. भोजनगृहाच्या सभोंवार शास्त्रीय पद्धतीनें साफसफाई करण्याच्या कामीं नगीनबाबू वगैरे गुंतले. त्यांना कुदळी घेऊन काम करीत असलेले पाहून माझी छाती आनंदानें भरून गेली.

पण मेहनतीचें काम सव्वाशें विद्यार्थ्यांना आणि शिक्षकांनाहि एकदम झेंपण्यासारखें नव्हतें; त्यामुळें रोज चर्चा होई. कित्येकजण थकून जात. पियर्सनना श्रम वाटतातच कशाला ? ते तर हंसतमुखानें नित्य भोजनगृहाच्या या नाहीं त्या कामांत गुंतलेले असायचेच. मोठमोठीं भांडीं घांसणें हें तर त्यांचेंच काम. भांडीं घांसणाऱ्या तुकडीचा श्रमपरिहार करण्याकरितां कांहींजण त्या ठिकाणीं सतार वाजवीत. प्रत्येक काम विद्यार्थ्यांनीं पूर्ण उत्साहानें उचललें व शान्तिनिकेतन मधमाश्यांच्या पोळ्याप्रमाणें गुणगुणूं लागलें.

अशा तऱ्हेच्या फेरफारांचा एकवार आरंभ झाला म्हणजे ते थांबून राहातच नाहींत. फिनिक्स भोजनगृह स्वाश्रयी होतें, एवढेंच नव्हे तर तेथील स्वयंपाकहि फार साधा होता. मसाले वर्ज्य होते. त्यामुळें वाफेवरच भात, डाळ, भाजी व गव्हाचे पदार्थ हीं शिजवून घेतलीं जात असत. बंगाली आहारामध्यें सुधारणा करण्याच्या दृष्टीनें अशाच तऱ्हेचें एक भोजनगृह काढलेलें होतें. त्याला

एकदोन शिक्षक व कांहीं विद्यार्थी येऊन मिळाले होते. असल्या प्रयोगांमुळेंच सर्वसामान्य पाकशाळा स्वावलंबी बनविण्याचा प्रयोग सुरू होऊं शकला होता.

पण अखेरीला कित्येक कारणांमुळें हा प्रयोग बंद झाला. माझी समजूत आहे, कीं या जगद्विख्यात संस्थेनें हा प्रयोग थोडक्या मुदतीपुरता चालविल्यानेंहि कसलेंच नुकसान झालेलें नाहीं. आणि त्यापासून मिळालेले कित्येक अनुभव तिला फार उपयोगी झाले.

माझा इरादा शान्तिनिकेतनामध्यें कांहीं काळपर्यंत राहाण्याचा होता. पण विधात्यानें मला बळजबरीनें ओढून नेलें. मी एक आठवडाभर राहिलों असेन नसेन इतक्यांत पुण्याहून गोखल्यांच्या मृत्यूची तार आली. शान्तिनिकेतन शोकामध्यें बुडून गेलें. सर्वजण माझ्याकडे येऊन हळहळूं लागले. मंदिरामध्यें मुद्दाम सभा भरविण्यांत आली. तो गंभीर देखावा अपूर्व होता. मी त्याच दिवशीं पुण्यास जाण्यास निघालों. पत्नी व मगनलाल यांस बरोबर घेतलें. बाकीचीं सर्व-जणें शान्तिनिकेतनामध्यें राहिलीं.

अँड्र्यूझ बरद्वानपर्यंत माझ्याबरोबर आले होते. त्यांनीं मला विचारलें, " तुम्हांला हिंदुस्थानांत सत्याग्रह करण्याचा प्रसंग येईल असें वाटतें का ? आणि वाटत असेल, तर केव्हां त्याची कांहीं कल्पना येते का ? "

मीं उत्तर दिलें, " याचें उत्तर देणें कठिण आहे. मला एक वर्षपर्यंत तर कांहीं करायचेंच नाहीं. गोखल्यांनीं माझ्याकडून वचन घेतलें आहे, कीं एक वर्षपर्यंत मीं भ्रमण करावें, कोणत्याहि सार्वजनिक प्रश्नासंबंधीं मत निश्चित करूं नये, किंवा बोलून दाखवूं नये. हें वचन मी अक्षरशः पाळणार आहें. त्यानंतर-मुद्धां मला कोणत्याहि प्रश्नावर बोलण्यासारखें असेल तरच मी बोलणार आहें. यावरून पांच वर्षेपर्यंत सत्याग्रह करण्याचा प्रसंग येईल असें मला वाटत नाहीं.

येथें एवढें सांगणें उचित आहे, कीं ' हिंदस्वराज्या 'मध्यें मीं जे विचार दर्शविले आहेत, त्यांची गोखले हंसूनच संभावना करीत असत व म्हणत, " एक वर्षभर तुम्हीं हिंदुस्थानांत राहून अनुभव घेतलांत म्हणजे तुमचे विचार आपोआप ठिकाणावर येतील. "



# ५

# तिसऱ्या वर्गाच्या हालअपेष्टा

बरद्वानच्यापुढें आम्हांला तिसऱ्या वर्गाचीं तिकिटें घ्यावयाचीं होतीं. तीं मिळेपर्यंत नाकी नऊ आले. 'तिसऱ्या वर्गाच्या उतारूंना तिकिटें लवकर देण्यांत येत नाहींत.' असा जबाब मिळाला. मी स्टेशनमास्तरपाशीं गेलों. मला स्टेशन-मास्तरपर्यंत जाऊं तरी कोण देतो? कोणी एकानें मेहेरबानी करून स्टेशन-मास्तर दाखवून दिले. मी त्यांच्याकडे गेलो; त्यांच्याकडूनहि वरीलप्रमाणेंच जबाब मिळाला. 'खिडकी उघडली' तेव्हां तिकीट घेण्यास गेलों. पण तिकिटें मिळविणें सोपी गोष्ट नव्हती. बलवान उतारू एकामागून एक घुसत आणि माझ्यासारख्याला मागें हटवीत जात. अखेरीला एकदांचीं तिकिटें मिळालीं.

गाडी आली. तेथेंहि जोरदार होते ते आंत शिरले. आंतील उतारू व आंत शिरूं इच्छिणारे एकमेकांशीं वदंळीवर येत; धक्काबुक्की चाले. मला त्यांत भाग घेणें शक्यच नव्हतें. आम्ही तिघेहि इकडे तिकडे हिंडत होतों. प्रत्येक ठिकाणाहून जबाब एकच कीं, 'येथें जागा नाहीं.' मी गार्डकडे गेलों. तो म्हणाला, "मिळाली जागा तर बसा, नाहीं तर दुसऱ्या गाडीनें चला."

मी नम्रपणें म्हटलें, "पण मला जरूरीचें काम आहे." तें ऐकून घ्यायला गार्डला वेळच नव्हता. माझे उपाय हरले. मगनलालना जागा मिळेल तथें बसण्यास सांगितलें. पत्नीला घेऊन मीं तिसऱ्या वर्गाच्या तिकिटानें 'इंटर' मध्यें शिरलों. गार्डानें मला त्यामध्यें जातांना पाहिलें होतें.

आसनसोल स्टेशनवर गार्ड जादा भाडें घ्यायला आला. मीं म्हटलें, "मला जागा दाखवून देण्याचें तुमचें काम होतें. जागा मिळाली नाहीं त्यामुळें मी येथें बसलों आहें. तुम्ही मला तिसऱ्या वर्गांत जागा दिलीत, तर मी तिकडे जायला तयार आहें."

गार्डसाहेब म्हणाले, "माझ्यापाशीं ही वकिली चालणार नाहीं. माझ्या-पाशीं जागा नाहीं. पैसे द्यायचे नसतील, तर गाडींतून निघून जावें लागेल."

मला कसेंहि करून पुण्याला पोंचायचें होतें; गार्डबरोबर भांडण चाल-विण्याची माझी तयारी नव्हती. मीं त्याचे पैसे चुकते केले. त्यानें थेट पुण्यापर्यंतचें जादा भाडें घेतलें. मला हा अन्याय झोंबला.

सकाळीं मोंगलसराई स्टेशन आलें. मगनलालनीं तिसऱ्या वर्गांत जागा मिळविली होती. मोंगलसराईला मी तिसऱ्या वर्गांत गेलों. तिकिट-कलेक्टरला मीं ही हकीकत कळविली. त्याच्याकडून मीं आमच्या हकीकतीचें प्रमाणपत्र

मागितलें. त्यानें देण्याचें नाकारलें. मीं जादा भाड्याचे पैसे परत मिळण्याबद्दल रेल्वेच्या वरिष्ठाकडे अर्ज केला.

" प्रमाणपत्राखेरीज जादा पैसे परत देण्याचा आमचा रिवाज नाहीं; पण तुमच्या बाबतींत आम्ही ते परत देतों. बरद्वानपासून मोंगलसराईपर्यंतचें जादा भाडें मात्र देतां येणार नाहीं. " अशा अर्थाचा जबाब मिळाला.

यानंतरचे माझे तिसऱ्या वर्गाच्या प्रवासाचे अनुभव इतके आहेत, कीं त्यांचें पुस्तकच होईल. पण त्यांतील कांहीं प्रसंगोपात्त देण्यापलीकडे त्यांचा या प्रकरणामध्यें समावेश होण्यासारखा नाहीं. शरीरप्रकृतीमुळें तिसऱ्या वर्गाचा माझा प्रवास बंद झाला. ही गोष्ट नेहमीं माझ्या मनाला झोंबत आहे व झोंबत राहणार. तिसऱ्या वर्गाच्या प्रवासामध्यें अरेरावी, सत्तेमुळें होणारे अपमान व विटंबना तर असतातच; पण तिसऱ्या वर्गांत बसणाऱ्या कित्येक उतारूंचा उद्धटपणा, त्यांचा ओंगळपणा, त्यांची स्वार्थबुद्धि, त्यांचें अज्ञान हींसुद्धां कांहीं कमी नसतात. दुःखाची गोष्ट तर ही आहे, कीं पुष्कळदां आपण उद्धटपणानें वागत आहों, अथवा दुर्गंधि होण्यास मदत करीत आहों, किंवा आपला तेवढा स्वार्थ शोधीत आहों हें त्या उतारूंच्या लक्षांतहि येत नाहीं. प्रत्येक जण स्वतः जें करतो तें त्याला स्वाभाविक वाटतें; आम्ही सुधारलेल्या लोकांनीं तिकडे लक्षच दिलेलें नाहीं.

कल्याण जंक्शनवर आम्हीं दमले-भागलेले असे जाऊन पोंचलों. स्नान करण्याचा विचार केला. मगनलालनी व मीं स्टेशनच्या पंपानें पाणी काढून स्नान केलें. पण पत्नीसाठीं कांहीं तरी तजवीज करण्याच्या विचारांत होतों. इतक्यांत सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीचे श्री. कौल यांनीं आम्हांला ओळखलें. तेहि पुण्यासच चालले होते. पत्नीला दुसऱ्या वर्गाच्या खोलीमध्यें स्नानासाठीं आपण घेऊन जातों, असें ते म्हणाले. या त्यांच्या मेहेरबानीचा स्वीकार करण्याबद्दल मला संकोच वाटला. पत्नीला दुसऱ्या वर्गाच्या खोलीचा आश्रय घेण्याचा अधिकार नाहीं. हेंहि मला समजत नव्हतें असें नाहीं. पण मीं तिला त्या खोलींत स्नान करूं देण्याच्या अप्रशस्तपणाकडे कानाडोळा केला. सत्याच्या पुजाऱ्याला एवढेंहि शोभत नाहीं. पत्नीला कांहीं तिकडे जाण्याचीच हौस होती असें नाहीं; परंतु पतीच्या मोहरूप सुवर्णपात्रानें सत्याचें मुख झांकून टाकलें.



६

# माझा प्रयत्न

पुण्याला पोंचल्यानंतर उत्तरक्रिया वगैरे आटोपून सोसायटीचा योगक्षेम यापुढें कसा चालवावा आणि मी सोसायटींत दाखल व्हावें किंवा नाहीं, या प्रश्नाच्या चर्चेला आम्ही सर्वजण लागलों. माझ्यावर मोठा भार येऊन पडला. गोखले जिवंत असेपर्यंत मी सोसायटीमध्यें दाखल होण्याचा प्रयत्न करण्याचा प्रश्नच उपस्थित होत नव्हता. गोखल्यांची आज्ञा किंवा इच्छा असेल त्याप्रमाणे करायचें एवढेंच माझें काम होतें. ही स्थिति मला पसंत होती. भारतवर्षरूपी तुफानी समुद्रामध्यें माझ्या आयुष्याचें तारूं ढकलतांना मला कोणी सुकाणुदार पाहिजे होता, आणि गोखल्यांसारखा सुकाणुदार मिळाल्यावर मला कसलीच धास्ती नव्हती.

आतां मला वाटूं लागलें, कीं मीं सोसायटींत दाखल होण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे. गोखल्यांच्या आत्म्याची अशीच इच्छा असणार असें मला वाटे. मी संकोच न धरतां व दृढपणें त्या प्रयत्नाला लागलों. त्या वेळीं सोसायटीचे बहुतेक सर्व सभासद पुण्यांत उपस्थित होते. त्यांना विनविण्याचें व माझ्याविषयीं त्यांना जें भय वाटत होतें तें दूर करण्याचें काम मीं सुरू केलें. पण सभासदांमध्यें त्या बाबतींत मतभेद असल्याचें माझ्या नजरेला आलें. कांहींचें मत मला दाखल करण्याच्या बाजूचें होतें; इतर दृढपणें मला सोसायटींत घेण्याच्या विरुद्ध होते. दोघांनाहि माझ्याबद्दल प्रेम वाटत होतें, हें मला दिसतच होतें. पण माझ्याविषयींच्या प्रेमापेक्षां सोसायटीविषयींची त्यांची निष्ठा कदाचित् अधिक होती, प्रेमापेक्षां कमी तर नव्हतीच.

त्यामुळें आमची सर्व चर्चा भित्रत्वाच्या नात्यानें व केवळ सिद्धान्तांना अनुसरून चाललेली होती. विरुद्ध पक्षाच्या मंडळीला असें वाटत होतें, कीं अनेक बाबतींत माझ्या व त्यांच्या विचारामध्यें उत्तर दक्षिण ध्रुवांइतकें अंतर आहे. याहूनहि विशेष म्हणजे त्यांना असें वाटत होतें, कीं ज्या ध्येयावर दृष्टि ठेवून गोखल्यांनीं सोसायटीची रचना केली, त्या ध्येयांनाच माझ्या सोसायटींत राहण्यानें धक्का पोंचण्याचा पूर्ण संभव आहे; अर्थातच हें त्यांना सहन होण्यासारखें नव्हतें.

पुष्कळ चर्चा झाल्यानंतर आम्ही आपापल्या ठिकाणीं गेलों. सभासदांनीं अखेरचा निर्णय करण्याचें पुढील सभेवर टाकलें.

घरीं जात असतां मी विचारांच्या भोंवऱ्यांत सांपडलों. सोसायटींत बहु-मतानें दाखल होण्याचा प्रसंग आला तर तसें दाखल होणें इष्ट म्हणतां येईल का? ही माझी गोखल्यांबद्दलची निष्ठा म्हणतां येईल का? माझ्याविरुद्ध मत पडलें

तर त्यामुळें सोसायटीची स्थिति बिकट करण्याला मीच कारण झालों असें नाहीं का होणार ? मला स्पष्ट दिसून आलें, कीं सोसायटीच्या सभासदांमध्यें जोंपर्यंत मला दाखल करण्याबद्दल मतभेद असेल, तोंपर्यंत माझा मींच दाखल होण्याचा आग्रह सोडून दिला पाहिजे; तेणेंकरूनच विरुद्ध पक्षाची नाजुक स्थितींत पडण्यापासून सुटका होईल, आणि त्यानेंच सोसायटी व गोखले यांच्याबद्दलचें माझें कर्तव्य मीं केलें असें होईल. अंतरात्म्यांत हा निर्णय होतांच मीं श्री. शास्त्री यांना पत्र लिहिलें, कीं त्यांनीं मी दाखल होण्याचा विचार करण्याकरितां सभा भरवूंच नये. विरोध करणारांना हा माझा निश्चय फार आवडला. ते धर्मसंकटांतून वचावले. त्यांच्या-माझ्यामधील स्नेहबंधन अधिक मजबूत झालें; आणि सोसायटीमध्यें दाखल होण्यासंबंधींचा माझा अर्ज परत घेऊनच मी सोसायटीचा खराखुरा सभासद झालों.

अनुभवानें आतां मला दिसतें, कीं मी सोसायटीचा रीतसर सभासद झालों नाहीं हें ठीकच झालें; व सभासदांनीं माझ्या सभासदत्वाला केलेला विरोध योग्य होता. त्यांच्या-माझ्या सिद्धान्तांमध्यें भेद असल्याचें अनुभवानें सिद्ध झालें आहे. पण मतभेदाची जाणीव असतांहि त्यांच्या-माझ्यामध्यें आत्म्याचें अंतर कधींच पडलेलें नाहीं. कटुता कधींच उत्पन्न झालेली नाहीं. मतभेद असतांहि आमचें बंधुत्वाचें व मैत्रीचें नातें कायम राहिलें आहे. सोसायटीचें स्थान माझ्या दृष्टीनें नेहमीं यात्रेचें स्थानच होऊन राहिलें आहे. लौकिक दृष्टीनें मी तिचा सभासद नसेना का, पण आध्यात्मिक दृष्टीनें मी सभासद आहेंच. लौकिक संबंधापेक्षां आध्यात्मिक संबंध अधिक मौल्यवान आहे. आध्यात्मिक संबंधाखेरीज लौकिक संबंध हा प्राणाशिवायच्या देहाप्रमाणें होय.

● ● ●

७

# कुंभ

मला डॉक्टर प्राणजीवन मेहता यांना भेटण्यासाठीं रंगूनला जावयाचें होतें. तिकडे जातांना कलकत्त्यामध्यें श्री. भूपेंद्रनाथ बसूंच्या निमंत्रणावरून मी त्यांच्याकडे उतरलों होतों. येथें बंगाली शिष्टाचाराची परमावधि झाली. त्या वेळीं मी फलाहारच करीत असें. माझ्याबरोबर माझा मुलगा रामदास हा होता. जेवढीं म्हणून सुकीं किंवा ताजीं फळें कलकत्त्यांत मिळण्यासारखीं होतीं, तेवढीं सगळीं एकत्र करण्यांत आलीं होतीं. स्त्रियांनीं रात्रभर जागरण करून पिस्ते वगैरे भिजत घालून त्यांच्या साली काढून ठेवल्या होत्या. ताजीं फळेंहि जितक्या सुरेख तऱ्हेनें तयार करणें शक्य होतें तितक्या सुरेख तऱ्हेनें तयार केलेलीं होतीं. माझ्या जोडीदारां-

साठीं अनेक तऱ्हांचीं पक्वानें शिजविलेलीं होतीं. त्यांतील प्रेम व शिष्टाचार मला कळत होतीं. परंतु एक दोन पाहुण्यांसाठीं सर्व घर सबंध दिवस गुंतलेलें राहावें हें मला असह्य वाटलें. माझ्या हातीं या विटंबनेंतून निसटून जाण्याचा इलाज नव्हता.

रंगूनला जातांना बोटीवर मी डेकचा उतारू होतों. श्री. बसूंकडे प्रेममूलक विटंबना होती, तर बोटीवर अप्रेम-मूलक विटंबना होती. डेकच्या उतारूंचे हाल भरपूर अनुभवास आले. स्नानाच्या जागीं उभें राहाणेंहि अशक्य इतकी घाण, पायखाना म्हणजे नरककुंड. पायखान्यांत जायचें म्हणजे अगोदर मलमूत्र तुडवीत किंवा ओलांडीत गेलें पाहिजे! मला तरी या अडचणी फारच कठिण गेल्या. मी मालिमाकडे गेलों, मग दाद घेतो कोण? उतारूंनीं आपल्या घाणींनें डेक बिघडवून टाकलें होतें. बसल्या जागींच थुंकत, तेथेंच तंबाखूची पिचकारी सोडीत, अन्नांतील कचराहि तेथेंच टाकीत. गप्पांच्या गोंगाटाला पारावारच नाहीं. प्रत्येकजण आपल्याला अडवितां येईल तेवढी जागा अडवी. कोणी कोणाच्या सोयीचा विचार बिलकुल करीत नसे. स्वतः जागा अडवीत, त्यापेक्षां त्यांच्या सामानानें अधिक जागा अडत असे. बोटींतले ते दोन दिवस मोठ्या कष्टानें काढले.

रंगूनला पोंचतांच एजंटला मीं सर्व हकीकत लिहून पाठविली. परंतु येतांनाहि आलों तो डेकवरूनच. पण या पत्रामुळें व डॉक्टर मेहतांनीं केलेल्या व्यवस्थेमुळें त्या मानानें बरी सोय लागली होती.

तेथेंसुद्धां माझ्या फलाहाराची उठाठेव नेहमींच्या मानानें फाजीलच होती. डॉक्टर मेहतांचें घर म्हणजे माझेंच म्हणतां येईल असा त्यांचा-माझा संबंध होता. त्यामुळें मीं खाण्याच्या जिनसांवर कांहींसा निर्बंध घातला होता, पण पदार्थ अमुक इतकेच खायचे असा मीं नियम केलेला नव्हता; त्यामुळें पुष्कळ प्रकारचीं फळें येत, त्यांना मी हरकत घेत नसें. अधिक प्रकार असले म्हणजे डोळ्यांना व जिभेला बरें वाटे. खाण्याची वेळ वाटेल ती असे. मला स्वतःला लवकर आटपून घेणें पसंत असे. त्यामुळें फार उशीर होत नसे खरा; पण रात्रीचे आठ नऊ तर सहज वाजत.

या म्हणजे १९१५ सालीं हरिद्वारला कुंभमेळा होता. त्याला जाण्याची मला फारशी इच्छा अशी नव्हती; पण मला महात्मा मुनशीरामजींच्या दर्शनाला जावयाचेंच होतें. कुंभमेळ्याचे प्रसंगीं गोखल्यांच्या सेवकसमाजानें एक मोठी तुकडी पाठविली होती. तिची व्यवस्था श्रीयुत हृदयनाथ कुंझरू यांचेकडे होती. कै. डॉक्टर देवहि तिच्यामध्यें होते. त्या कामीं मदत करायला मीं माझ्या तुकडीलाहि घेऊन जावें असें ठरलें होतें. मगनलाल गांधी शान्तिनिकेतनामध्यें असलेल्या तुकडीला घेऊन माझ्यापूर्वींच हरिद्वारला जाऊन पोंचले होते. मी रंगूनहून परत आल्यानंतर त्यांना जाऊन मिळालों.

कलकत्त्याहून हरिद्वारला जाऊन पोंचेपर्यंत खूप त्रास काढावा लागला. डब्यांत कित्येक वेळां दिवाबत्तीहि नसे. सहराणपूरहून पुढें तर मालाच्या किंवा जनावरांच्या डब्यांतच उतारूंनाहि कोंबलें होतें. उघडे डबे, वरून माध्यान्हींच्या सूर्याचा ताप व खालीं निव्वळ लोखंडाची तप्त बैठक; मग ते हाल काय पुसावे? तरी पण भाविक हिंदू खूप तहान लागलेली असतांहि 'मुसलमान-पाणी' येई तें पीत ना. 'हिंदु-पाणी' हा ध्वनि येई तेव्हांच पाणी पीत. त्याच भाविक हिंदूंना डॉक्टर औषधामध्यें दारू देवोत, मुसलमान किंवा खिस्ती पाणी देवोत किंवा मांसाचें सत्त्व देवोत तें घेण्याचा संकोच वाटत नाहीं, चौकशी करण्याचें कारणहि वाटत नाहीं.

शान्तिनिकेतनामध्येंच आम्हांला दिसून आलें होतें, कीं भंगीकाम करणें हाच आमचा हिंदुस्थानांत खास धंदा होऊन बसणार. सेवकांसाठीं एका धर्मशाळेच्या जागेंत तंबू ठोकण्यांत आले होते. पायखान्यासाठीं डॉ. देव यांनीं खड्डे खणविले होते. पण त्या खड्डयांची व्यवस्था डॉ. देव तरी असल्या वेळीं जे थोडेसे पगारदार भंगी मिळूं शकतील त्यांच्यामार्फतच करूं शकणार ना? या खड्डयांमध्यें पडणारा मळ वरचेवर मातीनें झांकून काढण्याचें व ते इतर तऱ्हांनीं साफ राखण्याचें काम फिनिक्सच्या तुकडीनें आपल्याकडे घ्यावें ही माझी मागणी डॉक्टर देव यांनीं आनंदानें मान्य केली. ही सेवा करण्याची मागणी करणारा मी, पण ती प्रत्यक्ष करण्याची जबाबदारी उचलणारे मगनलाल गांधी.

माझा धंदा बहुतांशीं तंबूमध्यें बसून 'दर्शन' देणें आणि अनेक यात्रेकरू येत त्यांच्याबरोबर धर्मासंबंधीं व तसलीच चर्चा करणें हाच होऊन बसला. दर्शन देतां देतां मी बेजार झालों. त्यांतून एका मिनिटाचीसुद्धां फुरसत मिळत नसे. स्नानाला जावें तरी तेथेंहि दर्शनाभिलाषी लोक मला एकटा राहूं देत ना. फराळ करीत असतांना तर एकान्ताची गोष्टच बोलायला नको. तंबूमध्यें कोठेंहि एक क्षणभरमुद्धां मला निवान्त बसायला मिळत नसे. दक्षिण आफ्रिकेमध्यें जी कांहीं सेवा घडूं शकली तिचा एवढा खोल परिणाम साऱ्या भरतखंडभर झाल्याचें हरिद्वारमध्येंच माझ्या अनुभवाला आलें.

जात्याच्या दोन पेढांमध्यें सांपडून चुराडा व्हावा त्यांतली माझी स्थिति झाली. अनोळखी ठिकाणीं तिसऱ्या वर्गाचा उतारू म्हणून कष्ट भोगायचे, आणि जेथें उतरावें तेथें दर्शनार्थी लोकांच्या प्रेमानें गांजलें जायचें. दोहोंपैकीं कोणती स्थिति अधिक करुणाजनक असेल तें सांगणें पुष्कळ वेळां मला कठिण दिसतें. दर्शनार्थी लोकांच्या प्रेमाच्या दर्शनाचा मला अनेक वेळां राग आलेला आहे आणि मनांतल्या मनांत तर त्याहून अधिक वेळां जळफळलों आहें, एवढें मात्र मला माहीत आहे. तिसऱ्या वर्गाच्या कष्टांमुळें मला गैरसोई सहन कराव्या लागल्या

असल्या तरी क्रोध क्वचितच आला आहे आणि त्यापासून माझी तर उन्नतिच झालेली आहे.

या वेळीं माझ्यामध्यें हिंडण्याफिरण्याची शक्ति पुरेशी होती. त्यामुळें मी खूप भटकूं शकलों. रस्त्यांतून फिरण्याचीहि पंचाईत पडण्याइतका त्या काळीं मी प्रसिद्ध झालों नव्हतों. या भ्रमणामध्यें लोकांच्या धर्मभावनेपेक्षां त्यांचा बावळट-पणा, चंचलता, पाखंड व अव्यवस्था हींच माझ्या अधिक प्रत्ययाला आली. साधूंचें तर पेंवच फुटलें होतें. ते फक्त मालपुवा व खीर खायलाच जन्मास आले असावे असें दिसलें. येथें मी पांच पायांची गाय पाहिली. मला तर आश्चर्य वाटलें. पण अनुभवी माणसांनीं माझें अज्ञान लवकरच दूर केलें. पांच पायांची गाय म्हणजे दुष्ट लोकांनीं घेतलेला बळी होय. या गाईच्या खांद्यांत जिवंत वासराचे पाय कापून व खांदाहि कापून काढून त्याला तो पाय बसवून देण्यांत येतो. आणि दुहेरी हत्येनें तयार झालेल्या त्या गाईचा अज्ञानी लोकांना ठकविण्याच्या कामीं उपयोग करण्यांत येतो. पांच पायांच्या गाईचें दर्शन घेण्याचा लोभ कोणत्या हिंदूला होणार नाही ? त्या दर्शनासाठीं त्यानें कितीहि दान केलें तरी तें थोडेंच.

कुंभाचा दिवस येऊन ठेपला. माझ्या दृष्टीनें ती धन्य घडी होती. मी हरिद्वारला गेलों तो यात्रेच्या भावनेनें गेलों नव्हतों. तीर्थक्षेत्रांना पवित्रतेच्या आपेक्षेनें जाण्याचा मोह मला कधींच वाटलेला नाही. पण सत्तर लाख माणसें सगळीं पाखंडी असणें शक्य नाहीं. मेळ्यामध्यें सत्तर लाख माणसें आलीं असावीं असें म्हणत. त्यांतील असंख्य माणसें पुण्य कमाविण्यासाठीं, आत्मशुद्धि प्राप्त करण्यासाठीं आलेलीं आहेत याबद्दल मला बिलकुल शंका नव्हती. अशा प्रकारची श्रद्धा आत्म्याला कोठपर्यंत उन्नत करीत असते तें सांगणें अशक्य नाहीं तरी कठिण तर आहेच.

रात्रीं अंथरुणांत पडल्यापडल्या मी विचारसागरामध्यें मग्न झालों. चारी बाजूंना पसरलेल्या या पाखंडामध्यें हे असले पवित्र आत्मेहि आहेतच. ईश्वराच्या दरबारांत ते शिक्षेस पात्र गणले जाणार नाहींत. हरिद्वारमध्यें अशा प्रसंगीं येणें हेंच जर पाप असेल, तर उघडपणें विरोध करून कुंभाच्या दिवशीं तरी हरिद्वारचा त्याग करणें माझें कर्तव्य होतें. येथें येण्यामध्यें व कुंभाच्या दिवशीं राहाण्यामध्यें जर पाप नसेल तर माझें कर्तव्य कोणतें तरी कडक व्रत घेऊन चालू पापाचें प्रायश्चित्त करणें, आत्मशुद्धि करणें हेंच होय. माझें सारें जीवनच व्रतांवर आधारलेलें आहे, म्हणून मीं कसलें तरी कडक व्रत घेण्याचा निश्चय केला. कलकत्ता व रंगून येथें माझ्या निमित्तानें यजमानांना पडलेल्या अनावश्यक त्रासाचें मला स्मरण झालें. म्हणून मीं आहाराच्या वस्तूंची संख्या मर्यादित करण्याचें व अंधार पडण्यापूर्वीं जेवण आटोपण्याचें व्रत घेण्याचा निश्चय केला. मीं असें पाहिलें, कीं जर मीं

घालावें अशी आवश्यकता मला दिसत नाहीं. शिवाय जानवें धारण करणें म्हणजे दुसरा जन्म घेणें; म्हणजेच आपण इरादापूर्वक शुद्ध होणें, ऊर्ध्वगामी होणें. सध्यां हिंदुसमाज व हिंदुस्थान पतितावस्थेमध्यें आहेत; अशा स्थितींत जानवें घालण्याचा आपल्याला अधिकार तरी कोठें आहे? हिंदुसमाज अस्पृश्यतेचा मळ काढून टाकील, उच्चनीचपणाची भावना विसरून जाईल, अंगीं खिळून राहिलेले इतर दोष काढून टाकील, चारी बाजूंना पसरलेले अधर्म–पाखंड दूर करील, तेव्हां मग त्याला जानव्याचा अधिकार प्राप्त होणार असेल तर होवो. यासाठीं जानवें वापरण्यासंबंधींचें तुमचें म्हणणें मला पटत नाहीं. पण शेंडीसंबंधींच्या तुमच्या सांगण्याचा मला अवश्य विचार केला पाहिजे. ती मी ठेवीतच होतों. मीं ती लज्जा व भय यांमुळेंच कापून टाकली आहे. ती ठेवणें आवश्यक आहे असें मला दिसतें. माझ्या सोबत्यांबरोबर मी ह्या गोष्टीचा विचार करीन.''

जानव्यासंबंधींचें माझें म्हणणें स्वामींना रुचलें नाहीं. जानवें न वापरण्याच्या बाजूचीं म्हणून जीं कारणें मीं दर्शविलीं, तींच त्यांना वापरण्याच्या बाजूचीं वाटलीं. जानव्यासंबंधीं हृषीकेशमध्यें मीं दर्शविलेले विचार आजहि जवळजवळ तसेच कायम आहेत. जोंपर्यंत निरनिराळे धर्म चालू आहेत, तोंपर्यंत प्रत्येक धर्माला कसल्या तरी बाह्य चिन्हाची कदाचित् आवश्यकता असेलहि. पण जेथें त्या बाह्य चिन्हाचेंच स्तोम वाढलें असेल, किंवा आपल्या धर्माला इतर धर्मांपासून वेगळा करून दाखविण्यासाठींच त्याचा उपयोग होत असेल, तेव्हां तें त्याज्य ठरतें. सध्यां जानव्यामुळें हिंदुधर्माची उन्नति होत असलेली मला दिसत नाहीं. त्यामुळें मी त्यासंबंधीं उदासीन आहें.

शेंडी काढल्याबद्दल माझी मलाच लाज वाटत होती. त्यामुळें तिच्यासंबंधीं सोबत्यांबरोबर चर्चा करून ती ठेवण्याचा मीं निश्चय केला. पण आतां आपल्याला लक्ष्मण झूलाकडे गेलें पाहिजे.

हृषीकेश व लक्ष्मण झूला येथील सृष्टिसौंदर्य मला फार आवडलें. आमच्या पूर्वजांची निसर्गाची कला ओळखण्याची शक्ति व कलेला धार्मिक स्वरूप देण्यांत त्यांनीं दाखविलेला दूरदर्शीपणा यांचेबद्दल मनामध्यें अत्यादर उत्पन्न झाला.

पण माणसांची कृति पाहून मात्र मनाला समाधान वाटलें नाहीं. हरिद्वारमध्यें, त्याचप्रमाणें हृषीकेशमध्यें लोक रस्ते व गंगेचा सुंदर कांठ घाणेरडा करून टाकीत होते. गंगेचें पवित्र पाणी कलुषित करण्याचाहि त्यांना संकोच वाटत नव्हता. शौचाला जाणारे लोक दूर एका बाजूला न जातां माणसांची ये–जा चालू असलेल्या ठिकाणींच बसत असत. हें पाहून माझ्या हृदयाला मोठा धक्का बसला.

लक्ष्मण झूलाला जातांना लोखंडी झुलता पूल पाहिला. लोकांकडून माहिती मिळाली, कीं प्रथम तर हा पूल दोरखंडाचा पण खूप मजबूत असा होता.

एका उदार मनाच्या मारवाड्यानें तो तोडवून त्याचे जागीं मोठें दान देऊन लोखंडी पूल बनविला, व त्याची किल्ली सरकारच्या ताब्यांत दिली! दोरखंडाचा पूल कसा काय होता त्याची मला कांहींच कल्पना नाही, पण लोखंडी पूल मात्र त्या नैसर्गिक वातावरणाशीं विजोड दिसत होता आणि कसासाच वाटत होता. यात्रेकरू लोकांच्या या पुलाची चावी सरकारच्या स्वाधीन करण्यांत यावी हें त्या वेळच्या माझ्या राजनिष्ठेलाहि असह्य झालें.

त्यापलीकडे दुःखकारक दृश्य स्वर्गाश्रमाचें होतें. जस्ताच्या पत्र्यांच्या तबेल्यासारख्या चाळीला 'स्वर्गाश्रम' नांव देण्यांत आलें होतें. तो साधकांसाठीं बनविलेला आहे असें मला सांगण्यांत आलें. त्यांत साधक असे त्या वेळीं क्वचि-तच कोणी राहात होते. त्याला लागून असलेल्या मुख्य घरामध्यें राहात असलेल्या मंडळींसंबंधानेंहि माझा फारसा अनुकूल ग्रह झाला नाहीं.

पण हरिद्वारचे अनुभव मला अत्यंत उपयोगी पडले. मीं कोठें राहावें व काय करावें तें ठरविण्याच्या कामीं हरिद्वारच्या अनुभवांची मला फार मदत झाली.

• • •

९

# आश्रमाची स्थापना

कुंभाच्या यात्रेसाठीं मी गेलों होतों. ती माझी हरिद्वारची दुसरी खेप होय.

सत्याग्रहाश्रमाची स्थापना २९ मे १९१५ रोजीं झाली. श्रद्धानंदजींची मागणी होती, कीं मी हरिद्वारमध्यें राहावें; कलकत्त्याच्या कित्येक मित्रांचा अभिप्राय वैद्यनाथधामामध्यें राहावें असा होता. राजकोटमध्यें राहण्याबद्दल कित्येक मित्रांचा फार आग्रह होता.

पण मी अहमदाबादवरून पुढें जात असतां पुष्कळ मित्रांनीं मला अहमदा-बाद पसंत करण्यास सांगितलें, व आश्रमाचा खर्च आपणच पुरा पाडण्याचें त्यांनीं वचन दिलें. घर शोधून देण्याचेंहि त्यांनीं कबूल केलें.

अहमदाबादवर माझी दृष्टि होतीच. मी गुजराथी असल्यामुळें गुजराथ-मार्फतच देशाची अधिकांत अधिक सेवा करूं शकेन अशी माझी समजूत होती. अहमदाबाद एकेकाळीं हातमागांचें मोठें केंद्र असल्यामुळें चरख्याचें काम येथेंच अधिक चांगल्या तऱ्हेनें चालेल अशी पण समजूत होती. गुजराथची राजधानी असल्यानेंहि येथील धनाढ्य लोकांकडून पैशाची मदतहि होऊं शकेल ही आशा-सुद्धां होतीच.

घालावें अशी आवश्यकता मला दिसत नाहीं. शिवाय जानवें धारण करणें म्हणजे दुसरा जन्म घेणें; म्हणजेच आपण इरादापूर्वक शुद्ध होणें, ऊर्ध्वगामी होणें. सध्यां हिंदुसमाज व हिंदुस्थान पतितावस्थेमध्यें आहेत; अशा स्थितींत जानवें घालण्याचा आपल्याला अधिकार तरी कोठें आहे? हिंदुसमाज अस्पृश्यतेचा मळ काढून टाकील, उच्चनीचपणाची भावना विसरून जाईल, अंगीं खिळून राहिलेले इतर दोष काढून टाकील, चारी बाजूंना पसरलेले अधर्म–पाखंड दूर करील, तेव्हां मग त्याला जानव्याचा अधिकार प्राप्त होणार असेल तर होवो. यासाठीं जानवें वापरण्यासंबंधींचें तुमचें म्हणणें मला पटत नाहीं. पण शेंडीसंबंधींच्या तुमच्या सांगण्याचा मला अवश्य विचार केला पाहिजे. ती मी ठेवीतच होतों. मीं ती लज्जा व भय यांमुळेंच कापून टाकली आहे. ती ठेवणें आवश्यक आहे असें मला दिसतें. माझ्या सोबत्यांबरोबर मी ह्या गोष्टीचा विचार करीन."

जानव्यासंबंधींचें माझें म्हणणें स्वामींना रुचलें नाहीं. जानवें न वापरण्याच्या बाजूचीं म्हणून जीं कारणें मीं दर्शविलीं, तींच त्यांना वापरण्याच्या बाजूचीं वाटलीं. जानव्यासबंधीं हृषीकेशमध्यें मीं दर्शविलेले विचार आजहि जवळजवळ तसेच कायम आहेत. जोंपर्यंत निरनिराळे धर्म चालू आहेत, तोंपर्यंत प्रत्येक धर्माला कसल्या तरी बाह्य चिन्हाची कदाचित् आवश्यकता असेलहि. पण जेथं त्या बाह्य चिन्हाचेंच स्तोम वाढलें असेल, किंवा आपल्या धर्माला इतर धर्मांपासून वेगळा करून दाखविण्यासाठीच त्याचा उपयोग होत असेल, तेव्हां तें त्याज्य ठरतें. सध्यां जानव्यामुळें हिंदुधर्माची उन्नति होत असलेली मला दिसत नाहीं. त्यामुळें मी त्यासंबंधीं उदासीन आहें.

शेंडी काढल्याबद्दल माझी मलाच लाज वाटत होती. त्यामुळें तिच्यासंबंधीं सोबत्यांबरोबर चर्चा करून ती ठेवण्याचा मीं निश्चय केला. पण आतां आपल्याला लक्ष्मण झूलाकडे गेलें पाहिजे.

हृषीकेश व लक्ष्मण झूला येथील सृष्टिसौंदर्य मला फार आवडलें. आमच्या पूर्वजांची निसर्गाची कला ओळखण्याची शक्ति व कलेला धार्मिक स्वरूप देण्यांत त्यांनीं दाखविलेला दूरदर्शीपणा यांचेबद्दल मनामध्यें अत्यादर उत्पन्न झाला.

पण माणसांची कृति पाहून मात्र मनाला समाधान वाटलें नाहीं. हरिद्वारमध्यें, त्याचप्रमाणें हृषीकेशमध्यें लोक रस्ते व गंगेचा सुंदर कांठ घाणेरडा करून टाकीत होते. गंगेचें पवित्र पाणी कलुषित करण्याचाहि त्यांना संकोच वाटत नव्हता. शौचाला जाणारे लोक दूर एका बाजूला न जातां माणसांची ये–जा चालू असलेल्या ठिकाणींच बसत असत. हें पाहून माझ्या हृदयाला मोठा धक्का बसला.

लक्ष्मण झूलाला जातांना लोखंडी झुलता पूल पाहिला. लोकांकडून माहिती मिळाली, कीं प्रथम तर हा पूल दोरखंडाचा पण खूप मजबूत असा होता.

एका उदार मनाच्या मारवाड्यानें तो तोडवून त्याचे जागीं मोठें दान देऊन लोखंडी पूल बनविला, व त्याची किल्ली सरकारच्या ताब्यांत दिली! दोरखंडाचा पूल कसा काय होता त्याची मला कांहींच कल्पना नाही, पण लोखंडी पूल मात्र त्या नैसर्गिक वातावरणाशीं विजोड दिसत होता आणि कसासाच वाटत होता. यात्रेकरू लोकांच्या या पुलाची चावी सरकारच्या स्वाधीन करण्यांत यावी हें त्या वेळच्या माझ्या राजनिष्ठेलाहि असह्य झालें.

त्यापलीकडे दुःखकारक दृश्य स्वर्गाश्रमाचें होतें. जस्ताच्या पत्र्यांच्या तबेल्यासारख्या चाळीला ‘ स्वर्गाश्रम ’ नांव देण्यांत आलें होतें. तो साधकांसाठीं बनविलेला आहे असें मला सांगण्यांत आलें. त्यांत साधक असे त्या वेळीं क्वचितच कोणी राहात होते. त्याला लागून असलेल्या मुख्य घरामध्यें राहात असलेल्या मंडळींसंबंधानेंहि माझा फारसा अनुकूल ग्रह झाला नाहीं.

पण हरिद्वारचे अनुभव मला अत्यंत उपयोगी पडले. मीं कोठें राहावें व काय करावें तें ठरविण्याच्या कामीं हरिद्वारच्या अनुभवांची मला फार मदत झाली.

●●●

# ९

# आश्रमाची स्थापना

कुंभाच्या यात्रेसाठीं मी गेलों होतों. ती माझी हरिद्वारची दुसरी खेप होय.

सत्याग्रहाश्रमाची स्थापना २९ मे १९१५ रोजीं झाली. श्रद्धानंदजींची मागणी होती, कीं मी हरिद्वारमध्यें राहावें; कलकत्त्याच्या कित्येक मित्रांचा अभिप्राय वैद्यनाथधामामध्यें राहावें असा होता. राजकोटमध्यें राहण्याबद्दल कित्येक मित्रांचा फार आग्रह होता.

पण मी अहमदाबादवरून पुढें जात असतां पुष्कळ मित्रांनीं मला अहमदाबाद पसंत करण्यास सांगितलें, व आश्रमाचा खर्च आपणच पुरा पाडण्याचें त्यांनीं वचन दिलें. घर शोधून देण्याचेंहि त्यांनीं कबूल केलें.

अहमदाबादवर माझी दृष्टि होतीच. मी गुजराथी असल्यामुळें गुजराथमार्फतच देशाची अधिकांत अधिक सेवा करूं शकेन अशी माझी समजूत होती. अहमदाबाद एकेकाळीं हातमागांचें मोठें केंद्र असल्यामुळें चरख्याचें काम येथेंच अधिक चांगल्या तऱ्हेनें चालेल अशी पण समजूत होती. गुजराथची राजधानी असल्यानेंहि येथील धनाढ्य लोकांकडून पैशाची मदतहि होऊं शकेल ही आशासुद्धां होतीच.

अहमदाबादच्या मित्रांबरोबर चर्चा होत असतांना अस्पृश्यांचा प्रश्न निघाला होता. मीं स्पष्टपणें सांगून टाकलें होतें कीं, जर एकादा लायक अंत्यज बंधु आश्रमांत येऊं इच्छिणारा भेटला तर मी त्याला अवश्य घेईन.

'तुमच्या अटीचें पालन करूं शकतील असे अंत्यज थोडेच वाटेवर पडले आहेत ?' असें म्हणून एका वैष्णव मित्रांनीं स्वतःच्या मनाची समजूत केली. अखेरीला अहमदाबादमध्यें राहाण्याचा निश्चय झाला.

घराचा तपास करतां मला अहमदाबादमध्यें राहवून घेणारांमध्यें श्री. जीवनलाल बॅरिस्टर प्रमुख होते. त्यांचेंच कोचरबमध्यें असलेलें घर भाड्यानें घेण्याचें ठरलें.

आश्रमाला नांव काय द्यावयाचें हा प्रश्न लगेच उपस्थित झाला. मित्रांबरोबर विचार केला. कांहीं नांवें पुढें आलीं. सेवाश्रम, तपोवन वगैरे सुचविण्यांत आलीं होतीं. सेवाश्रम नांव बरें वाटत होतें; पण त्यावरून सेवेच्या पद्धतीची कांहीं कल्पना येत नव्हती. तपोवन नांव पसंत करणें शक्यच नव्हतें. कारण तपश्चर्या जरी प्रिय असली, तरी हें नांव फारच अवजड वाटलें. आम्हांला तर सत्याची पूजा, सत्याचा शोध, कर्तव्य होता, त्याचाच आग्रह धरावयाचा होता आणि दक्षिण आफ्रिकेमध्यें ज्या पद्धतीचा उपयोग मीं केला तिचीच ओळख भारतवर्षामध्यें करून द्यायची होती, आणि तिची शक्ति कोठपर्यंत पोंचूं शकते तें पाहायचें होतें. त्यासाठीं मी व माझ्या सोबत्यांनीं 'सत्याग्रहाश्रम' नांव पसंत केलें. त्यामध्यें सेवा व सेवेची पद्धति या दोहोंचेंहि दिग्दर्शन सहजींच होत होतें.

आश्रम चालविण्यासाठीं नियमावलीची आवश्यकता होती. त्यासाठीं नियमावलि तयार करून तिच्यावर अभिप्राय मागविले. अनेकांचे अभिप्राय आले; त्यांत सर गुरुदास बानर्जींनीं दिलेला अभिप्राय माझ्या स्मरणांत राहिलेला आहे. त्यांना नियमावलि आवडली, पण त्यांची अशी सूचना होती, कीं व्रतामध्यें नम्रपणाच्या व्रताला स्थान दिलें पाहिजे. आपल्या युवकवर्गामध्यें नम्रतेची उणीव आहे असा त्यांच्या पत्राचा ध्वनि होता. नम्रपणाचा अभाव मला ठिकठिकाणीं जाणवत होता खरा; पण नम्रपणाला व्रतांमध्यें स्थान दिल्यानें नम्रता ही नम्रता राहातच नाहीं अशी शंका वाटत होती. नम्रतेचा पुरा अर्थ तर शून्यता होय. इतर व्रतें हीं शून्य प्राप्त करण्याचीं साधनें आहेत. शून्यता हीं मोक्षाची स्थिति आहे. मुमुक्षूच्या किंवा सेवकाच्या प्रत्येक कार्यामध्यें जर नम्रता—निरभिमानता—नसेल तर तो मुमुक्षु नव्हे, सेवक नव्हे. तो स्वार्थी होय, अहंकारी होय.

आश्रमामध्यें त्या वेळीं सुमारें तेरा असामी तामिळी होते. माझ्याबरोबर दक्षिण आफ्रिकेहून पांच तामिळी मुलें आलीं होतीं व बाकीचीं येथील. सुमारें पंचवीस स्त्री-पुरुषांनिशीं आश्रमाची सुरुवात झाली. सर्वजण एकत्र जेवीत असत

व एकाच कुटुंबाचीं माणसें असावीं अशा तऱ्हेनें वागण्याचा प्रयत्न करीत.

●●●

## १०

# क सो टी

आश्रम अस्त्वांत येऊन थोडेसे महिनेहि लोटले नाहींत इतक्यांतच मी आशाहि केली नव्हती अशा तऱ्हेची आमची कसोटी झाली. भाई अमृतलाल ठक्कर यांच्याकडून पत्र आलें, 'एक गरीब व प्रामाणिक अंत्यज कुटुंब आहे. त्याची इच्छा तुमच्या आश्रमांत येऊन राहाण्याची आहे. त्यांना घ्याल का ?'

मीं चपापलों तर खराच. ठक्कर बाप्पासारख्यांची शिफारस आणणारें अंत्यज कुटुंब इतक्या लवकर येईल अशी आशा मी बिलकुल केली नव्हती. सोबत्यांना पत्र वाचून दाखविलें. त्यांनीं पत्राबद्दल समाधान व्यक्त केलें. तें कुटुंब आश्रमाचे नियम पाळण्यास तयार असलें तर त्याला दाखल करण्याची तयारी भाई अमृतलाल ठक्कर यांस कळविली.

दूदाभाई, त्यांच्या पत्नी दानीबेन आणि रांगती अंगावरची लक्ष्मी अशीं तिघेंजणें आलीं. दूदाभाई मुंबईमध्यें शिक्षकाचें काम करीत असत. ते नियमाचें पालन करण्यास तयार होते. त्यांना आश्रमांत घेतलें.

साहाय्यक मित्रमंडळामध्यें खळबळ उडाली. विहिरीमध्यें बंगल्याच्या मालकाचा भाग होता; त्या विहिरींतून पाणी काढण्यास अडचण पडूं लागली. मोटवाल्याच्या अंगावर आमच्या पाण्याचे शिंतोडे उडाले, तरी तेवढ्यानें त्याला विटाळ होणार ! त्यानें शिवीगाळ सुरू केली, दूदाभाईना त्रास द्यायला सुरुवात केली. त्याच्या शिव्यांना प्रत्युत्तर देऊं नये व दृढतापूर्वक पूर्वीप्रमाणेंच पाणी भरीत जावें असें मी सर्वांस सांगितलें. आम्ही शिव्या गुपचूप ऐकून घेतों असें पाहून मोटवाला शरमला, व त्रास देईनासा झाला. पण पैशाची मदत बंद झाली. आश्रमांत येऊं इच्छिणारा अंत्यज मिळण्यासंबंधीं ज्या गृहस्थांनीं अगोदरपासूनच शंका प्रदर्शित केली होती, त्यांना अर्थातच कोणी अंत्यज येईल अशी कल्पनाहि नव्हती. पैशाची मदत बंद पडली. बहिष्कारासंबंधीं अफवा माझ्या कानांवर येऊं लागल्या. मीं सोबत्यांबरोबर विचार करून ठेवलाच होता कीं, 'आपल्यावर

बहिष्कार पडला आणि आपल्यापाशीं कसलीच मदत राहिली नाहीं, तरीहि यापुढें आतां आपल्याला अहमदाबाद सोडून चालणार नाहीं. अंत्यजवाड्यांत जाऊन त्यांच्याबरोबर राहूं व जें कांहीं मिळेल तेवढ्यावर किंवा मजुरी करून निर्वाह करूं.'

अखेरीला एक दिवस मगनलालनीं मला नोटीस दिली, ' येत्या महिन्याला आश्रमखर्च चालविण्यास आपल्यापाशीं पैसे शिल्लक नाहींत. ' मीं शांतपणें उत्तर दिलें, ' तर मग आपण अंत्यजवाड्यांत राहायला जाऊं. '

अशा तऱ्हेचा अडचणीचा प्रसंग माझ्यावर हा पहिलाच होता असें नाहीं. प्रत्येक प्रसंगीं अखेरच्या घडीला भगवन्तानें मदत धाडलेली आहे.

मगनलालनीं नोटीस दिल्यानंतर लवकरच एके दिवशीं सकाळीं एका मुलानें बातमी आणली, ' बाहेर मोटार उभी आहे, व एक शेठ तुम्हांला बोलावीत आहेत. ' मी मोटारपाशीं गेलों, शेठनीं मला विचारलें, " आश्रमाला कांहीं मदत देण्याची माझी इच्छा आहे, तुम्ही घ्याल का ? " " तुम्ही द्याल तर मी अवश्य घेईन. मला कबूल केलें पाहिजे, कीं सध्यां मी अडचणींतहि आहें."

" मी उद्यां याच वेळीं येईन, तेव्हां तुम्ही आश्रमांत असाल ? " मीं होय म्हटलें व शेठजी निघून गेले. दुसऱ्या दिवशीं ठरलेल्या वेळीं मोटारीचें शिंग वाजलें. मुलांनीं मला येऊन सांगितलें; शेठ आंत आले नाहींत. मी त्यांना भेटायला गेलों. ते माझ्या हातांत १३,००० रुपयांच्या नोटा ठेवून निघून गेले.

या मदतीची मीं कधींच आशा केली नव्हती. मदत देण्याची ही रीत नवीनच दिसली. त्यांनीं यापूर्वींहि कधीं आश्रमांत पाऊल टाकलें नव्हतें. त्यांना पूर्वीं एकवारच भेटल्याचें मला स्मरतें. आश्रमांत यायचेंहि नाहीं, पूसतपास नाहीं, कांहीं नाहीं; बाहेरच्या बाहेर पैसे देऊन निघून जायचें. माझा हा पहिलाच अनुभव. या मदतीमुळें अंत्यजवाड्यांत जावयाचें राहून गेलें. सुमारें एका वर्षाचा खर्च मला मिळून चुकला.

पण बाहेर खळबळ उडाली तशीच ती आश्रमांत उडाली. दक्षिण आफ्रिकेमध्यें माझ्याकडे अंत्यज येत, राहात, जेवीत, खात; परंतु या ठिकाणीं अंत्यज कुटुंबांत येऊन राहाणें हें माझ्या पत्नीला व इतर स्त्री मंडळाला रुचलें असें म्हणतां येत नाहीं. दानीबेनबद्दलचा त्यांना तिरस्कारच नाहीं, तरी पण औदासीन्य, माझ्या असल्या बाबतींत फार बारीक असलेल्या नजरेला दिसून येई व तीक्ष्ण कानांना ऐकूं येई. आर्थिक मदत मिळण्याची बंद झाली त्याबद्दल मला बिलकुल काळजी वाटली नव्हती, पण या अंतःस्थ खळबळीचा मोठा पेंच पडला. दानीबेन सामान्य स्त्री होती. दूदाभाईचें शिक्षणहि साधारणच होतें. पण त्यांची आकलनशक्ति चांगली होती. त्यांचा सोशिकपणाहि मला आवडला. क्वचित्प्रसंगीं त्यांना क्रोधहि येई, पण एकंदरींत त्यांच्या सोशिकपणाची माझ्यावर चांगली छाप पडली. बारीक-

सारीक अपमान पोटांत घालण्याबद्दल मी दूदाभाईना विनवून सांगत असें, त्यांची समजूत पडत असे व दानीबेनकडूनहि तेच सहन करवून घेत.

या कुटुंबाला आश्रमांत ठेवल्यापासून आश्रमाला पुष्कळ शिकायला मिळालें; आणि आश्रमांत अस्पृश्यतेला थारा नाहीं ही गोष्ट सुरुवातीलाच स्पष्ट होऊन गेल्यामुळें आश्रमाची रूपरेषा स्पष्ट होऊन गेली, व या बाबतींतील त्याचें काम बिनधोक बनलें. असें असतांहि आश्रमाचा वाढता खर्च बहुतांशीं जुन्या पद्धतीच्या हिंदूंकडूनच मिळत आलेला आहे. यावरून माझ्या मतें हें स्पष्ट दिसतें, कीं अस्पृश्यतेचीं पाळें ढिलीं झालेलीं आहेत. याचे इतर पुरावे पुष्कळच आहेत; परंतु जेथें अंत्यजाबरोबर रोटीव्यवहारहि ठेवला जातो, अशा संस्थेला सनातनी गणले जाणारे हिंदु मदत देतात हाहि अगदींच क्षुल्लक पुरावा म्हणतां येणार नाहीं.

याच प्रश्नाच्या निमित्तानें आश्रमासंबंधींच्या इतरहि कांहीं बाबींचा लागलेला निकाल, त्यांतूनच उपस्थित झालेले नाजुक प्रश्न व त्यांचा निर्णय, कित्येक अकल्पित आलेल्या अडचणींबद्दलहि आम्हीं मानलेला संतोष—यासारख्या सत्याच्या शोधासाठींच घडलेल्या प्रयोगांचें वर्णन—प्रस्तुत असूनहि—सोडून द्यावें लागत आहे, याबद्दल मलाहि दुःख वाटतें. पण यापुढील प्रकरणांमध्यें हा दोष राहाणारच. आवश्यक हकीकतीहि मला सोडून द्याव्या लागतील; कारण कीं, त्यांत भाग घेणारीं माणसें अद्याप पुष्कळशीं हयात आहेत, आणि त्यांच्या परवानगीशिवाय नांवांचा किंवा त्यांच्याबरोबर घडलेल्या प्रसंगांचा वाटेल तसा उपयोग करणें अयोग्य दिसतें. वेळोवेळीं प्रत्येकाची अनुमति मिळविणें किंवा त्यांच्यासंबंधींची हकीकत त्यांच्याकडे लिहून पाठवून सुधारून आणविणें हें जुळण्यासारखें नाहीं. या आत्मकथेच्या मर्यादेबाहेरची ही गोष्ट आहे. त्यामुळें यापुढील कथा, माझ्या समजुती-प्रमाणें, सत्याच्या शोधकानें जाणून घेण्यासारखी असली तरी अर्धवट दिली जाणार अशी मला धास्ती वाटते; तरी पण असहकाराच्या युगापर्यंत ईश्वरानें पोंचू दिल्यास पोंचावें अशी माझी इच्छा आहे, व तशी मला आशा वाटते.



# ११
# गिरमिटची पद्धति

नवीन वसलेल्या व अन्तर्बाह्य वादळांतून निभावून गेलेल्या आश्रमाला एका बाजूला ठेवून गिरमिटच्या पद्धतीचा थोडासा विचार करण्याची वेळ आतां आली आहे. गिरमिट्ये म्हणजे पांच किंवा त्याहून कमी वर्षेपर्यंत मजुरी करण्याच्या करारनाम्यावर सही करून हिंदुस्थानबाहेर मजुरी करण्यासाठीं गेलेले मजूर. नाताळमधील असल्या गिरमिट्यांवरील तीन पौंडांचा वार्षिक कर सन १९१४ मध्यें कमी झाला होता; पण ही चालच मुळांत बंद झाली नव्हती. सन १९१६ सालीं भारतभूषण पंडित मालवीयजींनीं हा प्रश्न कायदेमंडळामध्यें काढला होता व लॉर्ड हार्डिंजनीं त्यांचा ठराव मान्य करून जाहीरहि केलें होतें, कीं ही चाल 'वेळ येतांच' बंद करण्याचें वचन आपल्याला बादशहांकडून मिळालें आहे. परंतु ही चाल तत्काल बंद करण्याचा ठराव होणें आवश्यक आहे असें मला तर वाटत होतें. ही चाल हिंदुस्थाननें आपल्या बेदरकारीमुळेंच इतकीं वर्षे सहन केली. आतां ती बंद होणें आवश्यक होण्याइतकी जागृति लोकांमध्यें झालेली आहे असें मला वाटत होतें. कित्येक पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या, त्या विषयासंबंधीं वर्तमानपत्रांत थोडेंबहुत लिहिलें; त्यावरून माझा असा ग्रह झाला, कीं लोकमत ही पद्धत काढून टाकण्याच्या पक्षाचें आहे. या कामीं सत्याग्रहाचा उपयोग होऊं शकेल ? होऊं शकेल याबद्दल मला बिलकुल शंका नव्हती, पण तो कसा करावयाचा तें मला सुचलें नव्हतें.

मध्यंतरीं व्हाइसरॉयांनीं 'वेळ येतांच' या शब्दांचा खुलासा करण्याची संधि साधली. त्यांनीं जाहीर केलें, कीं 'अन्य व्यवस्था करण्यास जो वेळ लागेल तेवढ्या वेळांत' ही पद्धत नष्ट होईल. त्यामुळें सन १९१७ च्या फेब्रुवारीमध्यें भारतभूषण पंडित मालवीयजींनीं जेव्हां ही पद्धत कायमची बंद करण्यासंबंधींचें बिल वरिष्ठ कौन्सिलांत आणण्याची परवानगी मागितली, तेव्हां व्हाइसरॉयांनीं तशी परवानगी देण्याचें नाकारलें. अशा स्थितींत या प्रश्नाला चालना देण्यासाठीं मीं उभ्या हिंदुस्थानभर भ्रमण सुरू केलें.

भ्रमण सुरू करण्यापूर्वीं व्हाइसरॉयांची भेट घेणें उचित वाटलें. त्यांनीं लगेच मला भेटावयाची तारीख कळविली. त्या वेळचे मिस्टर मेफी—आतां ते सर जॉन मेफी झाले आहेत—हे त्यांचे सेक्रेटरी होते. मि. मेफीशीं माझा भरपूर परिचय जुळून आला. लॉर्ड चेल्म्सफर्डबरोबर संतोषकारक संभाषण झालें. त्यांनीं नक्की असें कमलेंच अभिवचन दिलें नाहीं; पण त्यांच्याकडून मदत मिळेल अशी आशा मला वाटूं लागली.

भ्रमणाला सुरुवात मुंबईपासूनच केली. मुंबईत सभा भरण्याचें मि. जहांगीर पेटिटनीं आपल्या शिरावर घेतलें होतें. इंपीरियल सिटिझनशिप ॲसोसिएशनच्या नांवानें सभा झाली. तिच्यापुढें मांडावयाच्या ठरावाचा मसुदा तयार करण्यासाठीं समिति बसली होती. तिच्यामध्यें डॉ. रीड, सर लल्लुभाई सामळदास, मि. नटराजन् वगैरे होते. मि. पेटिट तर असणारच. ठरावामध्यें मुदतबंदी मजुरीची पद्धति बंद करण्याबद्दल विनंति करावयाची होती. केव्हां बंद करावयाची हा प्रश्न होता. तीन सूचना आल्या होत्या—' शक्य तेवढ्या लवकर ', ' जुलैच्या ३१ तारखेपूर्वी ', व ' ताबडतोब '. ' जुलैची ३१ तारीख ' मीं सुचविली होती. मला तर निश्चित तारीख पाहिजे होती, कीं जेणेंकरून तेवढ्या मुदतींत कांहीं न झाल्यास पुढें काय करावयाचें किंवा काय करतां येण्यासारखें आहे, त्याचा विचार करतां येईल. सर लल्लुभाईंची सूचना ' ताबडतोब ' शब्द घालण्याची होती. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, ' जुलैच्या ३१ तारखे 'पेक्षां ' ताबडतोब ' शब्द विशेष निकड दर्शविणारा आहे. मीं समजावून देण्याचा प्रयत्न केला, कीं लोकांना ' ताबडतोब ' म्हणजे काय तें समजणार नाहीं. लोकांकडून कांहीं काम घ्यावयाचें असेल तर त्यांच्यापाशीं स्पष्ट शब्द असला पाहिजे. ' ताबडतोब 'चा अर्थ जो तो आपापल्या मर्जीप्रमाणें करणार. सरकार एक करणार, लोक दुसराच करणार. ' जुलैच्या ३१ व्या तारखे 'चा अर्थ सर्व एकच करणार; आणि त्या तारखेपर्यंत कांहीं निकाल न लागल्यास कोणता मार्ग पत्करावयाचा त्याचाहि कांहीं विचार करतां येईल. हा युक्तिवाद डॉ. रीडना लगेच पटला. अखेरीला सर लल्लुभाईंनाहि ३१ तारीख पसंत पडली व ठरावामध्यें तीच तारीख घातली गेली. जाहीर सभेपुढें हा ठराव मांडण्यांत आला, व सगळीकडे जुलैची ३१ तारीख नक्की झाली.

श्रीमती जायजी पेटिट यांच्या अमर्याद मेहनतीमुळें मुंबईहून स्त्रियांचें डेप्युटेशन व्हाइसरॉयकडे गेलें. त्यामध्यें लेडी टाटा, मरहूम दिलशाद बेगम वगैरे होत्या. सर्व स्त्रियांचीं नांवें मला आठवत नाहींत. पण या डेप्युटेशनचा फार चांगला परिणाम झाला, व ना. व्हाइसरॉय यांनीं त्यांना आशाजनक उत्तर दिलें.

कराची, कलकत्ता इत्यादि ठिकाणींहि मीं हिंडून आलों. सर्व ठिकाणीं छानदार सभा झाल्या. सर्व ठिकाणीं लोकांचा उत्साह खूप होता. फिरण्यास सुरुवात केली त्या वेळीं अशा सभा होतील किंवा त्यांना श्रोत्यांची इतकी गर्दी लोटेल अशी मला आशा वाटली नव्हती.

या वेळीं माझा प्रवास एकट्यानेंच होत असे. त्यामुळें अलौकिक अनुभव मिळत असत. डिटेक्टिव्ह तर पाठोपाठ असायचेच. मला त्यांच्याशीं तंटा करण्याचें कांहीं कारणच नव्हतें. मला कांहीं लपवून ठेवावयाचें नसेच, त्यामुळें ते मला त्रास देत नसत, मी त्यांना त्रास देत नसें. सुदैवानें या वेळीं मला ' महात्मा ' किताब

मिळाला नव्हता. जेथें मला लोक ओळखीत तेथें त्या नांवाचा गजर होत असे खरा; पण कायम किताब असा मिळाला नव्हता. एकाच वेळीं रेल्वेमधून जात असतां अनेक स्टेशनांवर डिटेक्टिव्ह माझें तिकीट पाहावयाला येत, व तिकिटाचा नंबर वगैरे टिपून घेत. मीं तर लागोलाग ते विचारतील त्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन मोकळा होत असें. शेजारच्या उतारूंची समजूत झाली, कीं मी कोणी साधा भोळा साधु किंवा फकीर असेन. दोन चार स्टेशनांवर डिटेक्टिव्ह आले. तेवढ्या-वरून ह्या उतारूंना चीड आली, व ते डिटेक्टिव्हला शिव्या देऊं लागले व दरडावूं लागले.

" इस बिचारे साधुको नाहक क्यों सताते हो ? " असें म्हणून माझ्याकडे वळून म्हणतात, " या बदमाशांना तिकीट दाखवूं नका. "

मीं हळूच त्या उतारूंना म्हटलें, " त्यांनीं तिकीट पाहिलें तर त्यांत माझें कांहींच जात नाहीं. ते आपलें काम करीत आहेत त्याबद्दलहि मला वाईट वाटण्याचेंहि कारण नाहीं." उतारूंना हें म्हणणें पटेना. ते माझी अधिकच कींव करूं लागले व आपसांत बोलूं लागले कीं, " ज्याला कर नाहीं त्यानें एवढी डर कां बाळगावी ? "

डिटेक्टिव्हांचा त्रास मला बिलकुल जाणवला नाहीं. पण रेल्वेंतील गर्दी-मुळें होणाऱ्या हालांचा कडव्यांत कडवा अनुभव मला लाहोर ते दिल्ली यांच्या दरम्यान आला. कराचीहून लाहोरमार्गें कलकत्त्याला जावयाचें होतें. लाहोरला गाडी बदलावयाची होती. त्या गाडींत माझी कोठेंच दाद लागण्यासारखी नव्हती. उतारू अंगबळाच्या जोरावर आपापल्यासाठीं वाट काढून घेत होते; डब्याचें दार बंद असलें, तर खिडकींतून आंत शिरत. मला कलकत्त्याला ठरलेल्या तारखेस पोंचा-वयाचें होतें. ही गाडी चुकली तर पोंचणें शक्य नव्हतें. मी जागा मिळविण्याची आशा सोडून देण्याच्या बेतांत होतों. कोणीहि मला आपल्या डब्यांत येऊं देण्यास तयार होईना. शेवटीं एका हमालानें मला जागा शोधतांना पाहून म्हटलें, " मला बारा आणे द्याल, तर मी जागा मिळवून देतों. " मीं म्हटलें, " मला जागा देशील तर अवश्य बारा आणे देईन. " बिचारा हमाल उतारूंच्या पाय-धरण्या करी, पण कोणी मला आंत घेण्यास तयार होईना. गाडी सुटण्याच्या बेतांत होती, एका डब्यांतील कांहीं उतारू म्हणाले, " येथें जागा तर नाहीं, पण आंत घुसडून देणार तर द्या; उभें राहावें लागेल. " हमालानें विचारलें, " क्यों जी ? " मीं रुकार दिला व त्यानें मला खिडकींतून आंत फेकून दिलें. मी आंत घुसलों; हमालानें बारा आणे कमाविले.

माझी ती रात्र फार कठिण गेली. इतर उतारू कसेबसे बसले होते; मी वरच्या बैठकीची सांखळी पकडून दोन तास उभाच होतों. मधूनमधून कांहीं उतारू माझ्यावर ओरडतच होते, " काय रे, अजूनहि बसत नाहींस का ? " मीं

पुष्कळ सांगून पाहिलें कीं, कोठेंच जागा नाहीं; पण मी उभा राहिलेलाहि त्यांना खपेना. ते स्वत: मात्र वरच्या फळीवर ताणून झोपलेले होते; पुन्हां पुन्हां मला त्रास देत. ते त्रास देत तसतसा मी शान्तपणें जबाब देत असें. त्यामुळें ते कांहींसे थंड पडले. माझें नांव गांव विचारलें. मला नांव सांगावें लागलें. तें ऐकून ते खजिल झाले. माफी मागून मला आपल्या शेजारीं जागा करून दिली. "धीरजनां फळ मीठां" (सोशिकपणाचीं फळें मधुर) या म्हणीचें स्मरण झालें. मी खूप थकलों होतों; डोकें गरगरूं लागलें होतें. मला बसण्यासाठीं जागेची ऐन जरूर होती तेव्हां ईश्वरानें ती दिली.

अशा तऱ्हेनें धक्के खात खात कलकत्त्याला वक्तशीर पोंचलों. कासिमबझारच्या महाराजांकडे उतरण्याचें मला निमंत्रण होतें. तेच कलकत्त्याच्या सभेचे अध्यक्ष होते. कराचीप्रमाणेंच कलकत्त्यामध्यें लोकांच्या उत्साहाला ऊत येत होता. कांहीं इंग्रजहि हजर होते.

जुलैच्या ता. ३१ पूर्वीं गिरमिटाची चाल बंद करण्यांत आल्याचा ठराव बाहेर पडला. सन १८९४ सालीं ह्या चालीचा निषेध करणारा पहिला अर्ज मीं तयार केला होता, व कधीं काळीं तरी ही 'अर्धगुलामगिरी' रद्द होईलच अशी आशा बाळगिली होती. १८९४ सालीं सुरू झालेल्या या प्रयत्नामध्यें अनेकजणांची मदत झाली. पण त्याच्या पाठीशीं शुद्ध सत्याग्रह होता असेंहि म्हटल्याशिवाय राहावत नाहीं.

यासंबंधींची अधिक तपशीलवार हकीकत व त्यामध्यें भाग घेणाऱ्या इसमांची माहिती दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाच्या इतिहासामध्यें वाचकांना याहून जास्त मिळूं शकेल.

• • •

# १२

# निळीचा डाग

चंपारण्य म्हणजे जनकराजाची भूमि. चंपारण्यांत ज्याप्रमाणें आंब्याचीं वनें आहेत, त्याचप्रमाणें सन १९१७ सालीं तेथें निळीचीं शेतें होतीं. चंपारण्यांतील शेतकऱ्यांनीं आपापल्या जमिनीच्या तीनविसांश भागामध्यें जमिनीच्या मूळ मालकासाठीं निळीचीच लागवड केली पाहिजे असें कायद्याचें बंधन होतें. याला 'तीन कठिया' असें नांव होतें. तिकडे वीस कठांचा एक एकर होतो, व एकरीं तीन कठांची लागवड करणें याचें नांव 'तीन कठियाची' पद्धति.

मला कबूल केलें पाहिजे कीं तिकडे मी प्रत्यक्ष गेलों, त्यापूर्वी चंपारण्याचें नांवनिशाणहि मला माहीत नव्हतें. निळीची लागवड होते याची कल्पनाहि विशेष नव्हती. निळीच्या गोळ्या पहिल्या होत्या, पण त्या चंपारण्यांत बनतात किंवा त्या निमित्तानें हजारों शेतकऱ्यांना हाल काढावे लागतात याची गंधवार्ताहि नव्हती.

राजकुमार शुक्ल नांवाचे चंपारण्यांतील एक शेतकरी होते; त्यांनाहि हें दुःख सहन करावें लागलें होतें. तें दुःख त्यांना सलत तर होतेंच, पण स्वतःला भोगाव्या लागलेल्या आपत्तीमुळें सर्वांवरील हा निळीचा डाग धुऊन काढण्याची तळमळ त्यांच्यामध्यें उत्पन्न झाली होती.

लखनौच्या कॉंग्रेसला मी गेलों होतों; तेथें या शेतकऱ्यानें माझी पाठ धरली. 'वकील बाबू आपको सब हाल बतायेंगे' (वकीलसाहेब तुम्हांला सर्व हकीकत सांगतील) असें म्हणत राही, आणि मला चंपारण्यांत येण्याबद्दल आमंत्रण देत राही.

हे वकील बाबू म्हणजे चंपारण्यांतील माझे प्रिय सहकारी, बिहारच्या सेवा-जीवनाचे प्राण ब्रजकिशोर बाबू होत. राजकुमार शुक्ल त्यांना माझ्या तंबूंत घेऊन आले. त्यांनीं काळ्या आल्पाकचा लांब डगला, पाटलोण वगैरे घातले होते. माझा ग्रह बरासा झाला नाहीं. मीं अनुमान केलें कीं, भोळ्या शेतकऱ्यांना लुटणारे हे कोणी वकीलसाहेब असावे.

चंपारण्याची हकीकत त्यांच्याकडून मीं थोडीशी ऐकून घेतली. माझ्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें मीं जबाब दिला, "स्वत: पाहिल्याशिवाय मी याविषयीं कांहीं अभिप्राय देऊं शकत नाहीं. तुम्ही कॉंग्रेसमध्यें बोला. सध्यां माझा नाद सोडूनच द्या." राजकुमार शुक्लांना कॉंग्रेसची मदत पाहिजेच होती. चंपारण्याविषयीं कॉंग्रेस-मध्यें ब्रजकिशोरबाबूंचें भाषण झालें, व सहानुभूतिदर्शक ठराव पास झाला.

राजकुमार शुक्लांना बरें वाटलें, पण तेवढ्यानें त्यांचें समाधान झालें नाहीं. चंपारण्यांतील शेतकऱ्यांचीं दुःखें मला समक्ष दाखविण्याची त्यांची इच्छा होती. मीं म्हटलें, "माझ्या फिरतीमध्यें मी चंपारण्यहि घेईन, एक-दोन दिवस देईन." ते म्हणाले, "एक दिन काफी होगा, नजरोंसे देखीए तो सही." (एक दिवस बस्स झाला, नजरेनें पहा तर खरें.)

लखनौहून मी कानपूरला गेलों. तेथेंहि राजकुमार शुक्ल हजरच. "यहांसे चंपारण्य बहोत नजदीक हैं. एक दिन दे दो." असें ते म्हणाले. "या वेळीं मला माफ करा. पण मी येईन एवढें वचन देऊन ठेवतों." असें म्हणून मी अधिकच बांधला गेलों.

मी आश्रमाला गेलों तर तेथेंहि राजकुमार शुक्ल माझ्या पाठीवर हजर! "अब तो दिन मुकर्रर कीजिये." मीं म्हटलें, "जा जा, मला अमुक तारखेला कलकत्त्याला

जावयाचें आहे, तेथें या आणि मला घेऊनच जा." कोठें जायचें आहे, काय करावयाचें, पाहावयाचें काय याची मला तादृश कल्पना नव्हती. कलकत्त्याला मी भूपेन्द्र बाबूंकडे जाऊन पोंचणार, त्यापूर्वींच त्यांनीं त्यांच्याकडे बिऱ्हाड ठोकलेलें होतें. या अशिक्षित, अडाणी परंतु निश्चयी शेतकऱ्यानें मला हारीस आणला.

१९१७ सालच्या आरंभीं कलकत्त्याहून आम्ही दोघेजण रवाना झालों. दोघांचीहि समान जोडी. दोघेहि शेतकऱ्याप्रमाणेंच दिसत होतों. राजकुमार शुक्ल घेऊन गेले त्या गाडींत आम्ही दोघेहि बसलों. सकाळीं पाटण्याला उतरलों.

पाटण्याला ही माझी पहिली खेप. पाटण्याला कोणाकडे उतरण्यासारखी माझी कोणाशीं ओळख नव्हती. मला वाटलें होतें, कीं राजकुमार शुक्ल जरी आडमुठ्ये शेतकरी असले तरी त्यांची कांहीं ओळखदेख असेल. आगगाडींत त्यांची कांहींशीं अधिक ओळख पटूं लागली. पाटण्यामध्यें पुरी फोड झाली. राजकुमार शुक्ल भावार्थी होते. ते ज्यांना आपले मित्र समजत होते, ते वकील त्यांचे मित्र नव्हते, पण राजकुमार शुक्ल त्यांचे आश्रितसे होते. खेडवळ अशील व वकील यांच्यामधील अंतर गंगानदीच्या पावसाळी विस्तीर्ण पात्राएवढें होतें.

मला ते राजेंद्रबाबूंच्या घरीं घेऊन गेले. राजेंद्रबाबू पुरीला कीं कोठेंसे गेले होते. बंगल्यांत एकदोन नोकर होते. फराळाचें सामान माझ्यापाशीं थोडेसें होतें मला खजूर पाहिजे होता, तो बिचाऱ्या राजकुमार शुक्लांनीं बाजारांतून आणला.

पण बिहारमध्यें स्पर्शास्पर्शाचा रिवाज फार सक्त होता. माझ्या बादलींतील पाण्याचे थेंब उडाले, तर तेवढ्यानें नोकराला विटाळ होई. मी कोणत्या जातीचा कोण हें नोकराला कसें कळावें? राजकुमारांनीं आंतील पायखान्याचा उपयोग करावयाला सांगितलें. नोकरानें बाहेरच्या पायखान्याकडे बोट केलें, मला यांत खट्टू होण्याचें किंवा राग येण्याचें कसलेंच कारण नव्हतें. असल्या अनुभवांना मी निढावलेला होतों. नोकर आपला धर्मच पाळीत होता व राजेंद्रबाबूंबद्दलचें आपलें कर्तव्य बजावीत होता. या मौजेच्या अनुभवांमुळें राजकुमाराविषयीं ज्याप्रमाणें माझा मान वाढला तसेंच ज्ञानहि वाढलें. पाटण्यापुढें लगाम मी आपल्या हातांत ठेवला.



# १३

# बिहारी सरलता

मौलाना मझरूल हक्क व मी एकाच वेळीं लंडनमध्यें शिकत होतों. त्यानंतर आमची भेट मुंबईस १९१५ च्या राष्ट्रीय सभेमध्यें झाली. त्या वर्षी ते मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते. त्यांनीं जुनी ओळख काढून मी पाटण्याला गेल्यास आपल्याकडे येण्याचें निमंत्रण दिलें होतें. त्या आमंत्रणाच्या आधारें मीं त्यांना पत्र लिहिलें व आपलें काम कळविलें. ते लगेच आपली मोटार घेऊन आले, व मला आपल्या घरीं घेऊन जाण्याचा आग्रह करूं लागले. मीं त्यांचे आभार मानले व मला जिकडे जावयाचें होतें तिकडे पहिल्या गाडीनें पाठवून देण्याबद्दल सांगितलें. रेल्वे-गाइडवरून मला कांहीं बोध होत नव्हता. त्यांनीं राजकुमार शुक्लाबरोबर वाटाघाट केली, व मी प्रथम मुझफ्फरपूरला जावें असें सुचविलें. त्याच दिवशीं संध्याकाळीं मुझफ्फरपूरला जाणाऱ्या गाडीमध्यें त्यांनीं मला बसवून दिलें. मुझफ्फरपूरला त्या वेळीं आचार्य कृपलानी राहात असत. त्यांची माझी ओळख होती. हैदराबादला गेलों असतां त्यांचा महात्याग, त्यांची राहाणी व त्यांच्या द्रव्यानें चालणारा आश्रम यासंबंधींची हकीकत डॉ. चोइथरामच्या तोंडून ऐकिली होती. ते मुझफ्फरपूर कॉलेजमध्यें प्रोफेसर होते, तेथून मोकळे होऊन बसले होते. मीं त्यांना तार केली होती. मुझफ्फरपूरला गाडी मध्यरात्रीं पोंचत होती. ते आपल्या शिष्यमंडळासह आले. पण त्यांना घरदार नव्हतें. ते अध्यापक मलकानींकडे राहात असत. त्यांच्याकडेच मला घेऊन गेले. मलकानी तेथील कॉलेजांत प्रोफेसर होते. आणि त्या काळच्या वातावरणांत सरकारी कॉलेजांतील प्रोफेसरानें माझ्यासारख्याला आपल्या घरीं उतारून घेणें ही विशेष गोष्ट म्हटली पाहिजे.

कृपलानीजींनीं बिहारच्या व विशेषतः तिरहुत विभागाच्या दीन स्थितीची हकीकत सांगितली व माझ्या कामाच्या कठिणपणाची मला कल्पना करून दिली. कृपलानीजींनीं बिहारी लोकांबरोबर गाढ सख्य जोडलें होतें. त्यांनीं माझ्या कामासंबंधींची माहिती त्यांना करून दिली होती. सकाळीं छोटेसें वकीलमंडळ माझ्याकडे आलें; त्यांच्यापैकीं रामनवमीप्रसाद यांचें स्मरण मला राहिलें आहे. त्यांनीं आपल्या आग्रहामुळें माझें लक्ष वेधून घेतलें.

"तुम्ही जें काम करावयाला आलां आहां, तें या जागीं राहून होणार नाहीं. तुम्हांला आमच्यासारख्यांकडे राहिलें पाहिजे. गयाबाबू येथील प्रख्यात वकील आहेत. त्यांच्यातर्फे मी तुम्हांला त्यांच्याकडे उतरण्याबद्दल आग्रह करतों. आम्हां सर्वांना सरकारची भीति तर वाटतेच; पण आमच्याकडून होण्यासारखी तेवढी सर्व

मदत आम्ही तुम्हांला देऊं. राजकुमार शुक्लांनीं सांगितलेली बरीचशी हकीकत खरीच आहे. दुःखाची गोष्ट एवढीच, कीं आमचे पुढारी आज येथें नाहींत. बाबू व्रजकिशोरप्रसाद व राजेंद्रप्रसाद यांना मीं तारा केल्या आहेत. दोघेहि लवकरच येतील व तुम्हांला संपूर्ण माहिती व मदत देऊं शकतील. मेहेरबानी करून आपण गयाबाबूंकडे चला."

या भाषणानें मला आशा सुटली. मला घरांत घेतल्यानें गयाबाबूंची स्थिति चमत्कारिक होईल या भयानें मला संकोच वाटत होता, पण गयाबाबूंनीं मला निश्चित केलें.

मी गयाबाबूंकडे गेलों. त्यानीं व त्यांच्या कुटुंबीजनांनीं माझ्यावर प्रेमाचा वर्षाव केला.

व्रजकिशोरबाबू दरभंग्याहून आले. राजेंद्रबाबू पुरीहून आले. येथें दिसले ते लखनौचे व्रजकिशोरप्रसाद नव्हते. त्यांच्या ठायीं असलेली बिहारी नम्रता, साधेपणा, भलेपणा, असाधारण श्रद्धा इत्यादि पाहून माझें हृदय हर्षानें उचंबळून आलें. बिहारच्या वकीलवर्गाला व्रजकिशोरबाबूंबद्दल वाटत असलेला आदर पाहून मला सानंदाश्चर्य वाटलें.

त्या मंडळींमध्यें व माझ्यामध्यें जन्माची प्रेमगांठ बांधली गेली.

व्रजकिशोरबाबूंनीं मला सर्व हकीकत सांगितली. ते गरीब शेतकऱ्यांच्या वतीनें खटले चालवीत. अशा तऱ्हेचे दोन खटले चालू होते. असले खटले चालवून त्या त्या व्यक्तीपुरती थोडीबहुत दाद मिळवीत असत. कधीं कधीं त्यांतहि अपयश येई. त्या भोळ्या खेडवळांकडून फी तर घेतच असत. व्रजकिशोरबाबू किंवा राजेंद्रबाबू त्यागी असले तरी फी घ्यायला कमी करीत नसत. धंद्याच्या कामीं आम्ही फी घेतली नाहीं तर आमचा घरखर्च कसा चालावा, व आम्ही लोकांनाहि मदत कोठून करावी, असा त्यांचा युक्तिवाद होता. त्यांच्या फीचे आंकडे व बंगाल-बिहारच्या बॅरिस्टरांना दिल्या जाणाऱ्या फीचे कल्पनातीत आंकडे ऐकून मी चकितच झालों.

"–साहेबांना आम्ही 'ओपिनियन्' साठीं १०,००० रुपये दिले." हजाराखालीं तर बातच मीं ऐकली नाहीं.

या मित्रमंडळानें माझा या बाबतींतील ठपका ऐकून घेतला. त्यांनीं त्याचा विपर्यास केला नाहीं.

मीं म्हटलें, "या खटल्याची हकीकत वाचल्यानंतर तर माझा अभिप्राय असाच आहे, कीं आपण असले खटले करण्याचें यापुढें बंदच करावें. असल्या खटल्यांपासून लाभ फारच थोडा होतो. जेथें रयतवर्ग इतका चिरडून गेलेला आहे, जेथें सगळेच इतके भयग्रस्त आहेत तेथें, कचेऱ्यांमार्फत इलाज थोडाच

होऊं शकणार ? लोकांचा भित्रेपणा दूर करणें हेंच त्यांच्यासाठीं खरें औषध आहे. ही 'तीन कठिया' पद्धत नाहींशी होईपर्यंत आपण सुखानें बसूं शकत नाहीं. मी तर दोन दिवसांत पाहतां येईल तेवढें पाहण्यास आलों होतों. पण आतां तर मला असें दिसतें कीं, या कामाला दोन वर्षेंहि लागतील. एवढा वेळ लागला तरी तो देण्यास मी तयार आहें. या कामीं काय केलें पाहिजे तें मला सुचत आहे; पण तुमची मदत मात्र पाहिजे. "

व्रजकिशोरबाबू मला फार ठरेल बुद्धीचे दिसून आले. त्यांनीं शान्तपणें जबाब दिला, " आमच्याकडून होईल ती मदत आम्ही करूं, पण ती कशा स्वरूपाची पाहिजे तें समजावून सांगा. "

आम्ही या संभाषणांत रात्र घालविली. मीं सांगितलें, " मला तुमच्या वकिलीच्या शक्तीचा उपयोग कमीच पडेल. तुमच्यासारख्यांकडून मी तर कारकुनाचें आणि दुभाष्याचें काम घेणार. त्यांत तुरुंगांत जाण्याचा प्रसंग येण्याचाहि संभव आहे. तुम्ही तेवढें जोखीम पत्करलेलें मला आवडेलच; परंतु तुमची तेवढी तयारी नसेल तर नाहीं पत्करलेंत तरी हरकत नाहीं. पण वकिलाचे कारकून बनणें आणि आपापला धंदा अनिश्चित मुदतीपर्यंत बंद ठेवणें हेंहि कांहीं मी कमी मागत नाहीं. इकडची हिंदी भाषा समजायला मला अवघड पडते. कागदपत्र सर्व कैथी-मध्यें किंवा उर्दूमध्यें लिहिलेले असतात. ते मला वाचतां येत नाहींत. त्यांचें भाषान्तर तुम्ही करून द्यावें अशी मी अपेक्षा बाळगतों. हें काम पैसे देऊन करावयाचें म्हटलें तर झेपणार नाहीं. हें सर्व सेवाभावानें व बिनपैशानें झालें पाहिजे.

व्रजकिशोरबाबूंची समजूत पटली; पण त्यांनीं माझी व आपल्या जोडी-दारांची उलट तपासणी चालविली. माझ्या म्हणण्याचा गर्भितार्थ विचारून घेतला. माझ्या अटकळीप्रमाणें वकिलांना किती हद्दीपर्यंत आत्मबलिदान करावें लागेल, कितीजणांची जरूर पडेल, थोडेथोडे थोडथोड्या मुदतीपुरते आल्यास चालेल कीं नाहीं, वगैरे प्रश्न मला विचारले. वकिलांनाहि त्यांची कितीशी झीज सोसण्याची तयारी आहे तें विचारून घेतलें.

शेवटीं त्यांनीं पुढीलप्रमाणें निश्चित जबाब दिला. " आम्ही इतकेजण तुम्ही सांगाल तें काम करून द्यायला नेहमीं तयार राहूं. यांच्यापैकीं ज्या वेळीं जेवढ्यांची मागणी कराल तेवढे तुमच्याबरोबर राहतील. तुरुंगांत जाण्याची गोष्ट नवीन आहे. त्या बाबतींत शक्ति मिळविण्याचा आम्ही प्रयत्न करूं. "

● ● ●

## १४

# अहिंसादेवीचा साक्षात्कार

मला शेतकऱ्यांच्या स्थितीची चौकशी करावयाची होती. निळाच्या मालकाविरुद्ध ज्या तक्रारी होत्या त्यांमध्यें कितपत तथ्य आहे तेंहि पाहावयाचें होतें. या कामानिमित्तानें हजारों शेतकऱ्यांना भेटावें लागणार; परंतु अशा तऱ्हेनें त्यांच्याशीं संबंध येण्यापूर्वीं निळाच्या मालकांची बाजू ऐकून घेणें व कमिशनरांना भेटणें मला आवश्यक वाटलें. दोघांनाहि पत्रें लिहिलीं.

मालकांच्या मंडळाच्या चिटणिसांची भेट झाली, तेव्हां त्यांनीं साफ सांगून टाकलें, कीं तुम्हांला तर परकीय म्हणतां येईल. तुम्हीं आमच्या व शेतकऱ्यांच्या मध्यें पडतां कामा नये. त्यांतूनहि तुम्हांला कांहीं सांगावयाचेंच असलें तर मला लिहून कळवा. मीं चिटणिसांना नम्रपणें सांगितलें, कीं मी स्वतःला परदेशी समजत नाहीं, व शेतकऱ्यांची इच्छा असेल तर त्यांच्या स्थितीची चौकशी करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे. मी कमिशनरसाहेबांनाहि भेटलों. त्यांनीं तर धमकी द्यायलाच सुरुवात केली, व मला पुढें न जातां तिरहुत सोडून जाण्याची शिफारस केली.

मीं सर्व हकीकत सोबत्यांना निवेदन केली व सांगितलें, कीं तपास करण्याची सरकार मला आडकाठी करील असा संभव आहे, व तुरुंगांत जाण्याचा प्रसंग मला वाटलें होतें त्याहून लवकरहि येईल. अटक व्हावयाचीच तर मला मोतीहारीमध्यें किंवा शक्य तर बेतियामध्यें झालेली बरी. त्यासाठीं शक्य तेवढ्या त्वरेनें तिकडे जाऊन पोंचलें पाहिजे.

चंपारण्य हा तिरहुत विभागाचा एक जिल्हा व मोतीहारी हें त्याचें मुख्य शहर. बेतियाच्या जवळच राजकुमार शुक्ल यांचें घर होतें, व त्याच्या जवळपासच्या मळ्यांतील शेतकरी अधिकांत अधिक रंक होते. त्यांची अवस्था मला दाखविण्याचा राजकुमार शुक्लांना लोभ होता. मलाहि पाहाण्याची इच्छा होती.

म्हणून सोबत्यांना बरोबर घेऊन मी त्याच दिवशीं मोतीहारीला जावयाला निघालों. मोतीहारीमध्यें गोरखबाबूंनीं आश्रय दिला व त्यांचें घर धर्मशाळा बनून गेलें. आमचा सर्वांचा त्याच्यामध्यें कसाबसा समावेश होऊं शकत होता. पोंचलों त्याच दिवशीं समजलें, कीं मोतीहारीपासून सुमारें पांच मैल अंतरावर एक शेतकरी राहात असे. त्याच्यावर अत्याचार झाले आहेत. त्याला भेटण्यास उदईक मीं धरणीधरप्रसाद वकिलांना घेऊन जावें असें ठरलें. सकाळीं आम्ही हत्तीवर बसून निघालों. गुजराथेंत गाड्यांचा उपयोग होतो तसाच जवळजवळ चंपारण्यामध्यें हत्तींचा होतो. अर्ध्या वाटेपर्यंत जातों, इतक्यांत पोलिस सुपरिंटेंडंटचा मनुष्य

येऊन थडकला व मला म्हणाला, " तुम्हांला सुपरिंटेंडंटसाहेबांनीं सलाम सांगितले आहेत. " मीं समजलों. धरणीधरबाबूंना मीं पुढें जावयाला सांगितलें. मी त्या जासुदाबरोबर त्यानें भाड्यानें घेतलेल्या गाडीमध्यें बसलों. त्यानें चंपारण्य सोडून जाण्याची नोटीस मला दिली. मला घरीं घेऊन गेला व माझी सही मागितली. मीं जबाब लिहून दिला, कीं मी चंपारण्य सोडून जाण्यास तयार नाहीं; मला पुढें जायचें आहे, व तपासहि करायचा आहे. निघून जाण्याचा हुकूम मोडल्याबद्दल दुसऱ्या दिवशीं कोर्टात हजर होण्याबद्दल समन्स मिळालें.

सबंध रात्र जागून मीं मला पत्रें लिहावयाचीं होतीं तीं लिहून काढलीं. व ज्या ज्या सूचना करावयाच्या होत्या त्या ब्रजकिशोरबाबूंपाशीं बोलून ठेविल्या.

समन्सची वार्ता एका क्षणांत सगळीकडे पसरली, व लोक म्हणत कीं पूर्वी कधीं न पाहिलेलें दृश्य त्या वेळीं मोतीहारीमध्यें दिसून आलें. गोरखबाबूंचें घर व कचेरी यांमध्यें मावत ना इतके लोक येऊन भरले. सुदैवानें मीं माझें सर्व काम रात्रींच आटोपून घेतलें होतें; त्यामुळें मी त्या गर्दीला तोंड देऊं शकलों. सोबत्यांचा उपयोग मला पुरेपूर समजून आला. ते लोकांना मर्यादेंत राखण्याच्या कामीं गुंतून गेले. कचेरीकडे किंवा जावें तिकडे टोळ्याच टोळ्या माझ्या मागून येत. कलेक्टर, मॅजिस्ट्रेट, सुपरिंटेंडंट इत्यादि व मी यांच्यामध्येंहि एक प्रकारचें ऐक्य जुळून आलें. सरकारी नोटिसांचें वगैरे विरुद्ध वाटल्यास मला कायदेशीर इलाज करतां आले असते. तसें न करतां मी त्यांच्या सर्व नोटिसा स्वीकारल्या. त्यावरून व अंमलदारांशीं प्रत्यक्ष संबंध आला असतां वापरलेल्या सौजन्यावरून त्यांना कळून आलें, कीं मला त्यांना विरोध करावयाचा नव्हता, तर त्यांच्या हुकूमाचा सविनय भंगच करावयाचा होता. त्यामुळें त्यांना एक प्रकारची निर्भयता प्राप्त झाली. मला त्रास देण्याऐवजीं लोकांना मर्यादेंत राखण्याच्या कामीं त्यांनीं माझ्या व माझ्या सोबत्यांच्या मदतीचा खुषीनें उपयोग केला. पण त्याबरोबरच त्यांच्या हेंहि लक्षांत आले कीं, आपली सत्ता आजपासून लुप्त झाली. लोक क्षणभर शिक्षेचें भय सोडून आपल्या नव्या मित्राच्या प्रेमाच्या सत्तेच्या आधीन झाले.

येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे, कीं चंपारण्यामध्यें मला कोणी ओळखीत नव्हतें. शेतकरीवर्ग साफ अशिक्षित होता. चंपारण्य हा गंगानदीच्या पैलतीरीं थेट हिमालयाच्या पायथ्याशीं, नेपाळच्या शेजारीं असलेला मुलूख, म्हणजे मला ती नवीन सृष्टीशीच होती. त्या ठिकाणीं राष्ट्रीय सभेचें नांवहि ऐकायला येत नव्हतें. राष्ट्रीय सभेचे कोणी सभासदहि आढळण्यासारखे नव्हते. ज्यांनीं नांव ऐकलें होतें त्यांना तें नांव उच्चारण्याची किंवा राष्ट्रीय सभेच्या कार्यांत भाग घेण्याची भीति वाटे. आतां राष्ट्रीय सभेचें नांव न काढतांहि राष्ट्रीय सभेनें व तिच्या सेवकांनीं त्या ठिकाणीं प्रवेश केला, व राष्ट्रीय सभेची सत्ता स्थापित झाली.

सोबत्यांबरोबर विचार करून मीं असें ठरविलें होतें, कीं राष्ट्रीय सभेच्या नांवानें कांहींच करावयाचें नाहीं. आपल्याला काम पाहिजे, नांवाची जरूर नाहीं; मन पाहिजे, बडबडीचा उपयोग नाहीं. राष्ट्रीय सभेचें नांवच अरुचिकर आहे. या भागांत राष्ट्रीय सभेचा अर्थ वकिलांची मारामारी, कायद्याच्या फटींतून निसटून जाण्याचे प्रयत्न असा होता. राष्ट्रीय सभा म्हणजे बॉंब गोळे, राष्ट्रीय सभा म्हणजे बोलावयाचें एक, करावयाचें दुसरेंच. असली समजूत सरकारची व सरकारचें सरकार जे निळाचे मालक त्यांची होती. राष्ट्रीय सभा म्हणजे हें नव्हे, राष्ट्रीय सभा ही निराळीच वस्तु आहे असें आम्हांला सिद्ध करावयाचें होतें. म्हणूनच आम्ही कोठेंहि राष्ट्रीय सभेचें नांव न उच्चारण्याचें व महासभेच्या भौतिक देहाचा परिचय न करविण्याचें ठरविलें. लोकांनीं तिच्या अक्षरांकडे न पाहतां तिचा आत्मा ओळखला व त्याला अनुसरलें म्हणजे पुरे, आणि तेंच खरें होय असा आम्हीं मनाशीं विचार करून ठेवला.

यासाठीं राष्ट्रीय सभेच्या वतीनें कोणत्याहि गुप्त किंवा प्रसिद्ध हस्तकां-मार्फत कसलीहि भूमिका तयार करण्यांत आली नाहीं. हजारों लोकांमध्यें प्रवेश करण्याची शक्ति राजकुमार शुक्लांमध्यें नव्हती. त्यांच्यामध्यें कोणीहि अजूनपर्यंत राजकीय काम केलेलेंच नव्हतें. चंपारण्याबाहेरच्या दुनियेची त्यांना खबरहि नव्हती. असें असतांहि त्यांची माझी भेट जुन्या मित्रांप्रमाणें झाली. यामध्यें मला ईश्वराचा, अहिंसेचा व सत्याचा साक्षात्कार झाला असें म्हणण्यामध्यें अतिशयोक्ति तर नाहींच, पण तें अक्षरशः सत्य आहे. हा साक्षात्कार करण्यासारखा माझ्या अंगीं अधिकार तरी कोणता होता, याचा जेव्हां मी विचार करतों तेव्हां लोकां-बद्दलच्या प्रेमाशिवाय मला दुसरें कांहींच आढळत नाहीं. हें प्रेम म्हणजे प्रेम किंवा अहिंसा यांबद्दल माझ्या मनांत वसणारी अढळ श्रद्धा.

चंपारण्यांतील तो दिवस माझ्या जन्मामध्यें कधीं विसरूं शकणार नाहीं असा होता. तो मला व शेतकऱ्यांनाहि उत्सवाचा दिवससा वाटला. सरकारी कायद्याच्या भाषेंत खटला माझ्यावर चालावयाचा होता; पण खरें पाहतां तो सरकारवरच होता. कमिशनरनें जाळें रचलें माझ्यासाठीं, पण त्यांत फशीं पाडलें सरकारलाच.

• • •

# १५

# खटला काढून घेतला

खटला चालू झाला. सरकारी वकील, मॅजिस्ट्रेट वगैरे घाबरून गेले होते. काय करावें तें त्यांना सुचेना. सुनावणी पुढें ढकलावी अशी मागणी सरकारी वकील करीत होता. मीं मध्यें पडलों, आणि विनंति केली, कीं पुढें ढकलण्याची कांहीं जरूरी नाहीं. कारण कीं, चंपारण्य सोडून जाण्याची नोटीस मोडल्याचा गुन्हा मला कबूलच करावयाचा आहे. असें म्हणून मीं एक अगदीं छोटेसें निवेदन तयार केलें होतें, तें वाचून दाखविलें. तें पुढीलप्रमाणें होतें:—

"फौजदारी काम चालविण्याच्या पद्धतीसंबंधींच्या कायद्याच्या १४४ कलमानुसार करण्यांत आलेला हुकूम उघडउघड तऱ्हेनें मोडण्यासारखा जोखमीचा मार्ग मला कां पत्करावा लागला त्याचें छोटेसें निवेदन कोर्टाच्या परवानगीनें सादर करण्याची माझी इच्छा आहे. माझा नम्र अभिप्राय असा आहे, कीं हा आज्ञा-भंगाचा प्रश्न नसून स्थानिक सरकार व मी यांच्यामधील मतभेदाचा हा प्रश्न आहे. मी या प्रदेशांत आलों तो जनसेवा व देशसेवा करण्याच्याच इराद्यानें. रयतांना 'नीलवर' न्यायानें वागवीत नाहींत, सबब त्यांना मदत करण्यास येण्याचा मला फार आग्रह झाला; म्हणूनच मला यावें लागलें. समग्र प्रश्नाचा अभ्यास केल्याखेरीज मीं त्यांना मदत कशी करूं शकणार? म्हणून मी त्या प्रश्नाचा अभ्यास करण्यास—शक्य तर सरकार व नीलवर यांची मदत घेऊन अभ्यास करावयाला—आलों आहें. माझा दुसरा कोणताच हेतु नाहीं; आणि माझ्या येण्यानें लोकांच्या शान्तीमध्यें भंग होईल आणि रक्तपात होईल ही गोष्ट मला शक्य वाटत नाहीं. असल्या गोष्टींचा मला भरपूर अनुभव आहे असें मी ठांसून म्हणूं शकतों. पण सरकारच्या अडचणी मला कळतात, आणि त्याला माहिती मिळेल तिच्यावरच विश्वासून त्याला चालावें लागणार हेंहि मीं कबूल करतों. कायद्याला मान देणारा प्रजाजन या नात्यानें माझा स्वाभाविक कल हुकूम पाळण्याकडेच होणार, व तसाच तो झालाहि. पण तसें केल्यानें ज्यांच्यासाठीं मी इकडे आलों त्यांच्याबद्दलच्या माझ्या कर्तव्याचा मी भंग करीन असें मला वाटलें. मला वाटलें आज त्यांची सेवा त्यांच्यामध्यें राहूनच माझ्याकडून घडूं शकेल. त्यामुळें मी आपण होऊन चंपारण्य सोडून जाऊं शकत नाहीं. अशा तऱ्हेच्या धर्मसंकटाचे प्रसंगीं मला चंपारण्यांतून काढून लावण्याची जबाबदारी सरकारवरच टाकण्याखेरीज मला गत्यंतर नव्हतें.

"हिंदुस्थानच्या सार्वजनिक जीवनामध्यें माझ्यासारखी ज्यांची प्रतिष्ठा आहे, अशा माणसानें अमुक एक कृत्य करून नवीन पायंडा पाडतांना अत्यंत

काळजी बाळगली पाहिजे हें मला पूर्णपणें समजतें; परंतु माझी दृढ समजूत आहे, कीं आज आपण ज्या भानगडीच्या परिस्थितीमध्यें सांपडलेलें आहों, त्या परिस्थितींत माझ्यासारख्या प्रसंगांत सांपडलेल्या स्वाभिमानी माणसापाशीं सुरक्षित व सन्मान्य रस्ता एकच, कीं हुकुमाचा भंग करून त्याबद्दल मिळेल ती शिक्षा मुकाट्यानें सहन करावयाची; याखेरीज दुसरा मार्ग नाहीं.

"तुमच्या मनांतून मला जी कांहीं शिक्षा करावयाची असेल ती कमी व्हावी, या हेतूनें मी हें निवेदन मांडीत नाहीं; तर मला एवढेंच स्पष्ट करावयाचें आहे, कीं हुकुमाचा अनादर करण्यामध्यें माझा हेतु कायद्यानें स्थापित झालेल्या सत्तेचा अपमान करण्याचा नसून त्याहूनहि थोर असा जो कायदा—अर्थात् अंतरात्म्याचा आवाज—माझें अंतःकरण मान्य करीत आहे, त्याला अनुसरण्याचा माझा संकल्प आहे."

आतां खटल्याची सुनावणी तहकूब ठेवण्याचा प्रश्नच उरला नाहीं. पण मॅजिस्ट्रेटला किंवा वकिलाला कल्पनाहि नव्हती, कीं येथपर्यंत गोष्ट येऊन ठेपेल; म्हणून कोर्टानें शिक्षा सांगण्यासाठीं खटला तहकूब केला. मीं व्हाइसरॉयांना सर्व हकीकतीची तार पाठविली होती; पाटण्यालाहि तार केली होती. भारतभूषण पंडित मालवीयजी इत्यादींनाहि घडलेल्या हकीकतींच्या तारा केल्या होत्या. शिक्षेसाठीं कोर्टांत जाण्याची वेळ येण्यापूर्वींच मॅजिस्ट्रेटचा हुकूम आला, कीं गव्हर्नरसाहेबांच्या हुकुमावरून खटला काढून घेण्यांत आला आहे; व कलेक्टरकडूनहि पत्र आलें, कीं मला करावयाची असेल ती चौकशी करावी, व त्या कामीं अंमलदारांकडून लागेल ती मदत मागावी. इतक्या त्वरित व शुभ परिणामाची आशा आम्ही कोणीहि बाळगिली नव्हती.

मी कलेक्टर मि. हेकोकना भेटलों. ते स्वतः भले व न्याय करण्यास तत्पर असे दिसले. कागदपत्र वगैरे जें कांहीं लागेल तें मागून घेण्यास व आपल्याला जेव्हां कधीं भेटावेसें वाटेल तेव्हां भेटण्यास त्यांनीं मला सांगितलें.

दुसऱ्या बाजूनें विचार करावयाचा तर उभ्या हिंदुस्थानला सत्याग्रहाचा अथवा सविनय कायदेभंगाचा वस्तुपाठ मिळाला. वर्तमानपत्रांत या गोष्टीची खूप चर्चा झाली व चंपारण्याला आणि माझ्या चौकशीला कल्पनातीत प्रसिद्धि मिळाली.

मी करीत असलेल्या चौकशीसाठीं सरकारकडून निःपक्षपातीपणाची मला जरूरी होती, तरी पण वर्तमानपत्री चर्चेची व त्यांच्या बातमीदारांची जरूर नव्हती. एवढेंच नव्हे, तर त्यांची भरमसाट टीका व चौकशीचे लांबलचक रिपोर्ट यांपासून हानि होण्याची भीति होती. त्यासाठीं मीं मुख्य वर्तमानपत्रांच्या चालकांना विनंति करून ठेविली, कीं त्यांनीं बातमीदारांना पाठविण्याच्या खर्चांत पडूं

नये. जेवढें छापणें आवश्यक असेल तेवढें मीच पाठवीत जाईन व त्यांना बातम्या पुरवीत जाईन.

चंपारण्यांतील नीलवर खूप चिडले होते. मला तें समजत होतें. अंमलदारहि मनांतून संतुष्ट नसणार हेंहि कळत नव्हतें असें नाहीं.

वर्तमानपत्रांत खऱ्याखोट्या बातम्या आल्यानें ते अधिक चिडणार. त्यांच्या धुश्श्याचा माझ्यावर परिणाम तो काय होणार? पण तो गरीब, भित्र्या रयतेवर झाल्याशिवाय राहाणार नाहीं; आणि असें झाल्यानें जी सत्य हकीकत मी शोधून काढूं इच्छीत होतों, तिला विघ्न येईल. नीलवरांकडून तर विषारी चळवळ सुरू झाली. त्यांच्याकडून वर्तमानपत्रांत माझ्याविषयीं व माझ्या सोबत्यांविषयीं खूप खोडसाळ बातम्या पसरविण्यांत आल्या. पण माझ्या अत्यंत क्षुल्लक बाबतींतहि सत्याला चिकटून राहाण्याच्या संवयीमुळें त्यांचे तीर फुकट गेले.

ब्रजकिशोरबाबूंची अनेक प्रकारें निंदा करण्यास नीलवरांनीं जरासुद्धां कमी केलें नाहीं; पण जसजसे ते त्यांची निंदा करीत गेले, तसतशी ब्रजकिशोरबाबूंची प्रतिष्ठा वाढतच गेली.

अशा नाजुक स्थितीमध्यें बातमीदारांना येण्यास मीं तिळमात्र उत्तेजन दिलें नाहीं. पुढाऱ्यांना बोलाविलें नाहीं. मालवीयजींनीं मला सांगून पाठविलें होतें, कीं " जरूर लागेल तेव्हां मला बोलवा. मी यावयाला तयार आहें." त्यांनाहि तसदी दिली नाहीं. लढयाला मी कधींहि राजकीय स्वरूप येऊं दिलें नाहीं. घडणाऱ्या हकीकतीचा अहवाल प्रसंगानुसार मी मुख्य वर्तमानपत्रांकडे पाठवीत असें. राजकीय काम करणें ठीक; पण ज्या ठिकाणीं राजकारणाला स्थान नाहीं, त्या गोष्टीला राजकीय स्वरूप दिल्यानें हेंहि नाहीं आणि तेंहि नाहीं अशी स्थिति होते; आणि अशा तऱ्हेनें विषयांचें स्थानान्तर न केल्यानें दोन्ही सुरळीत चालतात, हें मला पुष्कळ अनुभवानें दिसून आलें होतें. शुद्ध लोकसेवेमध्यें प्रत्यक्ष नाहीं तर परोक्ष रीतीनें राजकारण हें येतेंच, ही गोष्ट चंपारण्यांतील लढा सिद्ध करीत होता.

• • •

१६

# कार्यपद्धति

चंपारण्यांतील चौकशीचा अहवाल द्यावयाचा म्हणजे चंपारण्यांतील शेतकऱ्यांचा इतिहास देण्याप्रमाणें आहे. अशा तऱ्हेचा अहवाल या प्रकरणांमध्यें देतां येणार नाहीं. शिवाय चंपारण्यांतील चौकशी म्हणजे अहिंसा व सत्य यांचा महान् प्रयोग. त्यासंबंधीं दर आठवड्याला मला सुचतें तेवढें लिहीत जातों. त्यासंबंधींची अधिक विस्तृत हकीकत वाचकाला बाबू राजेंप्रसादांच्या या लढ्याच्या ( हिंदीमध्यें छापलेल्या ) इतिहासांतून व 'युगधर्म' मुद्रणालयानें करविलेल्या ( गुजराथी ) भाषांतरांतूनच मिळूं शकेल.

आतां या प्रकरणाच्या विषयाकडे वळतों. गोरखबाबूंच्या घरीं राहूनच ही चौकशी करावयाची तर त्यांना आपलें रिकामें घर करून देऊन स्वत: दुसरीकडे जावें लागणार. मोतीहारीमध्यें कोणापाशीं घर भाड्यानें मागितलें तरीहि तो चटकन् देईल इतकी निर्भयता लोकांमध्यें आली नव्हती; परंतु चतुर ब्रजकिशोरबाबूंनीं विस्तीर्ण कंपाउंड असलेलें एक घर भाड्यानें घेतलें, व आम्ही त्याच्यामध्यें जाऊन राहिलों.

बिलकुल पैशांखेरीज आम्हीं हें काम चालवूं शकूं अशी स्थिति नव्हती. सार्वजनिक कामासाठीं लागणारे पैसे लोकांकडून फंडाच्या रूपानें जमविण्याची आजवरची पद्धत नव्हती. ब्रजकिशोरबाबूंचें मंडळ हें मुख्यत्वेंकरून वकीलमंडळ होतें. अर्थात् ते प्रसंग पडल्यास आपल्या खिशांतून खर्च भागवीत किंवा मित्रमंडळींकडून कांहीं घेत. स्वतःची धनदौलत चांगली असतांना लोकांकडे पैशाची भिक्षा कशी मागावी, असें त्यांना वाटे. चंपारण्यांतील रयतेकडून एक पैहि घ्यावयाची नाहीं असा माझा दृढनिश्चय होता. ती घ्यावी तर त्याचा भलताच अर्थ होणार. या चौकशीसाठीं म्हणून हिंदुस्थानांत जाहीर फंडहि काढूं नये, असेंहि ठरविलें होतें. तसें केल्यास त्या प्रश्नाला राष्ट्रीय व राजकीय स्वरूप प्राप्त झालें असतें. मुंबईहून मित्रांनीं १५००० रुपयांच्या मदतीची तार पाठविली. त्यांची मदत आभारपूर्वक परत केली. चंपारण्याबाहेरच्या पण बहारमधीलच सुखी लोकांकडून ब्रजकिशोरबाबूंचें मंडळ मिळवूं शकेल तेवढें साहाय्य घ्यावें आणि कमी पडेल तेवढें मी डॉ. प्राणजीवनदास मेहतांकडून मागवून घ्यावें असें ठरविलें. डॉक्टर मेहतांनीं लागेल तेवढी मदत मागवून घेण्याबद्दल लिहून कळविलें. अशा तऱ्हेनें पैशांच्या बाबतींत आम्ही निश्चिंत झालों. गरिबीनें कमींत कमी खर्चांत राहून लढा चालवावयाचा होता. त्यामुळें पैसा विशेषसा लागण्यासारखा नव्हता. वस्तुतः

लागलाहि नाहीं. सर्व मिळून २-३ हजारांवर खर्च झाला नाहीं अशी माझी कल्पना आहे. गोळा केलेल्या पैशांपैकीं हजारपांचशें रुपये शिल्लकच राहिले असें मला स्मरतें.

आरंभकाळची आमची राहणी विचित्र होती; व मला तर तो रोजच्या रोज विनोदाचा विषय होऊन बसला होता. वकीलमंडळींपैकीं प्रत्येकाबरोबर आचारी, नोकर असावयाचे; प्रत्येकाचा स्वयंपाक स्वतंत्र स्वतंत्र व्हावयाचा. रात्रीचे बारा वाजतांहि जेवीत असावयाचे; हे महाशय राहात आपापल्या खर्चानेंच; तरी पण मला या राहाणीचा उपद्रवच वाटे. माझ्यामध्यें व माझ्या सोबत्यांमध्यें स्नेह-गांठ इतकी मजबूत बांधली गेली होती, की आमच्यामध्यें गैरसमज होण्याचा संभव नव्हता. ते माझे वाग्बाण प्रेमानें सहन करीत. शेवटीं असें ठरलें, कीं नोकरांना रजा द्यावी, सर्वांनीं एकत्र जेवावें व जेवणांत नियमितपणा पाळावा. सर्वचजण शाकाहारी नव्हते; दोन भोजनगृहें चालवावयाचीं तर खर्च वाढणार; त्यासाठीं निर्मांस भोजन तयार करून एकच भोजनगृह चालवावयाचें असा ठराव झाला. भोजनसुद्धां साधें ठेवण्याबद्दल कटाक्ष होता. त्यामुळें खर्चाची पुष्कळ बचत झाली, काम करण्याची शक्ति वाढली व वेळहि वांचला.

शक्ति वाढेल तेवढी पाहिजेच होती. कारण कीं, शेतकऱ्यांच्या टोळ्यांच्या टोळ्या स्वतःची कहाणी लिहून देण्यास येऊं लागल्या. कहाणी लिहावयाला सांगणारा-बरोबर त्याच्या जोडीदारांचें लष्कर असावयाचेंच. त्यामुळें घराचें कंपाउंड भरून जाई. दर्शनाभिलाषी लोकांपासून माझा बचाव करण्यासाठीं सहकारी खूप प्रयत्न करीत, पण ते व्यर्थ जात. ठराविक वेळीं दर्शन देण्यासाठीं मला बाहेर काढण्या-खेरीज गत्यंतरच नसे. कहाण्या लिहून घेणारेहि पांचसातजण तरी नेहमीं असत, तरीसुद्धां दिवसाच्या अखेरीला सर्वांच्या जबान्या पुऱ्या होत नसत. एवढ्या सर्व-जणांच्या हकीकतीची जरूर नव्हती; तरी पण ती लिहून घेतल्यानें त्यांना बरें वाटे, आणि मला त्यांच्या भावना कळून येत.

कहाणी लिहून घेणारांनीं कांहीं नियमांचें पालन करावयाचें असे. प्रत्येक शेतकऱ्याची उलटतपासणी केली पाहिजे. उलटतपासणींत जो डळमळेल त्याची जबानी घ्यावयाचीच नाहीं. ज्याची हकीकत मुळांतच निराधारशी वाटेल तीहि घ्यावयाची नाहीं. अशा नियमांच्या पालनामुळें वेळ थोडासा अधिक लागे खरा, पण जबान्या पुष्कळशा खऱ्याखुऱ्या व सिद्ध करतां येतील अशा मिळत.

या जबान्या घेतेवेळीं गुप्त पोलिसांचे कोणी ना कोणी अंमलदार हजर असावयाचेच. या अंमलदारांना येण्यास आडकाठी करतां आली असती; पण आम्हीं सुरुवातीलाच ठरविलें होतें, कीं त्यांना येण्यास हरकत करावयाची नाहीं; एवढेंच नव्हे, तर त्यांच्याशीं आदरपूर्वक वागावयाचें व देतां येण्यासारखी

माहितीहि त्यांना द्यावयाची. त्यांच्यादेखत, ते ऐकत असतांच सर्व जबान्या घेण्यांत येत असत. यापासून एवढा फायदा झाला, कीं लोकांमध्यें अधिक निर्भयता आली. गुप्त पोलिसांची लोकांना फार भीति वाटत असे, ती उडून गेली. तसेंच त्यांच्या देखत द्यावयाच्या जबान्यांमध्यें अतिशयोक्तीचें भय कमी राही. खोटें सांगूं लागल्यास अंमलदार आपल्याला पकडतील, या भीतीनें त्यांना जपूनच बोलावें लागे.

माझी इच्छा नीलवरांना खिजविण्याची नव्हती. त्यांना विनयपूर्वक वळविण्याचा मला प्रयत्न करावयाचा होता. म्हणून ज्यांच्याविरुद्ध विशेष गंभीर अशी तक्रार असेल, त्याला पत्र लिहीत असें, व भेटण्याचाहि प्रयत्न करीत असें. नीलवरमंडळाचीहि भेट घेतली आणि रयतेच्या तक्रारी त्यांच्यापुढें मांडून त्यांची बाजूहि ऐकून घेतली. त्यांच्यापैकीं कांहींजण माझा तिरस्कार करीत. कांहीं तटस्थ होते, व कोणी कोणी आदरहि दर्शवीत.

● ● ●

## १७

# माझे सहकारी

ब्रजकिशोरबाबू व राजेंद्रबाबू ही तर एक अद्वितीय जोडी होती. यांच्याखेरीज मला एकहि पाऊल पुढें टाकतां येऊं नये इतकें त्यांनी आपल्या प्रेमानें मला अपंग बनवून टाकलें. त्यांचे शिष्य म्हणा किंवा सोबती म्हणा, असे जे शंभूबाबू, अनुग्रहबाबू, धरणीबाबू, रामनवमीबाबू, ही वकील मंडळी नेहमीं बरोबरच राहात. हा झाला बिहारी संघ. त्यांचें मुख्य काम जबान्या घेण्याचें असे.

आचार्य कृपलानींना यांच्यांत येऊन सामील झाल्याखेरीज राहवण्यासारखें नव्हतें. स्वतः सिंधी असले तरी ते बिहारीपलीकडेहि बिहारी बनले होते. असे थोडेच सेवक मीं पाहिले आहेत, कीं ज्यांच्या अंगीं अशी कांहीं शक्ति असते, कीं ज्या प्रांतांत जातील तेथें पूर्णपणें एकजीव होऊन जातील; व आपण अन्य प्रांताचे आहों, असें कोणाच्या लक्षांतहि येऊं देणार नाहींत. अशांपैकीं कृपलानी हे एक होते. त्यांचा मुख्य धंदा द्वारपाळाचा होता. दर्शनासाठीं येणाऱ्या लोकांपासून माझा बचाव करण्यामध्येंच आपल्या जीवनाचें इतिकर्तव्य आहे असें त्या वेळेपुरतें त्यांनीं मानलें होतें. कोणाला विनोदपूर्वक माझ्यापर्यंत येण्याचा थांबवीत, तर कोणाला अहिंसक धमकीनें. रात्र झाली कीं शिक्षकाचा धंदा सुरू करीत; व सोबत्यांना हंसवीत आणि कोणी भित्र्या मनाचा आला असल्यास त्याच्यांत शौर्य भरीत.

मौलाना मझरूल हक्क यांनीं माझे मदतगार म्हणून आपला हक्क नोंदवून ठेविला होता; तेहि महिन्यांतून एक-दोन खेपा करून जात. त्या वेळचा त्यांचा थाटमाट व दिमाख आणि आजचा त्यांचा साधेपणा यांमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. आमच्यामध्यें आले म्हणजे आपलें अंतःकरण ते आमच्यामध्यें मिसळून देत; पण आपल्या अमीरी थाटामुळें बाहेरच्या माणसाला ते आमच्याहून निराळेसे दिसत.

मला अनुभव मिळत चालला तसतसें वाटूं लागलें, कीं चंपारण्यांध्यें नीट काम करावयाचें तर खेडोंपाडीं शिक्षणाचा प्रवेश झाला पाहिजे. लोकांचें अज्ञान कींव येण्याजोगें होतें. पोरें गांवांत रखडत असत; किंवा त्यांना दोन किंवा तीन पैसे मजुरी मिळे. तेवढ्यासाठीं आईबापें त्यांना सारा दिवस निळाच्या मळयामध्यें राबवीत असत. त्या काळीं पुरुषांची मजुरी दहा पैशांहून अधिक नव्हती. स्त्रियांची सहा पैसे व मुलांची तीन पैसे. चार आणे मजुरी मिळेल तो मजूर भाग्यशाली समजला जात असे.

सोबत्यांबरोबर विचार करून सहा खेड्यांमध्यें प्रथम मुलांसाठीं शाळा उघडण्याचें ठरविलें. अशी अट घातली होती, कीं त्या त्या गांवच्या पुढाऱ्यांनीं घर आणि शिक्षकाचें जेवण एवढें द्यावें व बाकीचा खर्च आम्ही पुरवावा. इकडच्या खेड्यांमध्यें पैशांचा झरा वहात नव्हता; पण धान्य वगैरे पुरविण्याइतकी लोकांमध्यें शक्ति होती; त्यामुळें लोक कच्चे धान्य देण्यास तयार झाले.

शिक्षक कोठून आणावे हा प्रश्न होता. बिहारमधून तुटपुंजा पगार घेणारे किंवा कांहीं न घेतां काम करणारे शिक्षक मिळणें कठिण होतें. माझी अशी कल्पना होती, कीं सामान्य शिक्षकाच्या हातांत मुलें द्यावयाचींच नाहींं. शिक्षकाचें पुस्तकी ज्ञान बेताचें असलें तरी चिंता नाहीं, पण त्याच्यामध्यें चारित्र्यबळ पाहिजे.

या कामासाठीं स्वयंसेवकांची मीं जाहीर रीतीनें मागणी केली. उत्तरीं गंगाधरराव देशपांड्यांनीं, बाबासाहेब सोमण व पुंडलीकजी यांस पाठविलें. मुंबईहून अवंतिकाबाई गोखले आल्या. दक्षिणेंतून आनंदीबाई आल्या. मीं छोटेलाल, सुरेंद्रनाथ व माझा मुलगा देवीदास यांना बोलावून घेतले. याच सुमाराला महादेव देसाई व नरहरि पारेख मला भेटून गेले होते. महादेव देसायांच्या पत्नी दुर्गाबेन व नरहरि पारेखच्या पत्नी मणीबेन याहि आल्या. कस्तूरबाईलाहि मीं बोलावून घेतली होती. शिक्षक-शिक्षिकांचा एवढा संघ पुरेसा होता. श्रीमती अवंतिकाबाई व आनंदीबाई यांना सुशिक्षित म्हणतां येईल; पण मणीबेन पारेख व दुर्गाबेन देसाई यांना गुजराथीचें थोडेंसें ज्ञान होतें. कस्तूरबाईला तर जवळजवळ मुळींच नाहीं. या भगिनींनीं हिंदी बालकाना कसें शिकवावें ?

स्त्रियांना हरतऱ्हेचे युक्तिवाद करून समजावून सांगितलें, कीं त्यांनीं मुलांना शिकवावयाचें तें व्याकरण नव्हे, रीतभात शिकवावयाची आहे, लिहावाचावयाला शिकविण्यापेक्षां स्वच्छतेचे नियमच शिकवावयाचे आहेत. हेंहि दाखवून दिलें, कीं हिंदी, गुजराथी, मराठी यांमध्यें फारसा फरक नाहीं, व पहिल्या वर्गामध्यें तर जेमतेम आंकडे मांडावयाला शिकवावयाचें असणार. अर्थात् अडचण पडण्याचें कारणच नाहीं. परिणाम असा झाला, कीं स्त्रियांचे वर्ग उत्तम तऱ्हेनें चालले. त्यांच्यामध्यें आत्मविश्वास उत्पन्न झाला आणि स्वत:च्या कामाबद्दल त्यांना गोडी वाटूं लागली. अवंतिकाबाईची शाळा आदर्श शाळा बनली. त्यांनीं आपल्या शाळेमध्यें आपलें शक्तिसर्वस्व घातलें. त्यांच्यामध्यें कार्यकुशलताहि तशीच होती. या भगिनींमार्फत खेड्यांतील स्त्रीवर्गामध्येंहि आम्हांला प्रवेश करतां आला.

पण मला शिक्षणावरच थांबावयाचें नव्हतें. गांवांत घाण अमर्याद असे. गल्लींतून कचरा, विहिरीपाशीं चिखल व दुर्गंधि, आंगणाकडे पाहाण्याचीहि सोय नाहीं. प्रौढांना स्वच्छतेच्या शिक्षणाची जरूर होती. चंपारण्यांतील लोक रोगांनीं पछाडलेले दिसत. होईल तेवढें ग्रामसुधारणेचें काम करावें आणि तसें करून लोकांच्या जीवनाच्या दरेक विभागामध्यें प्रवेश करावा अशी वृत्ति होती.

या कामीं डॉक्टरांच्या मदतीची जरूर होती. त्यासाठीं मीं गोखल्यांच्या समाजाकडून डॉ. देवांची मागणी केली. त्यांची माझी मैत्री तर जमलेलीच होती. सहा महिन्यांपुरता त्यांच्या सेवेचा लाभ मिळाला. शिक्षक व शिक्षिका यांनीं त्यांच्या देखरेखीखालीं काम करावयाचें होतें.

सर्वांबरोबर एवढा ठराव करून ठेविलेला होता कीं, कोणीहि नीलवरां-विरुद्ध तकारी आल्यास त्यांमध्यें पडावयाचें नाहीं; राजकारणाला स्पर्शहि करावयाचा नाहीं; कोणाच्या तक्रारी आल्यास त्यांना माझ्याकडे पाठवून द्यावें; कोणीहि आपल्या क्षेत्राबाहेर एक पाऊलभरहि जाऊं नये. चंपारण्यामध्यें या सोबत्यांनीं केलेलें नियमपालन अद्‌भुत होतें. मला असा एकहि प्रसंग आठवत नाहीं, कीं कोणीं त्याला मिळालेल्या सूचनांचें उल्लंघन केलें.

●●

# १८

# ग्रामप्रवेश

बहुधा प्रत्येक शाळेमध्यें एक पुरुष व एक स्त्री अशी व्यवस्था झाली होती. औषधपाणी व साफसफाई यांची व्यवस्था त्यांच्यामार्फतच व्हावयाची होती. स्त्रियांच्या मध्यस्थीनें स्त्रीवर्गामध्यें शिरकाव करावयाचा होता. औषधाचें काम अगदीं सोपें करून टाकलेलें होतें. एरंडेल, कोयनेल आणि एक मलम एवढ्याच वस्तू प्रत्येक शाळेंत ठेवलेल्या होत्या. जीभ तपासतां ती मलिन दिसली आणि बद्धकोष्ठाची कुरकुर कानीं आली तर एरंडेल द्यावयाचें. तापाचें दुखणें असल्यास एरंडेल देऊन दुसऱ्या खेपेला कोयनेल द्यावयाचें आणि फोड वगैरे असतील तर ते धुऊन वर मलम लावावयाचें. पोटांत घेण्याचें औषध किंवा मलम सहसा घरीं घेऊन जाण्यास दिलें जात नसे. जोखमीचें किंवा लक्षांत न येण्यासारखें दुखणें आढळल्यास डॉक्टर देवांना दाखविण्यासाठीं ठेवून दिलें जात असे. डॉक्टर देव निरनिराळ्या ठिकाणीं नेमलेल्या वेळीं फेरी करीत. असल्या साध्या सोयींचा लाभ लोक भरपूर प्रमाणांत घेत असत. सर्वसामान्य दुखणीं थोडींच असतात; व त्यासाठीं मोठमोठ्या विशारदांची जरूरीहि नसते. हें लक्षांत घेतलें तर वर दर्शविल्याप्रमाणें केलेली व्यवस्था कोणालाहि हास्यजनक वाटण्याचें कारण नाहीं; त्या लोकांना तर नाहींच वाटली.

सफाईचें काम अवघड होतें. लोक घाण काढून टाकण्यास तयार होत ना. स्वतःच्या हातानें घाण साफ करण्याची तयारी, जे लोक रोज शेतांत मजुरी करीत त्यांचीहि नव्हती. डॉ. देव थोडक्यानें हात टेकणारे नव्हते. त्यांनी जातीनें व स्वयंसेवकांनिशीं एका गावचे रस्ते साफ केले; लोकांच्या अंगणातील कचरा काढून टाकला, विहिरींच्या आसपासचे खड्डे भरून काढले, चिखल काढला आणि गांवच्या लोकांची स्वयंसेवक देण्याविषयीं प्रेमपूर्वक समजूत घालीत राहिले. कित्येक ठिकाणीं लोकांनीं लाजेकाजेस्तव तरी काम सुरू केलें, आणि कित्येक ठिकाणीं तर लोकांनीं माझी मोटार थेट यमार व्हावी म्हणून सडकाहि अंगमेहनतीनें तयार केल्या. असल्या मधुर अनुभवांच्या जोडीला लोकांच्या बेपर्वाईचे कडू अनुभवहि असतच. या सफाईची माहिती ऐकून कित्येक ठिकाणीं लोकांच्या मनामध्यें तिरस्कार उत्पन्न झाल्याचेंहि मला आठवतें.

एका अनुभवाचें वर्णन स्त्रियांच्या अनेक सभांमध्यें मीं केलेलें आहे. तें या अनुभवांबरोबर येथेंहि करणें अस्थानीं होणार नाहीं. भीतिहरवा हें एक लहानसें खेडें आहे. तेथें कित्येक स्त्रियांचे कपडे फारच मलिन दिसून आले. त्या स्त्रियांची कपडे धुण्या-बदलण्याविषयीं समजूत घालण्यास मीं कस्तूरबाईला सुचविलें. तिचें

त्या बायकांपाशीं बोलणें झालें. त्यांपैकीं एक बाई तिला आपल्या झोंपडीमध्यें घेऊन गेली व म्हणाली, " तुम्हींच पाहाना, येथें कांहीं पेटी, कपाटें वगैरे नाहीं, कीं त्यांत कपडे ठेवलेले असतील ! माझ्यापाशीं ही मीं नेसलें आहे तेवढीच काय ती एक साडी आहे. ती मीं धुवावी कशी ? महात्माजींना म्हणावें, कीं आम्हांला कपडे देण्याची व्यवस्था करा. मग मी रोज स्नान करून रोज कपडे बदलावयाला तयार आहें. " असल्या झोंपड्या हिंदुस्थानमध्यें अपवादरूप नाहींत. असंख्य झोपड्यांमध्यें सामानसुमान, पेटी-पडताळ, कपडेलत्ते, कांहीं एक नसतें; आणि असंख्य माणसें अंगावरील कपड्यावर काळ कंठीत असतात.

आणखी एक अनुभवहि नमूद करण्याजोगा आहे. चंपारण्यांत वांस आणि घास, बांबू आणि गवत यांचा दुष्काळ नाहीं. लोकांनीं भीतिहरवामध्यें शाळेसाठीं जें छप्पर बांधलें तें बांबूंचें व गवताचें बनविलेलें होतें. त्याला कोणी रात्रीची आग लावली. शेजारपासच्या नीलवरांच्या माणसांबद्दल शंका घेण्यात आली. परत बांबू-गवताचेंच घर बांधणें बरें दिसलें नाहीं. ही शाळा श्री. सोमण व कस्तूरबाई यांच्या ताब्यांत होती. श्री. सोमणांनीं विटांचें पक्कें घर बांधण्याचा निश्चय केला; आणि त्यांच्या अंगमेहनतीचा संसर्ग इतरांनाहि लागला. त्यामुळें क्षणभरांत विटांचें घर उभें झालें, आणि पुन्हां घर जळून जाण्याची भीति राहिली नाहीं.

अशा तऱ्हेनें शाळा, ग्रामसुधारणा व औषधपाणी इत्यादि कामामुळें लोकांमध्यें स्वयंसेवकांविषयीं विश्वास व आदर हीं वाढलीं व त्यांच्यावर चांगली छाप बसली.

पण मला सांगण्यास दिलगिरी वाटते, कीं हें काम दृढमूल करण्याची माझी इच्छा सफल झाली नाहीं. स्वयंसेवक मिळाले होते, ते ठराविक मुदतीपुरतेच मिळाले होते. इतर नवीन मिळणें कठिण झालें; आणि बिहारमधूनहि या कामाला लायक असे कायमचे सेवक मिळूं शकले नाहींत. चंपारण्यांतील माझें काम पुरें होतें, इतक्यांतच दुसरें एक काम माझ्यासाठीं तयार होऊन राहिलें होतें. त्या कामानें मला दुसरीकडे खेंचून नेलें. असें असतांहि सहा महिनेपर्यंत केलेल्या कामाचीं पाळेंमुळें येथपर्यंत गेलीं, कीं त्यांचा परिणाम या नाहीं त्या स्वरूपात आजमितीपर्यंत टिकून राहिला आहे.

*

# १९
# उजळ बाजू

एकीकडून समाजसेवेचें काम, ज्याचा उल्लेख मीं गेल्या कांहीं प्रकरणांमध्यें केला आहे, तें चालू होतें. दुसरीकडून लोकांच्या दुःखाच्या कहाण्या नोंदण्याचें काम वाढत्या प्रमाणांत चालू होतें. हजारों लोकांच्या करुणकथा लिहिल्या गेल्या; त्याचा परिणाम झाल्याखेरीज कसा राहाणार ? माझ्या उतरण्याच्या ठिकाणीं लोकांची गर्दी जसजशी वाढत चालली, तसतसा नीलवरांचा क्रोध वाढत चालला माझी चौकशी बंद करविण्याचे त्यांच्याकडून होणारे प्रयत्न वाढत गेले.

एके दिवशीं मला बिहार सरकारकडून पत्र आलें. त्याचा भावार्थ पुढीलप्रमाणें होताः—" तुमची चौकशी बरीच लांबली असें म्हणण्यास हरकत नाहीं. तुम्हीं आतां ती आटोपती घेऊन बिहार सोडून गेलें पाहिजे. " पत्राची भाषा आदरयुक्त होती. पण भावार्थ स्पष्ट होता. मीं उत्तरीं लिहिलें, कीं " तपास तर लांबणारच आणि तो आटोपल्यानंतरहि लोकांच्या दुःखाचें निवारण होईपर्यंत माझा इरादा बिहार सोडून जाण्याचा नाहीं. "

माझी चौकशी थांबविण्याचा एकच रास्त इलाज सरकारपाशीं होता. तो असा कीं, त्यांनीं लोकांची तक्रार खरी समजून दाद द्यावी, किंवा निदान तक्रारीबद्दल आस्था दाखवून स्वतःची चौकशीकमिटी नेमावी. गव्हर्नर सर एडवर्ड गेइट यांनीं मला बोलाविलें, व स्वतः चौकशी कमिटी नेमण्याचा आपला इरादा मला बोलून दाखविला; आणि त्या कमिटीचा सभासद म्हणून काम करण्यास मला पाचारण केलें. मीं इतर नांवें पाहिलीं व सोबत्यांबरोबर विचार करून, मला सोबत्यांबरोबर सल्ला मसलत करण्याची मोकळीक असली पाहिजे या शर्तीवर, सभासद होण्याचें कबूल केलें. तसेंच सरकारनें हेंहि ध्यानांत बाळगलें पाहिजे, कीं मी सभासद झालों म्हणून शेतकऱ्यांचा कैवारी नाहींसा होत नाहीं हें एक, व दुसरें चौकशी आटोपल्यानंतर माझें समाधान न झाल्यास शेतकऱ्यांना मार्ग दाखविण्याचें माझें स्वातंत्र्य मी हातचें घालविण्यास तयार नाहीं.

सर एडवर्ड गेइटनीं या अटी वाजवी म्हणून मान्य केल्या. मरहूम सर फ्रँक स्लाय त्या कमिटीचे प्रमुख नेमले गेले. चौकशी कमिटीनें शेतकऱ्यांच्या सर्व तक्रारी रास्त ठरविल्या, आणि नीलवरांनीं गैरवाजवी रीतीनें घेतलेल्या पैशांपैकीं अमुक इतका भाग परत करावा व तीन कठियांचा कायदा रद्द करण्यांत यावा अशी शिफारस केली.

ह्या रिपोर्ट सांगोपांग होण्याच्या व अखेरीस तदनुरूप कायदा पसार होण्याच्या कामीं सर एडवर्ड गेइट यांचा हिस्सा फार मोठा होता. ते दृढ राहिले नसते किंवा त्यांनीं आपल्या कौशल्याचा पूर्ण उपयोग केला नसता, तर रिपोर्ट एकमतानें झाला तसा होऊं शकला नसता; आणि शेवटीं जो कायदा पसार झाला तो होऊं शकला नसता. नीलवरांची सभा फार प्रबळ होती. रिपोर्ट बाहेर पडल्यानंतरहि त्यांच्यापैकीं कांहींनीं बिलाला कसून विरोध केला. पण सर एडवर्ड गेइट अखेरपर्यंत भक्कम राहिले, व कमिटीच्या शिफारशींचा त्यांनीं संपूर्ण अंमल केला.

अशा तऱ्हेनें शंभर वर्षांपासून चालत आलेला तीन कठियांचा कायदा मोडून पडला, व त्याबरोबर नीलवरराज्याचा अस्त झाला. जो रयतवर्ग सदाचा दबलेला राहात होता, त्याला स्वतःच्या शक्तीची कांहींशी जाणीव झाली, आणि निळाचा डाग धुऊन जातां जाणार नाहीं अशा तऱ्हेचा जो चुकीचा समज होता, तो दूर झाला.

माझी इच्छा होती, कीं चंपारण्यामध्यें सुरू केलेलें विधायक काम पुढें चालवावें, लोकांमध्यें कांहीं वर्षेंपर्यंत काम करावें, आणखी शाळा काढाव्या व आणखी खेड्यांमध्यें प्रवेश करावा. क्षेत्र तयार होतें, पण माझ्या मनीषा पुष्कळ वेळां ईश्वरानें पार पडूं दिलेल्याच नाहींत. मीं मनाशीं योजलें होतें एक, आणि दैवानें मला ओढून नेलें दुसऱ्याच कामाकडे.

२०

# मजुरांशीं संबंध

चंपारण्यांतील कमिटीचें काम मी आटपीत आहें इतक्यांत खेडा जिल्ह्यांतून त्या जिल्ह्यांतील शेतीचें नुकसान व सारामाफी यांसंबंधीं मोहनलाल पंड्या व शंकरलाल पारेख यांचें मला पत्र आलें. तिकडे जाऊन लोकांचें नेतृत्व स्वीकारण्याबद्दल त्यांनीं आग्रह केला. जाग्यावर जाऊन तपास केल्याखेरीज सल्ला देण्याची माझी इच्छा नव्हती, माझी शक्तीहि नव्हती किंवा हिंमतहि नव्हती.

दुसरीकडून श्रीमती अनसूयाबाईचें पत्र त्यांच्या मजूरसंघासंबंधीं आलें होतें. मजुरांचे पगार तुटपुंजे होते. पगारवाढीची त्यांची मागणी फार काळापासूनची होती. या बाबतींत त्यांचें मार्गदर्शकत्व करण्याची मला हौस होती. हें प्रमाणांत छोटेसें वाटणारें कामहि मी दूर राहून करूं शकेन अशी माझी ऐपत नव्हती.

म्हणून मी पहिली संधि सांपडतांच अहमदाबादला समक्ष गेलों. मला असें वाटलें होतें, कीं दोन्ही कामांचा तपास करून थोड्याच दिवसांत मी परत चंपारण्याला येईन, आणि तेथील विधायक कामाची देखरेख करूं लागेन.

पण अहमदाबादला पोंचल्यानंतर अशीं एक एक कामें निघूं लागलीं, कीं मला किती तरी काळपर्यंत चंपारण्याला जातां आलें नाहीं; व चालू केलेल्या शाळा एकामागून एक बंद पडल्या. मीं व माझ्या सोबत्यांनीं किती तरी मनोराज्यें रचलीं होतीं, परंतु तूर्त तरी तीं ढांसळून पडलीं.

चंपारण्यामध्यें गांवशाळा व ग्राम-सफाई यांखेरीज गोरक्षणाचें काम मीं हातीं घेतलें होतें. गोशाळा व हिंदी प्रचार या कामांचा मक्ता मारवाडी बंधूंनीं घेतलेला आहे, असें माझ्या भ्रमणामध्यें माझ्या लक्षांत येऊन चुकलें होतें. बेतियामध्यें एका मारवाडी गृहस्थानें आपल्या धर्मशाळेंत मला आश्रय दिला होता. बेतियाच्या मारवाडी गृहस्थांनीं मला आपल्या गोशाळेमध्यें आसरा दिला होता. गोरक्षणासंबंधीं आज माझे जे विचार आहेत, तेच त्या वेळींहि बनून गेलेले होते. गोरक्षण म्हणजे गोवंशशुद्धि, गोजातिसुधारणा, बैलांकडून नियमशीर काम घेणें, गोशाळेचें नमुनेदार दुग्धालय बनविणें वगैरे. या कामीं मारवाडी बंधूंनीं भरपूर मदत देण्याचें वचन दिलें. पण मी चंपारण्यामध्यें स्थिर राहूं न शकल्यामुळें तें काम अर्धवटच राहिलें. बेतियामध्यें गोशाळा तर आजहि चालू आहे, पण ती आदर्श दुग्धालय बनूं शकलेली नाहीं. चंपारण्यांतील बैलांकडून अद्यापहि त्यांच्या शक्तीपलीकडे काम घेण्यांत येतें. नांवाचे हिंदु अजूनहि बैलांना निर्दयपणें झोडपतात व धर्माला बट्टा आणतात. हें शल्य माझ्या हृदयामध्यें कायमचें राहून गेलें आहे. जेव्हां जेव्हां मी चंपारण्याला जातों, तेव्हां तेव्हां या अगत्याच्या परंतु अर्धवट राहिलेल्या कामाचें स्मरण होऊन उसासा टाकतों आणि हीं कामें अर्धवट सोडून गेल्याबद्दल मारवाडी बंधू व बिहारी लोक मला प्रेमपूर्वक दोष देतात, ते मी मुकाट्यानें ऐकून घेतों.

शाळांचें काम या नाहीं त्या रीतीनें येथें नाहीं पण दुसरीकडे चालू आहे. पण गोसेवेच्या कार्यक्रमानें मूळच धरलें नव्हतें. त्यामुळें त्याला योजल्याप्रमाणें वळण देतां आलें नाहीं.

अहमदाबादमध्येंच खेडा जिल्ह्यातील कामासंबंधीं सल्लामसलती चालू होत्या. त्या मुदतींतच मीं मजुरांचें काम हातीं घेतलें.

माझी स्थिति अतिशय नाजुक होती. मजुरांचा पक्ष मला अतिशय बळकट दिसला. श्री. अनसूयाबाईना आपल्या सख्ख्या भावाबरोबरच लढावें लागणार होतें. मजूर व मालक यांमधील या दारुण युद्धामध्यें श्री. अंबालाल साराभाईनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. गिरणीमालकांशीं माझा सलोख्याचा संबंध होता.

त्यांच्याबरोबर लढणें माझ्या जिवावर येत होतें. त्यांच्याबरोबर वाटाघाटी करून मीं त्यांना मजुरांच्या मागणीसंबंधीं पंच नेमण्याबद्दल विनविलें; परंतु आपल्या व मजुरांच्यामध्यें पंचांनीं मध्यस्थी करावी, हेंच मालकांना योग्य वाटेना.

मजुरांना मीं संप पुकारण्याचा सल्ला दिला. तो सल्ला देण्यापूर्वीं मजूर व मजुरांचे पुढारी यांच्याशीं भरपूर परिचय करून घेतला. त्यांना संपाच्या अटी समजावून दिल्या त्या अशाः—

१. शान्तताभंग कांहीं झालें तरी करावयाचा नाहीं.
२. ज्यांची कामावर जाण्याची इच्छा असेल त्यांच्यावर जोरजुलूम करावयाचा नाहीं.
३. मजुरांनीं भिक्षान्न खाऊं नये.
४. संप कितीहि लांबला तरी त्यांनीं दृढ राहावें, आणि स्वतःजवळचे पैसे संपले तर इतर मजुरी करून पोटास मिळवावें.

या अटी पुढाऱ्यांनीं समजून घेतल्या व त्या त्यांनीं मान्य केल्या. मजुरांची जाहीर सभा झाली व तींत त्यांनीं ठराव केला, कीं आपली मागणी मान्य झाल्याखेरीज किंवा तिच्या युक्तायुक्ततेचा तपास करण्यासाठीं पंच नेमले गेल्याखेरीज आपण कामावर जाणार नाहीं.

या संपामध्येंच श्री. वल्लभभाई व श्री. शंकरलाल बँकर यांची मला खरीखुरी ओळख झाली असें म्हणतां येईल. श्री. अनसूयाबाईचा माझा परिचय यापूर्वींच चांगला झाला होता.

संपवाल्यांची सभा रोज नदीकिनारीं एका झाडाच्या छायेमध्यें भरूं लागली. त्या सभेला रोज शेंकडों मजूर हजर राहात. मी रोज त्यांना त्यांच्या प्रतिज्ञेचें स्मरण करून देत असें. शान्ति पाळण्याची आवश्यकता समजावून देत असे. ते आपला ' एक निश्चया 'चा बावटा घेऊन शहरांतून हिंडत व त्या मिरवणुकीनिशींच सभेला येत.

हा संप एकवीस दिवस चालला. त्या मुदतींत मी वेळोवेळीं गिरणीमालकांबरोबर वाटाघाट करीत असें, न्याय देण्याबद्दल त्यांना विनवीत असें. " आमच्यांतहि निश्चय म्हणून कांहीं पाहिजेच ना ? आमचा व आमच्या मजुरांचा संबंध पितापुत्रांप्रमाणें असावयाचा; त्याच्या आड कोणी आल्यास आम्हीं तें कसें सहन करावें ? त्यांच्यामध्यें पंच ते कशासाठीं ? " असा जबाब मला मिळत असे.

# २१

# आश्रमाचें दर्शन

मजुरांचें प्रकरण पुढें चालविण्यापूर्वीं आश्रमाकडे नजर टाकून येणें आवश्यक आहे. चंपारण्यांत राहात असलों तरी मी आश्रमाला विसरूं शकत नव्हतों. मधूनमधून आश्रमांत येऊनहि जात असें.

कोचरब हें अहमदाबादशेजारचें एक लहान खेडें आहे. आश्रमाची जागा या गांवांत होती. कोचरबमध्यें प्लेगाचा प्रादुर्भाव झाला. बालकांना मी त्या वस्तीमध्यें सुरक्षित ठेवूं शकत नव्हतों. स्वच्छतेचे नियम आम्हीं कितीहि काळजीपूर्वक पाळीत असलों, तरी आसपासच्या अस्वच्छतेपासून आश्रमाला अलिप्त ठेवणें अशक्य होतें. कोचरबच्या लोकांकडून स्वच्छतेचें पालन करवून घेण्याची किंवा अशा प्रसंगीं त्यांची सेवा करण्याची शक्ति आमच्यामध्यें नव्हती. आमचें ध्येय तर असेंच होतें, कीं आश्रम हा शहरापासून किंवा गांवापासून अलग असावा; मात्र जायला यायला पंचाईत पडेल इतका दूर नसावा. कधीं काळीं आश्रमाला 'आश्रम' नांव शोभणार असेल तर अगोदर त्यानें स्वतःच्या जमिनींत व खुल्या जागेंत स्थिर झालेंच पाहिजे.

प्लेगचा अर्थ आम्हांला कोचरब सोडून जाण्याची नोटीस असा मीं केला. श्री. पुंजाभाई हिराचंद आश्रमाशीं निकट संबंध ठेवीत असत व आश्रमाला लहानमोठ्या हरएक बाबतींत शुद्ध, निरभिमान बुद्धीनें साहाय्य करीत असत. अहमदाबादच्या कारभाराचा त्यांना विस्तृत अनुभव होता. आश्रमाला पाहिजे असलेली जमीन लगेच शोधून देण्याचें त्यांनीं अंगावर घेतलें. कोचरबच्या उत्तरेकडील व दक्षिणेकडील भाग मी त्यांच्याबरोबर हिंडलों. त्यानंतर उत्तरेकडे तीनचार मैलांवर जमिनीचा तुकडा मिळेल तर शोधून काढण्यास मीं त्यांना सुचविलें. सध्यां जेथें आश्रम आहे, त्या जमिनीचा ते शोध लावून आले. ती तुरुंगाच्या नजीक आहे; हें मला एक विशेष प्रलोभन वाटलें. सत्याग्रह-आश्रमवासीयांच्या नशिबीं तुरुंग तर लिहिलेलाच असणार अशी समजूत असल्यामुळें तुरुंगाचा शेजार बरा वाटला. हें तर मला माहीत होतेंच, कीं तुरुंगाचें स्थान नेहमीं जेथें आसपास स्वच्छ जागा असेल अशाच ठिकाणीं शोधून काढण्यांत येतें.

आठ एक दिवसांतच जमिनीचा सौदा केला. त्या जमिनींत एकहि घर नव्हतें. एकहि झाड नव्हतें. नदीकिनारा व एकान्त हे गुण तें ठिकाण मनांत भरण्यास विशेष कारणीभूत झाले. आम्हीं तंबूमध्यें राहाण्याचा निश्चय केला.

स्वयंपाकासाठीं पत्र्याचें एक तात्पुरतें छप्पर बांधावें व हळूहळू कायमचीं घरें बांधण्यास सुरुवात करावी असा विचार केला.

या वेळीं आश्रमाची लोकसंख्या वाढली होती. लहानमोठे स्त्रीपुरुष मिळून सुमारें चाळीसजण होते. सगळे एकाच ठिकाणीं जेवीत असत एवढें बरें होतें. योजना कल्पिणारा मी होतों. ती अमलांत आणण्याचा बोजा उचलणारे नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें मगनलालच होते.

कायमचें घर बनेपर्यंत भोगाव्या लागलेल्या गैरसोयींना सीमा नव्हती. पावसाळा डोक्यावर आला होता. सामानसुमान सर्व चार मैल अंतरावरून शहरांतून आणावयाचें होतें. या पडित जमिनीमध्यें सर्प वगैरेहि होतेच. तशा स्थितींत मुलांबाळांना सांभाळण्याची जबाबदारी अशी तशी नव्हती. सर्पादिकांना न मारण्याचा रिवाज होता; पण त्यांच्या भयापासून सर्वथैव मुक्त असे आमच्यापैकीं कोणीच नव्हते, आजहि नाहींत.

हिंसक प्राण्यांना न मारण्याच्या नियमाचें यथाशक्ति पालन फिनिक्स, टॉलस्टॉय फार्म व साबरमती या तिन्ही ठिकाणीं केलेलें आहे. तिन्ही ठिकाणीं पडित जमिनीमध्येंच वसाहत करावी लागली होती. तिन्ही ठिकाणीं जीवजिवड्याचा उपद्रव भरपूर होता असें म्हणतां येईल. असें असतांहि अद्यापपर्यंत एकहि मृत्यु घडलेला नाहीं. यामध्यें माझ्यासारख्या श्रद्धाळु माणसाला तरी ईश्वरी नेमानेम, त्याची कृपाच दिसते. ईश्वर पक्षपात करीत नाहीं, मनुष्याच्या रोजच्या कामामध्यें ढवळाढवळ करावयाला तो रिकामा बसलेला नाहीं, अशा तऱ्हेची निरर्थक शंका कोणीहि घेण्याचें कारण नाहीं. ही गोष्ट, हा अनुभव अन्य तऱ्हेनें कसा व्यक्त करावा तें मला समजत नाहीं. ईश्वराच्या कृतीचें वर्णन लौकिक भाषेमध्यें करीत असलों तरीहि मला माहीत आहे, कीं त्याचें ' कार्य ' अवर्णनीय आहे. पण पामर मनुष्य वर्णन करूं लागला म्हणजे त्याच्यापाशीं त्याच्या बोबड्या बोलीशिवाय दुसरें साधन नाहीं. सामान्यपणें सर्पांना वगैरे न मारण्याचा रिवाज असूनहि आमच्या आश्रमीय समाजाचीं पंचवीस वर्षें निर्विघ्नपणें जावीं हा निव्वळ योगायोग समजण्याऐवजीं त्याला ईश्वरीकृपा मानणें हा जर भ्रम असेल तर असला भ्रमहि छातीशीं कवटाळण्यासारखा आहे.

मजुरांचा संप झाला त्या वेळीं आश्रमाच्या इमारतीचा पाया भरीत होते. आश्रमाचें मुख्य कार्य विणकाम होतें. कांतण्याचा शोध तर अद्याप करूं शकलों नव्हतों. म्हणून विणकामशाळा प्रथम बांधून काढावी असें ठरविलें होतें. अर्थात् पायाचें काम चाललें होतें तें विणकामशाळेचेंच.

● ● ●

२२

# उ प वा स

मजुरांनीं पहिले दोन आठवडेपर्यंत खूप हिंमत दाखविली; शांतिहि खूप टिकविली; रोजच्या सभेला हजिरीहि खूप असे. रोज मी त्यांना त्यांच्या प्रतिज्ञेचें स्मरण करून देत असें. " आम्ही मरूं पण आपल्या प्रतिज्ञेपासून कधींहि ढळणार नाहीं, " असें रोज ते मोठमोठ्यानें गर्जून बोलत असत.

पण पुढें ते नरम पडूं लागले व निर्बल मनुष्य ज्याप्रमाणें हिंसक असतो, त्याप्रमाणें जे कमकुवत झाले, ते गिरण्यांत कामावर जाणारांचा द्वेष करूं लागले; आणि एकादे वेळीं कोणावर शक्तीचाहि प्रयोग करतील अशी मला धास्ती वाटूं लागली. रोजच्या सभेंतील माणसांची हजिरी मंदावत चालली. येत त्यांच्या चेहऱ्यावर उदासीनता पसरलेली दिसे. मला बातमी लागली, कीं मजूर डगमगूं लागले आहेत. मी फिकिरींत पडलों. अशा प्रसंगीं माझा धर्म कोणता याचा विचार करूं लागलों. दक्षिण आफ्रिकेंतील मजुरांच्या संपाचा मला अनुभव होता; पण हा अनुभव नवीन होता. जी प्रतिज्ञा करविण्यामध्यें माझें अंग होतें, जिचा मीं रोज साक्षी होत होतों, त्या प्रतिज्ञेचा भंग कसा व्हावा ? हा विचार अभिमानप्रेरितहि असेल किंवा तो मजुरांबद्दलच्या व सत्याबद्दलच्या प्रेमामुळेंहि उद्भवलेला असेल.

सकाळचा प्रहर होता. मी सभेमध्यें होतों. मी पुढें काय करणार आहें, याची मला कांहीं कल्पना नव्हती. पण सभेमध्यें मी बोलून गेलों, " मजूर जर पुन्हां सज्ज होत नसतील व निकाल लागेपर्यंत संप टिकावूं शकणार नसतील, तर तसा निकाल लागेपर्यंत मीहि उपवास करणार. "

हजर असलेले मजूर चपापले. अनसूयाबाईच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा सुरू झाल्या. मजूर म्हणूं लागले, " तुम्ही नका; आम्ही उपवास करतों. पण तुम्हीं उपवास करतां कामा नये. आम्हांला माफ करा, आम्ही प्रतिज्ञा पाळूं. "

मीं म्हटलें, " तुम्हांला उपवास करण्याची जरूरी नाहीं. तुम्ही तुमच्या प्रतिज्ञेचें पालन करा म्हणजे झालें. आपल्यापाशीं पैसे नाहींत. आपल्याला मजुरांना भिक्षान्न खाऊं घालून संप चालवायचा नाहीं. तुम्ही कसली तरी मजुरी करा आणि आपल्या रोजच्या रोटीपुरते पैसे मिळवा, म्हणजे संप कितीहि लांबला तरी तुम्हांला निश्चित राहतां येईल. माझा उपवास आतां निकाल लागण्यापूर्वीं सुटणें शक्य नाहीं. "

वल्लभभाई त्यांच्यासाठीं म्युनिसिपालिटीमध्यें कांहीं काम शोधीत होते; पण तेथें कांहीं मिळण्यासारखें नव्हतें. आश्रमाच्या विणकामशाळेमध्यें रेतीची भरणी टाकावयाची होती. त्यामध्यें पुष्कळशा मजुरांना काम द्यावें असें मगनलालनीं

सुचविलें. मजूर तें काम करायला तयार झाले. अनसूयाबाईंनीं सुरुवात केली, आणि नदीच्या पात्रांतून रेतीच्या टोपल्या भरून नेणाऱ्या मजुरांची रांग लागली. तें दृश्य पाहण्यालायक होतें. मजुरांमध्यें नवीन चैतन्य आलें. त्यांचा हिशेब चुकविणारे त्यांना पैसे देतां देतां दमले.

या उपवासामध्यें एक दोष होता. मीं मागें लिहिलेंच आहे, कीं मालकांशीं माझा मित्रत्वाचा संबंध होता. अर्थात् उपवासाची आंच त्यांना लागल्याखेरीज़ राहिलीच नसती. सत्याग्रही या नात्यानें मला त्यांच्याविरुद्ध उपवास करतां येणारच नाहीं हें मला समजतच होतें. त्यांच्यावर जो कांहीं परिणाम होणार तो मजुरांच्या संपाचाच झाला पाहिजे. माझें प्रायश्चित्त त्यांच्या दोषासाठीं नव्हतें, मजुरांच्या दोषानिमित्त होतें. मी मजुरांचा प्रतिनिधि असल्यामुळें त्यांच्या दोषांनीं मीहि दूषित होईन. मालकांना मी फक्त विनंति करूं शकणार, त्यांच्याविरुद्ध उपवास करणें हा त्रागा होईल; तरी पण माझ्या उपवासाचा त्यांच्यावर परिणाम झाल्याखेरीज राहाणार नाहीं हें मला कळत होतें; परिणाम झालाहि. पण माझा उपवास थांबविणें मलाहि शक्य नव्हतें. असा सदोष उपवासहि करणें मला माझा धर्म असल्याचें प्रत्यक्ष दिसत होतें.

मालकांना मीं समजावून सांगितलें, “माझ्या उपवासामुळें तुम्हांला तुमचा मार्ग सोडण्याची बिलकुल जरूरी नाहीं.” त्यांनीं मला कटुमधुर टोमणेहि मारले. त्यांना तसें करण्याचा अधिकार होता.

शेठ अंबालाल या संपाविरुद्ध भक्कम राहाण्याच्या बाबतींत अग्रेसर होते. त्यांची दृढता आश्चर्य उत्पन्न करणारी होती. यांचा निर्भीडपणाहि मला तितकाच आवडला. त्यांच्याबरोबर लढणें मला आवडत होतें. त्यांच्यासारखे पुढारी विरुद्ध पक्षाकडे असतांना माझ्या उपवासाचा त्यांच्यावर होणारा आड-परिणाम मलाहि जाचतच होता. त्यांतूनहि त्यांच्या धर्मपत्नी श्रीमती सरलादेवी यांचें माझ्यावर सख्ख्या बहिणीप्रमाणें प्रेम होतें. माझ्या उपवासामुळें त्यांना पडलेला पेंच माझ्यानें पाहवत नव्हता.

माझ्या उपवासाच्या पहिल्या दिवशीं तर अनसूयाबाई, इतर अनेक मित्र व मजूर यांनींहि माझ्याबरोबर उपवास केला. त्यांनीं अधिक उपवास करूं नये, याबद्दल मी त्यांची मोठ्या मुष्किलीनें समजूत घालूं शकलों. अशा तऱ्हेनें चोहींकडे वातावरण प्रेममय बनून गेलें. मालक केवळ दयेला वश होऊन तडजोड करण्याचे मार्ग शोधून काढूं लागले. श्री. अनसूयाबाईच्या घरीं त्यांच्या वाटाघाटी सुरू झाल्या. श्री. आनंदशंकर ध्रुवहि मध्यें पडले. अखेरीस त्यांनाच पंच नेमण्यांत आलें, व संप मिटला. मला तीनच दिवस उपवास करावा लागला. मालकांनीं मजुरांना

मिठाई वांटली. एकवीस दिवसांनीं तडजोड झाली. तडजोडीची सभा झाली. तिला मालक व उत्तर प्रान्ताचे कमिशनर हजर होते. कमिशनरांनीं मजुरांना सल्ला दिला, "तुम्हीं नेहमीं मि. गांधींच्या सांगण्याप्रमाणें वागत चला." ह्या गोष्टी-नंतर थोडक्याच दिवसांनीं मला त्यांच्याचविरुद्ध लढावें लागलें. काळ पालटला तसे तेहि पालटले, व खेडा जिल्ह्यांतील पाटीदारांना माझा सल्ला न ऐकण्याबद्दल सांगूं लागले.

रसिक परंतु करुणाजनक अशा एका घटनेचा उल्लेख येथें करणें योग्य दिसतें. मालकांनीं मिठाई खूप तयार केली होती. ती हजारों मजुरांना वांटावी कशी असा प्रश्न पडला. ज्या झाडाखालीं मजुरांनीं प्रतिज्ञा केली होती त्या ठिकाणींच ती वांटणें योग्य असें म्हणून, त्याचप्रमाणें दुसऱ्या कोठेंहि हजारों मजुरांना एकत्र करणें गैरसोईचें होईल याहि विचारानें, झाडासभोंवारच्या खुल्या मैदानामध्यें ती वांटावी, असें ठरविण्यांत आलें. मी भोळेपणानें असें समजलों, कीं एकवीस दिवसपर्यंत नियमनांत राहिलेले मजूर विशेष बंदोबस्ताखेरीजच रांगेनें उभे राहून मिठाई घेतील, अधीर होऊन मिठाईवर तुटून पडणार नाहींत. पण मैदानांत मिठाई वांटण्याच्या दोनतीन रीति चालवून पाहिल्या, त्या निष्फळ झाल्या. दोनतीन मिनिटेंपर्यंत सर्व सुरक्षित चाले, पण नंतर लावलेली रांग मोडून जाई. मजुरांच्या पुढाऱ्यांनीं आपली शिकस्त केली, पण व्यर्थ. अखेरीस गर्दी, गोंगाट व धक्काबुक्की इतक्या थराला जाऊन पोंचली, कीं कांहीं मिठाई चिरडून फुकट गेली. मैदानांत वांटणें बंद करावें लागलें, आणि राहिलेली मिठाई मोठ्या शिकस्तीनें सोडवून शेठ अंबालालच्या मिर्झापुरांतील बंगल्यांत पोंचती करतां आली. मग ती दुसऱ्या दिवशीं बंगल्याच्या आवारांतच वांटावी लागली.

यांतील हास्यरस तर स्पष्टच आहे. 'एकनिश्चया'च्या झाडापाशीं मिठाई वांटतां आली नाहीं, त्याच्या कारणाचा तपास करतां असें कळून आलें, कीं मिठाई वांटावयाची आहे असें समजल्यावरून अहमदाबादचे भिकारी येथें येऊन दाखल झाले होते. त्यांनीं रांगा मोडून मिठाई हिसकून नेण्याचे प्रयत्न केले. हाच करुणरस.

हा देश उपासमारीनें इतका पीडलेला आहे, कीं भिकाऱ्यांची संख्या वाढत जात आहे, आणि खावयाला मिळविण्यासाठीं ते सामान्य रीतीभातींचें उल्लंघन करतात. धनिक लोक असल्या भिकाऱ्यांना काम शोधून देण्याऐवजीं अविचार-पूर्वक त्यांना भिक्षा घालून पोसतात.

● ● ●

# २३

# खेडा-सत्याग्रह

मजुरांचा संप पुरा झाल्यानंतर मला दम टाकायलाहि वेळ मिळाला नाहीं. लगेच खेडा जिल्ह्यांतील सत्याग्रहाचें काम हातीं घ्यावें लागलें. खेडा जिल्ह्यामध्यें दुष्काळी स्थिति असल्यामुळें वसूल माफ करून घेण्यासाठीं खेड्याचे पाटीदार झटत होते. या बाबतींत श्री. अमृतलाल ठक्करनीं चौकशी करून रिपोर्ट केला होता. मी कसलाहि नक्की सल्ला देण्यापूर्वीं कमिशनरला भेटलों. श्री. मोहनलाल पंड्या व श्री. शंकरलाल पारेख अविश्रान्त परिश्रम करीत होते. स्व. गोकुळदास कहानदास पारेख व श्री. विठ्ठलभाई पटेल यांच्यामार्फत त्यांनीं कौन्सिलांत चळवळ चालविली होती. सरकारकडे डेप्युटेशनेंहि गेलीं होतीं.

या वेळीं मीं गुजराथ सभेचा अध्यक्ष होतों. सभेनें कमिशनर व गव्हर्नरला अर्ज केले, तारा केल्या, अपमान सहन केले. त्यांच्या धमक्यांकडे सभेनें दुर्लक्ष केलें. त्या वेळच्या अंमलदारांच्या दिमाखाचें आतां तर हंसूंच येतें. अंमलदारांची त्या वेळची अत्यंत क्षुद्र वर्तणूक आतां असंभवनीयशी वाटते.

लोकांची मागणी इतकी स्पष्ट आणि अल्प होती, कीं तिच्यासाठीं लढण्याची जरूरीच पडूं नये. पीक चार आणे किंवा त्याहून कमी आल्यास त्या वर्षापुरता वसूल माफ झाला पाहिजे. असा कायदाच आहे. पण सरकारी अंमलदाराची आकारणी चार आण्यांपेक्षां जास्त होती. लोकांकडून पुराव्यानिशी सिद्ध करण्यांत येत होतें, कीं आकारणी चार आण्यांच्या खालीं असली पाहिजे. पण सरकार ऐकतें कशाला? लोकांकडून पंच नेमण्याची मागणी करण्यांत आली. सरकारला ती सहन झाली नाहीं. करतां आली तेवढी विनवणी करून झाल्यानंतर सोबत्यांचा विचार घेऊन मीं सत्याग्रह करण्याचा सल्ला दिला.

सोबत्यांमध्यें खेडा जिल्ह्यांतील सेवकांउपरान्त मुख्यतः श्री. वल्लभभाई पटेल, श्री. शंकरलाल बँकर, श्री. अनसूयाबाई, श्री. इंदुलाल कन्हैयालाल याज्ञिक, श्री. महादेव देसाई इत्यादि होते. वल्लभभाई आपली मोठी व वाढती वकिली सोडून आले होते. या वेळेपासून पुढें त्यांना निवान्तपणें बसून वकिली करावयाला मिळालीच नाहीं असें म्हटल्यास चालेल.

आम्हीं नडियाद अनाथाश्रमामध्यें तळ दिला. अनाथाश्रमांत उतरण्यामध्यें कांहीं विशेष होतें असें कोणी मानण्याचें कारण नाहीं. नडियादमध्यें याच्या-सारखें इतक्या सगळ्या लोकांना राहातां येईल एवढें स्वतंत्र घर दुसरें नव्हतें. अखेरीस पुढील मजकुराच्या प्रतिज्ञापत्रावर सह्या घेण्यांत आल्याः—

" आमच्या गांवचें पीक चार आण्यांहून कमी आलेलें आहे, हें आम्हांला माहीत आहे. या कारणास्तव सारावसुली पुढील वर्षापर्यंत तहकूब करण्याबद्दल आम्हीं सरकारकडे अर्ज केला, परंतु तशी तहकुबी मिळाली नाहीं. म्हणून आम्ही खालीं सह्या करणारे प्रतिज्ञा करतों, कीं आम्ही सरकारचा या सालाचा वसूल पुरा किंवा जेवढा बाकी राहिला असेल तेवढा भरणार नाहीं; परंतु तो वसूल करण्यासाठीं सरकारला जे कायदेशीर इलाज करावेसे वाटतील, ते करूं देऊं; व त्यापायीं सोसावीं लागणारीं दुःखें सहन करूं. आमची जमीन खालसा झाली तरीहि खालसा होऊं देऊं; पण आपल्या हातानें पैसे भरून खोटें ठरून स्वाभिमानाला मुकणार नाहीं. जर नामदार सरकारने बाकी येणें असलेल्या सर्व ठिकाणीं दुसरा हप्ता तहकूब ठेवला, तर आमच्यापैकीं ज्यांना सामर्थ्य आहे ते सबंध किंवा बाकी राहिलेली रक्कम भरण्यास तयार आहेत. सामर्थ्य असणारांनींहि वसूल न भरण्याचें कारण एवढेंच, कीं जो समर्थ आहे त्यानें पैसे भरले म्हणजे जो असमर्थ आहे तोहि घाबरून जाऊन आपली वाटेल ती चीजवस्तू विकून किंवा कर्ज करूनहि वसूल भरतो, आणि दुःखांत पडतो. अशा स्थितींतून गरिबाला वांचविणें हें शक्तिमानाचें कर्तव्य होय, अशी आमची समजूत आहे. "

या लढ्याला मी फारशीं प्रकरणें देऊं शकत नाहीं, त्यामुळें पुष्कळ मधुर स्मरणें सोडून द्यावीं लागणार. ज्यांची या महत्त्वाच्या लढयाचा खोल अभ्यास करण्याची इच्छा असेल, त्यांनीं शंकरलाल पारेखनीं लिहिलेला 'खेडा-सत्याग्रहा'चा सविस्तर व साधार इतिहास वाचावा, अशी माझी त्यांस शिफारस आहे.

●●●

## २४

# कांदेचोर

चंपारण्य हिंदुस्थानच्या अगदीं एका कोपऱ्यांत होतें; व तेथील लढयाला वर्तमानपत्रामध्यें प्रसिद्धि मिळूं दिलेली नव्हती, त्यामुळें तेथें बाहेरची प्रेक्षक मंडळी येत नसे. पण खेडा-सत्याग्रह वर्तमानपत्राच्या तावडींत सांपडला होता. गुजराथी लोकांना या नव्या वस्तूबद्दल खूप गोडी वाटूं लागली होती. ते धन लुटविण्यास तयार होते. सत्याग्रहाचा लढा धनाच्या बळावर चालूं शकत नाहीं, धनाची त्याला कमींत कमी जरूरी पडते ही गोष्ट त्यांच्या चटकन् लक्षांत येईना. नको नको म्हणत असतांहि मुंबईच्या शेटीयांनीं पाहिजे होते त्याहून अधिक पैसे दिले व लढयाच्या अखेरीला त्यापैकीं कांहीं रक्कम शिल्लक राहिली.

दुसऱ्या बाजूनें सत्याग्रही सेनेलाहि साधेपणाचा नवीन धडा शिकला पाहिजे होता. तो धडा ते पूर्णपणें शिकले असें मी म्हणूं शकत नाहीं. पण त्यांनीं आपल्या राहाणीमध्यें बरीच सुधारणा करून घेतली एवढें खरें.

पाटीदारांनासुद्धां अशा तऱ्हेचा लढा नवीनच होता. गांवोगांव हिंडून त्याचें रहस्य समजावून सांगावें लागे. अंमलदार हे प्रजेचे शेठ नाहींत तर नोकर आहेत. प्रजेच्या पैशांतूनच ते पगार खाणारे आहेत, हें समजावून देऊन त्यांच्याबद्दलचा दरारा दूर करणें हें मुख्य काम होतें; आणि निर्भय होऊनहि विनय टिकवून धरण्यास सांगणें व तें त्यांस पटवून देणें हें तर जवळजवळ अशक्यसें वाटत होतें. अंमलदारांबद्दलचें भय दूर झालें, कीं मग त्यांनीं केलेल्या अपमानांची फेड करण्याची इच्छा कोणास होणार नाहीं ? तरी पण सत्याग्रह्यानें अविनयी होणें म्हणजे दुधांत सोमल पडल्यासमान आहे असें म्हणतां येईल. विनयासंबंधींची शिकवण पाटीदारांमध्यें पुरी भिनली नव्हती, हें माझ्या मागाहून लक्षांत आलें. अनुभवाअन्तीं मला असें दिसून येत आहे, कीं विनय हा सत्याग्रहाचा कठिणांत कठिण भाग आहे. विनय म्हणजे बोलतांना आदरयुक्त भाषा ठेवणें एवढाच अर्थ येथें घ्यावयाचा नाहीं. विनय म्हणजे विरुद्ध पक्षाबद्दल मनांत आदर, सरळभाव, त्यांच्या हिताची इच्छा व त्याप्रमाणें वर्तन.

प्रथमप्रथमच्या दिवसांमध्यें लोकांमध्यें खूप हिंमत दिसून येत होती. सुरुवातीला सरकारचे इलाजहि मऊमऊच होते. पण सरकारला जेव्हां दिसलें, कीं लोक अधिकाधिक भक्कम होत चालले आहेत तेव्हां त्यानेंहि अधिक उग्र इलाज करण्याचा विचार केला. जप्तीदारांनीं लोकांचीं गुरें विकलीं, घरांतून वाटेल तो माल हिरावून नेला. चौथाईच्या नोटिसाहि निघाल्या. कांहीं गांवांचीं उभीं पिकें सबंधच्या सबंध जप्त करण्यांत आलीं. लोकांचीं घाबरगुंडी वळली. कांहींनीं सारा भरला. " अंमलदार आपला मालच जप्त करून सारा वसूल करून घेतील तर बरें " असें इतर कांहींजण मनांतल्यामनांत म्हणूं लागले. काहींजण सर्वस्वावर उदार होणारेहि निघाले.

अशा स्थितींत शंकरलाल पोरखांच्या जमिनीचा सारा त्यांच्या जमिनींत राहाणाऱ्या कुळानें भरला. त्यामुळें जिकडे तिकडे हाहाःकार उडाला. शंकरलालनीं ती जमीन सार्वजनिक कार्यार्थ देऊन टाकली; व अशा तऱ्हेनें आपल्या माणसाकडून घडलेल्या दोषाचें प्रायश्चित्त केलें. त्यांचें नांव शाबूत राहिलें. इतरांनाहि उदाहरण झालें.

भयभीत झालेल्या लोकांमध्यें उत्साह आणण्यासाठीं मी एक युक्ति योजली. एक शेत अयोग्य तऱ्हेनें जप्त करण्यांत आलें होतें व त्यांत कांद्याचें पीक तयार झालेलें होतें. तें पीक मोहनलाल पंड्यांच्या नेतृत्वाखालीं काढून आणण्याचा सल्ला

मीं दिला. माझ्या मतें यांत कायद्याचा भंग होत नव्हता; आणि होत असला तरी सुद्धां एवढ्यातेवढ्या साऱ्यासाठीं उभें पीक जप्त करणें याला कायद्याचा आधार असला तरी तें न्यायनीतीला सोडून आहे. ती सरळ लूट आहे. आणि अशा तऱ्हेनें झालेल्या जप्तीचा अनादर करणें आपलें कर्तव्यच आहे असें मीं सुचविलें. तसें करण्यामध्यें तुरुंगांत जाण्याची किंवा दंड होण्याची धास्ती आहे, हें लोकांना स्पष्ट करून सांगितलें होतें. मोहनलाल पंड्यांना तेंच पाहिजे होतें. सत्याग्रहाला बाध येणार नाहीं अशा तऱ्हेनें कोणी तरी तुरुंगांत गेल्याखेरीजच खेडा-सत्याग्रह पुरा व्हावा, हें त्यांना रुचत नव्हतें. त्यांनीं शेतांतील कांदे काढण्याचा निश्चय केला. त्यांच्या जोडीला आणखी सातआठ जण मिळाले.

सरकार त्यांना पकडल्याखेरीज कसें राहील? मोहनलाल पंड्या व त्यांचे जोडीदार यांना अटक करण्यांत आली. त्यामुळें लोकांमध्यें उत्साह वाढला. लोक तुरुंगाबद्दल बेफिकीर बनले कीं मग सरकारच्या सोट्यानें ते दबत नाहींत, तर त्यांना अधिक शौर्य चढतें. कचेरीमध्यें लोकांचे थवेच्या थवे खटला पाहावयाला येऊन भरले. पंड्या व त्यांचे जोडीदार यांना थोडथोडी तुरुंगाची शिक्षा झाली. मला तर वाटतें, कीं कोर्टाचा ठराव चुकीचा होता. कांदे काढण्याचें कृत्य कायद्यानें केलेल्या चोरीच्या व्याख्येमध्यें येत नव्हतें; पण अपील करण्याची वृत्तिच नव्हती.

कैद्यांना पोंचविण्यासाठीं मिरवणूक निघाली, त्या दिवसापासून मोहनलाल पंड्यांना 'कांदेचोर' असा सन्मानार्थी किताब मिळाला, व तो आजपर्यंत त्यांच्याकडे चालत आला आहे.

या लढ्याचा शेवट काय व कसा झाला त्याचें वर्णन करून हें खेडा-प्रकरण पुरें करीन.

●●●

## २५

# खेडा-सत्याग्रहाचा शेवट

खेडा-सत्याग्रहाचा शेवट विचित्र तऱ्हेनें झाला. लोक दमले होते, हें स्पष्ट दिसत होतें. जे भक्कम राहिले होते, त्यांची अखेरपर्यंत राखरांगोळी होऊं देणें जिवावर येत होतें. सत्याग्रहींना कमीपणा येणार नाहीं, अशा तऱ्हेनें लढा आटोपण्याचा शोभण्यासारखा कांहीं मार्ग मिळाल्यास तो घेण्याकडे माझी प्रवृत्ति होती. अशा तऱ्हेचा मार्ग अवचितच सांपडला. नडियाद तालुक्याच्या मामले-

दारानें सांगून पाठविलें, कीं जर सुस्थितींतील पाटीदारांनीं आपापला महसूल भरला तर गरिबांची वसुली तहकूब ठेवण्यांत येईल. याबद्दल मीं लेखी कबुली मागितली तोहि मिळाली. पण मामलेदार फक्त आपल्या तालुक्यापुरती जबाबदारी घेऊं शकणार, संबंध जिल्ह्याची जबाबदारी कलेक्टरच घेऊं शकेल; म्हणून मीं कलेक्टरला विचारलें. त्यांच्याकडून उत्तर आलें कीं, मामलेदार म्हणतात तसा हुकूम पूर्वींच निघालेला आहे. मला याची माहितीहि नव्हती. पण तसा निघाला असेल, तर लोकांची प्रतिज्ञा पुरी झाली असें म्हणतां येईल. प्रतिज्ञेंत हीच गोष्ट होती; म्हणून तेवढ्या हुकुमावर संतोष मानून घेतला.

तरी पण या निकालानें आमचें कोणाचेंच समाधान झालें नाहीं. सत्याग्रहाच्या युद्धाच्या पश्चात् जी गोडी झाली पाहिजे ती तेथें नव्हती. कलेक्टरला तर वाटे, कीं आपण नवीन असें कांहींच केलें नाहीं. गरीब लोकांना सूट देण्याची भाषा होती, पण तेहि क्वचितच सुटले. गरीब कोण हें ठरविण्याचा अधिकार लोकांना चालवितां आला नाहीं. लोकांमध्यें तेवढें त्राण राहिलें नाहीं. याबद्दल मला वाईट वाटत होतें. म्हणूनच युद्धाच्या अंतानिमित्त उत्सव करण्यांत आला तरी तो मला वरील कारणास्तव निस्तेज वाटला.

सत्याग्रहाचा शुद्ध शेवट तोच म्हणतां येईल, कीं जेव्हां सुरुवातीपेक्षां शेवटीं लोकांमध्यें अधिक तेज व शक्ति हीं दिसून येतील. तसें कांहीं मला दिसलें नाहीं.

असें असलें तरीहि या लढ्याचे जे अप्रत्यक्ष परिणाम झाले त्यांपासून होणारा लाभ तर आजहि दिसून येत आहे, व घेण्यांत येत आहे. खेडा-सत्याग्रहापासूनच गुजराथच्या शेतकरीवर्गाच्या जागृतीला, त्यांच्या राजकीय शिक्षणाला सुरुवात झाली.

विदुषी डॉ. बेझंटच्या 'होमरूल' ची प्रभावशाली चळवळ शेतकरीवर्गापर्यंत जाऊन पोंचली होती हें खरें; तरीहि शेतकरीवर्गामध्यें सुशिक्षितांचा, स्वयंसेवकांचा खरा प्रवेश या लढ्यापासूनच झाला असें म्हणतां येईल. सेवक पाटीदारांच्या राहाणीशीं समरस होऊन गेले. स्वयंसेवकांना आपल्या कार्यक्षेत्राच्या सीमा या लढ्यामध्यें कळून आल्या; त्यांची त्यागशक्ति वाढली. वल्लभभाईंना स्वतःची ओळख या लढ्यामध्येंच पटली. एवढी एकच गोष्ट घेतली तरी तीहि कमी महत्त्वाची नव्हती हें आपल्याला गेल्या वर्षी संकटनिवारणाच्या वेळीं आणि यंदां बारडोलीमध्यें दिसून आलें. गुजराथच्या लोकजीवनामध्यें नवीन तेज संचरलें, नवा उत्साह प्रकटला. पाटीदारांना स्वतःच्या शक्तीची जाणीव झाली, व तिचा कधींच विसर पडला नाहीं. प्रजेच्या मुक्तीचा आधार स्वतः तिच्यावरच आहे, तिच्या त्यागबलावरच आहे ही गोष्ट सर्वांच्या लक्षांत आली. खेड्याच्या निमित्तानें गुजराथच्या भूमींत सत्याग्रहानें आपलीं पाळें शिरकविलीं. म्हणूनच लढाईच्या

प्रत्यक्ष निकालानें माझें जरी समाधान झालें नसलें, तरी खेड्याच्या लोकांना मात्र हुरूप आला. कारण त्यांना दिसून आलें, कीं आपल्या शक्तीच्या मानानें मिळावयाचें तेवढें सर्व मिळालें; भविष्यकाळासाठीं राजकीय दुःखांच्या निवारणाचा मार्गहि त्यांना सांपडला. एवढी जाणीव त्यांना उत्साह वाटण्यास पुरेशी होती.

पण खेड्याचे लोक सत्याग्रहाचा अर्थ बरोबर समजले नव्हते; त्यामुळें त्यांना कसकसे कटु अनुभव घ्यावे लागले तें आपण पुढें पाहूं.

● ● ●

## २६

# ऐक्याची तळमळ

खेडा-प्रकरण चाललें होतें, त्या वेळीं युरोपांत महायुद्धहि चालू होतें. त्यानिमित्त व्हाइसरॉयांनीं दिल्लीला सर्व पुढाऱ्यांची सभा बोलाविली. तिला हजर राहण्याबद्दल त्यांनीं मलाहि आग्रह केला. लॉर्ड चेल्म्स्फर्डशीं माझा मित्रत्वाचा संबंध होता, हें मीं पूर्वीं दर्शविलेंच आहे.

मी आमंत्रण मान्य करून दिल्लीला गेलों; पण त्या सभेमध्यें भाग घेण्याबाबत मला एक अडचण वाटत होती. मुख्य कारण तर हें, कीं त्या सभेला अल्लीबंधू, लोकमान्य व इतर पुढाऱ्यांना निमंत्रण दिलेलें नव्हतें. अल्लीबंधू त्या वेळीं कैदेंत होते. त्यांची माझी भेट एकदोन वेळां झाली होती. त्यांच्याविषयीं मीं पुष्कळ ऐकलें मात्र होतें. सर्वजण त्यांची सेवावृत्ति व बहादुरी यांची स्तुति करीत. हकीमसाहेबांशींहि माझा परिचय झाला नव्हता. त्यांची स्तुति स्व. आचार्य रुद्र व दीनबंधु अँड्रयूझ यांच्या तोंडून पुष्कळच ऐकली होती. कलकत्त्याच्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनाच्या प्रसंगीं श्वेबकुरेशी व बॅरिस्टर ख्वाजा यांची भेट झाली होती. डॉ. अन्सारी, डॉ. अब्दुल रहमान यांच्याशींहि संबंध जुळले होते. मी चांगल्या मुसल्मानांची सोबत शोधीत होतों; व जे पवित्र अंतःकरणाचे व देशभक्त असे दिसतील त्यांच्या निकट संबंधांत येऊन त्यांच्या भावना जाणण्याची माझी तीव्र इच्छा होती. त्यासाठीं ते मला आपल्या समाजांत जेथें जेथं म्हणून घेऊन जात, तेथें तेथें मी ओढाताण न करतां जात असें.

हिंदु-मुसलमानांमध्यें खरी मैत्री नाहीं हें तर दाक्षिण आफ्रिकेमध्येंच माझ्या लक्षांत आलें होतें. दोहोंमधील वैषम्य जेणेंकरून मिटेल असा कोणताहि उपाय तिकडे असतांना मी हातचा घालवीत नसें. लटकीच खुशामत करून किंवा स्वत्व

घालवून त्यांची काय किंवा कोणाचीहि काय मनधरणी करण्याचा माझा स्वभावच नव्हता. पण तिकडे असल्या वेळेपासूनच मला समजून चुकलें होतें, कीं माझ्या अहिंसेची कसोटी व तिचे विशाल प्रयोग या ऐक्याच्या निमित्तानेंच व्हावयाचे आहेत. अजूनहि माझा हा अभिप्राय कायम आहे. ईश्वर माझी क्षणोक्षणीं सत्त्व-परीक्षा करीत आहे. माझा प्रयोग चालूच आहे.

ह्या विचारांनिशींच मी मुंबई बंदरीं उतरलों होतों. अर्थात् मला या बंधुद्वयाची झालेली भेट मनापासून आवडली. आमच्यामधील स्नेह वाढत गेला. आमची ओळख झाल्यानंतर लवकरच सरकारनें तर अलीभाईंना जिवंत पुरून टाकलें. मौलाना अहमदअलींना परवानगी मिळे, तेव्हां तेव्हां ते मला लांबलचक पत्रें बैतुल जेलमधून किंवा छिंदवाड्याहून लिहीत असत. त्यांना भेटावयाला जाण्याची परवानगी मीं सरकारपाशीं मागितली, पण मिळाली नाहीं.

अलीभाईंना जप्त केल्यानंतर कलकत्त्याला भरलेल्या मुस्लिम लीगच्या सभेमध्यें मुसलमान भाई मला घेऊन गेले होते. मला तेथें बोलायला सांगितलें. मी बोललोंहि. अलीभाईंना सोडविणें हें मुसलमानांचें कर्तव्य असल्याचें मीं सांगितलें.

त्यानंतर ते मला अलीगड कॉलेजांतहि घेऊन गेले. तेथें मीं मुसलमानांना देशासाठीं फकिरी पत्करण्याची विनंति केली.

अलीभाईंना सोडविण्यासाठीं मीं सरकारबरोबर पत्रव्यवहार चालविला. त्यानिमित्तानें त्या बंधूंच्या खिलाफतीसंबंधींच्या चळवळीचा अभ्यास केला; मुसलमानांबरोबर चर्चा केली. मी या निर्णयावर आलों, कीं माझी जर मुसलमानांचा सच्चा मित्र होण्याची इच्छा असेल, तर मीं अलीबंधूंना सोडविण्याच्या व खिलाफतीच्या प्रश्नाचा न्यायास धरून निवाडा लावून घेण्याच्या कामीं मदत केली पाहिजे. खिलाफतीचा प्रश्न माझ्या दृष्टीनें सोपा होता. त्याच्या स्वतंत्र गुणदोषाची चौकशी करण्याचें मला कारण नव्हतें. मुसलमानांची त्या बाबतींतील मागणी नीतीविरुद्ध नसेल तर मीं मदत दिली पाहिजे असें माझें मत होतें. धर्माच्या बाबतींतील श्रद्धा सर्वोच्च असते. सर्वांना एकाच वस्तूबद्दल एकसारखी श्रद्धा वाटत असेल, तर जगांत एकच धर्म नांदेल. खिलाफतीबाबतची मागणी मला नीतिविरुद्ध वाटली नाहीं. एवढेंच नव्हे तर ती मागणी ब्रिटिश प्रधान लॉइड जॉर्ज यांनीं मान्य केली होती; अर्थात् त्यांनीं आपलें वचन पाळावें एवढ्या-पुरताच प्रयत्न करण्याचें माझें काम होतें. वचन इतक्या स्पष्ट शब्दांमध्यें दिलेलें होतें, कीं त्या प्रश्नाचे गुणदोष, अमुक मर्यादेपर्यंत तरी तपासण्याचें काम माझ्या स्वतःच्या अंतरात्म्याला संतुष्ट करण्यासाठींच करावयाचें होतें.

खिलाफतीच्या प्रश्नाबाबत मीं मुसलमानांना दुजोरा दिला, याबद्दल मित्रांनीं व टीकाकारांनीं माझ्यावर टीकेचा वर्षाव केला आहे. या सर्वांचा विचार केल्यानंतरहि मीं केलेल्या निर्णयाबद्दल आणि केल्या करविलेल्या मदतीबद्दल मला पश्चात्ताप होत नाहीं. त्यांत कांहीं दुरुस्ती करण्याचेंहि प्रयोजन दिसत नाहीं. आजहि तसलाच प्रश्न उपस्थित झाल्यास माझें वर्तन तशाच तऱ्हेचें राहील अशी माझी समजूत आहे.

अशा तऱ्हेचे विचार घोळवीत मी दिल्लीला गेलों. मुसलमानांच्या दुःखासंबंधीं मला व्हाइसरॉयांबरोबर चर्चा करावयाचीच होती. खिलाफतीच्या प्रश्नाला अद्याप पूर्ण स्वरूप प्राप्त झालें नव्हतें.

दिल्लीला पोहोंचल्यानंतर तेथें अँड्रयूझनीं एक नैतिक प्रश्न उपस्थित केला. त्याच सुमाराला इंग्लंड व इटली यांच्यामधील गुप्त कराराची चर्चा इंग्रजी वर्तमानपत्रामध्यें झाली होती. तिच्याविषयीं दीनबंधूंनीं मला सांगितलें व म्हणाले, “ इंग्लंडनें जर असले गुप्त करार कोणत्याहि सत्तेबरोबर केले असतील तर तुम्हांला या सभेंत भाग घेऊन मदत कशी करतां येईल ? मला या करारासंबंधीं कांहीं माहिती नव्हती. दीनबंधूंचा शब्द मला पुरेसा होता. असल्या कारणांमुळें सभेला हजर राहाण्याबद्दल नाखुषी दर्शविणारें पत्र मीं लॉर्ड चेल्म्स्फर्डना लिहिलें. त्यांनीं मला चर्चा करण्यासाठीं बोलाविलें. त्यांच्याबरोबर व नंतर मि. मेफीबरोबर मीं खूप चर्चा केली. अखेर निर्णय असा झाला, कीं मीं सभेमध्यें भाग घेण्याचें कबूल केलें. व्हाइसरॉयांचें म्हणणें थोडक्यांत असें होतें, ‘ तुम्ही असें तर म्हणत नाहींना कीं ब्रिटिश कॅबिनेट जें कांहीं करतें त्याची व्हाइसरॉयला माहिती असलीच पाहिजे ? ब्रिटिश सरकार कधीं काळीं चूक करीतच नाहीं असेंहि मी छातीठोकपणें सांगू शकत नाहीं; कोणीच सांगू शकणार नाहीं; पण त्याचें अस्तित्व जगाला कल्याणकारी आहे हें जर तुम्हांला कबूल असेल, त्याच्या अंमलामुळें एकंदरींत या देशाचा लाभच झाला आहे असें जर तुम्हांला वाटत असेल, तर त्याच्या आपत्तीच्या प्रसंगीं त्याला मदत देण्याचें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य आहे हें तुम्ही नाकबूल नाहीं करणार ? गुप्त करारासंबंधीं तुम्हीं जें वर्तमानपत्रांत वाचलें आहे, तें मींहि पाहिलें आहे; त्यापलीकडे त्यासंबंधीं मला कांहींहि माहिती नाहीं अशी मी तुम्हांला खात्री देऊं शकतों. वर्तमानपत्रांत कसकसल्या गप्पाहि येत असतात, तें तुम्हांला माहीत आहेच. वर्तमानपत्रांत आलेल्या एकाद्या निंदक बातमीवरून तुम्ही अशा प्रसंगीं साम्राज्याचा त्याग करूं शकतां काय ? लढाई पुरी झाल्यानंतर तुम्हांला नीतीचे प्रश्न काढावयाचे असतील तेवढे काढा आणि करावयाच्या असतील तेवढ्या तक्रारी करा ना ? ’

हा युक्तिवाद नवीन नव्हता. ज्या प्रसंगीं व ज्या तऱ्हेनें तो मांडला गेला, त्यावरून मला तो नवीनसा वाटला व मीं सभेला जाण्याचें कबूल केलें. खिलाफतीच्या बाबतींत मीं व्हाइसरॉयांना पत्र लिहावें असें ठरलें.

• •

## २७

# रिक्रूटभरती

मी सभेला हजर राहिलों. सैनिक-साह्याच्या ठरावाला मीं दुजोरा द्यावा अशी व्हाइसरॉयांची फार इच्छा होती. मीं हिंदी-हिंदुस्थानीमध्यें बोलण्याची परवानगी मागितली. व्हाइसरॉयांनीं माझी मागणी मान्य केली, पण त्याबरोबरच इंग्रजींत बोलण्याची सूचना केली. मला भाषण असें करावयाचेंच नव्हतें. मीं बोललों एवढेंच, "मला माझ्या जबाबदारीची पूर्ण जाणीव आहे; ती जबाबदारी लक्षांत घेऊनच मी या ठरावास दुजोरा देत आहें."

हिंदुस्थानीमध्यें बोलल्याबद्दल अनेकांनीं मला धन्यवाद दिले. ते म्हणाले, कीं व्हाइसरॉयांच्या सभेंत हिंदुस्थानीमध्यें भाषण करण्याचें या काळांतलें हें पहिलेंच उदाहरण होय. धन्यवाद व हें पहिलेंच उदाहरण असल्याची माहिती दोन्ही माझ्या मनाला बोंचली. मला शरम वाटली. आपल्याच देशामध्यें, देशाबाबतच्या कामाच्या सभेमध्यें, देशी भाषेवर बहिष्कार असावा किंवा अवहेलना व्हावी ही केवढी दुःखाची गोष्ट! आणि माझ्यासारखा कोणी हिंदुस्थानीमध्यें एकाद-दुसरें वाक्य बोलला तर त्याबद्दल धन्यवाद तरी कसले? असले प्रसंग आपल्या पतित दशेची जाणीव करून देणारे आहेत.

सभेमध्यें बोललेल्या वाक्यांचें माझ्या दृष्टीनें फार महत्त्व होतें. ती सभा किंवा मीं दिलेला तो दुजोरा मीं विसरणें शक्य नव्हतें. माझी एक जबाबदारी तर मला दिल्लीमध्येंच आटपून घ्यावयाची होती. व्हाइसरॉयांना पत्र लिहिण्याचें काम मला सोपें वाटलें नाहीं; सभेला जाण्याबाबत माझी नाखुषी, तिचीं कारणें, पुढील आशा इत्यादींचा स्पष्ट खुलासा माझ्यासाठीं, सरकारसाठीं व लोकांसाठीं करणें मला आवश्यक वाटत होतें.

मीं व्हाइसरॉयांना पत्र लिहिलें त्यांत लोकमान्य टिळक, अलीभाई इत्यादि पुढाऱ्यांच्या गैरहजेरीबद्दल खेद व्यक्त केला, लोकांच्या राजकीय आकांक्षांचा व लढाईमधून उपस्थित होणाऱ्या मुसलमानांच्या मागण्यांचा उल्लेख केला. हें पत्र प्रसिद्ध करण्याची परवानगी मीं व्हाइसरॉयपाशीं मागितली व ती त्यांनीं आनंदानें दिली.

हें पत्र सिमल्यास पाठवावयाचें होतें. कारण सभा पुरी होतांच व्हाइसरॉय तर सिमल्यास रवाना झाले होते. तिकडे टपालानें पत्र पाठवावयाचें तर विलंब लागणार होता. माझ्या मतें पत्र महत्त्वाचें होतें. वेळ वांचविण्याची आवश्यकता होती. वाटेल त्याच्याबरोबर पत्र पाठविण्याची इच्छा नव्हती. एकाग्रा पवित्र इसमाबरोबर पत्र जाईल तर चांगलें असें मला वाटलें. दीनबंधु व सुशील रुद्र यांनीं भल्या रे. आयर्लंडाचें नांव सुचविलें. पत्र वाचून पाहून आपल्याला तें शुद्ध वाटलें तर आपण तें घेऊन जाऊं असें त्यांनीं कबूल केलें. पत्र खाजगी नव्हतेंच. त्यांनीं तें वाचलें, त्यांना पसंत पडलें व तें घेऊन जाण्यास ते तयार झाले. मीं दुसऱ्या वर्गाचें गाडीभाडें देऊं केलें; परंतु त्यांनीं तें घेण्याचें नाकारलें व रात्रींचा प्रवास करावयाचा असतांहि इंटरचेंच तिकीट काढलें. त्यांचा साधा, सरळ व निर्भीड स्वभाव पाहून मी मोहित झालों. अशा तऱ्हेनें पवित्र हातांनीं नेऊन दिलेल्या पत्राचा माझ्या समजुतीनें चांगला परिणाम झाला. त्यामुळें माझा मार्ग बिनधोक झाला.

माझी दुसरी जबाबदारी रंगरुटांची भरती करण्याची होती. रंगरुटांची याचना मीं खेडा जिल्ह्यांत नाहीं तर कोठें करावयाची? आपल्या सोबत्यांना प्रथम बोलवावयाचें नाहीं तर कोणाला बोलवावयाचें? खेड्याला पोंचतांच वल्लभभाई इत्यादींबरोबर चर्चा केली. त्यांच्यापैकीं कित्येकांच्या ही गोष्ट गळीं उतरेना. ज्यांना ती गोष्ट आवडली त्यांना ती कितपत तडीला जाईल याबद्दल शंका वाटत होती. ज्या वर्गामधून भरती करावयाची होती, त्या वर्गाला सरकारबद्दल कसलाच कळवळा नव्हता सरकारी अंमलदारांचा त्यांना आलेला अनुभव अद्याप ताजाच होता.

तरी पण कार्याला सुरुवात तर करावीच असें सर्वांचें मत पडलें. आरंभ करतांक्षणींच माझे डोळे उघडले. माझा आशावादहि कांहींसा लटका पडला. खेडा-सत्याग्रहाच्या वेळीं लोक आपल्या गाड्या मोफत देत; एका स्वयंसेवकाची जरूर असेल तेथें तीन-चार पुढें होत. आतां पैसे देऊनहि गाड्या मिळण्याची पंचाईत. पण एवढ्यानें आम्ही कोणी निराश होणारे नव्हतों. गाडीच्याऐवजीं पायीं प्रवास करण्याचें ठरविलें. रोज वीस मैलांची मजल मारावयाची असे. गाडी मिळण्याची पंचाईत, तेथें जेवण तर मिळणार कोठून? मागणेंहि योग्य झालें नसतें. त्यासाठीं प्रत्येक स्वयंसेवकानें आपल्यापुरती शिदोरी आपापल्या पिशवींत घालूनच बाहेर पडावें असें ठरलें. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें बरोबर पांघरायला कांहीं घेण्याची आवश्यकता नव्हती.

ज्या ज्या गांवीं जात असूं तेथें सभा करीत असूं. लोक सभेला येत, पण भरतीमध्यें एकाद-दुसरें नांव मिळालें म्हणजे मिळविली. "तुम्ही अहिंसावादी ना! मग आम्हांला हातांत शस्त्र घ्यायला कसें सांगतां?" "सरकारनें हिंदुस्थानचें असें

काय कल्याण केलें आहे, कीं तुम्ही त्याला मदत करावयाला सांगतां ? " अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न माझ्यापुढें मांडण्यांत येत.

असें असतांहि हळूहळू आमच्या सतत कार्याचा परिणाम लोकांवर होऊं लागला. सुरुवातीच्या नांवांची नोंदहि बरी होऊं लागली; आणि पहिली एक तुकडी बाहेर पडली, म्हणजे आणखी मिळविण्याला मार्ग मोकळा होईल असें आम्हांला वाटूं लागलें. रंगरूट बाहेर पडत. त्यांना कोठें ठेवावें वगैरे गोष्टींची चर्चा मीं कमिशनरबरोबर करूं लागलों. कमिशनर ठिकठिकाणीं दिल्लीच्या नमुन्यावर सभा भरवूं लागले होते. तशी गुजराथमध्येंहि झाली. तिला मला व माझ्या सोबत्यांना आमंत्रण होतें. येथेंहि मीं हजर राहिलों. पण दिल्लीमध्यें जर मी विशोभित दिसत होतों, तर येथें तर त्याहूनहि अधिक विशोभित होतों, असें माझें मला वाटूं लागलें. हांजी हांजीच्या वातावरणामध्यें मला चैन पडेना. येथें मी थोडें अधिक बोललों. माझ्या भाषणांत खुशामत ती कोठून असणार ? उलट दोन कडवे शब्दहि होते.

रिक्रूटभरतीसाठीं मीं एक पत्रिका काढली. तींत भरतीमध्यें येण्यातर्फेचा एक युक्तिवाद होता, तो कमिशनरला खुपला. त्याचा सारांश असा होता, " ब्रिटिश राज्यानें अनेक अपकृत्यें केलीं आहेत, त्यांमध्यें सर्व प्रजेला निःशस्त्र बनविण्याच्या कायद्याला इतिहास काळ्यांत काळा ठरवील. हा कायदा रद्द करावयाचा असेल व शस्त्रांचा उपयोग करवायाला शिकावयाचें असेल तर ही सोन्यासारखी संधि आहे. सरकारच्या संकटकालीं मध्यमवर्गानें स्वेच्छापूर्वक मदत केल्यास अविश्वास दूर होईल; व ज्याला शस्त्र धारण करावयाचें असेल तो तें खुशाल धारण करूं शकेल." याच मजकुराला उद्देशून कमिशनरला म्हणावें लागलें, कीं त्यांच्या माझ्यामध्यें मतभेद असतांहि सभेमध्यें मीं हजर राहाणें त्यांना प्रियच होतें. मलाहि माझ्या माताचें समर्थन शक्य तेवढ्या सौम्य शब्दांमध्यें करणें भाग पडलें.

वर ज्या पत्राचा उल्लेख करण्यांत आला आहे, त्याचा सारांश पुढें देण्यांत येत आहे:—

" युद्धपरिषदेला हजर राहाण्याबद्दल मला संकोच वाटला होता, पण तो आपल्याला भेटल्यानंतर दूर झाला. त्याचें एक कारण अर्थात्‌च हें होतें, कीं आपल्याबद्दल मला फार आदर वाटतो. न येण्याच्या कारणांपैकीं सर्वांत बलवत्तर कारण असें होतें, कीं परिषदेला लोकमान्य टिळक, मिसेस् बेझंट व अल्लीबंधू यांना निमंत्रण नव्हतें. त्यांना मी मोठे शक्तिमान् लोकनायक समजतों. मला तर वाटतें, कीं त्यांना निमंत्रण न देण्यामध्यें सरकारनें गंभीर चूक केली आहे; व मला अजूनहि सुचवावेसें वाटतें, कीं प्रांतिक परिषदा भरविल्या जातील, त्यांस त्यांना निमंत्रण देण्यांत यावें. माझा नम्र अभिप्राय आहे, कीं कोणतीहि राज्यसत्ता असल्या भारदस्त

पुढाऱ्यांची अवगणना करूं शकणार नाहीं. मग त्यांच्या-तिच्यामध्यें कितीहि मतभेद असोत. अशा स्थितींत मीं सभेच्या कमिट्यांना हजर राहूं शकलों नाहीं आणि सभेमध्यें फक्त दुजोरा देऊनच भागविलें. सरकारला माझी सूचना मान्य झाली, कीं लगेच दिलेल्या दुजोऱ्यानुसार कामाला लागावें असा माझा विचार आहे.

“ ज्या साम्राज्याच्या भविष्यकाळीं पूर्ण समान भागीदार होण्याची आम्हांला आशा वाटते, त्या साम्राज्याला संकटकालीं सर्व शक्तीनिशीं मदत करणें, हा आमचा धर्म आहे. पण मला हेंहि सांगितलेंच पाहिजे कीं, त्यामध्यें अशी आशाहि सांठविलेली आहेच, कीं अशी मदत केल्यानें आम्हांला आमचें ध्येय अधिक लवकर गांठतां येईल. त्यामुळें लोकांना अशी अपेक्षा करण्याचा अधिकार आहे, कीं ज्या सुधारणा लवकरच होणार अशी आशा आपल्या भाषणामध्यें दर्शविलेली आहे, त्या सुधारणांमध्यें राष्ट्रीय सभा व मुस्लिम लीग यांच्या मुख्य मागण्यांचा समावेश केलेला असेल. माझ्या म्हणण्याप्रमाणें चालतें, तर मीं असल्या वेळीं होमरूल वगैरेंचा उच्चारहि केला नसता तर साम्राज्याच्या संकटकालीं त्याच्या संरक्षणार्थ सर्व धडधाकट हिंदी लोकांना मुकाट्यानें आत्मबलिदान करण्याची प्रेरणा दिली असती. असें केल्यानेंच आम्ही साम्राज्याचे सर्वांत श्रेष्ठ व आदरणीय असे भागीदार बनूं शकूं; व जात, रंग, देश इत्यादींचे भेद पुसून जातील.

“ पण सुशिक्षित वर्गानें याहून कमी परिणामकारक असा मार्ग स्वीकारला आहे. जनसमाजामध्यें त्याचें वजन मोठें आहे. मीं हिंदुस्थानांत पाऊल टाकलें तेव्हांपासूनच सामान्य लोकांशीं निकट संबंधामध्यें येत गेलों आहें; आणि मी आपल्याला कळवूं इच्छितों, कीं होमरूलची उत्कंठा त्यांच्यामध्येंहि शिरली आहे. होमरूलखेरीज लोकांचें कधींहि समाधान व्हावयाचें नाहीं. होमरूल मिळविण्या-साठीं सहन करावे तेवढे कष्ट थोडेच आहेत, हेंहि त्यांना समजतें. म्हणून साम्राज्या-साठीं देतां येतील तितके स्वयंसेवक देणें हें जरी आमचें कर्तव्य असलें, तरी पण पैशांच्या मदतीला तो न्याय लागू पडत नाहीं. लोकांची स्थिति माहीत असल्या-वरूनच मी सांगतों, कीं हिंदुस्थाननें जी मदत केली आहे, तीच त्याच्या शक्तीबाहेरची आहे. मला एवढें समजतें, कीं सभेमध्यें ज्यांनीं पाठिंबा दिला आहे; त्यांनीं मरणापर्यंत मदत करण्याचा निश्चय केलेला आहे; पण आमची स्थिति मोठी चमत्कारिक आहे. आम्ही म्हणजे कांहीं एका पेढीचे भागीदार नव्हे. आमच्या मदतीचा पाया भविष्यकालासंबंधींच्या आशांवर रचलेला आहे; व ही आशा कोणती हें जरा विशेष स्पष्ट करून सांगणें आवश्यक आहे. मला सौदा करावयाचा नाहीं. तरी पण मला एवढें तर सांगितलेंच पाहिजे, कीं त्या आशेची निराशा झाली तर साम्राज्याविषयींची आजवरची आमची समजूत भ्रामक होती असें ठरेल. घरगुती झगडे विसरून जा असें आपण सुचविलें, त्याचा

अर्थ जर असा असेल, कीं जुलूम व अंमलदारांचीं अपकृत्यें सहन करा, तर तें होण्यासारखें नाहीं. सरकारच्या संघटित जुलुमाविरुद्ध सर्व शक्तीनिशीं लढणें, हा मी आपला धर्म समजतों. म्हणून आपणच अंमलदारांना सुचवावें, कीं त्यांनीं एकाहि जिवाची अवहेलना करूं नये, व लोकमताला पूर्वी कधीं दिला नसेल इतका मान द्यावा. चंपारण्यामध्यें शेंकडों वर्षें चालत आलेल्या जुलुमाचा प्रतिकार करून ब्रिटिश-न्यायाची सर्वश्रेष्ठताच मीं सिद्ध करून दिली आहे. खेड्याच्या रयत-वर्गाला समजून चुकलें आहे, कीं आपल्यांत जर सत्यासाठीं दुःख सहन करण्याची शक्ति असेल, तर खरी सत्ता राजसत्ता नसून लोकसत्ताच आहे. ही जाणीव झाल्या-मुळें ज्या साम्राज्याला ते लोक शिव्याशाप देत होते त्या साम्राज्याबद्दलचा त्यांच्या मनांतील द्वेष कमी झाला. तसेंच ज्या राजसत्तेनें सविनय कायदेभंग चालूं दिला ती सत्ता लोकमताला अगदींच झिडकारणारी असणें शक्य नाहीं, अशी त्यांची खात्री पटली आहे. म्हणूनच मीं असें समजतों, कीं चंपारण्य व खेडा येथें मीं जें काम केलें ती माझी या युद्धाच्या कामाला मदतच आहे. अशा तऱ्हेचें माझें काम बंद ठेवावयाला जर आपण मला सांगत असाल तर त्याचा अर्थ मला श्वास कोंडून धरावयाला आपण सांगतां असाच मीं समजेन. शस्त्रबळाऐवजीं आत्मबळाला किंवा प्रेमबळाला लोकप्रिय करण्याच्या माझ्या प्रयत्नांना जर यश आलें तर माझी खात्री आहे, कीं हिंदुस्थानवर सबंध जगानें डोळे वटारले तरी त्याचा सामना हिंदुस्थान करूं शकेल. म्हणून दुःख सहन करण्याची ही सनातन नीति माझ्या जीवनामध्यें बिंबविण्यासाठीं मी माझ्या आत्म्याला नित्य धडे देत राहीन, आणि याच नीतीचा अवलंब करण्यास इतरांनाहि बोलावीत राहीन. आणि मीं जर दुसऱ्या कोणत्या कार्यामध्यें भाग घेत असलों, तर तोहि याच नीतीची अद्वितीय श्रेष्ठता सिद्ध करण्यासाठींच.

"शेवटीं मला आपल्याला विनंति करावयाची, कीं मुसलमानी राज्या-संबंधीं स्पष्ट आश्वासन देण्यास आपण ब्रिटिश प्रधानमंडळाला सुचवावें. आप-ल्याला माहीतच आहे, कीं प्रत्येक मुसलमानाला त्याबद्दल काळजी लागून राहिलेली आहे. मी स्वतः हिंदु आहें; एवढ्यासाठीं मुसलमानांच्या भावनांबद्दल मी बेपर्वा राहूं शकत नाहीं. त्यांचें दुःख तेंच आमचेंहि असणारच. या मुसलमानी राज्यांच्या हक्कांना धक्का न लावण्यानें, त्यांच्या धर्मस्थानासंबंधींच्या त्यांच्या भावना न दुख-विण्यानें आणि हिंदुस्थानच्या होमरूलची मागणी मान्य करण्यानेंच साम्राज्याचेंहि संरक्षण होणार आहे. हें पत्र मीं अशासाठीं लिहिलें आहे, कीं मी इंग्रजांचा चाहता आहें; आणि जी राजनिष्ठा इंग्रजांमध्यें वसत असते; तीच प्रत्येक हिंदी माणसा-मध्येंहि जागृत करण्याची माझी इच्छा आहे."

• • •

## २८

# मृ त्यु श य्या

रिक्रूटभरती करतां करतां मला शरीर खूप झिजवावें लागलें. त्या वेळीं माझा आहार मुख्यत्वेंकरून भाजून कुटलेले व गूळ घातलेले भुईमुगदाणे, केळ्यां-सारखीं फळें व दोनतीन लिंबांचें पाणी असा असे. दाणे प्रमाणाबाहेर खाल्ल्यास बाधक होतात, हें मला कळत असतांहि ते जास्त खाल्ले गेले. त्यामुळें किंचित् मुरडा होऊं लागला. मला वारंवार आश्रमांत यावें लागतच असे. मला त्या मुरड्याकडे लक्ष देण्याचें कारण दिसलें नाहीं. रात्रीं आश्रमांत जाऊन पोंचलों. त्या काळीं औषधें मीं क्वचित्च घेत असें. एक वेळ खाल्लें नाहीं म्हणजे बरें वाटेल असा विश्वास वाटत होता. दुसऱ्या दिवशीं सकाळीं कांहीं खाल्लें नाहीं, त्यामुळें दुखावयाचें बहुतेक बंद झालें. पण मला कळत होतें, कीं मला आणखी कांहीं काळपर्यंत उपवास केला पाहिजे, किंवा खावयाचेंच तर फळांच्या रसासारखें कांहीं खाल्लें पाहिजे.

तो दिवस कसल्या तरी सणाचा होता. दुपारींहि मीं जेवणार नाहीं असें कस्तूरबाईला सांगून ठेवल्याचें मला स्मरतें. पण तिनें मला मोहांत गुंतविलें व मीं सांपडलों. त्या वेळीं मी कोणत्याहि जनावराचें दूध घेत नसें. अर्थातच तूप, ताक इत्यादींहि वर्ज्य होतीं. म्हणून माझ्यासाठीं गहूं भरडून तेलावर परतून त्यांची लापशी बनविलेली होती. लापशी व मुगांची उसळ माझ्यासाठीं ठेवून दिलेली आहे असें कस्तूरबाईनें मला सांगितलें; आणि जिव्हालौल्यामुळें माझा निश्चय डळमळला. डळमळला तरी इच्छा अशी होती, कीं मी कस्तूरबाईची समजूत करण्यापुरतें थोडेसेंच खाईन, स्वाद पण चाखीन व शरीरहि सांभाळून ठेवीन. पण सैतान आपली संधि साधण्यासाठीं टपूनच बसलेला होता. जेवावयाला बसलों आणि थोडेसेंच खाऊन उठण्याऐवजीं मीं पोट भरून खाल्लें. स्वादसुख तर पुरें घेतलें, पण त्याबरोबरच यमराजालाहि निमंत्रण दिलें. खाऊन एक तासभर लोटला नसेल इतक्यांत जोराचा मुरडा सुरू झाला.

रात्रीं परत नाडियादला जावयाचेंच होतें. साबरमती स्टेशनपर्यंत पायीं गेलों. पण तेवढा सव्वा मैलाचा रस्ता कापणें बिकट झालें. अहमदाबाद स्टेशनवर वल्लभभाई येऊन मिळावयाचे होते. त्याप्रमाणें ते आलेहि. माझें दुखणें त्यांच्या लक्षांत आलें. परंतु तें असह्य असल्याचें मी त्यांना किंवा जोडीदारांना समजूं दिलें नाहीं.

नडियाद स्टेशन आलें. स्टेशनापासून अनाथाश्रमापर्यंत अर्ध्या मैलाचें अंतर होतें, पण तें दहा मैलांएवढें वाटलें. मोठ्या शिकस्तीनें मुक्कामावर जाऊन पोंचलों.

पण तिडीक वाढत चालली होती. शौचाला पंधरापंधरा मिनिटांनीं होई. अखेरीला मीं हरलों. वेदना असह्य झाल्याचें जोडीदारांना कळविलें, आणि अंथरूण धरलें. आश्रमाच्या सामान्य पायखान्यांत जात होतों, त्याऐवजीं माडीवरच पेटी आणण्यास सांगितलें. शरम तर फार वाटत होती, पण माझा नाइलाज झाला. फुलचंद बापूजी विद्युद्वेगानें पेटी घेऊन आले. सर्व सोबती चिंतातुर होत्साते माझ्या सभोंवार जमले. त्यांनीं माझ्यावर प्रेमाचा वर्षाव केला; पण माझ्या दुःखामध्यें ते बिचारे कसा भाग घेऊं शकणार? माझा हट्टहि अमर्याद होता. डॉक्टरला बोलावून आणण्याचें मीं नाकारलें. औषध मला घ्यावयाचेंच नाहीं. केल्या कर्माचें प्रायश्चित्तच भोगणार. मित्रांनीं हें सर्व खट्टू मनानें सहन केलें. चोवीस तासांत तीसचाळीस वेळां शौचास झालें. खाणें मी बंदच केलें होतें. सुरुवातीच्या दिवसांत फळांचे रसहि घेतले नाहींत. घेण्याची इच्छाहि बिलकुल होत नव्हती.

ज्या शरीराला मी अजूनपर्यंत शिळेप्रमाणें समजत होतों, तेंच मातीच्या गाऱ्यासारखें होऊन गेलें. शक्ति खचून गेली. डॉ. कानुगा आले. त्यांनीं औषध घेण्याबद्दल माझी विनवणी केली. मीं कबूल झालों नाहीं. ते इंजेक्शन देतों म्हणाले. त्यालाहि मीं मनाई केली. इंजेक्शनासंबंधींचें माझें त्या वेळचें अज्ञान हास्यास्पद होतें. मला असेंच वाटत होतें, कीं हें इंजेक्शन म्हणजे कसली तरी लस असेल. पण मला मागाहून कळून आलें, कीं तें निर्दोष वनस्पतीच्या औषधाचें इंजेक्शन असतें. पण ही अक्कल आली, त्या वेळीं वेळ गेलेली होती. शौचाचें चालूच होतें. अतिश्रमामुळें ताप आला, व बेशुद्धीहि आली. मित्रमंडळी विशेषच घाबरली. इतर डॉक्टरहि आले. पण जो रोगी त्यांचें ऐकावयालाच तयार नाहीं, त्यावर त्यांचा इलाज काय चालणार?

शेठ अंबालाल व त्यांच्या धर्मपत्नी नडियादला आलीं. सोबत्यांचा विचार घेऊन ते मला फार काळजीपूर्वक आपल्या मिर्झापूरच्या बंगल्यावर घेऊन गेले. या दुखण्यामध्यें मला जी निर्मळ, निष्काम शुश्रूषा लाभली त्याहून अधिक कोणालाच मिळणें शक्य नाहीं, एवढें मी अवश्य सांगू शकतों. बारीक ताप जडला. शरीर क्षीण होत चाललें. दुखणें बरेंच लांबणार, कदाचित् यांतून मी उठणारहि नाहीं, असें मला दिसूं लागलें. अंबालाल शेठच्या बंगल्यामध्यें सर्वजण प्रेमानें शुश्रूषा करीत होते, तरीहि माझ्या मनाला स्वस्थता वाटेना. मला आश्रमांत घेऊन जाण्याबद्दल मीं त्यांची फार विनवणी केली. माझा फारच आग्रह पाहून ते मला आश्रमांत घेऊन गेले.

आश्रमामध्यें माझी व्यथा चालूच होती; इतक्यांत वल्लभभाईंनीं बातमी आणली, कीं जर्मनीचा पुरा पाडाव झाला असून रिक्रूटभरती करण्याची आतां

आवश्यकता राहिली नाहीं, असा निरोप कमिशनरकडून आलेला आहे. यामुळें रिक्रूटिंगच्या काळजींतून मीं मोकळा झालों, आणि तेवढेंच बरें वाटलें.

आतां पाण्याचे उपचार करीत असें आणि त्यामुळें देह टिकून राहिला होता. दुःख शान्त झालें, पण शरीर कांहीं केल्या भरून येईना. वैद्य मित्र व डॉक्टर मित्र अनेक प्रकारचा सल्ला देत; पण मीं कांहीं औषध घ्यावयाला तयार झालों नाहीं. दोनतीन मित्रांनीं सांगितलें, कीं दूध वर्ज्य असेल तर मांसाचा सुरवा घ्यावा. औषध म्हणून मांस वगैरे घ्याययाला हरकत नाहीं. अशा अर्थाचीं आयुर्वेदांतील प्रमाणेंहि त्यांनीं दिलीं. एकानें अंडीं घेण्याची शिफारस केली. पण त्यांपैकीं कोणताच सल्ला मान्य करणें मला शक्य नव्हतें. माझा जबाब एकच होता.

माझ्या बाबतींत खाद्याखाद्याचा निर्णय केवळ शास्त्रांतील श्लोकांच्या आधारें करावयाचा नव्हता. तत्संबंधींचे माझे विचार स्वतंत्रपणें ठरून गेले होते व ते माझ्या एकंदर जीवनाशीं निगडित झालेले होते. वाटेल तें खाऊन किंवा वाटेल त्या उपचारांनीं जगण्याचा मोह मला बिलकुल नव्हता. ज्या धर्माची अंमलबजावणी मी माझ्या मुलांच्या बाबतींत केली, पत्नीच्या बाबतींत केली, मित्रांचे बाबतींत केली, मी त्या धर्माचा त्याग स्वतःच्या बाबतींत कसा करावा ?

इतकें लांबलेलें किंवा इतक्या गंभीर स्वरूपाचें असें हें माझ्या आयुष्यांतील पहिलेंच दुखणें होतें. या दुखण्यामध्यें मला अशा तऱ्हेनें धर्मनिरीक्षण करण्याचा, त्याची कसोटी करण्याचा, अलभ्य लाभ मिळाला. एके दिवशीं रात्रीं तर मी आशा सोडून दिली. मृत्यु जवळच येऊन ठेपला आहे, असें माझ्या मनानें घेतलें. श्रीमती अनसूयाबाईंना निरोप पाठविला. त्या आल्या. वल्लभभाई आले. डॉक्टर कानुगा आले. डॉक्टर कानुगांनीं नाडी तपासून पाहिली आणि म्हणाले, " मला स्वतःला तरी मृत्यूचीं कांहीं एक चिन्हें दिसत नाहींत. नाडी साफ आहे. तुम्हांला केवळ अशक्ततेमुळें मानासिक भीति वाटत आहे. " पण मला विश्वास वाटेना. रात्र तर गेली. त्या रात्रींत मला किंचित् तरी झोंप लागली असेल कीं नाहीं याची शंकाच आहे.

सकाळ झाली. मृत्यु आला नाहीं. तरी पण अद्याप जगण्याची आशा वाटेना. मृत्यु नजिकच आहे असें समजून होईल तेवढा वेळ मी मित्रांच्या तोंडून गीतापाठ ऐकण्यांतच घालवूं लागलों. कांहीं कामकाज करण्याची शक्ति नव्हतीच. वाचन करण्याइतकीहि शक्ति नव्हती. कोणाशीं कांहीं बोलण्याची इच्छाहि होत नव्हती. थोडेसें बोलावें इतक्यांत मेंदू थकून जात असे. त्यामुळें जगण्यामध्यें कसलाच अर्थ वाटेना. निव्वळ जगण्यासाठीं जगणें मला कधींच पसंत पडलेलें नाहीं. कांहीं एक कामकाज न करतां मित्रांची सेवा घेत राहाण्याचा आणि क्षीण होत जाणाऱ्या देहाला टिकवून धरण्याचा अतिशय कंटाळा वाटूं लागला.

अशा तऱ्हेनें मृत्यूची वाट पाहात बसलों होतों; इतक्यांत डॉक्टर तळवलकर एका विचित्र प्राण्याला घेऊन आले. ते प्राणी महाराष्ट्राकडचे आहेत. हिंदुस्थान त्यांना ओळखीत नाहीं; पण ते माझ्यासारखेच 'चक्रम' आहेत; त्यामुळें मला त्यांची प्रथमदर्शनींच ओळख पटली. ते स्वतःचे उपचार माझ्यावर करून पाहाण्यासाठींच आले होते. डॉ. तळवलकर ज्यांना शिफारशीसाठीं घेऊन आले, त्यांनीं डॉक्टरीचा अभ्यास ग्रँट मेडिकल कॉलेजांत केलेला होता, पण द्वारकेचा छाप मिळविला नव्हता. मागाहून समजलें कीं ते ब्रह्मसमाजी आहेत. त्यांचें नांव केळकर. स्वभावानें फार स्वतंत्र वृत्तीचे. ते बर्फाच्या उपचारांची फार तरफदारी करणारे आहेत. माझ्या दुखण्याची वार्ता ऐकून आपले बर्फाचे उपचार माझ्यावर करून पाहाण्यासाठीं ते आले. तेव्हांपासून आम्ही त्यांना 'आइस डॉक्टर' या टोपणनांवानेंच ओळखीत असतों. स्वतःच्या मताबद्दल त्यांना फार आग्रह वाटतो. डिग्रीवाल्या डॉक्टरांपेक्षांहि आपण अधिक महत्त्वाचे असे कित्येक शोध लाविलेले आहेत, असा त्यांना आत्मविश्वास वाटतो. स्वतःबद्दलचा हा विश्वास ते माझ्यामध्यें उत्पन्न करूं शकले नाहींत, ही त्यांना व मला दोघांनाहि दुःखाची गोष्ट वाटते. त्यांचे उपचार अमुक मर्यादेपर्यंत मला योग्य वाटतात; परंतु मला वाटतें, कीं कांहीं अनुमानें काढण्यामध्यें त्यांनीं घाई केलेली आहे.

पण त्यांचे शोध योग्य असोत किंवा अयोग्य असोत; एवढें खरें, कीं मी त्यांना माझ्या शरीरावर प्रयोग करूं दिले. बाह्य उपचारांनीं बरें होतां येईल तर मला पाहिजेच होतें; आणि त्यांतून हे उपचार तर बर्फाचे म्हणजे पाण्याचे होते. त्यांनीं माझ्या सर्वांगावर बर्फ घासण्यास सुरुवात केली. त्यापासून त्यांची समजूत आहे तितका परिणाम जरी माझ्यावर घडून आला नाहीं तरीहि रोज जो मीं मरणाची वाट पाहात बसत असें, त्याऐवजीं आतां मला जगण्याची कांहींशी आशा वाटूं लागली; कांहींसा हुरूप वाटूं लागला. मानसिक उत्साहाबरोबर शरीरांतहि उत्साह जाणवूं लागला. अन्नहि थोडें अधिक जाऊं लागलें. रोज पांचदहा मिनिटें हिंडूं लागलों. "तुम्ही अंड्यांचा रस घ्याल, तर तुम्हांला आला आहे याहूनहि अधिक उत्साह येईल अशी मी खात्री देऊं शकतों. आणि अंडीं म्हणजे तर दुधाइतकाच निर्दोष पदार्थ आहे. अंडीं म्हणजे मांस तर नव्हेच. प्रत्येक अंड्यापासून कोंबडें होतेंच असाहि नियम नाहीं. ज्यापासून कोंबडें बनत नाहीं अशीं निर्बीज अंडींसुद्धां असतात, हें मी तुम्हांला सिद्ध करून देऊं शकेन." पण मी असलीं निर्बीज अंडीं घ्यावयालाहि तयार झालों नाहीं; तरी पण माझें गाडें कांहींसें पुढें ढकलत गेलें, व मीं आसपासच्या कामामध्यें थोडथोडें लक्ष घालूं लागलों.

●●●

## २९

# रौलॅट ॲक्ट व माझें धर्मसंकट

माथेरानला गेल्यास शरीर लवकर सुधारेल, अशी मित्रांचा सल्ला मिळाल्यावरून माथेरानला गेलों. पण तेथील पाणी फार जड असल्यामुळें माझ्यासारख्या रोग्याला तेथें राहाणें कठिण होऊन गेलें. आमांशामुळें गुदद्वार फार नरम होऊन गेलें होतें; आणि तेथें भेगा पडलेल्या असल्यामुळें मलत्यागाचे वेळीं खूप वेदना होत. त्यामुळें कांहींहि खाण्याची भीति वाटत असे. एका आठवड्यांतच माथेरानहून परत फिरलों. माझ्या तब्येतीची रखवालदारी शंकरलालनीं आपल्याकडे घेतली होती. त्यांनीं डॉक्टर दलालचा सल्ला घेण्याचा आग्रह केला. डॉक्टर दलाल आले. त्यांची चटचट निर्णय करण्याची शक्ति पाहून मी मोहित झालों.

" तुम्ही दूध घेत नाहीं तोंपर्यंत मला तुमचें शरीर सुधारतां येणार नाहीं. शरीर भरून येण्यासाठीं तुम्हीं दूध घेतलें पाहिजे, आणि लोखंड व सोमल यांचीं इंजेक्शनें घेतलीं पाहिजेत. एवढें कराल तर तुमचें शरीर परत सुदृढ करून देण्याची मी गॅरंटी देतों. " डॉक्टर म्हणाले.

" इंजेक्शन द्या, दूध मात्र मी घेणार नाहीं. " असा मीं जबाब दिला.

" तुमची दुधाविषयींची प्रतिज्ञा काय आहे ? " डॉक्टरनीं विचारलें.

" गाई-म्हशींवर फुंकारीची क्रिया होते हें ऐकल्यापासून दुधाबद्दल मला तिरस्कार उत्पन्न झाला; व तो मनुष्याचा आहारहि नव्हे असें मीं नेहमींच मानीत आलों आहें. म्हणून मीं दुधाचा त्याग केला आहे. "

" असेंच असेल तर बकरीचें दूध घेतां येईल. " कस्तूरबाई खाटेपाशीं उभी होती, ती चटकन् म्हणाली.

" बकरीचें दूध घेतलेंत म्हणजे माझें काम झालें." डॉक्टर मध्येंच म्हणाले.

मीं डळमळलों. सत्याग्रहाच्या लढ्याबद्दलच्या मोहामुळें माझ्यामध्यें जगण्याचा लोभ उत्पन्न झाला, आणि मी प्रतिज्ञेच्या अक्षरपालनावर संतोष मानून प्रतिज्ञेच्या आत्म्याचा घात केला. दुधाची प्रतिज्ञा घेतेवेळीं माझ्या डोळ्यांसमोर गाई-म्हशीच होत्या, तरीहि प्रतिज्ञा एकंदर दुधाला उद्देशूनच समजली पाहिजे; आणि जोंपर्यंत कोणत्याहि पशूचें दूध मनुष्याचा आहार या नात्यानें निषिद्धच आहे असें मला वाटतें, तोंपर्यंत तें घेण्याचा मला अधिकार पोंचत नाहीं हें कळत असूनहि मी बकरीचें दूध घ्यावयाला तयार झालों. सत्याच्या पुजाऱ्यानें सत्याग्रहाच्या लढाईसाठीं जगण्याची इच्छा करून सत्याला कलंक लावला.

माझ्या या कृत्याचा दंश अद्याप भरून निघालेला नाहीं, आणि बकरीचें दूध सोडण्याबद्दल माझें चिंतन चालूच आहे. बकरीचें दूध पितांना रोज मला दुःख होतें. परंतु सेवा करण्याचा महासूक्ष्म मोह माझ्या पाठीस लागला आहे, तो मला सोडीत नाहीं. अहिंसेच्या दृष्टीनें आहाराचे प्रयोग करणें मला प्रिय आहे. ते करण्यामध्यें मला आनंद वाटतो, तो माझा विरंगुळा आहे. पण मला बकरीचें दूध सध्यां जाचतें तें त्या दृष्टीनें नव्हे; तें मला सत्याच्या दृष्टीनें बोंचत आहे. मीं अहिंसेचा साक्षात्कार केला आहे असें मला वाटतें. सत्याची कांस सोडून दिली तर अहिंसेची कठिण कोडीं उकलतां येणार नाहींत असा माझा अनुभव आहे. सत्याचें पालन म्हणजे घेतलेल्या व्रतांच्या शरीराचें व आत्म्याचें रक्षण, शब्दार्थाचें व भावार्थाचें पालन. येथें मीं आत्म्याचा—भावार्थाचा—भंग केला आहे ही गोष्ट मला नित्य डांचत असते. हें कळत असतां माझ्या व्रतासंबंधीं माझें कर्तव्य कोणतें याचा मला उलगडा होत नाहीं, किंवा त्याच्या पालनासाठीं लागणारी हिंमत माझ्यामध्यें नाहीं. असें म्हणाना; दोहोंचाहि अर्थ एकच आहे. कारण कीं, शंकेच्या मुळाशीं श्रद्धेचा अभावच असतो, हे ईश्वरा, मला तूं श्रद्धा दे.

बकरीचें दूध सुरू केल्यानंतर थोड्याच दिवसांनीं डॉ. दलालनीं गुदद्वाराशीं चिरा पाडल्या होत्या त्यांवर शस्त्रक्रिया केली व ती फार यशस्वी झाली.

अंथरुणांतून उठण्याची थोडथोडी आशा वाटूं लागली, आणि वर्तमानपत्रें वगैरे वाचूं लागलों इतक्यांत रौलॅट कमिटीचा रिपोर्ट माझ्या हातीं आला. त्यांतील शिफारशी पाहून मीं चकित झालों. या बाबतींत कांहीं तरी त्वरित व स्पष्ट उपाय अंमलांत आणला पाहिजे, अशी भाई उमर व शंकरलाल यांनीं मागणी केली. महिना-भऱ्यानें मी अहमदाबादला गेलों. वल्लभभाई बहुधा रोज माझ्या समाचाराला येत. त्यांच्याशीं मी बोललों व याबाबत कांहीं तरी झालें पाहिजे असें सुचविलें. ‘ काय होणार ? ’ या प्रश्नाचा जबाब देतांना मीं म्हटलें, “ जर थोडीं तरी माणसें या बाबतींत प्रतिज्ञेनें बांधलीं जाणारीं मिळालीं तर व कमिटीच्या शिफारशींप्रमाणें कायदा झाला तर, आपण सत्याग्रह हातीं घेतला पाहिजे. अंथरुणाला खिळलेला नसतों तर मी एकटाहि झुंजलों असतों; आणि इतर मागून येऊन मिळतील अशी आशा केली असती. माझ्या या परवश स्थितीमध्यें एकट्यानें झुंजण्यासारखी माझी मुळींच स्थिति नाहीं. ”

या संभाषणांतून एवढी गोष्ट निघाली, कीं माझ्याशीं भरपूर संबंधांत आलेल्या मंडळींची एक छोटीशी सभा बोलावण्याचें ठरलें. रौलॅट कमिटीला मिळालेल्या पुराव्यावरून तिनें योजिलेल्या कायद्याची आवश्यकता बिलकुल सिद्ध होत नाहीं असें मला तर स्पष्ट दिसत होतें. तशा तऱ्हेचा कायदा स्वाभिमानाची चाड असलेली कोणतीहि प्रजा मान्य करणार नाहीं हेंहि मला तितकेंच स्पष्टपणें दिसत होतें.

नंतर सभा झाली. तिला फार फार तर वीस एक इसमांना बोलावलेलें होतें. मला आठवतें, कीं तिच्यामध्यें वल्लभभाईखेरीज श्रीमती सरोजिनी नायडू, मि. हॉर्निमन्, स्व. उमर सोभानी, श्री. शंकरलाल बँकर, श्रीमती अनसूयाबाई वगैरे होतीं.

प्रतिज्ञापत्र तयार करण्यांत आलें व त्यावर हजर असलेल्या सर्वांनीं सह्या केल्या असें मला आठवतें. त्या वेळीं मी वर्तमानपत्र चालवीत नसें, पण वेळो-वेळीं वर्तमानपत्रांत लिहीत असें, त्याप्रमाणें आतां मीं लिहावयाला सुरुवात केली व शंकरलाल बँकरनीं खूप चळवळ सुरू केली. त्यांच्या काम करण्याच्या व संघटन करण्याच्या शक्तीचा या वेळीं मला खूप अनुभव आला.

चालू असलेल्यांपैकीं कोणतीहि संस्था सत्याग्रहासारखें नवीन शस्त्र पेलूं शकेल हें मला शक्य वाटलें नाहीं. म्हणूनच सत्याग्रहसभेची स्थापना करण्यांत आली. तिच्यामध्यें मुख्य नांवें मुंबईतीलच घातलीं गेलीं. मुख्य ठाणें मुंबईच करण्यांत आलें. प्रतिज्ञेवर खूप सह्या होऊं लागल्या. खेडा-सत्याग्रहाप्रमाणें पत्रिका निघाल्या व ठिकठिकाणीं सभा झाल्या.

या सभेचा अध्यक्ष मीं झालों. माझ्या लक्षांत आलें, कीं माझें व सुशिक्षित-वर्गाचें फारसें पटण्यासारखें नाहीं. सभेमध्यें गुजराथी भाषेचाच उपयोग करण्या-बद्दलचा माझा आग्रह व माझ्या इतर कांहीं पद्धती यांमुळें ते पेंचांत सांपडले. तरी पण माझी पद्धति चालवून घेण्याइतकी उदारता पुष्कळांनीं दाखविली एवढें मला कबूल केलें पाहिजे. पण सुरुवातीलाच मला दिसून आलें, कीं ही सभा दीर्घ-काळपर्यंत चालणार नाहीं. शिवाय सत्य आणि अहिंसा यांवर मी जो जोर देत असें तोच कित्येकांना अप्रिय होऊन बसला. तरीहि सुरुवातीच्या काळामध्यें हें नवें काम खूप जोरानें चाललें.

## ३०

# तें अद्‌भुत दृश्य !

एकीकडे रौलॅट कमिटीच्या रिपोर्टाविरुद्ध आंदोलन अधिकाधिक बळावत जात होतें तर दुसरीकडे कमिटीच्या शिफारशींचा अंमल करण्याकडे सरकारचें वळण अधिकाधिक दृढ होत होतें. रौलॅट बिल प्रसिद्ध झालें. मीं जन्मांत एकदांच कायदेकौन्सिलच्या बैठकीला गेलों आहें. रौलॅट बिलावरील चर्चा ऐकण्यासाठीं गेलों होतों. शास्त्रीजींनीं आपलें जळजळीत भाषण केलें. सरकारला धोक्याची सूचना दिली.

शास्त्रीजींचा वाक्प्रवाह चालला असतां व्हाइसरॉय त्यांचेकडे टक लावून पाहात होते. मला तर वाटलें, कीं त्या भाषणाचा त्यांच्या मनावर परिणाम झाला असावा. शास्त्रीजींना भावनांचें भरतें येत होतें.

पण मनुष्य झोंपलेल्याला जागा करूं शकेल. जो अगोदरचाच जागा, पण झोंपेची बतावणी मात्र करतो त्याच्या कानांत ढोल वाजविले म्हणून तो ऐकतो थोडाच ? कायदेकौन्सिलामध्यें बिलाची चर्चा करण्याचा फार्स तर केलाच पाहिजे; त्याप्रमाणें सरकारनें तो केला, परंतु त्याला जें कांहीं करावयाचें होतें त्याबाबतचा निश्चय अगोदरच होऊन चुकला होता. त्यामुळें शास्त्रीजींची धोक्याची सूचना व्यर्थ गेली.

मग माझा सनईचा आवाज ऐकणार तरी कोण ? मीं व्हाइसरॉयना भेटून खूप विनवणी केली. खाजगी पत्रें लिहिलीं, जाहीर पत्रें लिहिलीं. सत्याग्रहाखेरीज माझ्यापाशीं दुसरा मार्ग नाहीं हें त्यामध्यें स्पष्ट कळविलें; पण सर्व व्यर्थ गेलें.

अद्याप बिल गॅझेटांत आलें नव्हतें. माझें शरीर तर अशक्तच होतें. तरी पण मीं लांबच्या प्रवासाचें जोखीम पत्करलें. माझ्यामध्यें उंच स्वरानें बोलण्याची शक्ति आली नव्हती. उभें राहून बोलण्याची शक्ति गेली ती अद्यापपर्यंत परत आलेली नाहीं. उभ्यानें बोलूं लागल्यास थोडक्याच वेळांत सर्व शरीराला कंप सुटे आणि छातीमध्यें व पोटामध्यें भरून आल्यासारखें होई. पण मद्रासकडून आलेलें आमंत्रण स्वीकारलेंच पाहिजे असें मला वाटलें. दक्षिणेकडील प्रान्त त्या वेळींहि मला घराप्रमाणें वाटत. दक्षिण आफ्रिकेंतील संबंधामुळें तामिळ, तेलगू वगैरे दक्षिण प्रान्तांतील लोकांवर माझा कांहींसा हक्क पोंचतो असें मी समजत आलों आहें, व या समजुतीमध्यें मीं किंचित् तरी चूक केली आहे असें अद्यापपर्यंत माझ्या निदर्शनास आलेलें नाहीं. आमंत्रण सद्गत कस्तुरीरंगा आयंगार यांजकडून आलें होतें. त्या आमंत्रणाच्या मुळाशीं राजगोपालाचार्य होते हें मला मद्रासला गेलों तेव्हां कळलें. राजगोपालाचार्यांचा हा माझा पहिलाच परिचय म्हणतां येईल. मीं त्यांना या वेळींच प्रत्यक्ष ओळखूं लागलों.

सार्वजनिक कामामध्यें अधिक भाग घेण्याच्या इराद्यानें व श्री. कस्तुरीरंगा आयंगार इत्यादि मित्रांच्या आग्रहावरून ते सेलम सोडून मद्रासमध्यें वकिली करणार होते. माझें बिऱ्हाड त्यांच्याकडे ठेवलेलें होतें. मला दोनएक दिवसांनंतर कळलें, कीं मीं उतरलों होतों तें त्यांचें घर. बंगला कस्तुरीरंगा आयंगार यांचा असल्यामुळें माझी समजूत झाली होती, कीं मी त्यांचाच पाहुणा आहें. महादेव देसायांनीं माझी चूक दुरुस्त केली. राजगोपालाचार्य दूरदूरच राहात. पण महादेवनीं त्यांची चांगली पारख केली. ‘ तुम्ही राजगोपालाचार्यांचा परिचय करून घेतला पाहिजे ’ महादेवभाईनीं मला सूचना केली.

मीं परिचय करून घेतला. त्यांच्याबरोबर रोज लढ्याच्या उभारणीसंबंधीं विचार चाले. सभा भरविण्यापलीकडे मला दुसरें कांहींच सुचत नव्हतें. रौलॅट बिलाचा जर कायदा झाला व त्याला सविनय भंग कसा लागू करायचा? त्याचा सविनय भंग करण्याची संधि सरकार देईल तेव्हांच मिळणार. दुसऱ्या कोणकोणत्या कायद्यांचा सविनय भंग करतां येईल? त्याचे नियम कसे ठरवावयाचे? अशा तऱ्हेची चर्चा होत असे.

श्री. कस्तुरीरंगा आयंगारांनीं एक लहानशी पुढाऱ्यांची सभाहि बोलावली. तिच्यामध्यें खूप चर्चा झाली. तिच्यामध्यें श्री. विजयराघवाचार्य खूप भाग घेत. बारीकसारीक सर्व सूचना लिहून काढून सत्याग्रहाची स्मृति लिहून काढण्याची त्यांनीं मला सूचना केली. हें काम माझ्या शक्तीबाहेरचें आहे असें मीं त्यांस सांगितलें.

अशा तऱ्हेनें धामधूम चालली होती. इतक्यांत बातमी आली, कीं बिल कायद्याच्या स्वरूपांत गॅझेटमध्यें प्रसिद्ध झालें. ही बातमी आल्यानंतर रात्रीं मी विचार करीत करीतच झोंपीं गेलों. सकाळीं लवकर उठून बसलों. अर्धवट झोंपेंत स्वप्नामध्येंच मला विचार सुचला. सकाळच्या प्रहरीं मीं राजगोपालाचार्यांना बोलावून आणून सांगितलें,

"मला रात्रीं अर्धवट झोंपेमध्यें विचार सुचला, कीं आपण या कायद्याच्या प्रत्युत्तरादाखल उभ्या देशाला हरताळ पाडण्याची सूचना द्यावी. सत्याग्रह हा आत्मशुद्धीचा लढा आहे, हा धार्मिक लढा आहे. धर्मकार्याची सुरुवात आत्मशुद्धी-पासून करावी हें योग्य दिसतें. त्या दिवशीं सर्वांनीं उपवास करावा व कामधंदा बंद करावा. मुसलमान बंधू रोजापलीकडे जास्त उपवास पाळणार नाहींत, त्यासाठीं उपवास चोवीस तासांतच पाळण्याची सूचना करावी. यांत सर्वच प्रान्त भाग घेतील कीं नाहीं सांगतां येत नाहीं. मुंबई, मद्रास, बिहार व सिंध एवढ्यांची मला आशा आहेच. एवढ्या ठिकाणीं बरोबर हरताळ पडला तरी आपण संतोष मानला पाहिजे."

ही सूचना राजगोपालाचार्यांना फार आवडली. नंतर लगेच इतर मित्रांनाहि ती कळविली. सर्वांनीं पसंत केली. एक लहानशी नोटीस मीं लिहून काढली. प्रथम ३० मार्च १९१९ ही तारीख घालण्यांत आली होती, मागाहून एप्रिलची ६ तारीख करण्यांत आली. लोकांना फारच थोड्या दिवसांची सूचना देण्यांत आली होती. कार्य तावडतोब होणें आवश्यक वाटल्यामुळें तयारीसाठीं अधिक मुदत द्यावयाला वेळच नव्हता.

पण कशी कोणाला माहीत, सर्व व्यवस्था नीट लागली! सबंध हिंदुस्थान-भर—शहरांत व खेडोंपाडीं—हरताळ पडले. तें दृश्य भव्य होतें.

●●●

# ३१

# तो आठवडा ! — १

दक्षिण भागांत थोडासा प्रवास करून बहुधा एप्रिल ४ ला मी मुंबईस पोंचलों. ६ तारीख पाळण्यासाठीं मीं मुंबईला हजर राहावें अशी श्री. शंकरलाल यांच्याकडून तार आली होती.

पण तत्पूर्वीं ३० मार्च रोजींच दिल्लीला हरताळ पडला. दिल्लीमध्यें स्व. श्रद्धानंदजी व मरहूम हकीमसाहेब अजमलखान यांच्या अनुरोधानें कामें होत. हरताळाची तारीख ६ एप्रिलवर ढकलल्याची बातमी दिल्लीला उशिरा पोंचली. दिल्लीमध्यें त्या दिवशीं पडला तसा हरताळ पूर्वीं कधींच पडला नव्हता. हिंदु व मुसलमान दोघेहि एकदिल झाल्यासारखे दिसले. श्रद्धानंदजींना जुम्मामशिदीमध्यें घेऊन जाण्यांत आलें, व तेथें त्यांस भाषण करूं दिलें. हें सर्व सत्ताधाऱ्यांना सहन होऊं शकलें नाहीं. मिरवणूक रेल्वेस्टेशनकडे जात असतां पोलिसांनीं अडविली. पोलिसांनीं गोळीबार केला. कांहीं लोक जखमी झाले. कांहीं खूनहि झाले. दिल्लीमध्यें दडपशाहि सुरू झाली. श्रद्धानंदजींनीं मला दिल्लीला बोलाविलें. मी ६ तारखेचा कार्यक्रम आटपून लगेच दिल्लीला येतों, अशी तार केली.

जी स्थिति दिल्लीची तीच लाहोर, अमृतसरची होती. अमृतसरहून डॉ. सत्यपाल व किश्चलू यांच्या तारा मीं ताबडतोब निघून यावें अशाबद्दलच्या आल्या होत्या. या दोन गृहस्थांची मला त्या वेळीं मुळींच माहिती नव्हती. परंतु तिकडेहि दिल्लीवरून नक्की येतों असें कळविलें.

मुंबईस ६ तारखेला सकाळच्या प्रहरीं हजारों लोक चौपाटीवर स्नान करावयाला गेले, व तेथून ठाकूरद्वारकडे मिरवणूक निघाली. त्यांत स्त्रिया व मुलेंहि सामील झालीं. मिरवणुकीमध्यें मुसलमानांनींहि मोठ्या सख्येनिशीं भाग घेतला. या मिरवणुकींतून आम्हांला मुसलमानबंधू एका मशिदींत घेऊन गेले. तेथें श्री. सरोजिनीदेवींकडून व माझ्याकडून भाषणें करवून घेतलीं. या प्रसंगीं श्री. विठ्ठलदास जेराजाणींनीं स्वदेशी व हिंदु-मुसलमानऐक्य यांसंबंधीं लोकांकडून प्रतिज्ञा घेवविण्याविषयीं सूचना केली. अशा घाईनें प्रतिज्ञा घेवविण्यास मीं कबूल झालों नाहीं. होत आहे एवढ्यावरच संतुष्ट राहा असें सांगितलें. प्रतिज्ञा एकदां घेतल्यानंतर मोडतां कामा नये. स्वदेशीचा अर्थ आपण समजून घेतला पाहिजे. हिंदु-मुसलमान-ऐक्यासंबंधींच्या जबाबदारीची जाणीव आपल्याला असली पाहिजे, वगैरे सांगितलें

आणि असें सुचविलें, कीं ज्यांना प्रतिज्ञा घ्यावयाच्या असतील त्यांनीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं चौपाटीच्या मैदानावर एकत्र जमण्यास हरकत नाहीं.

मुंबईला संपूर्ण हरताळ पडला होता. येथें कायद्याच्या सविनय भंगाची तयारीहि करून ठेविलेली होती. भंग करतां येईल अशा दोनतीन गोष्टीच होत्या. जे कायदे रद्द होणें इष्ट होतें, तसेंच ज्यांचा भंग सर्वांना सहजीं करतां येण्यासारखा होता अशांपैकीं एकच प्रथम हातीं धरावा असें ठरलें. मिठाच्या करासंबंधींचा कायदा असह्य होता. तो कर रद्द करविण्याचे खूप प्रयत्न होऊन गेले होते. म्हणून सर्वांनीं परवान्याखेरीज आपापल्या घरांत मीठ तयार करावें अशी एक सूचना मीं केली. दुसरी सूचना सरकारनें बंदी केलेलीं पुस्तकें छापून विकण्यासंबंधींची होती. अशीं दोन पुस्तकें माझींच स्वतःचीं होतीं. 'हिंद-स्वराज्य' आणि 'सर्वोदय.' हीं पुस्तकें छापवून विकणें हा सविनय भंग सर्वांत सोपासा वाटला. म्हणून तीं छापवून घेतलीं, व उपवास सुटल्यानंतरच चौपाटीवरील जंगी सभा विसर्जन पावल्यानंतर तीं विकण्याचा कार्यक्रम ठरविण्यांत आला.

संध्याकाळीं पुष्कळ स्वयंसेवक हीं पुस्तकें विकावयाला बाहेर पडले. एका मोटारींतून मी निघालों, व एकींतून श्री. सरोजिनी नायडू निघाल्या. छापविलेल्या तेवढ्या सर्व प्रती खपून गेल्या. वसूल होईल ती किंमत लढ्याच्या खर्चालाच वापरावयाची होती. प्रत्येक प्रतीची किंमत चार आणे ठेवण्यांत आली होती, पण माझ्या किंवा सरोजिनीदेवींच्या हातांत चार आणे क्वचितच कोणीं ठेवले असतील. बहुतेक जण खिशांत असतील तेवढे सर्व पैसे देऊन प्रत घेणारे निघाले. कोणी कोणी पांचदहा रुपयांच्या नोटाहि देत. मला एका प्रतीची किंमत पन्नास रुपयांच्या नोटीपर्यंत मिळाल्याचें स्मरतें. लोकांना आम्ही समज देत होतों, कीं घेणारालाहि तुरुंग मिळण्याचा संभव आहे. पण घटकाभर लोकांनीं तुरुंगाचें भयच सोडून दिलें होतें.

७ तारखेला समजलें, कीं सरकारनें ज्या पुस्तकांच्या विक्रीला प्रतिबंध केला होता, तींच पुस्तकें विकलीं गेलीं असें सरकारच्या दृष्टीनें ठरत नाहीं. विकलीं तीं त्या पुस्तकांची नवीन आवृत्ति म्हणतां येईल. तिचा सरकारजमा झालेल्या पुस्तकांत अंतर्भाव होत नाहीं. अर्थात् ही नवी आवृत्ति छापणें, विकणें किंवा खरीदणें यांत कांहीं गुन्हा होत नाहीं असें सरकारतर्फे सांगण्यांत आलें. ही बातमी ऐकून लोकांचा विरस झाला.

त्या दिवशीं सकाळीं लोकांनीं स्वदेशीव्रतासाठीं व हिंदु-मुसलमानऐक्याच्या व्रतासाठीं चौपाटीवर जमावयाचें होतें. विठ्ठलदास जेराजणींना हा पहिला अनुभव मिळाला, कीं चकाकतें तेवढें सोनें नव्हे. लोक फार थोडे जमले होते. त्यांपैकीं दोनचार भगिनींचीं नांवें या वेळीं माझ्या नजरेसमोर आहेत. पुरुषसुद्धां थोडेच होते. मीं व्रतांचे मसुदे तयार करून ठेविले होते. त्यांच्या अर्थाचे हजर असलेल्या

लोकांपुढें खूप विवरण करून नंतर तीं घेऊं दिलीं. थोड्या हजेरीचें मला आश्चर्य वाटलें नाहीं, दुःख तर नाहींच झालें. पण धांवपळीचा कार्यक्रम व विधायक कार्य यांमधील भेद, पहिल्याबद्दलची हौस व दुसऱ्याबद्दलचा कंटाळा, हीं तेव्हांपासूनच माझ्या अनुभवास येत आहेत.

पण या विषयाला स्वतंत्र प्रकरण द्यावें लागेल. ७ तारखेला रात्रीं मी दिल्ली-अमृतसरकडे जावयाला निघालों. ८ तारखेला मथुरेला पोंचतों तों कुणकुण ऐकावयाला आली, कीं कदाचित् मला पकडतील. मथुरेच्या पलीकडे एका स्टेशनवर गाडी थांबत होती तेथें आचार्य गिडवाणी भेटले. त्यांनीं मला पकडणार अशी साधार बातमी दिली, व आपल्या सेवेची जरूर असेल तर सांगा असें सांगितलें. मीं आभार मानले व जरूर पडल्यास सेवा घेण्यास चुकणार नाहीं असें सांगितलें.

पलवल स्टेशन येण्यापूर्वी पोलीस अंमलदारानें माझ्या हातांत हुकूम आणून दिला. "तुम्हीं पंजाबमध्यें आल्यानें अशान्तता वाढण्याचा संभव आहे. सबब तुम्हीं पंजाबच्या सरहद्दींत पाऊल टाकूं नये." अशा अर्थाचा तो हुकूम होता. हुकूम दाखवून पोलिसांनीं मला उतरून जाण्यास सांगितलें. मीं उतरण्याचें नाकारून म्हटलें,

"मी अशान्तता वाढविण्यासाठीं नव्हे, तर बोलावणें आल्यावरून अशान्ति कमी करण्यासाठीं जाऊं इच्छितों; त्यामुळें मला दिलगिरी वाटते, कीं मला हा हुकूम मानणें शक्य नाहीं."

पलवल आलें. महादेव माझ्याबरोबर होते. त्यांना दिल्लीला जाऊन श्रद्धानंदजींना भेटण्यास व लोकांना शान्त राखण्यास सांगितलें. मीं महादेवांना सांगून ठेविलें, कीं मीं हुकुमाचा अनादर करून त्याबद्दल होईल ती शिक्षा पत्करण्याचें ठरविलें आहे असें कळवावें व मला शिक्षा झाली तरीहि लोकांनीं शान्त राहाण्यामध्येंच आपला जय आहे, हें त्यांनीं लोकांना समजूत द्यावें.

पलवल स्टेशनवर मला उतरून घेतलें व पोलिसांच्या हवालीं केलें. दिल्लीहून येणाऱ्या एका गाडीच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत मला बसविलें. बरोबर पोलिसपार्टी बसली. मथुरेला पोंचल्यावर मला पोलिस बराकींत घेऊन गेले. माझें काय करणार किंवा मला कोठें घेऊन जाणार तें अंमलदार मला सांगूं शकला नाहीं. पहांटेस चार वाजतां मला उठविलें आणि एक मालगाडी मुंबईकडे जात होती तिच्यामध्यें बसविलें. दुपारीं सवाई माधुपूरला उतरून घेतलें. तेथें मुंबईच्या मेलनें लाहोरहून इन्स्पेक्टर बोरिंग आले; त्यांनीं माझा कबजा घेतला.

आतां मला पहिल्या वर्गांत बसविलें. शेजारीं साहेब बसले. अजूनपर्यंत मी सामान्य कैदी होतों. आतां माझी गणना 'जंटलमन कैद्या'मध्यें झाली. साहेबांनीं सर मायकेल ओडवायरची स्तुति सुरू केली. त्यांचें व्यक्तिशः माझ्याशीं कांहींच वैर नाहीं, पण मी पंजाबमध्यें गेल्यानें शान्तिभंग होण्याचें त्यांना फार भय वाटतें

वगैरे सांगितलें; व मीं आपण होऊन परत जावें व पंजाबची सरहद्द ओलाडूं नये अशी विनंति केली. मीं त्यांना सांगून टाकलें, कीं माझ्याकडून हुकुमाचें पालन होण्यासारखें नाहीं आणि मी आपण होऊन परत जावयाला तयार नाहीं. त्यावर आपल्याला निरुपायास्तव कायद्याचा अंमल करावा लागणार, असें साहेब म्हणूं लागले. “ पण माझें काय करण्याचा तुमचा विचार आहे तें तर सांगाल ? ” मीं विचारलें. ते म्हणाले, “ मला माहीत नाहीं. मला पुढचे हुकूम मिळावयाचे आहेत. तूर्त मी तुम्हांला मुंबईस घेऊन जात आहें. ”

सुरतेला आलों. तेथें दुसऱ्या एका अंमलदारानें माझा कबजा घेतला. त्यानें रस्त्यांत मला सांगितलें, “ तुम्ही मोकळे आहां. पण तुमच्यासाठीं मरीन लाइन्स स्टेशनपाशीं गाडी थांबवीन. तेथें तुम्ही उतरून जाल तर अधिक बरें. कुलाब्यावर अधिक गर्दी होण्याचा संभव आहे. ” मीं त्यांच्या इच्छेप्रमाणें करण्याची खुषी दर्शविली. त्यांना बरें वाटलें, व त्यांनीं माझे आभार मानले. मरीन लाइन्सला उतरलों. तेथें कोणा ओळखीच्या गृहस्थाची घोडागाडी दिसली. ते मला रेवाशंकर झवेरींच्या घरीं पोंचवून गेले. त्यांनींच मला बातमी दिली कीं, “ तुम्हांला पकडल्याची बातमी ऐकून लोक चवताळून गेले आहेत, आणि वेड्यासारखे बनून गेले आहेत. पायधुणीपाशीं दंगा होण्याची भीति आहे. मॅजिस्ट्रेट व पोलिस तिकडे गेले आहेत. ”

मी घरीं पोंचतां तों उमर सोभानी व अनसूयाबाई मोटारींतून आलीं, व मला पायधुणीला घेऊन जातों असें म्हणालीं. “ लोक अधीर बनले आहेत, आणि चवताळून गेले आहेत. आमच्या कोणाकडून शान्त होण्यासारखे नाहींत. तुम्हांला पाहिलें तरच शान्त होतील. ” असें त्यांनीं सांगितलें.

मी मोटारींत बसलों. पायधुणीपर्यंत पोंचण्यापूर्वींच रस्त्यांत खूप गर्दी जमलेली दिसली. लोक मला पाहून हर्षानें वेडे झाले. आतां मिरवणूक बनली. ‘ वंदे मातरम् ’ व ‘अल्लाहो अकबर’च्या जयघोषानें आकाशाच्या चिंधड्या उडतात, कीं काय असें दिसलें. पायधुणीवर घोडेस्वार दिसले. वरून विटांचा वर्षाव होत होता. मी हात जोडून लोकांना शान्त होण्याबद्दल विनवीत होतों. पण आम्हीसुद्धां त्या विटांच्या वर्षावांतून बचावून जाऊं असें चिह्न दिसेना.

मिरवणुकीला अबदुल रहमान गल्लींतून क्रॉफर्ड मार्केटकडे जाण्याची आडकाठी करण्याकरितां समोरून घोडेस्वारांची तुकडी येऊन थडकली. लोकांना कोर्टाकडे जावयाचें थांबविण्याचा त्यांचा प्रयत्न होता. लोक मावत नव्हते. लोक पोलीसलाइन फोडून पुढें घुसले. माझा आवाज ऐकूं जाण्यासारखी स्थिति नव्हती. अशा स्थितींत घोडेस्वारांच्या तुकडीच्या मुख्यानें लोकांना उधळवून लावण्याचा हुकूम केला, आणि त्या तुकडीनें भाले उभारून लोकांवर एकदम घोडे सोडून

दिले. त्यांपैकीं एकाद्या भाल्यानें आमचीहि वाट लावली, तर आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं असें मला वाटलें. पण त्या समजुतींत अर्थ नव्हता. आमच्या बाजूनें सर्व भाले आगगाडीच्या वेगानें वाट कापीत चालले होते. लोकांच्या जमावामध्यें खिंडार पडलें. पळापळ सुरू झाली. कोणी चिरडलें, कोणाला जखमा झाल्या. घोडेस्वारांना बाहेर पडावयाला मार्ग नव्हता, तर लोकांना बाजूला सरावयाला मार्ग नव्हता. मागें फिरावें तरी मागेंहि हजारों लोक खेंचोखेंच भरलेले होते. एकंदर देखावा भयंकर होता. घोडेस्वार व लोक दोघेहि वेडे झाल्यासारखेच दिसले. घोडेस्वार कांहीं पाहात नव्हते व त्यांना पाहातां येण्यासारखेंहि नव्हतें. ते तर खालीं वांकून घोड्यांना दौडवीत चालले होते. हा हजारों लोकांचा जमाव भेदून जायला जे कांहीं क्षण लागले, तेवढे क्षण त्यांना कांहीं दिसतच नव्हतें असें मीं पाहिलें.

लोकांना अशा तऱ्हेनें विखुरण्यांत व थांबविण्यांत आलें. आमच्या मोटारीला पुढें जाऊं दिलें. मी कमिशनरच्या ऑफिसपुढें मोटार उभी करविली आणि पोलिसांच्या वर्तणुकीबद्दल त्यांच्याकडे तक्रार करण्यासाठीं मी तेथें उतरलों.

●●●

३२

# तो आठवडा !—२

कमिशनर ग्रिफिथसाहेबांच्या ऑफिसांत गेलों. त्यांच्या जिन्यापाशीं जिकडे पाहावें तिकडे हत्यारबंद सोल्जर बसलेले होते; जसे काय युद्धासाठींच सिद्ध होत असावेत ! पडवीमध्येंदि धांदल उडून गेलेली होती. मी आगाऊ सूचना देऊन ऑफिसांत जातों, तर तेथें कमिशनरांशेजारीं मि. बोरिंगना बसलेले पाहिलें.

मीं पाहिलेल्या दृश्याचें वर्णन कमिशनरपाशीं केलें. त्यांनीं थोडक्यांत जबाब दिला, “मला मिरवणूक कोटाकडे जाऊं द्यावयाची नव्हती. तिकडे गेल्यास दंगा झाल्याखेरीज राहिलाच नसता. आणि मला दिसलें, कीं लोक परत वळा म्हणून वळण्यासारखे नव्हते. अर्थात् चाल करून जाण्याखेरीज मार्ग नव्हता.”

“पण त्याचा परिणाम काय होणार तें तुम्हांला समजत होतें ? लोक घोड्यांच्या टापांखालीं चिरडल्याशिवाय राहाणार नाहींत. घोडेस्वारांचीच जरूर नव्हती असें मला वाटतें.” मीं म्हटलें.

“तें तुम्हांला समजावयाचें नाहीं. लोकांवर तुमच्या शिकवणीचा परिणाम कोणत्या तऱ्हेचा झाला आहे, त्याची माहिती तुमच्यापेक्षां आम्हां पोलिसांना

अधिक मिळते. आम्हीं पहिल्यापासूनच कडक उपाय योजला नाहीं, तर अधिक नुकसान होईल. तुम्हांला खात्री देतों, कीं लोक तुमच्यासुद्धां ताब्यांत राहावयाचे नाहींत. कायदेभंगाची गोष्ट त्यांना चटकन पटेल, शान्तीची गोष्ट त्यांच्या अधिकाराबाहेरची आहे. तुमचे हेतु चांगले आहेत, पण ते लोकांना कळावयाचे नाहींत. ते आपल्या वळणावरच जाणार. " साहेब म्हणाले.

" पण तुमच्या माझ्यामध्यें मतभेद येथेंच आहे. लोक स्वभावतः लढाऊ वृत्तीचे नाहींत, शान्तिप्रियच आहेत. " मीं जबाब दिला.

आमच्यामध्यें वादविवाद सुरू झाला.

शेवटीं साहेब म्हणाले, " बरें तर, लोक तुमची शिकवण समजलेले नाहींत, याबद्दल जर तुमची खात्री पटली तर तुम्हीं काय कराल ? "

मीं जबाब दिला, " माझी तशी खात्री झाली तर मी लढा बंद ठेवीन."

" बंद ठेवाल म्हणजे काय ? तुम्हीं तर मि. बोरिंगना सांगितलें आहे, कीं मोकळे होतांक्षणीं परत पंजाबला जाण्याचा तुमचा इरादा आहे ! "

" हो, माझा विचार उलट गाडीनेंच पंजाबला जाण्याचा होता; पण तें आज जुळण्यासारखें नाहीं. "

" तुम्हीं धीर धरला तर तुम्हांला आणखी किती तरी गोष्टी समजत जातील. अहमदाबादेंत काय चाललें आहे याची तुम्हांला कल्पना आहे ? अमृतसरमध्यें काय झालें ? सगळीकडे लोक पिसाळल्यासारखे होऊन गेले आहेत. मलासुद्धां सर्व माहिती नाहीं. कित्येक ठिकाणीं तारा तोडण्यांत आल्या आहेत. मी तुम्हांला बजावून सांगतों कीं, या सर्व दंग्याची जबाबदारी तुमच्या माथ्यावर आहे."

मीं म्हटलें, " माझी जी जी कांहीं जबाबदारी असेल ती पत्करण्यास मी मागें घेणार नाहीं. अहमदाबादेंत लोकांनीं कांहीं कमीजास्त केल्यास मला आश्चर्य व दुःख वाटेल. अमृतसरची मला कांहीं एक माहिती नाहीं. मी तिकडे कधीं गेलेलोंहि नाहीं. मला तिकडे कोणी ओळखीतहि नाहीं. पण मला एवढें माहीत आहे, कीं पंजाबसरकारनें मला तिकडे जाण्यास बंदी केली नसती, तर शान्ति राखण्याच्या कामीं मला भरपूर भाग घेतां आला असतां. मला बंदी करून सरकारनें लोकांना डिवचलें आहे. "

अशा तऱ्हेनें आमच्या गोष्टी झाल्या. आमचीं मतें एकमेकांशीं जुळण्यासारखीं नव्हतींच. चौपाटीवर सभा भरवून लोकांना शान्त राहाण्याबद्दल समजावून सांगण्याचा माझा इरादा कमिशनरना कळवून मीं त्यांचा निरोप घेतला.

चौपाटीवर सभा भरली. मी लोकांना शान्ततेचें महत्त्व व सत्याग्रहाचे नियम समजावून सांगितले; व सांगितलें कीं, " सत्याग्रह खऱ्याचा खेळ आहे.

लोक जर शान्तता राखणार नाहींत, तर मला सत्याग्रहाचा लढा कधींहि चालवितां येणार नाहीं. ''

अहमदाबादेहून अनसूयाबाईंनाहि खबर मिळाली होती, कीं तिकडेहि हुल्लड झाली आहे. अनसूयाबाईंनाहि पकडलें अशी कोणी अफवा उठविली होती. त्यामुळें मजूर वेडे होऊन गेले होते. त्यांनीं हरताळ पाडला आणि दंगा केला. एका शिपायाचा खूनहि झाला होता.

मी अहमदाबादला गेलों. मला समजलें, कीं नडियादच्या शेजारीं रेल्वेचा रूळ काढून टाकण्याचाहि प्रयत्न झाला होता. विरमगांवला एका सरकारी नोकराचा खून झाला. मी अहमदाबादला जातों तों तेथें मार्शल लॉ चालू होता. लोक गांगरून गेले होते. लोकांनीं आपल्या कर्मांचीं फळें सव्याज भोगिलीं.

स्टेशनवर मला कमिशनर मि. प्रॅटकडे घेऊन जाण्यासाठीं मनुष्य आला होता. मी त्यांच्याकडे गेलों. तेहि खूप संतापलेले होते. मीं शान्तपणें जबाब दिला. झालेल्या खुनाबद्दल आपली दिलगिरी व्यक्त केली. मार्शल लॉ अनावश्यक असल्याचेंहि सुचविलें; आणि परत शान्तता प्रस्थापित करण्यासाठीं जे जे उपाय योजावे लागतील ते ते योजण्याची माझी तयारी आहे असें सांगितलें. जाहीर सभा भरविण्याची परवानगी मागितली. ती सभा आश्रमाच्या जागेमध्यें भरविण्याची माझी इच्छा व्यक्त केली. ती त्यांना पसंत पडली. मला आठवतें त्याप्रमाणें मीं रविवार ता. १३ रोजीं ती सभा भरविली. मार्शल लॉहि त्याच दिवशीं कीं दुसऱ्या दिवशीं रद्द झाला. या सभेमध्यें मीं लोकांना त्यांच्या दोषांची जाणीव करून देण्याचा प्रयत्न केला. मीं प्रायश्चित्तादाखल तीन दिवस उपास केला व लोकांना एक दिवस करण्याचा सल्ला दिला. ज्यांनीं दंग्याधोप्यामध्यें भाग घेतला होता, त्यांना स्वत:चा गुन्हा कबूल करण्याची सूचना केली.

माझें कर्तव्य मला स्पष्ट दिसून आलें. ज्या मजुरांमध्यें व इतर लोकांमध्यें मी एवढा वेळ राहिलों होतों, ज्यांची मीं सेवा केली होती, आणि ज्यांच्याकडून चांगल्या वर्तणुकीची मी आशा ठेविली होती, त्यांनीं दंग्यामध्यें भाग घ्यावा हें मला असह्य झालें, व त्यांच्या दोषाचा मीहि भागीदार आहे असें मला वाटलें.

मीं लोकांना आपापले गुन्हे कबूल करावयाला सांगितलें, त्याचप्रमाणें सरकारलाहि गुन्हे माफ करण्याची सूचना केली. माझें म्हणणें दोघांपैकीं एकानेंहि ऐकलें नाहीं. लोकांनीं गुन्हे कबूल केले नाहींत, सरकारनें माफहि केले नाहींत.

स्व. रमणभाई वगैरे नागरिक माझ्याकडे आले, व सत्याग्रह बंद ठेविण्याबद्दल मला विनवूं लागले. मला विनविण्याची आवश्यकता उरलीच नव्हती, शान्ततेची शिकवण जोंपर्यंत लोक आत्मसात् करणार नाहींत तोंपर्यंत सत्याग्रह बंद राखण्याचा मीं अगोदरच मनाशीं निश्चय केला होता. तें ऐकून त्यांना बरें वाटलें.

कांहीं मित्रांची इतराजीहि झाली. त्यांना वाटत होतें, कीं सर्वत्र शान्ति राहिली पाहिजे, अशी जर माझी अपेक्षा असेल तर मोठ्या प्रमाणावर सत्याग्रह कधींच घडूं शकणार नाहीं. मी आपला मतभेद नमूद केला. ज्या लोकांमध्यें आपण काम केलेलें आहे, ज्यांच्यामार्फत सत्याग्रह करण्याची आपल्याला उमेद वाटते, तेच जर शान्तता राखणार नाहींत तर सत्याग्रह चालणार नाहीं हें उघड आहे. एवढी मर्यादित शांतता टिकविण्याइतकी शक्ति सत्याग्रहाच्या पुढाऱ्यांनीं मिळविलीच पाहिजे असें माझें म्हणणें होतें. या विचारामध्यें मी आजहि फेरफार करूं शकत नाहीं.

●●●

# ३३
# ‘पहाडाएवढी चूक’

अहमदाबादच्या सभेनंतर लगेच मी नडियादला गेलों. ‘पहाडाएवढी चूक’ असे जे माझे शब्द इतके प्रसिद्ध झाले आहेत ते मी प्रथम नडियादमध्यें उच्चारले. अहमदाबादमध्यें मला माझी चूक कळूं लागली होती. पण नडियाद-मध्यें तेथील स्थिति प्रत्यक्ष पाहून विचार करतां तसेंच खेडा जिल्ह्यांत पुष्कळ इसमांना पकडलें होतें त्यासंबंधींची हकीकत ऐकून ज्या सभेमध्यें मी घडलेल्या हकीकतीसंबंधीं भाषण करीत होतों, त्या सभेमध्येंच एकाएकीं मला लख्ख दिसून आलें, कीं खेडा जिल्ह्याच्या किंवा तसल्याच इतर लोकांना सविनय कायदे-भंगासाठीं पाचारण करण्यांत मीं घाई केली व ती चूक मला पर्वतासमान भासली.

मीं अशा तऱ्हेची कबुली दिल्यामुळें माझा भरपूर उपहास झाला आहे, तरी पण मला त्या कबुलीबद्दल कधींहि पश्चात्ताप वाटलेला नाहीं. मी नेहमीं असेंच मानीत आलों आहें कीं, इतरांचे गजाएवढे (हत्तीएवढे) दोष आपण रजाएवढे करून पाहूं लागूं व स्वतःचे राईएवढे दोष पर्वतासमान पाहायला शिकूं तेव्हांच आपल्याला स्वतःच्या व इतरांच्या दोषांचें यथायोग्य प्रमाण मिळूं शकेल. मला असेंहि वाटतें, कीं या सामान्य नियमाचें पालन सत्याग्रही होऊं इच्छिणारानें तर फारच अधिक सूक्ष्मपणें केलें पाहिजे.

ही पर्वतप्राय वाटणारी चूक कोणती तें पाहूं या. कायद्याचा सविनय भंग ह्याच इसमाकडून होऊं शकेल, कीं जो कायद्याला विनयपूर्वक स्वेच्छेनें मान देत आला आहे. आपण बहुधा कायद्याचें पालन करतों तें त्याचा भंग केल्यास मिळणाऱ्या शिक्षेच्या भयानें. ही गोष्ट ज्या कायद्याच्या बाबतींत नीति-अनीतीचा

प्रश्न उपस्थित होत नाहीं, अशा कायद्यांना विशेषेंकरून लागूं पडते. कायदा असो किंवा नसो, शिष्ट गणले जाणारे लोक एकाएकीं चोरी करणार नाहींत; तरी पण रात्रींच्या वेळीं बायसिकलवर दिवा लावण्याच्या नियमांतून निसटून जाण्याची चांगल्या चांगल्या माणसांनाहि दिक्कत वाटत नसते; आणि असले नियम पाळण्याचा कोणी सल्ला दिला तरी ती मान्य करण्यास चांगले लोकहि चटकन् तयार होत नाहींत. पण त्याच नियमाला कायद्याचें स्वरूप मिळालें, कीं मग तो मोडल्यास दंड होण्याची धास्ती असते आणि दंड भरण्याच्या अडचणींत सांपडूं नये म्हणून तरी ते रात्र होतांच बायसिकलवर दिवा लावतील. अशा तऱ्हेनें केलेलें नियमपालन हें स्वेच्छेनें केलेल्या नियमपालनांत मोडत नाहीं.

पण सत्याग्रही जो समाजाच्या कायद्याला मान देईल तो मान ज्ञानपूर्वक स्वेच्छेनें, मान देणें हा धर्म आहे असें समजून, देईल. अशा तऱ्हेनें ज्यानें समाजाच्या नियमांचें इरादापूर्वक पालन केलें आहे त्याच्या अंगींच त्या नियमांच्या नीति-अनीतीचा न्याय करण्याची शक्ति येते, व त्यालाच विशिष्ट नियमांचा भंग करण्याचा आधिकार प्राप्त होतो. लोकांनीं अशा तऱ्हेचा आधिकार प्राप्त करण्या-पूर्वींच मीं त्यांना सविनय भंग करण्यास सांगितलें, ही माझी चूक मला पर्वता-समान वाटली आणि खेडा जिल्ह्यामध्यें प्रवेश करतांच मला खेडा-सत्याग्रहाचें स्मरण झालें आणि असें वाटलें, कीं मी मुळांतच रस्ता चुकलों. लोक सविनय भंगाला लायक व्हायचे तर अगोदर त्यांना त्याच्या गूढ रहस्याचें ज्ञान झालें पाहिजे हें माझ्या लक्षांत आलें. जे लोक मनानें रोज कायदे मोडतात, गुप्तपणें ज्यांनीं अनेक वेळां कायदे मोडलेले आहेत, त्यांना एकाएकीं सविनय भंगाचें मर्म कसें कळावें? त्याचे नियम ते कसें पाळूं शकणार?

ही आदर्श स्थिति हजारों किंवा लाखों लोक प्राप्त करूं शकणार नाहींत हें सहजीं लक्षांत येण्यासारखें आहे. पण असें असेल तर सविनय भंग सुरू करण्या-पूर्वीं लोकांना समजूत देणाऱ्या व त्यांना प्रतिक्षणीं मार्ग दाखविणाऱ्या स्वयं-सेवकांचें दल निर्माण झालें पाहिजे. आणि या दलाला सविनय भंगाची व त्याच्या मर्यादांची परिपूर्ण माहिती झालेली असली पाहिजे.

अशा तऱ्हेचे मनांत विचार घोळवीत मी मुंबईस गेलों. आणि सत्याग्रह-सभेमार्फत सत्याग्रही स्वयंसेवकांचें दल उभारलें. दलामार्फत लोकांना सविनय भंगाची माहिती देण्यासाठीं स्वयंसेवकाचें शिक्षण हातीं घेतलें, आणि माहिती देणारीं पत्रकें काढलीं.

हें काम चालूं झालें तर खरें; पण मला दिसून आलें, कीं मला लोकांना त्याच्याबद्दल गोडी वाटेल असें करतां आलें नाहीं. स्वयंसेवकांची गर्दी जमली नाहीं.

ज्यांचीं नांवें नोंदविलीं त्यांपैकींहि सर्वांनीं नियमित शिक्षण घेतलें असेंहि म्हणतां येत नाहीं. अधिक काळ लोटला तसतशी नवीन नांवें नोंदविणारांची संख्याहि वाढण्याऐवजीं घटतच चालली. मीं ताडलें, कीं सविनय भंगाचें गाडें वाटलें होतें त्याहून सावकाश चालणार.

●●●

## ३४

# 'नवजीवन' आणि 'यंग इंडिया'

किती का मंद असेना, पण शान्ततायुक्त अशी चळवळ एकीकडे चाललेली होती, तर दुसरीकडून सरकारची दडपशाही खूप जोरांत चालू होती. पंजाबमध्यें तिचा तडाखा विशेष स्पष्टपणें जाणवला. तेथें लष्करी कायदा, म्हणजेच झोटिंग पातशाही, सुरू झाली. पुढाऱ्यांना पकडलें. 'खास कोर्टें' हीं कोर्टें नव्हतीं तर एका गव्हर्नरच्या हुकमाप्रमाणें चालणारीं मंडळें बनून राहिलीं होतीं. तीं पुराव्याखेरीज प्रमाणाबाहेर शिक्षा देत सुटलीं. लष्करी शिपायांनीं लोकांना किड्यांप्रमाणें पोट घाशीत चालवलें. याच्यापुढें माझ्या दृष्टीनें तर जालियांवाला बागेंतलि घोर कत्तल तुच्छ होती. लोकांचें व जगाचें लक्ष मात्र त्या कत्तलीकडेच अधिक वेधलें नेलें.

पंजाबमध्यें वाटेल तें करून प्रवेश करण्याबद्दल माझ्यावर दडपण येऊन पडूं लागलें. मीं व्हायसरॉयांना पत्रें लिहिलीं, तारा केल्या, पण परवानगी मिळेना. परवानगीखेरीज जावें तर आंत प्रवेश मिळावयाचाच नाहीं. सविनय भंग केला असें मनाचें समाधान होईल तेवढेंच. या धर्मसंकटामध्यें काय करावें याचा मला मोठा प्रश्न पडला. मीं मनाईहुकूम मोडून चालून गेलों, तर तो सविनय अनादर होणार नाहीं असें मला भासलें. शान्ततेसंबंधीं जशी माझी खात्री व्हावयाला पाहिजे होती तशी अद्याप होत नव्हती. पंजाबांतील नादिरशाहीमुळें लोकांमध्यें अस्वस्थता अधिक झाली होती. अशा स्थितींत माझा कायदेभंग हा आगींत तेल ओतल्याप्रमाणें होईल असें मला वाटलें. त्यामुळें जोरजुलमानें पंजाबांत शिरण्याच्या सूचनेला मीं रुकार दिला नाहीं. हा निर्णय करणें म्हणजे मला कडू काढा घेण्याप्रमाणें वाटत होतें. रोज पंजाबहून अन्यायाच्या बातम्या येत; रोज मला त्या ऐकून फक्त दांत खात बसावें लागे.

इतक्यांत मि. हॉर्निमन् कीं ज्यांनीं 'क्रॉनिकल' ही एक महान् शक्ति बनविली होती, त्यांना सरकारनें लोकांना कळूंहि न देतां एकाएकीं पळवून नेलें. या चोरट्या कारभारामध्यें जीं आणखी कांहीं कुलंगडीं होतीं त्यांची घाण मला अद्याप

येत असते. मला माहीत आहे कीं, मि. हॉर्निमन् अंदाधुंदीचे भोक्ते नव्हते. मी सत्याग्रहसमितीचा सल्ला न घेतां पंजाबसरकारचा हुकूम अमान्य केला हेंहि त्यांना आवडलें नव्हतें. सविनय भंग बंद ठेवला, त्याला त्यांची पूर्ण संमति होती. बंद ठेवण्याचा माझा इरादा मीं जाहीर केला त्यापूर्वींच मला तसें करण्याबद्दल सल्ला देणारें त्यांचें पत्र रवाना झालें होतें. मुंबई-अहमदाबादमधील अंतरामुळें तें पत्र मला मीं माझा विचार जाहीर केल्यानंतर मिळालें. त्यामुळें त्यांच्या हद्दपारीचें मला नवल वाटलें व तितकेंच वाईटहि वाटलें.

असें झाल्यामुळें ‘ क्रॉनिकल ’च्या व्यवस्थापकांनीं तें पत्र चालविण्याचा बोजा माझ्यावर टाकला. मि. ब्रेलवी तर होतेच, त्यामुळें मला फारसें कांहीं करावें लागत नव्हतें. तरीहि माझ्या स्वभावाप्रमाणें मला ती जबाबदारी अवजड होऊं लागली होती.

पण मला ती जबाबदारी फार काळ घ्यावी लागलीच नाहीं. सरकारच्या कृपेमुळें तें पत्र बंद पडलें.

ज्यांच्या हातीं क्रॉनिकलची व्यवस्था होती, तेच ‘ यंग इंडिया ’ च्या व्यवस्थेवर देखरेख करीत असत. ते म्हणजे उमर सोभानी व शंकरलाल बँकर. या दोन्ही मित्रांनीं ‘ यंग इंडिया ’ची जबाबदारी मींच घ्यावी अशी सूचना केली. ‘ क्रॉनिकल ’ ची उणीव भरून काढण्याच्या दृष्टीनें ‘ यंग इंडिया ’ आठवड्यांतून एकदांच्या ऐवजीं दोनदां काढावा हें त्यांना व मला दोघांनाहि ठीक वाटलें. सत्याग्रहाचें रहस्य समजावून देण्याची मला हौस होतीच. पंजाबाबाबत मीं अधिक कांहीं करूं शकलों नाहीं, तरी निदान योग्य टीका करूं शकत होतों; आणि त्या टीकेच्या पाठीशीं सत्याग्रहरूपी शक्ति दडलेली आहे हें तर सरकारला कळतच होतें. म्हणून या मित्रांची ही सूचना मीं मान्य केली.

पण इंग्रजींतून लोकांना सत्याग्रहाचें शिक्षण कसें देतां येणार ? माझ्या कार्याचें मुख्य क्षेत्र गुजराथ होतें. भाई इंदुलाल याज्ञिक त्या वेळीं याच मंडळांत होते. त्यांच्या हातीं मासिक ‘ नवजीवन ’ होतें. त्याचा खर्चहि हे मित्रच पुरवीत असत. हें नियतकालिक भाई इंदुलालनीं व त्या मित्रांनीं माझ्या हवालीं केलें, व भाई इंदुलालनीं त्यांत काम करण्याचेंहि मान्य केलें. त्या मासिकाचें साप्ताहिक केलें.

मध्यंतरीं ‘ क्रॉनिकल ’ पुनः जिवंत झालें त्यामुळें ‘ यंग इंडिया ’ परत साप्ताहिक झाला; व माझ्या सूचनेवरून त्याला अहमदाबादला हालवला. दोन वर्तमानपत्रें निरनिराळ्या ठिकाणीं चालविल्यानें खर्चहि जास्त होणार व माझीहि गैरसोय अधिक होणार. नवजीवन तर अहमदाबादमध्येंच निघत असे. असल्या वर्तमानपत्रांना स्वतंत्र छापखाना पाहिजे, हें तर ‘ इंडियन ओपिनियन् ’च्या वेळींच माझ्या अनुभवाला आलें होतें. शिवाय या देशांतील त्या वेळचे वर्तमान-

पत्रासंबंधींचे कायदेहि असेच होते; कीं व्यापारी दृष्टीनें छापखाना चालविणाऱ्या लोकांना मला जे विचार प्रकट करावयाचे असतील ते छापण्याचीहि अडचण वाटेल असा संभव होता. हेंहि छापखाना सुरू करण्याला एक सबळ कारण होतें; आणि तो तर अहमदाबादमध्येंच सुरू करणें सुलभ होणार होतें. म्हणून ' यंग इंडिया 'हि अहमदाबादलाच घेऊन गेलों.

या वर्तमानपत्रांमार्फत मीं राष्ट्रास सत्याग्रहाचें शिक्षण देण्याचा यथशक्ति आरंभ केला. दोन्ही पत्रांच्या प्रती थोड्या खपत असत. त्या वाढतां वाढतां ४०,००० पर्यंत जाऊन पोंचल्या. ' नवजीवन 'चा खप एकदम वाढला. ' यंग इंडिया 'चा मात्र हळूहळू वाढला. मी तुरुंगांत गेल्यानंतर त्याला ओहोटी लागली आणि आज दोन्ही पत्रांचा मिळून खप आठ हजारांखालीं आला आहे.

या वर्तमानपत्रांमध्यें जाहिराती न घेण्याचा माझा आग्रह प्रथमपासूनच होता. त्यापासूनच कांहीं एक नुकसान झालेलें नाहीं अशी माझी समजूत आहे; आणि पत्रांचें विचारस्वातंत्र्य टिकविण्याच्या कामीं या पद्धतीची फार मदत झालेली आहे.

या वर्तमानपत्रांमुळें मला माझ्या मनाचें समाधान करतां आलें. कारण कीं, मला जरी लगेच परत सविनय भंग सुरू करणें शक्य नव्हतें; तरी मला आपले विचार तरी मोकळेपणानें मांडतां येऊं लागले; सल्ला, सूचना इत्यादींसाठीं जे माझ्याकडे पाहात त्यांना मी आश्वासन देऊं शकलों व मला वाटतें कीं, दोन्ही पत्रांनीं त्या आणीबाणीच्या काळांत लोकांची चांगली सेवा केली व लष्करी कायद्याचा अंमल हलका करण्याच्या कामीं मदत केली.

● ● ●

## ३५

# पंजाबांत

पंजाबमध्यें जे दंगेधोपे झाले, त्याबद्दल सर मायकेल ओड्वायर यांनीं मला गुन्हेगार ठरविला होता; तर तिकडचे कांहीं नवजवान तेथें पुकारण्यांत आलेल्या लष्करी अंमलाबद्दलहि मलाच गुन्हेगार ठरविण्यास मागेंपुढें पाहात नव्हते. हे नवजवान क्रोधाच्या आवेशांत येऊन असा युक्तिवाद करीत कीं मीं जर सविनय कायदेभंग बंद ठेवला नसता तर जालियांवाला बागेंतील कत्तल मुळींच होऊं शकली नसती, लष्करी अंमल पुकारला गेला नसता. कित्येकांनीं मला धमक्याहि दिल्या, कीं मीं पंजाबांत गेल्यास लोक मला ठार केल्याशिवाय राहाणार नाहींत.

पण माझ्या समजुतीनें माझें करणें इतकें रास्त होतें, कीं त्यासंबंधीं समजुतदार माणसांमध्यें गैरसमज होण्याचें कारणच पडूं नये. पंजाबांत जायला मी अधीर होऊन बसलों होतों. मीं पंजाब कधीं पाहिलेलाहि नव्हता. परंतु समक्ष पाहायला मिळेल तेवढें पाहून घेण्याची मला फार इच्छा होती, आणि निमंत्रण पाठविणारे डॉ. सत्यपाल, डॉ. किश्लू, पं. रामभुजदत्त चौधरी इत्यादिकांना भेटण्याचीहि इच्छा होती. ते तुरुंगांत होते. पण मला पूर्ण विश्वास वाटत होता, कीं सरकारला त्यांना दीर्घ काळपर्यंत अडकवून ठेवणें शक्यच नाहीं. मुंबईला मीं जेव्हां जेव्हां जात असें तेव्हां तेव्हां पंजाबचे पुष्कळ लोक येऊन मला भेटून जात. मीं त्यांना प्रोत्साहन देत असें, तेवढ्यावर ते समाधान मानून जात. मला त्या वेळीं आत्मविश्वास खूप होता.

पण माझें जाणें लांबणीवर पडत चाललें. व्हाइसरॉय 'अजून वेळ आहे' असेंच लिहीत होते.

मध्यंतरीं हंटर कमिटी आली. लष्करी कायद्याच्या मुदतींत पंजाबच्या अंमलदारांनीं केलेल्या कृत्यांची तिनें चौकशी करावयाची होती. दीनबंधु अँड्र्यूझ अगोदरच तिकडे जाऊन राहिले होते. त्यांच्या पत्रांत हृदयद्रावक वर्णनें येत. त्यांच्या पत्रांचा असा ध्वनि असे, कीं लष्करी कायद्याचा जुलूम वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेल्या हकीकतीहूनहि अधिक कठोर स्वरूपाचा झाला होता. मीं पंजाबला आलें पाहिजे, असा त्यांनीं फार आग्रह चालविला. त्याचप्रमाणें मालवीयजींच्याहि तारांवर तारा येत होत्या, कीं मला पंजाबला गेलेंच पाहिजे. त्यावरून मीं पुन्हां व्हाइसरॉयांना तार केली. जबाब आला कीं, 'अमुक तारखेला तुम्ही जाऊं शकतां.' तारीख बरोबर आठवत नाहीं, पण बहुधा १७ ऑक्टोबर होती.

मी लाहोरला जाऊन पोंचलों, त्या वेळीं जें दृश्य दिसलें तें कधीं विसरण्यासारखें नाहीं. अनेक वर्षांच्या वियोगानंतर जसा एकादा प्रियजन परत यावा. आणि त्याच्या आप्तजनांनीं त्याला भेटावयाला जावें त्याच तऱ्हेनें स्टेशनवर माणसांचा पूर लोटला होता. लोक हर्षवेडे होऊन गेले होते.

पंडित रामभुजदत्त चौधरी यांच्या घरीं माझ्या उतरण्याची व्यवस्था होती. श्रीमती सरलादेवी चौधराणी यांचा माझा अगोदरपासून परिचय होता. मला आसरा देण्याची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली. 'आसरा देणें' हे शब्द मीं इरादापूर्वक वापरले आहेत; कारण कीं, हल्लींप्रमाणें त्या वेळींहि मी ज्याच्याकडे म्हणून उतरेन, त्या गृहस्थाचें घर धर्मशाळेसारखें होऊन जात असे.

पंजाबमध्यें मला दिसून आलें कीं, पंजाबचे पुष्कळसे पुढारी तुरुंगांत असल्यामुळें मुख्य पुढाऱ्यांची जागा पंडित मालवीयजी, पंडित मोतीलालजी व स्व. स्वामी श्रद्धानंदजी यांनीं घेतली होती. मालवीयजी, श्रद्धानंदजी यांच्याशीं

माझा चांगला परिचय झाला होता. पण पंडित मोतीलालजींचा निकट परिचय तर लाहोरमध्येंच घडला. हे पुढारी व ज्यांना तुरुंगाचा मान मिळाला नव्हता असे इतर स्थानिक पुढारी यांनीं मला थोडक्याच अवधींत आपलासा करून सोडलें. मला कोठेंहि परकेसें वाटलेंच नाहीं.

हंटर कमिटीपुढें साक्षी न देण्याचा ठराव आम्हीं सर्वांनीं एकमतानें केला. त्यांचीं सर्व कारणें त्या वेळीं प्रसिद्ध झालेलीं होतींच, सबब त्यांचा येथें पुनरुच्चार करीत नाहीं. तीं कारणें सबळ होतीं, व कमिटीवर घातलेला बहिष्कार योग्यच होता असें आजहि मला वाटतें.

पण सरकारी कमिटीवर बहिष्कार घातला, त्या अर्थी लोकपक्षातर्फें; म्हणजेच राष्ट्रीय सभेतर्फें, एक कमिटी नेमणें जरूर आहे असा विचार झाला. या कमिटीवर पंडित मोतीलाल नेहरू, स्व. चित्तरंजन दास, श्री. अब्बास तैय्यबजी, श्री. जयकर व मी इतक्यांची नेमणूक झाली. आम्ही चौकशी करण्यासाठीं निरनिराळ्या ठिकाणीं विखरून गेलों. या कमिटीची व्यवस्था स्वाभाविकपणेंच माझ्या माथीं येऊन पडली आणि अधिकांत अधिक गांवांची चौकशी माझ्याच वांट्याला आल्यामुळें पंजाब व पंजाबचीं खेडीपाडीं पाहाण्याचा अलभ्य लाभ मला मिळाला.

या चौकशीच्या काळांत पंजाबच्या स्त्रीवर्गाशीं माझी इतकी कांहीं ओळख झाली, कीं जसा कांहीं आमचा अनेक युगांचा परिचय असावा. जेथें जावें तेथें त्यांच्या टोळ्यांच्या टोळ्या जमत, आणि माझ्यापाशीं स्वतः कांतलेल्या सुताचे ढीग पडत. पंजाब हें खादीचें महान क्षेत्र होऊं शकेल हें या चौकशीच्या मुदतींत माझ्या तेव्हांच ध्यानांत आलें.

लोकांवर झालेल्या जुलमाची चौकशी करतां करतां जसजसा मीं खोलांत शिरत गेलों, तसतसें सरकारची अराजकता, अंमलदारांची नादिरशाही व अरेरावी यासंबंधींच्या एकेक गोष्टी ऐकून मला आश्चर्य वाटलें, व दुःखहि झालें. पंजाबसारखा मुलुख, कीं जेथून सरकारला अधिकांत अधिक शिपाई मिळतात, तेथील लोकांनीं एवढा सर्व जुलूम सहन करावा ही गोष्ट मला त्या वेळींहि आश्चर्यकारक वाटली व अजूनहि वाटते.

या कमिटीचा रिपोर्ट लिहून काढण्याचें कामहि माझ्यावरच सोंपविण्यांत आलें. पंजाबांत कसकसे जुलूम घडले हें समजून घेण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं तो रिपोर्ट अवश्य वाचावा. या रिपोर्टाच्या बाबतींत मी एवढें सांगूं शकतों, कीं त्यांत एकाहि ठिकाणीं समजूनउमजून अतिशयोक्ति केलेली नाहीं. जेवढी हकीकत दिलेली आहे तिचा पुरावाहि तेथेंच नमूद केलेला आहे. या रिपोर्टांत प्रसिद्ध केलेला आहे त्याहून पुष्कळसा अधिक पुरावा कमिटीपाशीं होता. जिच्याविषयीं यत्किंचित तरी शंका होती, अशी एकहि गोष्ट रिपोर्टांत घातलेली नाहीं.

अशा तऱ्हेनें केवळ सत्यावर नजर देऊनच हा रिपोर्ट लिहिण्यात आला आहे; व ब्रिटिश सरकार आपली सत्ता कायम राखण्यासाठीं कोणत्या हद्दीपर्यंत जाऊ शकतें, कसकशीं अमानुष कृत्येंहि करूं शकतें, याची कल्पना या रिपोर्टावरून वाचकाला येईल. या रिपोर्टांतील एकहि विधान माझ्या माहितीप्रमाणें आजपर्यंत खोटें ठरलेलें नाहीं.

●●●

## ३६

# खिलाफतीच्या बदल्यांत गोरक्षण ?

पंजाबचें हत्याकाण्ड आतां थोडा वेळ दृष्टिआड करूं या.

राष्ट्रीय सभेतर्फे पंजाबांतील डायरशाहीची चौकशी चालली होती. त्या सुमारालाच माझ्या हातीं एक जाहीर निमंत्रण आलें. त्यावर मरहूम हकीमसाहेब व भाई असफअल्ली यांचीं नांवें होतीं. श्रद्धानंदजी हजर राहावयाचे आहेत असाहि उल्लेख होता. मला तर असें पुसट स्मरणहि आहे, कीं ते उपाध्यक्ष होते. खिलाफतीसंबंधीं नवीन उपस्थित झालेल्या परिस्थितीचा विचार करण्यासाठीं व युद्धसमाप्तीनिमित्त व्हावयाच्या उत्सवामध्यें भाग घ्यावा किंवा नाहीं याचा निर्णय करण्यासाठीं दिल्लीमध्यें हिंदू-मुसलमानांची एक सभा व्हावयाची होती, तिचें तें निमंत्रण होतें. ही सभा नोव्हेंबर महिन्यामध्यें होती असेंहि स्मरतें.

या निमंत्रणपत्रिकेमध्यें असा उल्लेख होता, कीं सदर सभेंत खिलाफतीच्या प्रश्नाचा उल्लेख होईल, एवढेंच नव्हे तर गोरक्षणाच्या प्रश्नाचीहि चर्चा होईल; आणि गोरक्षण साधण्याची ही उत्तम संधि आहे. मला हें वाक्य झोंबलें. त्या निमंत्रणपत्रिकेचें उत्तर देतांना मी हजर राहाण्याचा प्रयत्न करीन असें लिहिलें, त्याबरोबरच आणखी असेंहि लिहिलें, कीं खिलाफत व गोरक्षण एकत्र करून त्यांना परस्परांतील सौद्याचें स्वरूप देऊं नये, तर प्रत्येकाचा विचार त्याच्या स्वतंत्र गुण-दोषानुसार व्हावा.

सभेला मी हजर राहिलों. समाज बरा जमला होता. पुढें पुढें जशी हजारोंनीं गर्दी जमत असे, त्या मासल्याची मात्र ही सभा दिसली नाहीं. या सभेला स्वामी श्रद्धानंदजी हजर होते. त्यांच्याबरोबर मीं वरील विषयासंबंधानें बोलणें करून घेतलें. त्यांना माझें म्हणणे पसंत पडलें व तें सभेपुढें मांडण्याचें काम त्यांनीं माझ्यावरच सोपविलें. हकीमसाहेबांबरोबरहि मी बोलून घेतलें. माझें म्हणणें एवढेंच आहे, कीं दोन्ही प्रश्नांचा विचार त्या त्या वस्तूच्या गुणदोषानुसार स्वतंत्रपणें व्हावा.

खिलाफतीच्या प्रश्नामध्यें जर तथ्य असेल, त्या बाबतींत सरकारकडून जर खरोखरच अन्याय घडत असेल, तर मुसलमानांना पाठिंबा देणें हिंदूंचें कर्तव्य आहे; मग त्यांनीं त्याच्याबरोबर गोरक्षण जोडून देऊं नये. अशा तऱ्हेची कसलीहि अट घालणें हिंदूंना शोभणार नाहीं. खिलाफतीच्या कामीं मिळणाऱ्या मदतीची किंमत म्हणून मुसलमानांनीं गोवध बंद केला तर त्यांनाहि तें शोभणार नाहीं. शेजारधर्म म्हणून किंवा आपण एकाच भूमीचीं लेंकरें म्हणून, आणि हिंदूंच्या भावनांना मान देण्यासाठीं त्यांनीं स्वतंत्रपणें गोवध बंद केला तर तें चांगलें दिसेल. तसें करणें त्यांचें कर्तव्यहि आहे. परंतु तो स्वतंत्र प्रश्न आहे. जर हें त्यांचें कर्तव्य असेल व तसें ते समजत असतील, तर मग हिंदू खिलाफतीच्या कामीं मदत करोत अथवा न करोत, मुसलमानांनीं गोवध बंद केला पाहिजे. अशा तऱ्हेनें दोन्ही प्रश्नांचा विचार पृथक् झाला पाहिजे, व म्हणून सभेमध्यें फक्त खिलाफतीच्या प्रश्नाची चर्चा व्हावी, असा मीं माझा युक्तिवाद मांडला. सभेला तो योग्य वाटला. गोरक्षणाचा प्रश्न चर्चेला निघाला नाहीं. पण मौलाना अबदुल बारी यांनीं सांगून टाकलें कीं, "हिंदूंची खिलाफतीला मदत होवो कीं न होवो, आपण एका मुलखांतील असल्यामुळें मुसलमानांनीं हिंदूंच्या समाधानार्थ गोवध बंद केला पाहिजे." एके वेळीं असें दिसूं लागलें होतें, कीं खरोखरच मुसलमान गोवध बंद करतील.

कित्येकांची अशी सूचना होती, कीं पंजाबचा प्रश्नहि खिलाफतीच्या जोडीला घ्यावा. मीं त्या बाबतींत आपला विरोध दर्शाविला. पंजाबचा प्रश्न स्थानिक स्वरूपाचा आहे. पंजाबच्या दुःखाचें निमित्त करून आपण सबंध साम्राज्याचा ज्याच्याशीं संबंध पोंचतो अशा तहाच्या उत्सवापासून दूर राहूं शकत नाहीं. असल्या बाबतींत खिलाफतीच्या जोडीला पंजाबचा प्रश्न नेऊन बसविल्यानें आपण अविवेकाच्या आरोपाला पात्र होऊं; हें माझें म्हणणें सर्वांना पसंत पडलें.

या सभेंत मौलाना हजरत मोहानी होते. त्यांची माझी ओळख पूर्वींच झाली होती. पण ते कसे लढवय्ये आहेत हें याच वेळीं माझ्या प्रत्ययास आलें. येथपासूनच आमच्यामध्यें मतभेद होण्यास सुरुवात झाली व ती अनेक बाबतींत शेवटपर्यंत कायम राहिली.

अनेक ठरावांपैकीं एक असा होता, कीं हिंदु-मुसलमान सर्वांनीं स्वदेशी व्रताचें पालन करावें, व त्यासाठीं परदेशी कापडाचा बहिष्कार करावा. खादीचा अद्याप पुनर्जन्म झाला नव्हता. हजरतसाहेबांना हा ठराव मान्य होण्यासारखा नव्हता. त्यांना तर इंग्रजी साम्राज्यानें खिलाफतीच्या बाबतींत न्याय दिला नाहीं, तर त्याबद्दल सूड उगवावयाचा होता; म्हणून त्यांनीं यच्चयावत् ब्रिटिश मालावर शक्य-तोंपर्यंत बहिष्कार घालावा असें सुचविलें. मीं एकंदर ब्रिटिश मालाचा बहिष्कार कसा अशक्य आहे व अयोग्यहि आहे यासंबंधींचा माझा नेहमींचा युक्तिवाद

मांडला; तो आतां सर्वांच्या माहितीचा झालेला आहे. मीं आपल्या अहिंसावृत्तीचेंहि प्रतिपादन केलें. सभेवर माझ्या म्हणण्याचा खोल परिणाम झालेला दिसला. हजरत मोहानींचें भाषण ऐकतांना लोक असे हर्षनाद करीत होते कीं, मला वाटलें, कीं माझा चिमणीचा आवाज यापुढें कोण ऐकतो ? पण मीं माझ्या धर्माला जागलें पाहिजे, मीं आपला धर्म लपवून ठेवतां कामा नये, असें समजून मीं बोलावयाला उठलों. लोकांनीं माझें भाषण खूप लक्षपूर्वक ऐकलें. प्लॅटफॉर्मवर तर मला संपूर्ण पाठिंबा मिळाला, व माझ्या पुष्ट्यर्थ एकावर एक भाषणें होऊं लागलीं. पुढाऱ्यांच्या लक्षांत आलें कीं, ब्रिटिश मालाच्या बहिष्काराच्या ठरावाचा उपयोग तर कांहीं व्हावयाचा नाहीं, उपहासाला मात्र कारण होईल. साऱ्या सभेमध्यें असा मनुष्य हुडकूनच काढावा लागला असता, कीं ज्याच्या अंगावर कसलीहि ब्रिटिश वस्तु नाहीं. जी गोष्ट करणें सभेला हजर राहिलेल्या लोकांनाहि अशक्य होतें, ती गोष्ट करण्याच्या ठरावापासून फायदा होण्याऐवजीं नुकसानच होणार हें पुष्कळांच्या लक्षांत आलें.

"आमचे तुमच्या विदेशी वस्त्राच्या बहिष्काराच्या ठरावानें समाधान होण्यासारखें नाहीं. आम्ही आपल्याला पाहिजे तेवढें सर्व कापड पैदा करणार केव्हां ? आणि विदेशी वस्त्राचा बहिष्कार साध्य होणार केव्हां ? आम्हांला तर असें कांहीं तरी पाहिजे कीं, जेणेंकरून ब्रिटिश लोकांवर ताबडतोब परिणाम होऊं शकेल. तुमचा बहिष्कार राहूं द्या, पण त्याहून अधिक परिणामकारक असें कांहीं तरी आपण आम्हांला दाखविलें पाहिजे." असें मौलाना आपल्या भाषणांत म्हणाले. मी तें भाषण ऐकत होतों. विदेशी वस्त्रबहिष्कारापलीकडे कांहीं तरी अधिक व नवीन असें दाखवून देणें जरूर आहे असें मला वाटलें. विदेशी वस्त्राचा बहिष्कार लगेचच्या लगेच होणार नाहीं हें मलाहि त्या वेळीं जाणवत होतें. पुरेशी खादी उत्पन्न करण्याची शक्ति आपण मनांत आणल्यास आपल्यामध्यें आहे, हें जें माझ्या मागाहून लक्षांत आलें, तें त्या वेळीं समजलें नव्हतें. नुसत्या गिरण्यांवर भिस्त ठेवल्यास त्या दगा देतील हें मला कळत होतें. मौलानासाहेबांनीं आपलें भाषण पुरें केलें, त्या वेळीं मी आपला जबाब योजीत होतों.

ऊर्दू किंवा हिंदी शब्द मला सुचेना. अशा तऱ्हेच्या खास मुसलमानांच्या बैठकीमध्यें पूर्वपक्ष उत्तरपक्ष यांनीं भरलेलीं भाषणें करण्याचा हा माझा पहिलाच अनुभव होता. कलकत्त्याच्या मुस्लिम लीगमध्यें मी बोललों होतों; पण तें अवघ्या कांहीं मिनिटांचें व हृदयस्पर्शी असें भाषण होतें. पण येथें तर मला विरुद्ध मतें असलेल्या समाजाची समजूत घालावयाची होती. पण मीं भीड सोडून दिली होती. दिल्लीच्या मुसलमानांसमोर मला अस्सल ऊर्दूमध्यें आलंकारिक भाषण करावयाचें

नव्हतें, पण माझ्या म्हणण्याचा सारांश मोडक्यातोडक्या हिंदींत समजावून सांगावयाचा होता. तेवढें मला नीट करतां आलें, हिंदी-ऊर्दू हीच मिश्रित राष्ट्रभाषा होऊं शकेल याचें ही सभा प्रत्यंतर होती. मीं इंग्रजींत भाषण केलें असतें तर माझें गाडें चाललेंच नसतें. मौलानासाहेबांनीं जें आव्हान दिलें तें देण्याचा प्रसंगहि आला नसता व मला उत्तरहि सुचलें नसतें.

ऊर्दू किंवा गुजराथी शब्द सुचेना याची मला शरम वाटली, पण मीं जबाब तर दिलाच. मला 'नॉन्-को-ऑपरेशन्' हा शब्द सांपडला. मौलाना भाषण करीत असतांनाच मला एकसारखें वाटत होतें, कीं ज्या सरकारशीं ते हरतऱ्हेनें सहकार्य करीत आहेत, त्या सरकारचा विरोध करण्याच्या बाता व्यर्थ आहेत. तरवारीनें विरोध करावयाचा नाहीं, त्या अर्थी सहकार्य न करणें हाच खरा विरोध आहे, असें माझ्या मनानें घेतलें, व मीं 'नॉन्-को-ऑपरेशन्' शब्दाचा प्रथम या सभेंत उपयोग केला. मीं आपल्या भाषणांत त्याच्या समर्थनपर मुद्दे मांडले. त्या वेळीं या शब्दामध्यें काय काय येऊं शकतें त्याची जाणीव मला झाली नव्हती. त्यामुळें मी तपशिलांत शिरलों नाहीं. मीं एवढें सांगितल्याचें मला आठवतें, कीं "मुसलमानबंधूंनीं आणखी एक ठराव फार महत्त्वाचा असा केला आहे. ईश्वर करो आणि तसा प्रसंग न येवो! पण जर का तहाच्या अटी त्यांच्या विरुद्ध गेल्या तर ते सरकारला मदत द्यावयाची बंद करतील. मला वाटतें कीं, तसें करण्याचा प्रजेला हक्क आहे. आपण सरकारचे किताब बाळगून ठेवण्यास किंवा सरकारची नोकरी करण्यास बांधलेले नाहीं. सरकारचे हातून खिलाफतीसारख्या अत्यंत महत्त्वाचा धार्मिक प्रश्नाच्या बाबतींत आपलें अनिष्ट आचरलें जात असतांना आपण सरकारला साहाय्य कसें करावें? म्हणून खिलाफतीचा निकाल आपल्याविरुद्ध गेल्यास साहाय्य बंद करण्याचा आपल्याला हक्क आहे."

परंतु या गोष्टीचा प्रचार होण्यास यानंतरहि अनेक महिने लोटले. कित्येक महिनेपर्यंत तो शब्द त्या सभेंतच गाडलेला राहिला. एका महिन्यानें अमृतसरची राष्ट्रीय सभा झाली. तेथें मीं सहकार्याच्या ठरावाला दुजोरा दिला. त्या वेळीं मला अशीच आशा वाटत होती कीं, हिंदू-मुसलमानांना असहकाराचा प्रसंगच येणार नाहीं.

●●●

## ३७

# अमृतसरची राष्ट्रीय सभा

लष्करी कायद्याच्या अंमलाच्या अवधींत ज्या शेंकडों निर्दोष पंजाबी लोकांना, नांवाच्या न्यायालयांत पुराव्याचा फार्स करून, कमीजास्त मुदतीची कैदेची शिक्षा देण्यांत आली होती, त्यांना तसेंच कोंडून ठेवणें सरकारला शक्य नव्हतें. या धडधडीत अन्यायाविरुद्ध सगळीकडून इतका कांहीं बोभाटा झाला कीं, सरकार त्यांना अधिक काळपर्यंत तुरुंगांत ठेवूं शकेल अशी स्थितीच राहिली नाहीं. त्यामुळें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन होण्यापूर्वींच पुष्कळसे कैदी सुटून आले. लाला हरकिसनलाल वगैरे सर्व पुढारी सुटले, व राष्ट्रीय सभा चालू असतांनाच अली-भाईहि सुटून आले. त्यामुळें लोकांच्या हर्षाला सीमा राहिली नाहीं. पंडित मोतीलाल नेहरू, ज्यांनीं आपला धंदा बाजूला सारून पंजाबमध्येंच ठाणें दिलें होतें, ते राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. स्वामी श्रद्धानंदजी स्वागतमंडळाचे अध्यक्ष होते.

आजपर्यंत राष्ट्रीय सभेमध्यें माझें काम हिंदीमध्यें छोटेसें भाषण करून वसाहतींतील हिंदी लोकांचीं गाऱ्हाणीं मांडणें व त्यांचीं तरफदारी करणें एवढें असें. अमृतसरलाहि मला यापलीकडे कांहीं करावें लागेल अशी माझी कल्पना नव्हती. पण माझ्या बाबतींत यापूर्वींहि अनेकवार घडलें त्याचप्रमाणें या वेळींहि माझ्यावर एकाएकीं जबाबदारी येऊन पडली.

बादशहांचें नवीन सुधारणांसंबंधींचें फर्मान प्रसिद्ध झालें. त्यानें माझें पूर्ण समाधान होण्यासारखें नव्हतें; इतरांनाहि कोणाला तें आवडलें नाहीं. परंतु सदरहू फर्मानामध्यें दिग्दर्शित केलेल्या सुधारणा सदोष असल्या तरी त्या स्वीकारण्या सारख्या आहेत, असें मला त्या वेळीं वाटत होतें. बादशहांच्या फर्मानामध्यें लॉर्ड सिंह यांचा हात आहे असें मीं अनुमान केलें होतें. माझ्या त्या वेळच्या दृष्टीला मला त्यांत आशेचे किरण दिसले. पण अनुभवी लोकमान्य, चित्तरंजन दास इत्यादि योद्धे डोकें हालवीत; भारतभूषण मालवीयजी तटस्थ होते.

माझी उतरण्याची सोय मालवीयजींनीं आपल्या खोलींतच केली होती. त्यांची साधी राहाणी काशी विश्वविद्यालयाच्या पायाच्या समारंभाच्या वेळींच मला दिसून आली होती. पण या वेळीं तर त्यांनीं मला स्वतःच्या खोलींत ठेवून घेतलें त्यामुळें मला त्यांची एकंदर दिनचर्या न्याहाळून पाहातां आली, व पाहून मला सानंदाश्चर्य वाटलें. त्यांची खोली म्हणजे गरीबांची धर्मशाळा. तींत मोकळी जागा अशी उरलेलीच नव्हती. जेथें तेथें माणसें पडलेलींच असायचीं. तींत मोकळें

वाटण्याची सोय नाहीं, एकान्त मिळण्याचीहि नाहीं. वाटेल त्या माणसानें वाटेल तेव्हां यावें आणि त्यांचा वाटेल तेवढा वेळ घ्यावा. या घरकुलाच्या एका कोपऱ्यांत माझा दरबार ( म्हणजे खाट ) होता.

पण मला हें प्रकरण मालवीयजींच्या राहाणीच्या वर्णनाला द्यावयाचें नाहीं. सबब आतां मुख्य विषयाकडे वळतों.

अशा स्थितीमध्यें मालवीयजींबरोबर रोज बोलावयाला मिळत असे. थोरला भाऊ धाकट्या भावाला व्यवहाराची समजूत घालून देतो त्याप्रमाणें ते मला पक्षोपपक्षांची प्रेमपूर्वक फोड करून सांगत. सुधारणांसंबंधींच्या ठरावामध्यें भाग घेणें माझें कर्तव्य आहे असें मला वाटूं लागलें. पंजाबसंबंधींच्या राष्ट्रीय सभेच्या रिपोर्टाची आंशिक जबाबदारी माझ्याकडे होतीच. पंजाबच्या बाबतींत मला सरकारकडून कामें करून घ्यावयाचीं होतीं, खिलाफतीबाबतींतहि घ्यावयाचीं होतीं. मॉंटेग्यूसाहेब हिंदुस्थानचा विश्वासघात होऊं देणार नाहींत असेंहि मला वाटलें होतें. कैद्यांची व विशेषतः अल्लीबंधूंची बंधमुक्तता हेंहि मला एक शुभ चिन्हसें वाटलें. म्हणून माझें मत होतें, कीं सुधारणांचा स्वीकार करणारा ठराव होणें आवश्यक आहे. चित्तरंजन दास यांचें ठाम मत असें होतें, कीं सुधारणा अत्यंत असमाधानकारक व अपुऱ्या समजून त्या झिडकारून दिल्या पाहिजेत. लोकमान्य कांहींसे तटस्थ होते. परंतु देशबंधु जो कांहीं ठराव पसंत करतील त्यांच्या तर्फेनेंच स्वतःचें वजन खर्च करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें.

अशा तऱ्हेनें मुरलेल्या, कसलेल्या व सर्वमान्य लोकनायकांमध्यें व माझ्यामध्यें मतभेद पडावा ही गोष्ट मला असह्य वाटली. उलटपक्षी माझा अंतर्नाद स्पष्ट होता. मीं राष्ट्रीय सभेच्या बैठकींतून पळून जाण्याचा प्रयत्न केला. पंडित मोतीलाल नेहरू व मालवीयजी यांच्यापाशीं मीं बोलून दाखविलें कीं मला गैरहजर राहूं दिल्यानें सर्व गोष्टी साधतील, आणि थोर पुढाऱ्यांशीं मतभेद प्रदर्शित करण्याच्या प्रसंगांतून मी बचावून जाईन.

ही सूचना त्या दोन्ही वडील माणसांना पटली नाहीं. लाला हरकिसनलाल यांच्या कानांवर जातांच ते म्हणाले, “ असें कधींच चालणार नाहीं. पंजाबच्या लोकांना मोठा धक्का बसेल. ” लोकमान्यांबरोबर व देशबंधूंबरोबर वाटाघाट केली. मि. जिनांना भेटलों. कोठून मार्ग निघेना. माझी व्यथा मी मालवीयजींपुढें मांडली कीं, “ तडजोड होण्याचें चिन्ह मला दिसत नाहीं. मला माझा ठराव मांडावा लागला, तर मतमोजणीचा प्रसंग येणार. पण येथें मतें मोजतां येतील अशी कांहीं व्यवस्था मला दिसत नाहीं. आजवर आपण भरसभेमध्यें हात वर करवीत आलों आहों. हात वर करतेवेळीं प्रतिनिधी व प्रेक्षक यांच्यामध्यें भेद राहात नाहीं. असल्या विशाल सभेमध्यें मतें मोजण्याची व्यवस्था आपल्यापाशीं

नसते. म्हणून मला माझ्या ठरावानिमित्त मतें घ्यावयाचीं असलीं तरी तें जुळण्यासारखें नाहीं. ''

लाला हरकिसनलालनीं ती व्यवस्था संतोषकारक रीतीनें करून देण्याचें आपल्या अंगावर घेतलें. त्यांनीं म्हटलें, '' मतें घेण्याच्या दिवशीं प्रेक्षकांना आंत येऊं देऊं नये, प्रतिनिधी तेवढेच येतील. आणि त्यांचीं मतें मोजून देण्याचें काम माझें. पण तुम्ही राष्ट्रीय सभेच्या बैठकीला गैरहजर राहातां कामाच नये. ''

अखेरीला मला कबूल व्हावें लागलें. मीं आपल्या ठरावाचा मसुदा तयार केला. तो सभेपुढें मांडण्याचा मला फार संकोच वाटला, पण मीं कबूल केलें. मि. जिना व मालवीयजी दुजोरा देणार होते, भाषणें झालीं. मला दिसत होतें, कीं जरी आमच्या मतभेदामध्यें कोठेंच कटुता नव्हती, भाषणामध्येंसुद्धां युक्तिवादापलीकडे कांहींच नव्हतें, तरीहि सभेला मुळांत मतभेदच सहन होत नव्हते. पुढाऱ्यांतील मतभेदांमुळें त्यांना वाईट वाटत होतें. सभेची इच्छा होती, कीं एकमत व्हावें.

भाषणें चालू असतांनाहि व्यासपीठावर मतभेद दूर करण्याचे प्रयत्न चालूच होते. परस्परांमध्यें चिठ्ठ्यांची ये-जा चालू होती. मालवीयजी तर कसेंहि करून तडजोड करण्यासाठीं मेहनत करीत होते. इतक्यांत जयरामदासांनीं आपली सूचना माझ्या हातांत दिली, व प्रतिनिधींना मतें देण्याच्या संकटांतून बचावा, अशी माझी अतिमधुर शब्दामध्यें विनवणी केली. मला त्यांची सूचना आवडली. मालवीयजींची नजर तर कोठें आशा दिसते का पाहाण्यासाठीं चोहींकडे फिरतच होती. मीं म्हटलें, '' ही सूचना दोघांनाहि पसंत पडेल अशी दिसते.'' मीं ती लोकमान्यांना दाखविली. ते म्हणाले, '' दासांना पसंत असेल तर माझी हरकत नाहीं.'' देशबंधु विरघळले. त्यांनीं बिपिनचंद्रपालकडे पाहिलें. मालवीयजींना पुरी आशा वाटूं लागली, त्यांनीं चिठ्ठी हिसकून घेतली. देशबंधूंच्या तोंडून होकार पुरा बाहेरहि पडतो न पडतो तोंच पंडितजींनीं सांगूनहि टाकलें, '' सद्‌गृहस्थहो, तुम्हांला ऐकून समाधान वाटेल, कीं समेट झाला आहे. '' मग आणखी काय पाहिजे ? टाळ्यांचा गडगडाटानें मंडप गाजून गेला; व लोकांच्या चेहऱ्यावर गंभीरता होती त्या जागीं समाधान झळकूं लागलें.

हा ठराव कोणता होता त्यांत शिरण्याची येथें आवश्यकता नाहीं. हा ठराव कसा बनला एवढें दर्शविणेंच या प्रयोगांच्या कक्षेमध्यें येतें.

या समेटामुळें माझी जबाबदारी वाढली.

● ● ●

## ३८

# राष्ट्रीय सभेंत प्रवेश

अमृतसरच्या राष्ट्रीय सभेंत मला भाग घ्यावा लागला हा मी आपला राष्ट्रीय सभेंतील प्रवेश म्हणत नाहीं. त्यापूर्वीच्या राष्ट्रीय सभेच्या बैठकींना मी हजर राहात असें, तो फक्त माझ्या निष्ठेचें चिन्ह म्हणून. पूर्वीच्या बैठकींमध्यें कनिष्ठांत कनिष्ठ शिपायापलीकडे मला कांहीं काम करावयाचें आहे, अशी माझी समजूत नव्हती. मला इच्छाहि नव्हती.

अमृतसरच्या अनुभवावरून मला दिसून आलें, कीं माझ्या अंगच्या एका गुणाचा उपयोग राष्ट्रीय सभेला होण्यासारखा आहे. पंजाब कमिटीचें काम पाहून लोकमान्य, मालवीयजी, मोतीलालजी, देशबंधु वगैरे खूष झाले असल्याचें माझ्या लक्षांत आलें होतें. म्हणूनच त्यांनीं मला आपल्या बैठकींना व वाटाघाटींना बोलाविलें. विषयनियामक कमिटीचें खरें काम असल्या बैठकींतच होतें, हें मला कळून चुकलेंच होतें. असल्या बैठकीमध्यें पुढाऱ्यांचा ज्यांच्यावर विशेष विश्वास किंवा आधार असेल अशीच मंडळी असत. इतरहि कांहींजण कसल्या तरी निमित्तानें शिरकाव करून घेणारे असत.

पुढील वर्षी करावयाच्या दोन कामांबद्दल मला आवड होती. कारण कीं त्यांत मला गम्य होतें.

एक काम जालियांवाला बागेंतील कत्तलीचें स्मारक. त्याबाबत राष्ट्रीय सभेनें मोठ्या दिमाखानिशीं ठराव पसार केला होता. त्यासाठीं पांच एक लाख रुपयांची रक्कम उभारावयाची होती. त्याच्या रक्षकांमध्यें (ट्रस्टींमध्यें) माझें नांव होतें. हिंदुस्थानांत सार्वजनिक कार्यासाठीं भिक्षा मागण्याची विशेष शक्ति असलेल्या इसमांमध्यें पहिला नंबर मालवीयजींचा होता, व आहे. मला ठाऊक होतें, कीं माझा दर्जाहि त्यांच्याहून फारसा दूर राहाणार नाहीं. माझी ही शक्ति दक्षिण आफ्रिकेमध्यें मला दिसून आली होती. राजामहाराजांपासून जादू करून लाखों रुपये काढण्याची शक्ति माझ्यामध्यें नव्हती, आजहि नाहीं. त्या बाबतींत मालवीयजींची बरोबरी करणारा दुसरा कोणी मला अद्याप आढळलेला नाहीं. जालियांवाला बागेच्या कामीं त्यांच्याकडून द्रव्य मिळवितां येणार नाहीं हें मला समजतच होतें. म्हणून या स्मारकासाठीं पैसे जमविण्याचा बोजा मुख्यतः माझ्यावरच पडणार, हें रक्षकाची पदवी स्वीकारतांनाच माझ्या लक्षांत आलें होतें. झालेंहि तसेंच. या स्मारकासाठीं मुंबईच्या उदार नागरिकांनीं पोटभर पैसा दिला व आज राष्ट्रापाशीं त्या स्मारकासाठीं पाहिजे तेवढे पैसे आहेत. पण हिंदू, मुसलमान व शीख यांच्या एकत्रित रक्तानें पवित्र झालेल्या त्या भूमीवर कशा स्वरूपाचें

स्मारक करावें, अर्थात् पडून राहिलेल्या पैशाचा उपयोग काय करावा, हा भानगडीचा प्रश्न होऊन बसला आहे. कारण, कीं तिघांमध्यें किंवा दोघांमध्यें म्हणा, दोस्तीच्याऐवजीं आज दुष्मनगिरीचा भास होत आहे.

माझी दुसरी शक्ति कारकुनाचें काम करण्याबाबतची होय. हिचाहि उपयोग राष्ट्रीय सभेला होण्यासारखा होता. दीर्घकालीन संवयीमुळें कोठें काय, किती थोड्या शब्दांत, अविनयरहित भाषेमध्यें लिहावें तें मला कळूं लागलें होतें, हेंहि पुढाऱ्यांच्या ध्यानांत आलें होतें. राष्ट्रीय सभेची त्या वेळची जी घटना होती, ती गोखल्यांचा ठेवा होती. त्यांनीं कांहीं नियम बनविले होते. त्यांच्या आधारें राष्ट्रीय सभेचें काम चालत असे. ते नियम कसे बनले त्याचा मधुर इतिहास मला त्यांच्याच तोंडून समजला होता. पण आतां राष्ट्रीय सभा तेवढ्या नियमांवर चालावयाची नाहीं असें सर्वांना दिसत होतें. तिची घटना तयार करण्यासंबंधीं दरवर्षी चर्चा चाले. पण राष्ट्रीय सभेपाशीं अशा तऱ्हेची व्यवस्थाच नव्हती, कीं जेणेंकरून तिचें काम सबंध वर्षभर चालूं शकेल, किंवा पुढचे विचार कोणी करूं शकेल. तिचे तीन चिटणीस असत; पण खरें पाहिलें असतां कार्यवाहक चिटणीस एकच असे. एका चिटणिसानें कचेरीचें काम करावें, कीं पुढचे बेत करावे, कीं भूतकाळीं राष्ट्रीय सभेनें उचललेल्या जबाबदाऱ्या चालू वर्षांत पुऱ्या पाडाव्या ? अर्थात् या सालीं हाच प्रश्न सर्वांच्याच दृष्टीनें अत्यंत अगत्याचा होऊन बसला. राष्ट्रीय सभेला हजारों लोकांची गर्दी होणार, तेथें जनतेचें काम कसें चालावें ? प्रतिनिधींच्या संख्येला मर्यादा नव्हती. वाटेल त्या प्रांतांतून वाटेल तेवढे प्रतिनिधी येऊं शकत. वाटेल त्याला प्रतिनिधि होतां येत असे. त्यामुळें कांहीं तरी व्यवस्था होणें अत्यावश्यक आहे असें सर्वांनाच वाटत होतें. घटना तयार करण्याची जबाबदारी मीं अंगावर घेतली. त्याला मीं एक अट मात्र घातली. जनतेवर दोन पुढाऱ्यांचा अंमल असल्याचें मला दिसत होतें. म्हणून माझ्याबरोबर काम करण्यास त्यांचेहि प्रतिनिधि असावे अशी मीं मागणी केली. ते स्वतः स्वस्थपणें बसून घटना घडवूं शकणार नाहींत हें मला समजत होतें. म्हणून लोकमान्यांकडून व देशबंधूंकडून त्यांच्या विश्वासांतील दोन नांवें मागितलीं; याखेरीज घटना-समितींत आणखी कोणाचीच जरूर नाहीं, असें मीं सुचविलें. ती सूचना मान्य झाली. लोकमान्यांनीं श्री. केळकरांचें व देशबंधूंनीं श्री. आय्. बी. सेनचें अशीं दोन नांवें दिलीं. ही घटना-समिति एकत्र अशी एक दिवसहि बसली नाहीं; तरीहि आम्हीं आमचें काम एकमतानें पार पाडलें. पत्रव्यवहारानेंच काम चालवून घेतलें. या घटनेबद्दल मला कांहींसा अभिमान वाटतो. मला वाटतें, कीं त्या घटनेनुसार काम चालविल्यास आजहि आपली नौका पैलतीर गांठील. तें होईल तेव्हां होवो, पण ही जबाबदारी उचलल्यानें मीं महासभेमध्यें खरा प्रवेश केला अशी माझी समजूत आहे.

●●●

## ३९

# खादीचा जन्म

सन १९०८ सालापर्यंत मीं चरखा किंवा माग नजरेनें पाहिलीं असल्याचें मला स्मरत नाहीं; तरीहि ' हिंद स्वराज्या 'मध्यें चरख्यानेंच हिंदुस्थानचें दारिद्य दूर होईल असें मीं विधान केलें. ज्या साधनांनीं उपासमार टळेल त्याच मार्गानें स्वराज्यहि मिळेल, ही कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखी गोष्ट आहे. सन १९१५ सालीं दक्षिण आफ्रिकेहून स्वदेशीं आलों, तेव्हांहि चरखा पाहावयाला मिळालाच नव्हता. आश्रम स्थापला तेव्हां हातमाग बसविला. माग बसवितांनाहि मला खूप अडचणी आल्या. आम्ही सर्व अनभिज्ञ, त्यामुळें माग आणवला तरी तेवढ्यानेंच तो चालेल असें नव्हतें. आम्ही सर्व कलमबहाद्दर किंवा व्यापार करूं जाणणारे एकत्र जमलों होतों. आमच्यापैकीं कारागीर असा कोणीच नव्हता; त्यामुळें माग मिळविल्यानंतरहि विणकाम शिकविणाराची आवश्यकता होती. काठेवाड व पालनपूर येथून माग मिळाला व एक शिकविणारा आला. त्यानें आपलें सर्व कसब दाखविलें नाहीं; पण मगनलाल गांधी हातीं घेतलेलें काम एकाएकीं सोडून देणारे नव्हते. त्यांच्या हातामध्यें कारगिरी तर होतीच; यामुळें त्यांनीं विणकामाची कला पूर्णपणें समजून घेतली, व नवे विणकर एकामागून एक आश्रमामध्यें तयार झाले.

आम्हांला स्वतःचे कपडे स्वतः तयार करून वापरावयाचे होते. त्यासाठीं आतां गिरणीचे कपडे वापरण्याचें बंद केलें; आणि देशी गिरण्यांच्या सुताचें हातमागावर विणलेलें कापड वापरण्याचा आश्रमवासियांनीं ठराव केला. तसें करण्यापासून आम्हांला पुष्कळ शिकावयाला मिळालें. हिंदुस्थानांतील विणकरांची राहाणी, त्यांच्या कामाचा उलट, सूत मिळण्याबाबत त्यांना येणाऱ्या अडचणी, त्यांत त्यांची होणारी फसवणूक व अखेरीला त्यांचा दिवसेंदिवस वाढत जाणारा कर्जबाजारीपणा इत्यादि गोष्टींची माहिती मिळाली. आम्हीं स्वतः आम्हांला लागणारें सर्व कापड लगेचच्या लगेच विणून घेऊं शकूं अशी स्थिति तर नव्हतीच. त्यामुळें बाहेरच्या विणकरांपासून आम्हांला जरूर तेवढें कापड विणवून घ्यावें लागत असे. कारण कीं, देशी गिरण्यांच्या सुताचें हातानें विणलेलें कापड विणकराकडून वाटेल तेव्हां मिळूं शकेल अशी सोय नव्हती. विणकर उंची कापड सर्व विलायती सुताचेंच विणीत असत. कारण देशी गिरण्यांमध्यें बारीक सूत निघत नसे. आजहि बारीक सूत थोडेंच निघतें, फार बारीक तर निघूं शकतच नाहीं. मोठ्या मुष्किलीनें कांहीं विणकर आमच्या हातीं लागले. ते मोठी मेहेरबानी म्हणून देशी सुताचें कापड विणून देण्यास कबूल झाले. देशी सुताचें कापड निघेल तें विकत घेण्याचें वचन त्या

विणकरांना आश्रमातर्फे द्यावें लागलें होतें. अशा तऱ्हेनें कापड मुद्दाम विणवून घेऊन आम्ही वापरूं लागलों, व मित्रांमध्येंहि त्याचा प्रचार केला. सूत कांतणाऱ्या गिरण्यांचे आम्ही बिनपगारी एजंट बनलों. गिरण्यांशीं संबंध आला तसतशी त्यांच्या व्यवस्थेसंबंधीं त्यांच्या असहाय स्थितीसंबंधीं माहिती मिळाली. स्वतः कांतलेलें सूत स्वतःच विणून काढणें हेंच गिरण्यांचें ध्येय असल्याचें आमच्या नजरेस आलें. त्या मुद्दाम म्हणून हातमागाच्या उपयोगी पडत नव्हत्या; त्याला त्यांचा इलाज नव्हता एवढेंच.

हें सर्व पाहिल्यानंतर आम्ही हातानें सूत कांतावयाला अधीर बनलों. हातानें सूत कांतूं लागेपर्यंत आमची पराधीनता राहाणारच असें आम्हांला वाटलें. गिरण्यांचे एजंट बनण्यामध्यें आम्ही कांहीं देशसेवा करतों असें वाटलें नाहीं.

पण चरखाहि कोठें मिळेना किंवा चरखा चालविणाराहि कोणी भेटेना. कुकड्या वगैरे भरण्याचे चरखे आमच्यापाशीं होते, पण त्यांच्यावर सूत कांततां येतें अशी कल्पनाहि नव्हती. कालिदास वकील एकदां एका बाईला शोधून घेऊन आले. ती सूत काढून दाखवील असें त्यांनीं सांगितलें. नवीन कसब शिकण्यांत विशेष कुशल अशा एका आश्रमवासीयाला तिच्याकडे पाठविला; पण कसब हस्तगत झालें नाहीं.

दिवस फार जाऊं लागले. मी फारच अधीर होऊन राहिलों होतों. माहिती देण्यासारखे जे कोणी आश्रमांत येत तेवढ्यांना मी विचारीत सुटें; पण कांतण्याचा मक्ता स्त्रियांकडेच होता. अर्थात् कोनाकोपऱ्यांत कोणी स्त्री कांतणें जाणणारी असली तर तिचा शोधहि स्त्रियांनाच लागणार.

सन १९१७ सालीं गुजराथी बंधूंनीं मला भडोच शिक्षणपरिषदेंत खेंचून नेलें होतें. तेथें मला महासाहसी विधवा बाई गंगाबेन या भेटल्या. त्यांचें शिक्षण बेताचेंच होतें, पण हिंमत व ग्रहणशक्ति हीं सुशिक्षित स्त्रियांमध्यें सामान्यतः असतात, त्याहून त्यांच्यामध्यें अधिक होतीं. त्यांनीं आपल्या राहाणींतून अस्पृश्यतेची पाळेंमुळें खणून काढून टाकलेलीं होतीं. त्या बेधडक जाऊन अंत्यजांमध्यें मिसळत व त्यांची सेवा करीत. त्यांच्यापाशीं पैसे होते, पण स्वतःच्या गरजा अल्प होत्या. शरीर कसलेलें होतें. आणि वाटेल तेथें एकट्यानेंहि जाण्याचा त्यांना संकोच वाटत नसे. घोड्यावर बसण्यांतहि त्या मोठ्या पटाईत होत्या. या भगिनीशीं विशेष परिचय गोधऱ्याच्या परिषदेमध्यें केला. मी माझी मनोव्यथा त्यांच्यापुढें मांडली. आणि दमयन्ती ज्याप्रमाणें नलाच्या मागून भटकत गेली त्याप्रमाणें चरख्याच्या शोधार्थ भ्रमण करण्याचें शिरावर घेऊन त्यांनीं माझा भार हलका केला.

• • •

## ४०

# चरखा सांपडला !

गुजराथमध्यें खूप भटकल्यानंतर गायकवाडांच्या विजापूरमध्यें गंगाबेनना चरखा सांपडला. पुष्कळ कुटुंबांपाशीं चरखे होते, पण ते त्यांनीं माळ्यावर टाकलेले होते. पण कोणी त्यांचें सूत घ्यावयाला तयार असेल व त्यांना पेळू पुरविले जातील तर ते सूत कांतण्यास तयार होते. गंगाबेननीं मला खबर दिली व माझ्या हर्षाला सीमा राहिली नाहीं. पेळू पुरविण्याचें काम कठिण वाटलें. मरहूम भाई उमर सोभानी यांच्याशीं गोष्ट काढतां त्यांनीं आपल्या गिरणींतून पेळूंच्या नळया पुऱ्या पाडण्याचें शिरावर घेतलें. मीं त्या नळया गंगाबेनकडे पाठविल्या, व सूत इतक्या झपाट्यानें निघूं लागलें, कीं मला हात टेकावे लागले.

भाई उमर सोभानींचें औदार्य विशाल होतें. पण त्यालाहि झाली तरी मर्यादा असणारच. पेळू विकत घेण्याचें माझ्या जिवावर आलें. शिवाय गिरणीचे पेळू घेऊन सूत कांतण्यांत मला मोठा दोषहि वाटला. गिरणीचे पेळू घ्यावयाचे तर सूत घेण्यालाहि हरकत कोणती ? आपल्या वाडवडिलांपाशीं गिरणीचे पेळू थोडेच होते ? ते पेळू कसे बनवीत बरें ? पेळू बनविणारांचा शोध करण्याची मीं गंगाबेनना सूचना केली. त्यांनीं हें काम आपल्या अंगावर घेतलें. पिंजारी शोधून काढला. त्याला दरमहा ३५ रुपये का त्याहूनहि अधिक पगारावर नेमला. मुलांना पेळू करावयाला शिकविलें. मीं रूची भिक्षा मागितली. भाई यशवंतप्रसाद देसाईनीं रूच्या गांसड्या पुरविण्याचें शिरावर घेतलें. गंगाबेननीं काम एकदम वाढविलें. विणकरांना आणून वसविलें व कांतलेलें सूत विणून घेण्यास सुरुवात केली. विजापूरची खादी प्रसिद्धि पावली.

इकडे आश्रमामध्येंहि चरखे सुरू होण्यास आतां वेळ लागला नाहीं. मगनलाल गांधींच्या शोधक बुद्धीनें चरख्यामध्यें सुधारणा केल्या व चरखे आणि चात्या आश्रमामध्यें बनूं लागल्या. आश्रमांतील खादीच्या पहिल्या ताग्याचा खर्च वारीं सतरा आणे आला. मी मित्राकडून कच्च्या सुताच्या जाडी खादीचे एका वाराला सतरा आणे घेतले, व त्यांनीं ते हौसेनें दिले.

मुंबईमध्यें मी अंथरुणांतच पडून असें; पण भेटेल त्याच्याकडे चौकशी करीत असें. तेथेंहि कांतणाऱ्या दोन स्त्रिया हातीं लागल्या. त्यांना एक शेर ( गुजराथी शेर = ४० तोळे ) सुताचा एक रुपया दिला. मी खादीशास्त्रामध्यें अद्याप आंधळ्या भिंतीसारखा होतों. मला कोठूनहि हातानें कांतलेलें सूत पाहिजे होतें, कांतणाऱ्या स्त्रिया पाहिजे होत्या. गंगाबेन देत असत त्या दराशीं तुलना करून पाहातों तर मी

फसत होतों. बाया कमीवर काम करावयाला तयार होत ना, त्यामुळें त्यांना सोडून द्यावें लागलें. पण त्यांचाहि उपयोग झाला. त्यांनीं श्रीमती अवंतिकाबाई गोखले, रमीबाई कामदार, श्री. शंकरलाल बँकरच्या मातुश्री व वसुमतीबेन यांना कांतावयाला शिकविलें; आणि माझ्या खोलींत चरख्याचा गुंजारव सुरू झाला. मला रोग्याचा ताजातवाना करण्यामध्यें या यंत्राचा हिस्सा होता असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं. ही मानसिक स्थिति आहे हें खरें; पण मनुष्याला रोगी निरोगी करण्यांत मनाचा हिस्सा तरी काय कमी आहे ? चरख्याला मींहि हात लावला; यापलीकडे माझी त्या वेळीं प्रगति होऊं शकली नाहीं.

मुंबईत हाताचे पेळू कोठून आणावे ? श्री. रेवाशंकर जवेरींच्या बंगल्यावरून तांतीचा टणत्कार करीत रोज पिंजारी जात असे. मीं त्याला बोलावून आणला. तो गाद्यांचा रू पिंजीत असे. त्यानें पेळू तयार करून देण्याचें कबूल केलें. दर भारी मागितला, तो मीं देऊं केला. अशा तऱ्हेनें तयार झालेलें सूत मीं वैष्णवांना ठाकोरजीला घालावयाच्या माळांसाठीं पैसे घेऊन विकत दिलें. भाई शिवजींनीं मुंबईत चरखावर्ग काढला. या प्रयोगाखालीं पैशांचा खूप चुराडा झाला. श्रद्धाळु देशप्रेमी लोकांनीं पैसे दिले, मी खर्च करीत गेलों; पण तो खर्च व्यर्थ गेलेला नाहीं असा माझा नम्र अभिप्राय आहे. त्यांतून खूप शिकावयाला मिळालें; कामाच्या मर्यादेची स्पष्ट कल्पना आली.

आतां मी संपूर्ण खादीधारी बनण्याला उतावळा झालों. माझें धोतर देशी गिरणीच्या कापडाचें होतें. विजापुरांत आणि आश्रमांत जी खादी बनत असे, ती फार जाड आणि ३० इंच पन्ह्याची होत असे. मीं गंगाबेनना नोटीस दिली, कीं जर का एक महिन्याच्या आंत त्यांनीं मला ४५ इंच पन्ह्याचें खादीचें धोतर काढून दिलें नाहीं, तर मला जाड खादीचा पंचा लावून काम चालवावें लागेल. त्यांना पेंच पडला, मुदत कमीशी वाटली; पण त्या हरल्या नाहींत. त्यांनीं महिन्याच्या आंत मला पन्नास इंची धोतरजोडा आणून दिला आणि माझें दारिद्र्य निवारलें.

त्याच सुमारास भाई लक्ष्मीदास लाठीहून अंत्यज भाई रामजी व त्यांच्या पत्नी गंगाबेन यांना आश्रमांत घेऊन आले; आणि त्यांच्याकडून रुंद पन्ह्याची खादी विणून मिळूं लागली. खादीप्रचाराच्या कामीं या जोडप्यानें केलेली मदत अशीतशी म्हणतां येणार नाहीं. त्यांनीं गुजराथेंत व गुजराथेबाहेर हातसूत विणण्याचें कसब इतरांना शिकविलें आहे. ही निरक्षर पण संस्कारी बाई धोटा चालवीत असतांना त्या कामांत अशी कांहीं तल्लीन होऊन जाते, कीं इकडे तिकडे पाहावयाला किंवा कोणाबरोबर गप्पागोष्टी करावयाला तिला फुरसतच होत नाहीं.

●●●

## ४१

# एक संवाद

स्वदेशीच्या नांवानें चालणारी ही खादीची चळवळ सुरू झाली, तेव्हां गिरण्यांच्या मालकांकडून मला भरपूर टीकाहि ऐकावयाला मिळूं लागली. उमर सोभानी स्वत: कुशल गिरणीमालक असल्यामुळें स्वतःच्या ज्ञानाचा उपयोग मला देतच असत व शिवाय इतरांच्या अभिप्रायासंबंधींहि मला माहिती देत राहात. त्यांच्यापैकीं एका गृहस्थाच्या म्हणण्याचा त्यांच्या मनावरहि परिणाम झाला व मला त्यांच्याकडे घेऊन जाण्याची त्यांनीं आपली इच्छा दर्शविली. मला त्यांची सूचना पसंत पडली. आम्ही त्यांच्याकडे गेलों. त्यांनींच विषय काढला,

" तुमची स्वदेशी चळवळ कांहीं पहिलीच नव्हे हें तर तुम्हांला माहीत आहे ना ? "

मीं उत्तर दिलें, " होय, साहेब. "

" तुम्हांला माहीत आहे कीं, वंगभंगाच्या वेळीं स्वदेशी चळवळीला खूप जोर चढला होता. तिचा आम्ही गिरणीवाल्यांनीं खूप फायदा घेतला व कापडाचे दर वाढविले. कांहीं गोष्टी करूं नये अशाहि केल्या आहेत. "

" मीं ही गोष्ट ऐकली आहे; ती ऐकून वाईटहि वाटलें. "

" तुम्हांला वाटणारें दुःख मी समजूं शकतों; पण तें अस्थानीं आहे. आम्ही आमचा धंदा चालवितों तो परोपकारार्थ थोडाच चालवतों आहों ? आम्हांला पैसे कमवावयाचे आहेत. आम्ही आमच्या भागीदारांना जबाबदार आहोंत. वस्तूची किंमत तिच्या मागणीवर अवलंबून राहाते हा नियम कोण थोपवून धरणार ? बंगाली लोकांना एवढें कळावयाला पाहिजे होतें, कीं त्यांच्या चळवळीनें स्वदेशी कापडाचे दर वाढणारच ! "

" ते बिचारे माझ्यासारखेच श्रद्धाळु, त्यामुळें ते असें समजून चालले, कीं गिरणीवाले झाले तरी अगदींच स्वार्थी बनणार नाहींत; ठकबाजी तरी करणार नाहींत. स्वदेशीच्या नांवावर परदेशी कापड तरी नाहींच विकणार. "

" तुम्ही असे समजत असणार हें मला माहीत होतें, म्हणूनच मीं तुम्हांला सूचना करण्याचा विचार केला व तुम्हांला येथपर्यंत येण्याची तसदी दिली; म्हणजे तुमची तरी भोळ्या बंगाल्यांप्रमाणें दिशाभूल होऊं नये. " असें म्हणून शेठजींनीं आपल्याकडील विणकरीचे नमुने आणण्याबद्दल खूण केली. त्यांत रद्दी सुतापासून

बनविलेल्या कांबळीचे दोन नमुने होते. ते हातांत घेऊन ते म्हणाले, " हा पहा, हा माल आम्हीं नवीन बनविला आहे. रद्दी सुतापासून बनविलेला, अर्थात् स्वस्त तर पडणारच. हा माल आम्ही थेट उत्तरेपर्यंत नेऊन पोंचवितों. आमचे दलाल चारी दिशांनीं पसरलेले आहेत; त्यावरून तुमच्या लक्षांत येईल, कीं आम्हांला तुमच्यासारख्या एजंटांची जरूरी नाहीं. खरी स्थिति तर उलट अशी आहे, कीं जेथें तुमच्यासारख्यांचा आवाजहि पोंचत नाहीं, अशा ठिकाणीं आमचे गुमास्ते आमचा माल घेऊन जातात. तुम्हांला आणखी ही गोष्ट हिशेबांत घेतली पाहिजे कीं, हिंदुस्थानला हवा असणारा सर्व माल आम्ही उत्पन्न करूं शकतहि नाहीं; त्यामुळें स्वदेशीचा प्रश्न हा मुख्यतः पैदाशीचा प्रश्न आहे. आपण जरूरीइतकें कापड काढूं लागलों आणि कापडाच्या जातीमध्यें सुधारणा करूं शकलों म्हणजे परदेशी कापड यावयाचें थांबेल म्हणून माझा तुम्हांला असा सल्ला आहे, कीं तुम्ही आपली स्वदेशीची चळवळ चालवीत आहां, या तऱ्हेनें चालवूं नका, तर नवीन गिरण्या काढण्याकडे लक्ष द्या. आपल्याकडे स्वदेशी माल खपविण्याच्या चळवळीची जरूर नाहीं. जरूर आहे पैदाशीची. "

" मग तर मी जर तेंच काम करीत असलों तर तुम्ही मला आशीर्वाद द्याल कीं नाहीं ? " मीं म्हटलें.

" तें कसें काय ? तुम्ही जर गिरण्या काढण्याच्या प्रयत्नांत असाल तर तुम्हांला धन्यवाद दिले पाहिजेत. "

" तें तर मी करीत नाहीं, पण मी चरखाप्रसाराच्या कार्यांत गुंतलों आहें."

" चरखाप्रसार तें काय ? "

मीं चरख्याची योजना समजावून सांगितली व पुढें म्हटलें,

" तुमचे विचार मला मान्य आहेत. मी गिरण्यांची एजन्सी करीत बसणें योग्य होणार नाहीं. त्यापासून फायदा होण्याऐवजीं नुकसानच आहे. गिरण्यांचा माल कांहीं पडून राहात नसतो. मी नवीन पैदाशीच्या कामीं व नवीन पैदाशीचें कापड खपवून काढण्याच्या कामींच गुंतून राहिलें पाहिजे. सध्यां तर मी पैदाशी-मध्येंच गुंतलों आहें. मला याच स्वरूपाची स्वदेशी पसंत आहे. कारण कीं तिच्या-मार्फत हिंदुस्थानांतील भुकेनें मरणाऱ्या अर्धबेकार स्त्रियांना काम पुरवितां येईल. त्या कांततील तें सूत विणवून घ्यावें व ती खादी लोकांना धारण करण्यास लावावें अशी माझी वृत्ति आहे, व त्या दिशेनें मी चळवळ करीत आहें. चरखाप्रसाराला किती यश येईल तें मला सांगतां येत नाहीं. सध्यां त्या कार्याचा कोठें आरंभ होत आहे. पण माझा त्यावर पूर्ण विश्वास आहे. कांहीं झालें तरी त्यापासून नुकसान तर नाहींच. हिंदुस्थानांत उत्पन्न होणाऱ्या कापडांत जेवढी भर या चरख्याच्या

चळवळीनें पडेल, तेवढा फायदाच आहे. अर्थात् तुम्ही म्हणतां तसला दोष या चळवळीमध्यें नाहींच. ”

“ अशा तऱ्हेनें तुम्ही चळवळ चालवीत असाल, तर मला कांहीं म्हणावयाचें नाहीं. या युगांत चरखा चालेल कीं नाहीं हा स्वतंत्र प्रश्न आहे. मी तर तुम्हांला यश चिंतितों. ”

## ४२

# असहकाराचा प्रवाह

खादीची प्रगति पुढें कसकशी झाली त्याचें वर्णन या प्रकरणामध्यें देतां येणार नाहीं; त्या त्या गोष्टी जनतेपुढें कसकशा येत गेल्या एवढें दाखवून देण्यापलीकडे त्यांचा अधिक इतिहास देत बसण्यास या प्रकरणांमध्यें जागा नाहीं. तसें करावयाचें तर त्या त्या विषयाचें स्वतंत्र पुस्तक तयार होईल. सत्याचा शोध करतांना एकामागून एक गोष्टी माझ्या जीवनामध्यें कसकशा सहजींच येऊन मिळत गेल्या एवढेंच दिग्दर्शित करण्याचा येथें विचार आहे.

म्हणून आतां असहकारासंबंधीं थोडें लिहिण्याची वेळ आली आहे असें म्हणतां येईल. खिलाफतीबाबत अलीबंधूंची जबरदस्त चळवळ चालूच होती. मरहूम मौलाना अबदुल बारी इत्यादि उलेमांबरोबर माझी त्या बाबतींत खूप चर्चा झाली; मुसलमान लोक शान्ति, अहिंसा कोठपर्यंत पाळूं शकतील यांचेंहि विवेचन झालें; व शेवटीं नक्की झालें, कीं अमुक हद्दीपर्यंत धोरण म्हणून ती पाळण्यास हरकत नाहीं, व एकवार अहिंसेची प्रतिज्ञा केल्यानंतर ती पाळण्यास ते बांधलेले आहेत. अखेरीला असहकाराचा ठराव खिलाफत-परिषदेमध्यें मांडण्यांत आला व पुष्कळ चर्चा होऊन तो पसार झाला. मला आठवतें, कीं अलाहाबादमध्यें त्यासाठीं एके दिवशीं सबंध रात्रभर सभा चालली होती. हकीमसाहेबांना शान्तिमय असहकार चालू शकेल कीं नाहीं याबद्दल शंका वाटत होती. पण त्यांची शंका दूर झाल्यानंतर ते त्या ठरावाला येऊन मिळाले, व त्यांची मदत अमूल्य झाली.

त्यानंतर गुजराथेंत परिषद झाली. तिच्यापुढें मीं असहकाराचा ठराव मांडला. त्याला विरोध करणारांची पहिली हरकत अशी होती कीं, जोंपर्यंत राष्ट्रीय सभेनें असहकाराचा ठराव केलेला नाहीं, तोंपर्यंत प्रान्तिक परिषदांना तसा ठराव करण्याचा अधिकार नाहीं. मीं सुचविलें, कीं प्रांतिक परिषदांनीं मागें हटूं

नये; पण पुढें पाऊल टाकण्याचा सर्व पोटमंडळांना अधिकार आहे. एवढेंच नव्हे तर त्यांच्यांत धमक असेल तर तसें करणें हा त्यांचा धर्म आहे. त्यामुळें मुख्य संस्थेची प्रतिष्ठा वाढते. ठरावाच्या गुणदोषासंबंधींहि मधुर चर्चा झाली. मतें मोजण्यांत आलीं व मोठ्या बहुमतानें असहकाराचा ठराव पास झाला. हा ठराव पास करण्याचें बरेंचसें श्रेय अब्बास तैय्यबजी व वल्लभभाई यांस होतें. अब्बास-साहेब अध्यक्ष होते, व त्यांचा कल असहकाराच्या ठरावाकडेच होता.

राष्ट्रीय महासमितीनें या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं राष्ट्रीय सभेचें खास अधिवेशन कलकत्त्यामध्यें १९२० च्या सप्टेंबर महिन्यांत भरविण्याचा ठराव केला. तयारी खूप मोठ्या प्रमाणांत झाली. लाला लजपतराय यांना अध्यक्ष निवडलें होतें. खिलाफत-स्पेशल व कॉंग्रेस-स्पेशल मुंबईहून सुटल्या. कलकत्त्यामध्यें प्रतिनिधींचा व प्रेक्षकांचा मोठा समुदाय जमला.

मौलाना शौकत अल्लींच्या मागणीवरून असहकाराच्या ठरावाचा मसुदा मीं आगगाडींत तयार केला. अजूनपर्यंतच्या माझ्या ठरावाच्या मसुद्यामध्यें 'शांतिमय' शब्द बहुधा आलेला नव्हता. मी आपल्या भाषणांमध्येंच त्याचा उपयोग करीत असें. केवळ मुसलमान लोकांच्या सभेमध्यें ' शांतिमय ' या शब्दानें मला जें दर्शवावयाचें होतें तें मला समजावून देतां आलें नसतें. म्हणून मी मौलाना अबुल कलाम आझाद यांजपाशीं दुसऱ्या एकाद्या शब्दाची मागणी केली. त्यांनीं ' बाअमन ' शब्द दिला, व असहकाराला ' तर्के मवालात ' हा शब्द दिला.

अशा तऱ्हेनें गुजराथी, हिंदी, हिंदुस्थानी इत्यादि भाषांतून असहकाराची परिभाषा बनविण्याच्या कामीं माझा मेंदू गुंतलेला होता; इतक्यांत राष्ट्रीय सभेसाठीं ठराव तयार करण्याचें काम वर दर्शविल्याप्रमाणें माझ्यावर येऊन पडलें. त्यांत ' शांतिमय ' शब्द घालावयाचा राहून गेला. मीं ठराव लिहून आगगाडींतच मौलाना शौकतअल्लींच्या हातांत देऊन टाकला. रात्रीच्या वेळीं मला स्मरण झालें, कीं मुख्य शब्द ' शांतिमय ' तर राहूनच गेला आहे. मीं महादेवांना दौडाविलें, व निरोप पाठविला, कीं ' शांतिमय ' शब्द छापतांना घालावा. मला पुसट स्मरण आहे, कीं तो शब्द घालण्यापूर्वींच ठराव छापून निघाला होता. विषयविचारणी सभा त्याच रात्रीं भरली, अर्थात् मला तो शब्द मागाहून घालावा लागला. मला दिसून आलें, कीं जर का मी ठराव लिहून तयार होऊन राहिलों नसतों, तर बरीच अडचण पडली असती.

माझी स्थिति केविलवाणी होती. ठरावाला विरोध कोण करतील आणि पसंत कोण करतील याची मला कांहीं कल्पना नव्हती. लालाजींचा कल कोणीकडे आहे, तेंहि मला समजलें नव्हतें. कसलेले योद्धे कलकत्त्यामध्यें हजर झाले होते.

सभेनें ती हरकत अमान्य केली व सबंध घटना राष्ट्रीय सभेमध्यें छानदार चर्चा होऊन पसार झाली. माझी समजूत आहे, कीं त्या घटनेची अंमलबजावणी लोकांनीं प्रामाणिकपणें व उत्साहपूर्वक केली असती, तर त्यामुळें जनतेला खूप शिक्षण मिळालें असतें. तिच्या अंमलबजावणीमध्येंच स्वराज्याचीहि संपादना आहे. पण हा विषय येथें अप्रस्तुत आहे.

याच सभेमध्यें हिंदु-मुसलमान ऐक्याविषयीं, अस्पृश्यतेविषयीं व खादी-विषयीं ठराव झाले. आणि तेव्हांपासून अस्पृश्यता दूर करण्याचें काम राष्ट्रीय सभेच्या हिंदू सभासदांनीं अंगावर घेतलें आहे व खादीपर्यंत राष्ट्रीय सभेनें हिंदुस्थानांतील हाडांच्या सांपळ्यांशीं संबंध जोडला आहे. खिलापतीच्या निमित्तानें असहकार पुकारणें हाच राष्ट्रीय सभेचा हिंदु-मुस्लिम ऐक्य साधण्याचा महान् प्रयत्न होता.

•••

## ४४

# पूर्णाहुति

पण आतां हीं प्रकरणें बंद करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. यापुढील माझें जीवन इतकें कांहीं प्रसिद्ध होऊन बसलें आहे, कीं जनतेला माहीत नाहीं असें क्वचितच कांहीं असेल. शिवाय १९२१ सालापासून मी राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांशीं इतक्या निकट संबंधांत आलों आहें, कीं एकाहि प्रसंगाचें वर्णन पुढाऱ्यांना त्यांत गोंविल्याखेरीज मला यथार्थपणें करतां येणार नाहीं. हे संबंध अजून ताजे आहेत. श्रद्धानंदजी, देशबंधु, लालाजी आणि हकीमसाहेब आपल्यामध्यें नाहींत, तरीहि सुदैवानें इतर अनेक पुढारी अद्याप विद्यमान आहेत. राष्ट्रीय सभेच्या महापरिवर्तनानंतरचा इतिहास अद्याप घडविला जात आहे. माझे मुख्य प्रयोग राष्ट्रीय सभेमार्फत झालेले आहेत. अर्थात् त्या प्रयोगांचें वर्णन करतांना पुढाऱ्यांना मध्यें आणणें अपरिहार्य होईल; व तसें करणें विनयाखातर तरी अयोग्य होईल. शिवाय अत्यंत महत्त्वाचें कारण म्हणजे चालू प्रयोगासंबंधींचे माझे अभिप्राय निश्चित म्हणतां येणार नाहींत. म्हणून हीं प्रकरणें तूर्त बंद करणें मीं आपलें कर्तव्य समजतों. माझी लेखणी पुढें चालावयाला कबूल नाहीं, असेंहि म्हटल्यास चालेल.

वाचकांचा निरोप घेतांना माझ्या मनाला दुःख होत आहे. माझ्या प्रयोगांची मला स्वतःला फार किंमत वाटते. त्याचें वर्णन मी यथार्थतः करूं शकलों आहें, कीं

नाहीं मला माहीत नाहीं. यथार्थ वर्णन करण्याच्या कामीं मीं कसूर केलेली नाहीं. सत्य मीं जसें पाहिलें, ज्या मार्गानें पाहिलें तसें तें दर्शविण्याचा मीं सतत प्रयत्न केला आहे; आणि वाचकांपुढें त्याचें वर्णन करण्यापासूनहि माझ्या चित्ताचें समाधान झालें आहे. कारण, कीं त्या वर्णनापासून वाचकालाहि सत्य व अहिंसा यांबद्दल अधिक आस्था वाटूं लागेल, अशी मला आशा वाटत आहे.

सत्यापरता कोणी परमेश्वर असल्याचा मला अनुभव नाहीं. सत्यमय होण्यास अहिंसा हाच एक मार्ग आहे, हें या प्रकरणाच्या पानापानांतून उघड झालें नसेल तर हा माझा प्रयत्न व्यर्थ आहे, असें मी समजतो. सिद्धान्ताचें प्रतिपादन करण्याचा माझा प्रयत्न फोल झाला, तरी मूळ सिद्धान्त फोल नाहीं. माझी अहिंसा सच्ची असली तरी कच्ची आहे, अपूर्ण आहे. माझा सत्याचा साक्षात्कार म्हणजे हजारों सूर्य एकत्र केले तरीहि ज्या सत्यरूपी सूर्याची बरोबरी करूं शकणार नाहींत त्या सूर्याच्या एका किरणाच्या दर्शनासारखा आहे. त्याचें संपूर्ण दर्शन संपूर्ण अहिंसेखेरीज अशक्य आहे, एवढें तरी मी माझ्या आजवरच्या प्रयोगांच्या अखेरीस अवश्य सांगूं शकतों.

अशा या सर्वव्यापी सत्यनारायणाच्या प्रत्यक्ष दर्शनासाठीं जीवमात्रावर आत्मवत् प्रेम करणें अत्यंत आवश्यक आहे; व तें करूं इच्छिणारा मनुष्य जीवनाच्या कोणत्याहि विभागापासून अलिप्त राहूं शकत नाहीं. म्हणूनच सत्याच्या माझ्या उपासनेनें मला राजकारणामध्यें खेंचून आणलें आहे. धर्माचा राजकारणाशीं संबंध नाहीं म्हणणाराला धर्माचा अर्थ समजलेला नाहीं असें म्हणण्यास मला बिलकुल संकोच वाटत नाहीं; तसें म्हणण्यांत माझ्याकडून अविनयहि घडत नाहीं.

आत्मशुद्धीखेरीज जीवमात्राबरोबर ऐक्य साधतां येणार नाहीं. आत्मशुद्धीखेरीज अहिंसाधर्माचें पालन सर्वथैव अशक्य आहे. अशुद्धात्मा परमात्म्याचें दर्शन करूं शकत नाहीं. अर्थात् जीवनमार्गाच्या सर्वच विभागांमध्यें आत्मशुद्धीची आवश्यकता आहे. ही शुद्धि साध्य आहे; कारण व्यक्ति व समष्टि यांच्यामध्यें इतका निकट संबंध आहे, कीं एका व्यक्तीची शुद्धि ही अनेकांच्या शुद्धीच्या बरोबरीची ठरते. आणि व्यक्तिगत प्रयत्न करण्याची शक्ति तर सत्यनारायणानें सर्वांनाच जन्मापासून दिलेली आहे.

पण हा शुद्धीचा मार्ग घोर आहे, हें माझ्या क्षणोक्षणीं अनुभवास येत आहे. शुद्ध होणें म्हणजे मन-वचन-कायेनें निर्विकार होणें, रागद्वेषरहित होणें. या निर्विकारतेप्रत पोंचण्याचा मीं प्रतिक्षणीं प्रयत्न करीत असूनहि मी तिच्यापर्यंत पोंचलेलों नाहीं. त्यामुळें लोकांनीं केलेली स्तुति मला फसवूं शकत नाहीं; ती स्तुति कित्येक वेळां, तर मला अतिशय सलते. शस्त्रयुद्धानें सारें जग जिंकण्यापेक्षां मनाचे विकार जिंकणें मला अधिक कठिण वाटतें. हिंदुस्थानांत आल्यानंतरसुद्धां

सभेनें ती हरकत अमान्य केली व सबंध घटना राष्ट्रीय सभेमध्यें छानदार चर्चा होऊन पसार झाली. माझी समजूत आहे, कीं त्या घटनेची अंमलबजावणी लोकांनीं प्रामाणिकपणें व उत्साहपूर्वक केली असती, तर त्यामुळें जनतेला खूप शिक्षण मिळालें असतें. तिच्या अंमलबजावणीमध्येंच स्वराज्याचीहि संपादना आहे. पण हा विषय येथें अप्रस्तुत आहे.

याच सभेमध्यें हिंदु-मुसलमान ऐक्याविषयीं, अस्पृश्यतेविषयीं व खादी-विषयीं ठराव झाले. आणि तेव्हांपासून अस्पृश्यता दूर करण्याचें काम राष्ट्रीय सभेच्या हिंदू सभासदांनीं अंगावर घेतलें आहे व खादीपर्यंत राष्ट्रीय सभेनें हिंदुस्थानांतील हाडांच्या सांपळ्यांशीं संबंध जोडला आहे. खिलापतीच्या निमित्तानें असहकार पुकारणें हाच राष्ट्रीय सभेचा हिंदु-मुस्लिम ऐक्य साधण्याचा महान् प्रयत्न होता.

●●●

## ४४

# पूर्णाहुति

पण आतां हीं प्रकरणें बंद करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. यापुढील माझें जीवन इतकें कांहीं प्रसिद्ध होऊन बसलें आहे, कीं जनतेला माहीत नाहीं असें क्वचितच कांहीं असेल. शिवाय १९२१ सालापासून मी राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांशीं इतक्या निकट संबंधांत आलों आहें, कीं एकाहि प्रसंगाचें वर्णन पुढाऱ्यांना त्यांत गोंविल्याखेरीज मला यथार्थपणें करतां येणार नाहीं. हे संबंध अजून ताजे आहेत. श्रद्धानंदजी, देशबंधु, लालाजी आणि हकीमसाहेब आपल्यामध्यें नाहींत, तरीहि सुदैवानें इतर अनेक पुढारी अद्याप विद्यमान आहेत. राष्ट्रीय सभेच्या महापरिवर्तनानंतरचा इतिहास अद्याप घडविला जात आहे. माझे मुख्य प्रयोग राष्ट्रीय सभेमार्फत झालेले आहेत. अर्थात् त्या प्रयोगांचें वर्णन करतांना पुढाऱ्यांना मध्यें आणणें अपरिहार्य होईल; व तसें करणें विनयाखातर तरी अयोग्य होईल. शिवाय अत्यंत महत्त्वाचें कारण म्हणजे चालू प्रयोगासंबंधींचे माझे अभिप्राय निश्चित म्हणतां येणार नाहींत. म्हणून हीं प्रकरणें तूर्त बंद करणें मीं आपलें कर्तव्य समजतों. माझी लेखणी पुढें चालावयाला कबूल नाहीं, असेंहि म्हटल्यास चालेल.

वाचकांचा निरोप घेतांना माझ्या मनाला दुःख होत आहे. माझ्या प्रयोगांची मला स्वतःला फार किंमत वाटते. त्यांचें वर्णन मी यथार्थतः करूं शकलों आहें, कीं

नाहीं मला माहीत नाहीं. यथार्थ वर्णन करण्याच्या कामीं मीं कसूर केलेली नाहीं. सत्य मीं जसें पाहिलें, ज्या मार्गानें पाहिलें तसें तें दर्शविण्याचा मीं सतत प्रयत्न केला आहे; आणि वाचकांपुढें त्याचें वर्णन करण्यापासूनहि माझ्या चित्ताचें समाधान झालें आहे. कारण, कीं त्या वर्णनापासून वाचकालाहि सत्य व अहिंसा यांबद्दल अधिक आस्था वाटूं लागेल, अशी मला आशा वाटत आहे.

सत्यापरता कोणी परमेश्वर असल्याचा मला अनुभव नाहीं. सत्यमय होण्यास अहिंसा हाच एक मार्ग आहे, हें या प्रकरणाच्या पानापानांतून उघड झालें नसेल तर हा माझा प्रयत्न व्यर्थ आहे, असें मी समजतो. सिद्धान्ताचें प्रतिपादन करण्याचा माझा प्रयत्न फोल झाला, तरी मूळ सिद्धान्त फोल नाहीं. माझी अहिंसा सच्ची असली तरी कच्ची आहे, अपूर्ण आहे. माझा सत्याचा साक्षात्कार म्हणजे हजारों सूर्य एकत्र केले तरीहि ज्या सत्यरूपी सूर्याची बरोबरी करूं शकणार नाहींत त्या सूर्याच्या एका किरणाच्या दर्शनासारखा आहे. त्याचें संपूर्ण दर्शन संपूर्ण अहिंसेखेरीज अशक्य आहे, एवढें तरी मी माझ्या आजवरच्या प्रयोगांच्या अखेरीस अवश्य सांगूं शकतों.

अशा या सर्वव्यापी सत्यनारायणाच्या प्रत्यक्ष दर्शनासाठीं जीवमात्रावर आत्मवत् प्रेम करणें अत्यंत आवश्यक आहे; व तें करूं इच्छिणारा मनुष्य जीवनाच्या कोणत्याहि विभागापासून अलिप्त राहूं शकत नाहीं. म्हणूनच सत्याच्या माझ्या उपासनेनें मला राजकारणामध्यें खेंचून आणलें आहे. धर्माचा राजकारणाशीं संबंध नाहीं म्हणणाराला धर्माचा अर्थ समजलेला नाहीं असें म्हणण्यास मला बिलकुल संकोच वाटत नाहीं; तसें म्हणण्यांत माझ्याकडून अविनयहि घडत नाहीं.

आत्मशुद्धीखेरीज जीवमात्राबरोबर ऐक्य साधतां येणार नाहीं. आत्मशुद्धीखेरीज अहिंसाधर्माचें पालन सर्वथैव अशक्य आहे. अशुद्धात्मा परमात्म्याचें दर्शन करूं शकत नाहीं. अर्थात् जीवनमार्गाच्या सर्वच विभागांमध्यें आत्मशुद्धीची आवश्यकता आहे. ही शुद्धि साध्य आहे; कारण व्यक्ति व समष्टि यांच्यामध्यें इतका निकट संबंध आहे, कीं एका व्यक्तीची शुद्धि ही अनेकांच्या शुद्धीच्या बरोबरीची ठरते. आणि व्यक्तिगत प्रयत्न करण्याची शक्ति तर सत्यनारायणानें सर्वांनाच जन्मापासून दिलेली आहे.

पण हा शुद्धीचा मार्ग घोर आहे, हें माझ्या क्षणोक्षणीं अनुभवास येत आहे. शुद्ध होणें म्हणजे मन-वचन-कायेनें निर्विकार होणें, रागद्वेषरहित होणें. या निर्विकारतेप्रत पोंचण्याचा मीं प्रतिक्षणीं प्रयत्न करीत असूनहि मी तिच्यापर्यंत पोंचलेलों नाहीं. त्यामुळें लोकांनीं केलेली स्तुति मला फसवूं शकत नाहीं; ती स्तुति कित्येक वेळां, तर मला अतिशय सलते. शस्त्रयुद्धानें सारें जग जिंकण्यापेक्षां मनाचे विकार जिंकणें मला अधिक कठिण वाटतें. हिंदुस्थानांत आल्यानंतरसुद्धां

माझ्यामध्यें दडून राहिलेले विकार माझ्या उघडकीला आले आहेत. त्याची मला शरम वाटत आहे. पण मी प्रयत्न मात्र सोडीत नाहीं. सत्याचे प्रयोग करतांना मला रसाचे घुटके मिळाले आहेत, आजहि मिळत आहेत. पण मला माहीत आहे, कीं मला अजून घोर मार्ग कापावयाचा आहे. त्यासाठीं मला शून्यवत् बनलें पाहिजे. मनुष्य जोंपर्यंत आपण होऊन स्वतःला सर्वांच्या शेवटीं नेऊन बसवीत नाहीं, तोंपर्यंत त्याला सुटका नाहीं. अहिंसा ही नम्रतेची पराकाष्ठा होय; आणि या नम्रतेविना मुक्ति कधीं काळीं शक्य नाहीं, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. त्या नम्रतेची प्रार्थना करीत, त्या कामीं जगाच्या साहाय्याची याचना करीत, सध्यां तरी हीं प्रकरणें बंद करतों.

●●●

# परिशिष्टें

[ गांधीजींनीं ' दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाचा इतिहास ' येरवड्याच्या तुरुंगांत लिहिण्यास सुरुवात केली, व सुटून आल्यानंतर तो पुरा केला. तो प्रथम गांधीजींचें गुजराथी साप्ताहिक ' नवजीवन ' यामध्यें प्रकरणशः प्रसिद्ध झाला. त्याचें इंग्रजी भाषान्तर मद्रासचे जी. नटेसन आणि कंपनी यांनीं प्रसिद्ध केलें आहे. मराठी भाषान्तर प्रसिद्ध झालेलें नाहीं. आत्मकथेच्या प्रकरणांतील हकिकती- संबंधीं अधिक सविस्तर माहिती देणारे " इतिहासांतील " कांहीं उतारे खालीं दिले आहेत. ]

## १ डरबनमधील हल्ला

( इतिहास खंड १, प्र. ७ वरून. अनुसंधान : आत्मकथा खंड ३, प्र. ३ )

नाताळ-सरकारहि दमलें. अयोग्य प्रतिबंध किती दिवस चालवतां येणार ? तेवीस दिवस तर होऊन गेले. दादा अबदुल्ला डरले नाहींत किंवा हिंदी उतारूहि डगमगले नाहींत. अर्थात् तेवीस दिवसांनंतर निर्बंध सुटला आणि आगबोटींना आंत येण्याची परवानगी मिळाली. मध्यंतरी मि. एस्कंबनीं खवळलेल्या कमिटीला शान्त केलें. त्यांनीं सभा भरवून सांगितलें, " डरबनमध्यें गोऱ्या लोकांनीं खूप ऐक्य व हिंमत दाखविलीं आहेत. तुमच्याकडून होण्यासारखें होतें तेवढें तुम्हीं केलेंत. सरकारनेंहि तुम्हांला मदत केली. या लोकांना तेवीस दिवसपर्यंत प्रतिबंधांत ठेवलें. तुमच्या मनोभावनांचें व शौर्याचें जें आविष्करण तुम्हीं केलें तेवढें पुरें आहे. त्याचा वरिष्ठ सरकारावर खूप परिणाम होईल. तुमच्या कामगिरीमुळें नाताळ सरकाचा मार्ग सरळ झाला आहे. पण आतां जर तुम्ही दंडेली करून एका पण हिंदी उतारूला येण्यास आडकाठी केलीत तर मात्र तुमच्या कामाला तुमच्याकडूनच नुकसान पोंचेल व नाताळ सरकारची स्थिति बिकट होईल. इतकेंहि करून या लोकांना तुम्ही आडकाठी करूं शकणार नाहीं ती नाहींच. बिचाऱ्या उतारूंचा कांहींच दोष नाहीं. त्यांच्यामध्यें स्त्रिया व मुलेंहि आहेत. मुंबईला चढले, तेव्हां त्यांना तुमच्या मनःस्थितीची कल्पनाहि नव्हती. यासाठीं आतां तुम्ही मी सांगतों तें ऐकून आपापल्या वाटेनें गेलें पाहिजे, आणि या

लोकांना येण्यास बिलकुल हरकत करतां कामा नये. पण मी तुम्हांला एवढें वचन देतों कीं, यापुढें येणारांच्या बाबतींत निर्बंध घालण्याचा अधिकार नाताळ सरकार विधिमंडळापासून मिळवून घेईल." हा मीं भाषणाचा फक्त सारांश दिला आहे. मि. एस्कंबचें नेहमींच इतकें वजन असें कीं, त्यांच्या सांगण्यावरून ते निघून गेले. दोन्ही आगबोटी बंदरांत आल्या.

माझ्या बाबतींत त्यांनीं निरोप पाठविला कीं, तुम्हीं दिवसा उजेडीं बोटींतून उतरूं नये. संध्याकाळ झाल्यावर पोर्ट-सुपरिंटेंडंटला तुम्हांला नेण्यासाठीं पाठवीन, त्यांच्याबरोबर तुम्हीं घरीं जावें. तुमच्या कुटुंबाला वाटेल तेव्हां उतरून जाण्यास हरकत नाहीं." हा कांहीं कादेशीर हुकूम नव्हता, तर कॅप्टनला मला उतरूं न देण्याबद्दल शिफारस होती, व माझ्या डोक्यावर लटकून राहिलेल्या धोक्याची सूचना होती. कॅप्टननें मला जबरदस्तीनें अडवून ठेवणें शक्यच नव्हतें. पण मलाच वाटलें कीं, मीं ही सूचना मान्य केली पाहिजे. माझ्या बायकामुलांना घरीं पाठविण्याऐवजीं डरबनचे प्रसिद्ध व्यापारी आणि माझे जुने अशील व मित्र पारसी रुस्तुमजी यांजकडे पाठविलीं आणि त्यांना तेथें येऊन भेटेन असें सांगितलें. उतारू वगैरे उतरून गेले. इतक्यांत मि. लॉटन् दादा अबदुल्लांचे वकील व माझे मित्र, आले व मला भेटले. मला विचारलें, " तुम्ही अद्याप कां नाहीं उतरलां ?" मीं मि. एस्कंबच्या पत्राची हकीकत सांगितली. ते म्हणाले, " मला तर संध्याकळपर्यंत वाट पहाणें आणि नंतर गुन्हेगाराप्रमाणें किंवा चोराप्रमाणें गांवांत जाणें बिलकुल पसंत नाहीं. तुम्हांला जर भीति वाटत नसेल तर असेच माझ्याबरोबर चला. जणूं कांहींच झालेलें नाहीं अशा तऱ्हेनें आपण पायींच शहरांतून चालत जाऊं." मीं म्हटलें, " मला नाहीं वाटत, मला कसली भीति आहे असें. मि. एस्कंबची सूचना-सल्ला-मानायची कीं नाहीं एवढाच केवळ विवेक-अविवेकाचा प्रश्न माझ्या नजरेपुढें आहे; आणि कॅप्टनवर या बाबतींत कांहीं जबाबदारी आहे कीं काय याचाहि थोडाबहुत विचार केला पाहिजे." मि. लॉटन् हंसून म्हणाले, " मि. एस्कंबनीं असें काय मोठें केलें आहे कीं, तुम्हीं त्यांची सूचना मनावर घ्यावी ? शिवाय त्यांच्या सूचनेमध्यें फक्त साम आहे आणि भेद नाहीं असें मानण्यासहि तुमच्यापाशीं काय पुरावा आहे ? शहरांत काय काय घडलें आणि त्यामध्यें या भाईसाहेबांचें कितीसें अंग आहे त्याची तुमच्यापेक्षां मलाच जास्त माहिती आहे. ( मी मध्यें डोकें हालविलें. ) त्यांनीं शुभेच्छेनेंच सूचना केली आहे असें धरून चाललें तरीहि, त्या सूचनेप्रमाणें वागण्यानें तुमच्याकडे कमीपणा येईल हें तर मला स्पष्ट दिसतें. म्हणून माझा तर सल्ला आहे, कीं तुमची तयारी असेल तर आतांच चला. कॅप्टन आपलेच आहेत. तेव्हां त्यांची जबाबदारी ती आमचीच आहे. त्यांना विचारणारे काय ते दादा अबदुल्ला. त्यांना काय वाटेल तें मीं सांगूं शकतों. कारण कीं, त्यांनीं या

लढाईमध्यें बहादुरी दाखविली आहे." मीं म्हटलें, " तर मग आपण जाऊं या. मला कसलीहि तयारी करायची नाहीं. पगडी डोक्याला घालायचा अवकाश आहे. कॅप्टनना सांगून निघूं या." कॅप्टनची परवानगी घेतली.

मि. लॉटन् हे डरबनमधील फार जुने व प्रख्यात वकील होते. मी हिंदुस्थानला जाण्यापूर्वींच त्यांचा माझा चांगला स्नेहसंबंध जमला होता. विशेष अडचणीच्या खटल्यामध्यें मी त्यांचाच सल्ला घेत असें. ते स्वतः हिंमतवान् होते. बांध्यानें धिप्पाड होते.

आमचा रस्ता डरबनमधील मोठ्यांत मोठ्या पेठेंतून जात होता. आम्ही निघालों तेव्हां संध्याकाळचे चार-साडेचार वाजले असावे. आकाशांत तुरळक मेघ होते; पण तेवढे सूर्याला झांकून टाकण्यास पुरेसे होते. पायीं चालून शेठ रुस्तुमजींच्या घरीं जाऊन पोंचायला कांहीं नाहीं तरी एक तास लागेल एवढा रस्ता होता. आम्ही उतरतों इतक्यांतच कित्येक पोरांनीं आम्हांला पाहिलें. त्यांमध्यें मोठीं माणसें मुळींच नव्हतीं. सामान्यपणें बंदरावर माणसें असतात तितकींच दिवस होतीं. कांहीं पोरांनीं आम्हांला पाहिलें. माझ्यासारखा पगडी घालणारा मीं एकटाच पडलों. पोरांनीं मला ताबडतोब ओळखला आणि " गांधीं, गांधी ! " याला 'ठोका,' 'वेढा द्या,' अशा आरोळ्या ठोकीत आमच्याकडे वळले. कोणी रेवाहि फेंकू लागले. कित्येक मोठ्या वयाचे गोरेहि येऊन मिळाले. हळूहळू हल्ला वाढत चालला. मि. लॉटन्ना वाटलें कीं, चालत जाण्यामध्यें धोका आहे. म्हणून त्यांनीं 'रिक्षा' बोलावली. 'रिक्षा' म्हणजे माणसांनीं ओढावयाची गाडी. मीं कधींहि रिक्षामध्यें बसलोंच नव्हतों. कारण कीं, माणसांनीं ओढावयाच्या वाहना-मध्यें बसण्याबद्दल मला मनापासून तिटकारा वाटत होता. पण या वेळीं मला वाटलें कीं, रिक्षामध्यें बसून जाणें हेंच माझें कर्तव्य आहे. पण ईश्वर ज्याचा पाठी-राखा आहे तो पडूं इच्छीत असला तरी पडूं शकत नाहीं, याचा प्रत्यक्ष अनुभव मीं माझ्या हयातींतच अडचणीच्या पांच-सात प्रसंगीं घेतला आहे. माझें पतन झालें नाहीं याचें यश मला मुळींच घेतां यावयाचें नाहीं. रिक्षा ओढणारे हबशीच असतात. पोरांनीं आणि मोठ्यांनींहि रिक्षावाल्याला धमकी दिली कीं, जर तूं या माणसाला रिक्षामध्यें बसवलास, तर तुला ठोकूं आणि रिक्षाहि मोडून टाकूं. त्यामुळें रिक्षावाला 'खा' (नाहीं) म्हणून चालता झाला; आणि माझें रिक्षामध्यें बसणें राहून गेलें.

आतां आम्हांला पायीं जाण्याखेरीज गत्यंतर नव्हतें. आमच्या पाठीशीं सेना जमली. जसजसें पुढें चाललों, तसतशी सेना वाढतच चालली. मुख्य रस्त्याशीं आलों, तों तेथें तर शेंकडों लहानमोठे लोक गोळा झाले. एका बळवान् इसमानें मि. लॉटनना वेंगेत धरून माझ्यापासून दूर केलें. त्यामुळें माझ्या मदतीला येण्या-

सारखी त्यांची स्थिति राहिली नाहीं. माझ्यावर शिव्यांचा, धोंड्यांचा, जें कांहीं हाताला लागेल त्याचा मारा सुरू झाला. माझी पगडी उडवून दिली. एवढ्यांत एका मोठ्या जाडजूड माणसानें येऊन मला थप्पड मारली आणि मागोमाग ठोसा लगावला. तिरिमिरी येऊन पडणार होतों, इतक्यांत रस्त्याजवळ असलेली एका घराच्या आंगणाची जाळी माझ्या हातीं लागली. किंचित् श्वास घेतल्यावर तिरिमिरी उतरली, तेव्हां चालण्यास सुरुवात केला. जिवंत पोंचण्याची बहुतेक आशा सुटली होती. परंतु मला एवढें बरोबर आठवतें कीं, या वेळींहि माझें हृदय त्या मारणारांचा यत्किंचित्‌हि दोष काढीत नव्हतें.

अशा तऱ्हेनें माझी कूच चालली आहे, इतक्यांत डरबनच्या पोलीस सुपरिंटेंडंटची स्त्री समोरून येत होती. आम्ही एकमेकांना चांगल्या तऱ्हेनें ओळखीत होतों. ती बाई हिंमतवान् होती. आकाश आभ्राच्छादित होतें आणि या वेळीं सूर्यहि खालीं गेला होता. तरीसुद्धां त्या बाईनें आपली छत्री माझ्या रक्षणासाठीं उघडली आणि माझ्या बाजूनें चालूं लागली. बाईमाणसाचा अपमान, आणि तोहि डरबनच्या सर्वांत वृद्ध व लोकप्रिय फौजदाराच्या पत्नीचा अपमान, गोऱ्या लोकांकडून व्हावयाचाच नाहीं—तिला इजाहि व्हायची नाहीं. त्यामुळें तिला लागणार नाहीं अशा बेतानें माझ्यावर आघात करावे लागत, ते अर्थातच हलके असत. तोंपर्यंत या हल्ल्याची पोलीस सुपरिंटेंडंटला बातमी कळल्यावरून त्यांनीं पोलीस पार्टी पाठविली आणि पोलीस माझ्या चारी बाजूंना राहिले. आमचा रस्ता पोलीस चौकीवरून जात होता. तेथें जाऊन पोंचलों, तों फौजदार वाटच पाहत उभे होते. त्यांनीं मला पोलीस-चौकींतच जाऊन बसण्याचा सल्ला दिला. मीं आभार मानले, पण आंत जाण्याचें नाकारलें. मीं म्हटलें, “ मला कसेंहि करून मुक्कामावर जाऊन पोंचलें पाहिजे. डरबनच्या लोकांच्या न्यायवृत्तीबद्दल आणि माझ्या स्वतःच्या सत्याबद्दल मला विश्वास आहे. आपण पोलिसांना पाठविलें याबद्दल आपला आभारी आहे. शिवाय मिसेस् अलेक्झांडरनींहि माझें संरक्षण केलें ! ”

मीं सुखरूपपणें रुस्तुमजींच्या घरीं पोंचलों. तेथें पोंचेपर्यंत जवळजवळ रात्र झाली. ‘ कुर्लेंड’वरील डॉक्टर दाजी बरजोर रुस्तुमजी शेठजींकडे होते. त्यांनीं माझी शुश्रूषा केली. जखमा तपासल्या. फारशा नव्हत्या. एका जागीं कुबललों होतों त्याचाच विशेष त्रास होत होता. परंतु अजून मला स्वस्थता मिळविण्याचा अधिकार प्राप्त झाला नव्हता. रुस्तुमजीशेठच्या घरासमोर हजारों गोरे लोक जमा झाले. रात्र पडली असल्यामुळें लुच्चेलफंगेहि त्यांत मिसळणार. लोकांनीं रुस्तुमजीशेठना सांगून पाठविलें कीं, जर तुम्हीं गांधीला आमच्या स्वाधीन केला नाहीं, तर त्याच्याबरोबर तुमची आणि तुमच्या दुकानाची होळी करूं. ते कांहीं

कोणी भेवडावून भिणारे हिंदी नव्हत. सुपरिंटेंडंट अलेक्झांडरला ही बातमी कळतांच ते आपल्या गुप्त पोलिसांसह हळूच त्या थव्यामध्यें येऊन शिरले. एक खाट आणविली आणि तिच्यावर उभे राहिले. लोकांबरोबर बोलण्याच्या मिषानें अशा तऱ्हेनें पारशी रुस्तुमजींच्या घराच्या दरवाजाचा कबजा घेतला कीं, जेणें-करून तो फोडून कोणाला आंत घुसून येतां येऊं नये. योग्य स्थळीं गुप्त पोलिसांना ठेवून दिलेंच होतें. त्यांनीं येतांक्षणींच आपल्या एका अंमलदाराला हिंदी पोशाख चढवून व तोंड रंगवून हिंदी व्यापाऱ्याचें सोंग घेण्यास सांगून दिलें आणि त्याला हुकूम दिला कीं, त्यानें माझी गांठ घेऊन मला सांगावें कीं, " जर तुम्हांला तुमच्या मित्राचें, त्याच्याकडे उतरलेल्या पाहुण्यांचें, त्याच्या मालमत्तेचें आणि स्वतःच्या मुलांमाणसांचें रक्षण व्हावयाला पाहिजे असेल, तर तुम्ही हिंदी शिपायाचा वेष घेऊन पारशाच्या गोदामांतून बाहेर पडून लोकांच्या जमावामधून माझ्या इसमाबरोबर पसार होऊन पोलीस चौकीमध्यें जाऊन राहिलें पाहिजे. गल्लीच्या कोंपऱ्यावर तुमच्यासाठीं गाडी तयार ठेवलेली आहे. तुमचें व इतरांचें संरक्षण करण्याचा माझ्यापाशीं हा एवढाच मार्ग आहे. जमाव इतका कांहीं क्षुब्ध झालेला आहे, कीं त्याला दाबांत ठेवण्याचें माझ्यापाशीं कांहीं साधन नाहीं. तुम्हीं त्वरा केली नाहीं तर हें घर जमीनदोस्त होईल, एवढेंच नव्हे तर प्राणहानि व मालमत्तेचें नुकसान किती होईल त्याचा मी अंदाजहि करूं शकत नाहीं.

एकंदर स्थिति माझ्या लक्षांत आली. मीं लगेच शिपायाचा पोशाख मागितला आणि चढवून निसटून गेलों, आणि त्या अंमलदाराबरोबर बिनधोकपणें पोलीस चौकीमध्यें जाऊन पोंचलों. इकडे फौजदार समयोचित गीतांनीं आणि भाषणांनीं जमावाला गोंजारीत राहिला. मीं पोलीस चौकींत जाऊन पोंचलों, असा जेव्हां त्याला इशारा मिळाला तेव्हां त्यानें आपलें खरें बोलणें सुरू केलें :

" तुमचें म्हणणें तरी काय ? "

" आम्हांला गांधी पाहिजे. "

" तुम्हीं त्याचें करणार काय ? "

" आम्ही त्याला जाळून टाकूं ? "

" त्यानें तुमचें काय घोडें मारलें आहे ? "

" आमच्याविषयीं हिंदुस्थानांत खोट्यानाट्या गोष्टी सांगितल्या आहेत, आणि नाताळमध्यें हजारों हिंदी लोकांना घुसडून द्यायला बघतो आहे. "

" पण तो बाहेर पडला नाहीं तर काय कराल ? "

" तर मग आम्हीं या घरालाच आग लावूं ! "

" घरांत तर त्याचीं बायकामुलें आहेत; इतर स्त्रीपुरुष आहेत. स्त्रियांना आणि बालकांना जाळून टाकण्याची तुम्हांला लाज नाहीं वाटत ? "

" याचा दोष तुमच्याकडे आहे. तुम्हीं आमचा निरुपाय केलात तर आम्ही काय करावें ? आम्ही दुसऱ्या कोणाला इजा करूं इच्छित नाहीं. गांधीला आमच्या हवालीं केलेंत म्हणजे बस ! तुम्ही गुन्हेगाराला आमच्या स्वाधीन करीत नाहीं आणि त्याला पकडतांना इतरांना इजा झाली, तर त्याचा दोष आमच्यावर टाकतां हा कोठला न्याय ? "

सुपरिंटेंडंटनीं हंसतहंसत त्यांना हळूच सांगून दिलें कीं, गांधी तर तुमच्यामधूनच बिनधोकपणें दुसऱ्या ठिकाणीं जाऊन पोंचला आहे ! लोक खदखदां हंसूं लागले आणि ' खोटी गोष्ट ', ' खोटी गोष्ट ' असा आरडा करूं लागले.

सुपरिंटेंडंट म्हणाले, " तुम्हांला जर तुमच्या वृद्ध फौजदाराचें खरें वाटत नसेल तर तुमच्या मनाला येतील त्या तीन-चार असामींची एक कमिटी नेमा. बाकीच्या सर्वांनीं वचन द्यावें, कीं कोणीसुद्धां आंत घुसून जाणार नाहीं, आणि कमिटी गांधीला हुडकून काढूं शकली नाहीं तर तुम्हीं शान्तपणें परत जावें. तुम्ही आवेशाला बळी पडून आज पोलिसांची सत्ता झुगारून दिली यांत पोलिसांचा कमीपणा नाहीं, तुमचाच आहे. त्यामुळें पोलिसांनाहि तुमच्याशीं डाव लढवावे लागले. पोलिसांनीं भर तुमच्यामधून तुमची शिकार उचलून नेली, आणि तुम्ही हरलेत. यांत तुम्ही पोलिसांना तर दोष देणारच नाहीं. पोलिसांना नेमलें तुम्हींच; त्यांनीं आपलें कर्तव्य बजावलें."

हें सर्व भाषण सुपरिंटेंडंटनें इतक्या मीठेपणानें, हंसत हंसत आणि दृढतापूर्वक केलें कीं, लोकांनीं त्यानें मागितल्याप्रमाणें वचन दिलें. कमिटी नेमली गेली. तिनें पारशी रुस्तुमजींच्या घराचा कोंपरान् कोंपरा धुंडाळून पाहिला, आणि लोकांना येऊन सांगितलें—

" सुपरिंटेंडंटचें म्हणणें खरें आहे. त्यांनीं आमच्यावर मात केली खरी. "

लोक निराश तर होणारच, पण स्वतःच्या वचनालाहि चिकटून राहिले. कांहीं एक नुकसान न करितां घरोघर निघून गेले. हा दिवस म्हणजे १८९७ सालच्या जानेवारी महिन्याची १३ वी तारीख होय.

● ● ●

# २ बोअर युद्ध

## हिंदी लोकांनीं काय करावें ?

( इतिहास खंड १, प्र. ९ वरून. अनुसंधानः आत्मकथा खंड ३, प्र. १०. )

या प्रसंगीं दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांनीं काय करावें ? हा महान् प्रश्न त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला. बोअर लोकांपैकीं एकन् एक पुरुष लढाई-वर गेला होता. वकिलांनीं वकिली सोडली, शेतकऱ्यांनीं आपल्या शेतीभातीची रजा घेतली, व्यापाऱ्यांनीं व्यापार बंद ठेवला; नोकरांनीं नोकरीवर पाणी सोडलें. इंग्रजांपैकींहि, बोअरांइतके नाहींत तरी केप कॉलनी, नाताळ व ऱ्होडेशिया येथील अनेक घरंदाज लोक स्वयंसेवक बनले. मोठे मोठे इंग्रज वकील व इंग्रज व्यापारी त्यांत सामील झाले. नामांकित वकिलांपैकीं बहुतेकजण लढाईच्या कामांत गुंतून गेले. हिंदी लोकांवर जे आक्षेप घेण्यांत येत त्यांपैकीं एक असा होता कीं, " हे लोक दक्षिण आफ्रिकेमध्यें फक्त पैसे गोळा करावयाला येतात, आपल्यावर ( इंग्रजां-वर ) हे निव्वळ भाररूप आहेत. आणि ज्याप्रमाणें वाळवी लांकडांत शिरून पोखरून पोकळ करून टाकते त्याप्रमाणें हे लोकहि आमचीं काळजें पोखरून खायलाच आलेले आहेत. देशावर परचक्र आलें, घरेदारें लुटलीं जाण्याचा प्रसंग आला, तर अशा प्रसंगीं त्यांचा कांहीं एक उपयोग होण्यासारखा नाहीं. परचक्रापासून आमचें आम्हांलाच रक्षण केलें पाहिजे. आणि शिवाय यांचेंहि रक्षण केलें पाहिजे. " हा आक्षेपहि आम्ही सर्व हिंदी लोकांनीं विचारांत घेतला. या आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं हें दाखवून देण्यास ही चांगली संधि आहे असें आम्हां सर्वांस वाटलें. पण दुसऱ्या बाजूनें पुढीलप्रमाणेंहि विचार करावा लागला.

" बोअर काय आणि इंग्रज काय, दोघेहि सारखाच आमचा छळ करतात. ट्रॅन्सवालमध्यें आपत्ति आहेत, आणि नाताळ कॅंपमध्यें नाहींत असें थोडेंच आहे ? फरक असला तर अंशांचा. शिवाय तुम्हांला गुलामवर्गाप्रमाणें समजण्यांत येतें. बोअरांसारखे अवघे मूठभर लोक केवळ आपल्या अस्तित्वासाठीं झगडतात हें आपल्याला दिसतें. असें असतां त्यांचा नाश करण्याच्या कामीं आम्हीं हातभार कां बरें लावावा ? आणि अखेरीस केवळ व्यवहारदृष्टीनें पाहिलें, तरी बोअरांचाच पराजय होणार आहे, असें कोणीहि सांगूं शकणार नाहीं. ते जिंकले तर आमचें उट्टें काढायला थोडेंच कमी करणार आहेत ? "

हा युक्तिवाद जोरानें प्रतिपादणारा आमच्यामध्यें एक पक्ष होता. मला स्वतःलाहि हें म्हणणें समजत होतें. त्याला योग्य तेवढें महत्त्वहि मी देत होतों.

तरीसुद्धां मला तो योग्य वाटला नाहीं, आणि या युक्तिवादांतील मुद्द्याचें प्रत्युत्तर मीं स्वतःच्या मनाला व ज्ञातिबांधवांना पुढीलप्रमाणें दिलें:—

"दक्षिण आफ्रिकेंत आम्ही राहात आहों ते फक्त ब्रिटिश प्रजाजन म्हणून. प्रत्येक अर्जामध्यें आम्हीं ब्रिटिश प्रजा या नात्यानेंच हक्क मागत आलों आहों. ब्रिटिश प्रजा असल्याबद्दल आपल्याला अभिमानहि वाटतो, किंवा वाटतो असें राज्याधिकाऱ्यांना आम्ही दर्शविलें आहे. अधिकाऱ्यांनीं आमच्या हक्कांचें समर्थन केलें तेंहि आम्ही ब्रिटिश प्रजा होतों म्हणूनच. आणि जे कांहीं हक्क राहिले:आहेत तेहि ब्रिटिश प्रजा होतों म्हणूनच. इंग्रज आपल्यावर जुलूम करतात एवढ्यासाठीं त्यांचीं आणि आमचीं घरेंदारें जाण्याचा प्रसंग आलेला असतांहि आम्ही तटस्थपणें तमाशा पाहात बसावें हें माणुसकीला शोभणार नाहीं. एवढेंच नव्हे तर त्यामुळें आपण आपल्या दुःखामध्यें आणखी भर घालणार आहों. जो आरोप आपण खोटा म्हणतों तो खोटा असल्याचें दाखवून देण्याची सुसंधि आपल्याला अनायासें प्राप्त झाली आहे. ती हातची जाऊं देणें म्हणजे आपल्याच तोंडानें आरोपाची कबुली दिल्याप्रमाणें होईल. आणि मग आपल्यावर अधिक दुःखें येऊन पडलीं किंवा इंग्रजांनीं आमच्यावर वक्रदृष्टि ठेवली, तर नवल नाहीं; तें आमच्याच कर्माचें फळ म्हणावें लागेल. "इंग्रजांचे जेवढे म्हणून आरोप आहेत ते सगळेच निराधार आहेत; त्यांना जबाब देण्यासारखेंहि त्यांत कांहीं नाहीं"— असें म्हणणें म्हणजे स्वतःची फसवणूक करून घेण्याप्रमाणें आहे. आपण ब्रिटिश साम्राज्याचे गुलामांसारखे आहों हें खोटें नव्हे; परंतु आजपर्यंतचें आपलें धोरण साम्राज्यांत राहूनच गुलामी तेवढी काढून टाकण्याचें आहे. हिंदुस्थानचे सर्व पुढारीहि याच धोरणानें वागत आहेत. आपणहि याच धोरणानें आजवर चाललों. आणि ब्रिटिश राज्याचे एक घटक या नात्यानेंच जर आपल्याला आपली स्वतंत्रता व उन्नति साधावयाची असेल तर या वेळीं आपणहि लढाईमध्यें तनमनपूर्वक मदत करावी. हीच तसें करण्याची सोन्यासारखी संधि आहे. बोअर पक्ष हाच न्यायाचा पक्ष आहे हें बहुतांशीं कबूल करावें लागेल. पण राज्यामध्यें राहिल्यानंतर मग प्रत्येकजणानें स्वतःच्या स्वतंत्र विचारांप्रमाणें वागावयाचें हें जुळण्यासारखें नाहीं. अधिकारी लोक जें जें करतात तें सगळेंच रास्त असेल असें व्हायचें नाहीं. तरीसुद्धां प्रजा जोंपर्यंत अमुक एक राजसत्ता मान्य करीत असेल, तोंपर्यंत त्या राजसत्तेच्या कृत्यांशीं सामान्यपणें मिळतें घेणें आणि त्यांना मदत करणें हा प्रजेचा स्पष्ट धर्म आहे.

"शिवाय प्रजेपैकीं एकाद्या विशिष्ट वर्गाला राजसत्तेचें अमुक एक कृत्य अनीतिमय वाटत असलें तरीहि त्या कृत्यामध्यें विघ्न घालण्यापूर्वीं किंवा विघ्न घालणारांना मदत करण्यापूर्वीं राजसत्तेला त्या अनीतीपासून पराङ्मुख करण्याचा

शिकस्तीचा प्रयत्न जीवाची पर्वा न करतांहि केला पाहिजे. तसें कांहींहि आपण केलेलें नाहीं. अशा तऱ्हेचा धर्म आपल्यापुढें उभाहि राहिलेला नाहीं, आणि अशा तऱ्हेच्या एकाद्या जाहीर कारणामुळें आपल्याला युद्धांत भाग घेतां येत नाहीं असें कोणीहि म्हटलेलें नाहीं. कोणाची तशी समजूतहि नाहीं. अर्थात् प्रजाजन या नात्यानें आपलें सामान्यपणें कर्तव्य हेंच कीं, युद्धाच्या गुणदोषांचा विचार न करतां, युद्ध झालें आहे त्या अर्थीं, यथाशक्ति मदत करावी. शेवटीं बोअर सरकारचा जय झाला आणि नाहींच होणार असें म्हणावयाला कांहींच आधार नाहीं, तर आपण आगींतून निघून फोफाट्यांत पडूं. आणि मग ते आमचें यथेच्छ उट्टें काढतील, असें म्हणणें किंवा मानणें म्हणजे बहाद्दर बोअर लोकांना व आपणा स्वतःलाहि अन्याय करण्याप्रमाणें आहे. तें तर निव्वळ आपल्या नामर्दपणाचें लक्षण म्हणावें लागेल. अशा तऱ्हेचा विचारहि मनांत येऊं देणें म्हणजे राजनिष्ठेला काळिमा आणण्याप्रमाणें आहे. एकहि इंग्रज क्षणभर तरी असा विचार करील का, कीं इंग्रज हरले तर आपली स्वतःची काय गत होईल? रणक्षेत्रांत पाऊल टाकल्यावर मग स्वतःच्या माणुसकीला फांटा दिल्याशिवाय असा युक्तिवाद करतांच यावयाचा नाहीं.

हा युक्तिवाद मीं १८९८ सालीं केला आणि त्यांत यत्किंचित्‌हि फेरफार केला पाहिजे असें आजहि मला वाटत नाहीं. म्हणजे ब्रिटिशराजनीतीबद्दल जी आसक्ति मला त्या वेळीं वाटत होती, आणि ब्रिटिशांच्या छत्राखालीं राहूनच आमची स्वतंत्रता मिळण्यासंबंधीं जी आशा मला त्या वेळीं वाटत होती ती आसक्ति व ती आशा जर आजहि कायम असेल तर मी अक्षरशः हाच युक्तिवाद दक्षिण आफ्रिकेमध्यें करीन, व तशाच तऱ्हेच्या प्रसंगीं हिंदुस्थानांतहि करीन. या युक्तिवादाविरुद्ध अनेक उत्तरपक्ष मीं दक्षिण आफ्रिकेमध्यें ऐकले व त्यानंतर विलायतेमध्यें ऐकले, तरीहि आपल्या विचारांत फेरफार करण्याचें यत्किंचितहि कारण मला दिसलेलें नाहीं. माझ्या आजच्या विचारांचा प्रस्तुत विषयाशीं कांहीं संबंध नाहीं हें मी जाणून आहें. वर दर्शविलेले भिन्न विचार नमूद करण्याला दोन सबळ कारणें आहेत. एक तर असें कीं, हें पुस्तक घाईघाईनें वाचून टाकणारा वाचक तें ध्यानपूर्वक सबुरीनें वाचील अशी अपेक्षा मला करतां येत नाहीं. अशा तऱ्हेच्या वाचकाला माझ्या आजच्या चळवळीचा वरील विचारांशीं मेळ घालणें कठिण पडेल; दुसरें कारण असें कीं, या विचारपद्धतीच्या पाठीशींहि सत्याचाच आग्रह आहे. आपण जसें आंत असूं तसेंच बाहेर दिसावें, आणि त्याप्रमाणें वागावें, ही धर्माचरणाची शेवटची पायरी नसून पहिली पायरी आहे. या पायाखेरीज धर्माची इमारत उभी होणें अशक्य आहे.

●●●

# आमचें प्रकाशन

**महात्मा गांधी**

१ सत्याचे प्रयोग ९
२ संयम कीं स्वैराचार ! १।।।
३ संपूर्ण स्वदेशी २।
४ गांधीजींचें मानस ४
५ दिल्ली-डायरी ६

**पं. जवाहरलाल नेहरू**

१ आत्मचरित्र १२।।
२ संक्षिप्त आत्मकथा (सचित्र) १।=

**साने गुरुजी**

१ भारतीय संस्कृति ३
२ विश्राम १।।
३ गीता-हृदय ०।।।०
४ मानवजातीची कथा ८
५ पत्री ३।।
६ विनोबाजी भावे १

**शंकरराव देव**

१ उपनिषदांतील दहा गोष्टी ०।।।०
२ भगवान् बुद्धासाठीं ३।।
३ उपनिषत्सार ३

**प्रा. न. र. फाटक**

१ भारतीय राष्ट्रवादाचा विकास ४।।

**डॉ. राधाकृष्णन्**

१ हिंदुधर्मांचीं मूलतत्त्वें २।।
२ गांधीजींचें विविध दर्शन २।।
३ संस्कृतीचें भवितव्य १।
४ महात्मा गौतम बुद्ध १।

**आचार्य जावडेकर**

१ अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ? २
२ हिंदु-मुसलमान-ऐक्य ३
३ वाल्मीकि-आश्रमांतील प्रवचनें १

४ पुरोगामी साहित्य २
५ लो. टिळक व म. गांधी २

**आचार्य भागवत**

१ जीवन आणि साहित्य २।।

**खलिल जिब्रान**

१ जीवन-दर्शन १।।।
२ प्रवासी २
३ पैगंबराचा बगीचा १।।

**ना. ग. जोशी**

१ विश्वमानव २।

**जयप्रकाश नारायण**

१ समाजवादच कां ? २

**काकासाहेब कालेलकर**

१ हिमालयांतील प्रवास २।।
२ जिवंत व्रतोत्सव ३।।।
३ हिंदूंचें समाजकारण २।

**आचार्य कृपलानी**

१ निवडक लेख व भाषणें ३

**नरहरिभाई परीख**

१ यंत्राची मर्यादा २।।

**प्रेमा कंटक**

१ सत्याग्रही महाराष्ट्र ३

**रवीन्द्रनाथ ठाकुर**

१ प्राचीन साहित्य १।।

**बाबू राजेंद्रप्रसाद**

१ द्विखंड हिंदुस्थान ११

**गो. आ. देशपांडे**

१ कॉंग्रेस-कथा ४।।

**रा. द. रानडे**

१ ज्ञानेश्वरी-अंतरंग २।।

**रोहिणी भाटे**

१ माझी नृत्यसाधना (सचित्र) ५